# आधुनिक जर्मनीची उत्क्रांति

लेखक

नारायण कृष्ण आगाशे, बी. ए., एल्एल्. बी.

हायकोर्ट वकील, सातारा

व

'इंग्लंडांतील प्रधान मंडळ,' 'डॅनियल ओकॉनेलचें चरित्र,'

'राजकीयदृष्ट्या इतिहासाचें महत्त्व'

व इतर संकीर्ण लेख

यांचे कर्ते

---



सोल एजंट्स

**धि प्रिंटिंग एजन्सी**

**बुधवार पेठ, पुणें**

---

शक १८३७ सन १९१५

---

किंमत दीड रुपया



# प्रस्तावना

“ क्लेशः फलेन हि पुनर्नवतां विधत्ते ”

प्रस्तुतचें युरोपांतील महायुद्ध सुरू झाल्यानंतर जर्मनीची माहिती मिळविण्याची इच्छा अनेक लोकांबरोबर माझ्याहि मनांत उद्भवली. ती पूर्ण करण्याच्या हेतूनें मि. डॉसन यांचा “ The Evolution of modern Germany ” हा ग्रंथ मीं आणविला. त्याचा बराचसा भाग वाचून झाल्यावर त्याच्या आधारानें मराठींत एखादें पुस्तक लिहावें असें मनानें घेतलें व त्याप्रमाणें पुस्तक लिहिण्यास सुरुवात केली. पहिलीं चार प्रकरणें लिहून झाल्यानंतर तीं येथील विविध-व्याख्यानमालेंत १९१४ च्या डिसेंबर महिन्यांत वाचून दाखविलीं. नंतर कांहीं प्रेमळ मित्रांच्या प्रोत्साहनानें सबंध पुस्तक लिहिण्याचा मीं संकल्प केला, व परमेश्वरकृपेनें तो सिद्धीस गेला.

मि. डॉसनचा ग्रंथ १९०८ सालीं प्रथम प्रसिद्ध झाला. ग्रंथकर्त्याच्या देखरेखीखालीं पुढें त्याच्या तीन आवृत्त्या निघाल्या. शेवटची आवृत्ति १९१४ त प्रसिद्ध झाली. १९०८ सालीं प्रथम ग्रंथ लिहून झाल्यावर पुढील आवृत्त्यांत ग्रंथकारानें कांहीं फेरफार केला नाहीं, यामुळें मि. डॉसननें दिलेली माहिती १९०८ सालापूर्वीची आहे हें उघड आहे. मूळ ग्रंथकाराच्या प्रस्तावनेचें सार मीं आपल्या पुस्तकांत शेवटीं दिलें आहे, व त्यावरून मि. डॉसनचा प्रस्तुत ग्रंथ लिहिण्यांत कोणता हेतु होता हें स्पष्ट दिसतें. माझा स्वतःचा हेतु त्याहून भिन्न नाहीं. उद्योगधंद्यांत फार मागें असलेल्या हिंदुस्तानांतील

लोकांनां जर्मनीची तद्विषयक माहिती झाली तर फार उपयोग होईल असें मला वाटल्यावरून मी हें पुस्तक लिहिण्यास प्रवृत्त झालों.

मूळ ग्रंथाचीं बारीक टाइपांत छापलेलीं ४९७ पानें आहेत. त्यांतील माहिती या पुस्तकाच्या ३५७ पानांमध्यें देण्याचा मीं यत्न केला आहे, व तो कितपत सिद्धीस गेला आहे हें वाचकांनीं ठरवावयाचें आहे. मूळ इंग्रजी ग्रंथ ज्यांनीं वाचला असेल त्यांनांच या कामांत खरें मत देतां येईल. आणि अशा गृहस्थांनां माझें पुस्तक पसंत पडलें तर माझ्या श्रमाचें चीज झालें असें मीं समजेन.

आधारभूत ग्रंथाचा क्रम मीं कोठेंहि सोडलेला नाहीं. शेवटचें प्रकरण मात्र सबंधच्या सबंध 'जर्मनी' नांवाच्या एका जर्मन अमेरिकन गृहस्थानें लिहिलेल्या ग्रंथांतून घेतलें आहे. कांहीं इंग्रजी शब्द जसेच्या तसे वापरले आहेत; परंतु ते सर्वांच्या परिचयाचे असल्यानें निवळ मराठी जाणणारांनां देखील त्यांपासून अडचण होण्याचा संभव नाहीं. जर्मन भाषेचें मला मुळींच ज्ञान नाहीं, शब्दांच्या उच्चाराची पद्धति माहीत नाहीं, यामुळें जर्मन स्थळांचीं व व्यक्तींचीं नांवें मराठींत आणतांनां अनेक चुका होणें अपरिहार्य आहे. फर्गसन कॉलेजांतील जर्मनींत जाऊन आलेले डॉ. गुणे यांच्या लेखांतून मिळतील तितके उच्चार घेतले आहेत, परंतु तेवढ्यानें माझी सगळी गरज भागलेली आहे असें नाहीं.

जर्मन भाषाज्ञानाच्या अभावीं जर्मनीसंबधीं माहिती मिळवावयाची झाली तर ती इंग्रज ग्रंथकारांच्या ग्रंथांतूनच मिळविली पाहिजे हें उघड आहे. अशा ग्रंथांत पक्षपातित्वाची झांक थोड्याबहुत प्रमाणानें यावी हें मनुष्यस्वभावाला अनुसरूनच आहे. परंतु मि. डॉसन यांनीं अशा तऱ्हेचा आक्षेप आपल्यावर येऊं नये म्हणून शक्य तितकी खटपट केली आहे. पहिल्या प्रकरणांतील त्यांचे विचार सर्वांनां कदाचित् पटणार नाहींत; परंतु इतर बाबतींत असा मतभेद होण्याचा संभव फारच थोडा आहे, असें मला वाटतें.

जर्मनीचा पूर्वेतिहास व इतर माहिती उपोद्घाताच्या रूपानें पुस्त-

काच्या आरंभीं संक्षेपतः दिली आहे, व वाचकांनां पुस्तकांतील विषय समजण्याला तिचा बराच उपयोग होईल असें वाटतें. उपोद्घातांतील विषय सर्व पुस्तकभर इतस्ततः व विशेषेंकरून २१ व्या प्रकरणांत आलेले आहेत. परंतु ते संकलित करून पुस्तकाच्या आरंभालाच दिले तर वाचकांची अधिक सोय होईल, असें मला एका विद्वान् गृहस्थांनीं सुचविल्यावरून ही योजना केली आहे.

प्रस्तुतसारखीं परदेशीय माहितीसंबंधींचीं पुस्तकें वाचतांना वाचकांच्या डोळ्यांसमोर त्या देशाचा नकाशा असणें अनेक दृष्टींनीं जरूर व हितावह असतें; म्हणून मुद्दाम जर्मनीचा मराठी नकाशा तयार करून तो या पुस्तकास जोडला आहे.

हें पुस्तक लिहीत असतां मला ज्या इंग्रजी ग्रंथांचा उपयोग झाला, त्यांची यादी पुढें दिली आहे. हीं पुस्तकें फार चांगलीं आहेत. इंग्रजी जाणणारांनीं तीं अवश्य वाचावीं अशी माझी शिफारस आहे.

मासिक मनोरंजनांत डॉ. गुणे, "आजकालचे जर्मन लोक" या मथळ्याखालीं व लोकशिक्षणांत इसलामपुरचे माझे मित्र रा. मुंडले हे "जर्मन साम्राज्याचें अंतरंग" या मथळ्याखालीं, या विषयासंबंधानें लेख लिहीत आहेत. प्रिन्सिपल पाध्ये यांच्या "जगांतील घडामोडीं"त जर्मनीसंबंधानें पुष्कळ माहिती आली आहे. डॉ. गुणे व प्रि. पाध्ये यांचे लेखांतून कांहीं मजकूर मीं उपोद्घातांत व एकोणिसाव्या प्रकरणांत जरूरीपुरताच उद्धृत केला आहे. वरील लेखकांनां प्रस्तुतच्या युद्धामुळेंच हा विषय हातीं घ्यावासा वाटला असेल यांत शंका नाहीं. वाइटाचा केव्हां केव्हां चांगला परिणाम होतो, याचें हें एक ढळढळीत उदाहरण आहे.

प्रस्तुत पुस्तक १९१५ च्या एप्रिलअखेर लिहून तयार झालें. परंतु येथें छापण्याची सोय नसल्यानें परठिकाणीं तें मला छापून घ्यावें लागलें; यामुळें तें प्रसिद्ध होण्याला थोडासा अवकाश लागला. तथापि पुण्यांतील 'धि प्रिंटिंग एजन्सी'चे उत्साही चालक रा. रा. रामकृष्ण दत्तात्रेय पराडकर यांची व माझी जर गांठ पडली नसती तर आजला देखील हें पुस्तक छापून

तयार झालें असतें किंवा नाहीं याची शंकाच आहे. रा. पराडकर यांच्या सदर एजन्सीनें पुस्तक छापण्याच्या, प्रुफें तपासण्याच्या व इतरहि कामांत मला जी मदत केली ती बहुमोलाची आहे, आणि त्याबद्दल मी त्यांचा फार आभारी आहें.

पुस्तकाची हस्तलिखित प्रत ज्या माझ्या मित्रांनीं वाचली व मला वेळोवेळ महत्त्वाच्या सूचना केल्या, त्यांचाहि मी अत्यंत ऋणी आहें. केवळ त्यांच्या आग्रहावरून मी त्यांचीं नांवें येथें देत नाहीं; असो. शेवटीं ज्या परमेश्वराचे कृपेनें, अंगांत अवसान नसतांनां, हातांत घेतलेलें काम शेवटास गेलें, त्याची अनन्य भावानें प्रार्थना करून ही प्रस्तावना पुरी करतों.

सातारा
ता. ४।११।१५

**ना० कृ० आगाशे.**

---

# OTHER WORKS CONSULTED


1. Germany—The Welding of a world-power by wolf Von Schierbrand ( 1903 ).
2. Germany and its Evolution in Modern Times, by Lichtenberger ( 1913.)
3. Germany and German Emperor, by G. H. Perris ( 1914).

# आधुनिक जर्मनीची उत्क्रांति

## विषयानुक्रमणिका

---

# मूळ ग्रंथांतील प्रस्तावनेचा सारांश

प्रस्तुतचा ग्रंथ लिहिण्यास बऱ्याच वर्षांपूर्वी सुरुवात केली होती, परंतु दरम्यान कांहीं अपरिहार्य अडचणी प्राप्त झाल्यामुळें तो पुरा होण्यास बराच अवकाश लागला. या अवकाशांत नवीन नवीन माहिती पुष्कळ उपलब्ध झाली, व तिच्या साहाय्यानें ग्रंथांत केलेलीं विधानें व काढलेलीं अनुमानें बरोबर आहेत किंवा नाहींत हें अजमावून पाहण्यास आयती संधि मिळाली; आणि या दृष्टीनें पुस्तक पुरें होण्यास दिनावधि झाला ही एक फायद्याचीच बाब झाली.

प्रस्तुत पुस्तकाच्या नांवावरूनच लेखकाचा काय हेतु आहे हें स्पष्ट कळण्याजोगें आहे. पन्नास वर्षांपूर्वीच्या जर्मनीचें प्रस्तुत दिसून येणारें रूपांतर कसें कसें होत गेलें, हें दाखविण्याचा ग्रंथकाराचा प्रधान हेतु आहे. हें रूपांतर सांपत्तिक बाबतींत विशेष झालें आहे, आणि म्हणून या विषयाचाच या ग्रंथांत विशेष विचार केला आहे. जर्मन साम्राज्याचा खुद्द देशांतल्या देशांत व अन्यत्र कसा प्रसार होत गेला याचेंहि प्रसंगानुसार विवेचन केलें आहे. ब्रिटिश राज्यांत ज्या सांपत्तिक प्रश्नांचा सध्यां चोहोंकडे विचार चालू आहे, त्या प्रश्नांचा निकाल समाधानकारक रीतीनें लावण्याच्या कामांत या ग्रंथांतील माहितीचा उपयोग व्हावा या हेतूनें ती संकलित केलेली नाहीं, हें येथें सांगणें जरी जरूर नाहीं तरी पण इष्ट आहे असें वाटतें. पुस्तकांतील निरनिराळे विषय साधारण ज्ञानाच्या माणसाला समजतील अशा पद्धतीनें लिहिण्याचा यत्न केला आहे. कांहीं ठिकाणीं आंकड्यांची विशेष माहिती देणें जरूर वाटल्यावरून ती तशी दिली आहे, आणि तीवरून जर्मनीची व्यापारांत व उद्योगधंद्यांत कशी प्रगति होत गेली हें तेव्हांच ध्यानांत येईल, असा लेखकास भरंवसा आहे.

उद्योगधंदे आणि मजूरी या दोन मुद्द्यांसंबंधानें जर्मनीची अवास्तव स्तुति किंवा निंदा करण्याचा या पुस्तकाचा हेतु नाहीं. व्यापारी राष्ट्र या नात्यानें जर्मनी आपल्याला जसा दिसतो तसाच तो दाखविण्याचा यत्न केला आहे. व्यापारांत यश मिळविण्याकरतां जर्मन लोकांनीं किती परिश्रम केले, व मोठ्या उत्साहानें किती अचाट उद्योग केले, हें ब्रिटिश लोकांनां कळावें, व इतक्या अल्प काळांत जर्मनीची जी औद्योगिक उन्नति झाली तिचें खरें रहस्य काय आहे हें त्यांच्या पुरतेपणीं ध्यानांत यावें, हा ग्रंथकाराचा हेतु आहे; त्यांनां हिणविण्याचा किंवा नाउमेद करण्याचा नाहीं. कारण जर्मनीची औद्योगिक प्रगति झाली ती गुप्तमार्गानें थोडीच झालेली आहे? त्यांनीं ज्या मार्गांचा व उपायांचा अवलंब केला ते मार्ग व उपाय सर्वांनां सारखेच खुले आहेत, ज्याला वाटेल त्यानें त्यांचा अंगीकार करावा. जगाच्या बाजारांत जर्मनीनें जें अग्रस्थान मिळविलें आहे त्याचीं कारणें शास्त्र, शिक्षण, दीर्घोद्योग, आणि लहान व मोठ्या बाबतींत सारखें लक्ष्य हीं होत. ज्या राष्ट्रानें यांपैकीं एकाकडे कां होइना पण दुर्लक्ष्य केलें, त्याची मात्रा जर्मन लोकांपुढें चालेनाशी झाली असें अनुभवान्तीं सिद्ध झालें आहे.

जर्मनीची औद्योगिक चढाओढ पूर्णत्वाला पोंचली आहे असा ग्रंथकाराचा समज नाहीं; उलट ती अल्पकाळांत आणखी बळावेल असा त्याचा अजमास आहे. हा अजमास बरोबर आहे असें दाखविणारीं अनेक कारणें आहेत. त्यापैकीं एक हें आहे कीं, जर्मन उद्योगधंदे अजून बाल्यावस्थेंत आहेत. दुसरें कारण असें आहे कीं, युरोपांतील कोणच्याहि इतर राष्ट्रानें व्यापारांत आजपर्यंत जर्मनीइतकें लक्ष्य घातलें नाहीं. जर्मन राष्ट्राचे मात्र सर्व विचार व उद्योग प्रस्तुत एकतानतेनें या दिशेनें चालू आहेत. या म्हणण्याचा अर्थ असा नाहीं कीं, जर्मन कारखानदार अथवा व्यापारी आपल्या प्रतिस्पर्ध्यापेक्षां गुणांनीं

श्रेष्ठ आहे. त्याचा जो गुण आहे तो हा कीं, आपलें सगळें लक्ष्य तो आपल्या धंद्यांत घालतो, इतरांत इतका एकाग्रपणा दिसून येत नाहीं; उलट, एकाग्रता हा एकप्रकारचा दोषच आहे असें मानण्याची कांहींची प्रवृत्ति आहे. तात्त्विक विचारांत मग्न झालेला 'पूर्वीचा ट्युटोनिकस' जाऊन त्याच्या जागीं क्रियावान ट्युटोनिकस सांप्रत येऊन बसला आहे; आणि आधिभौतिक संपत्तीकडे त्याचा ओढा असल्यानें त्या दिशेनेंच त्याचे सर्व उद्योग चालू आहेत. शिवाय, लोकसंख्या वाढत चालल्यानें व युरोपियन लोकांनीं वस्ती करण्याला लायक अशा वसाहतींचा अभाव असल्यानें, जर्मन औद्योगिक स्पर्धा भावी काळांत विशेषच बळावेल. आमचें हें भविष्य वस्तुस्थितीला अनुसरून आहे व ही वस्तुस्थिति कोणच्या स्वरूपाची आहे याचें विवेचन प्रस्तुत ग्रंथाच्या सतराव्या प्रकरणांत पूर्णपणें केलें आहे.

औद्योगिक बाबतींत दीर्घ उद्योग करण्याकडे मनाची प्रवृत्ति होण्याला आणखी एक पुढें दिलेलें कारण आहे, पण त्याकडे लोकांचें जावें तितकें लक्ष्य गेल्याचें दिसत नाहीं. हें कारण जर्मनीला मागें उपयोगीं पडलें आणि पुढेंहि उपयोगीं पडेल. सरकारनें किंवा म्युनिसिपालिट्यांनीं लोकोपयोगी कामें आपल्या हातांत कोणचीं घ्यावीं व कोणचीं न घ्यावीं, हें धोरण जर्मनीनें जितकें बाळगलें आहे तितकें इतर कोणच्याहि देशानें बाळगलेलें नाहीं. रेल्वे आणि ट्रामवे, बंदरें, नद्या व कालवे यांवर चालणारा व्यापार, इन्शुअरन्स, बॅंकिंग इत्यादि लोकोपयोगी अनेक कामें सरकारनें किंवा म्युनिसिपालिट्यांनीं आपल्या अंगावर घेतलीं आहेत; त्यांपैकीं कांहीं सर्वस्वीं व कांहीं अंशतः घेतलीं आहेत. ज्या देशांत ही व्यवस्था शक्य वाटत नाहीं, तेथील खाजगी लोकांचें भांडवल या कामांत गुंतविणें भाग पडतें; व त्यामुळें भांडवलवाल्यांना इतर उद्योगधंद्यांकडे लक्ष्य देण्यास सवड होत नाहीं. जर्मनींत मात्र वर सांगित-

लेली सोय झाली असल्यानें खाजगी भांडवलवाल्यांनां आपलें लक्ष्य इतर उद्योगधंद्यांकडे लावण्यास वाव राहते. ब्रिटिश लोक या व्यवस्थेसंबंधानें काय म्हणतील ते म्हणोत, पण त्यांनां हें कबूल केलेंच पाहिजे कीं, तीमुळें जर्मनींत व्यापारच काय तो वाढला असें नसून त्याच्याबरोबर उद्योगधंदेहि अतोनात वाढले आहेत.

उलटपक्षीं, जर्मनीच्या चढाओढीमुळें जे लोक अगदीं गांगरून गेले आहेत, त्यांनां समाधान वाटण्याजोगीं कांहीं कारणें अस्तित्वांत येऊं लागलीं आहेत. जर्मन मजुरांनां आतांपर्यंत कमी पगार देऊन जास्ती वेळ त्यांच्याकडून काम करून घेतां येत असल्यानें जर्मन कारखानदाराला आपला माल तयार करण्याला हा वेळपावेतों कमी खर्च येत होता. परंतु भांडवलवाले आणि मजूर यांच्यामध्यें अलीकडे जी ओढाताण सुरू झाली आहे ती ध्यानांत घेतली म्हणजे कारखानदारांचे हे सुखाचे दिवस नेहमीं असेच पुढें चालू राहतील, असा भरंवसा वाटत नाहीं. जर्मनींतील माल म्हटला कीं तो स्वस्त असावयाचा, असा जो आजपर्यंतचा लौकिक आहे, तो हळूहळू नाहींसा करणारीं वेगवेगळीं कारणें उपस्थित होऊं लागलीं आहेत. तीं कारणें हीं कीं, तेथील लोकांनां पूर्वींची साधी रहाणी आतां आवडेनाशी झाली आहे, आणि पूर्वींपेक्षां जास्त पैसा त्यांनां आतां मिळूं लागला असला तरी तो खर्चून टाकण्याकडे त्यांच्या मनाची अधिक प्रवृत्ति झाली आहे. पूर्वींची काटकसर आणि स्वसुखाचा निरभिलाष नाहींसा झाल्यानें 'सुधारणा' 'सुधारणा' म्हणतात ती कदाचित् जास्त झाली असेल, परंतु या सुधारणेमुळें संपत्त्युत्पादनाचीं मुख्य साधनें जीं मजुरांचा पगार आणि वेतन, व्याज व नफा, यांत आजपर्यंत ज्या सवलती मिळत होत्या त्या यापुढें क्रमाक्रमानें मिळेनाशा होऊं लागतील.

जर्मन चढाओढीच्या प्रश्नाचा आपल्या देशबंधूंच्या हिताहिताच्या

## मूळ ग्रंथांतील प्रस्तावनेचा सारांश

दृष्टीनें ग्रंथकार विचार करूं लागला म्हणजे या बाबतींत विशेष काळजी करण्याचा प्रसंग येऊन ठेपला आहे, असें त्याला मुळींच वाटत नाहीं. आपल्या पूर्वजांनीं उद्योगधंद्यांत पूर्वी कसें यश संपादन केलें, हें त्यांनीं लक्ष्यांत आणावें; जीं राष्ट्रें आज आपल्याशीं वरचढपणा करीत आहेत, त्या राष्ट्रांनां औद्योगिक शिक्षणाचा पहिला ओनामा ब्रिटिश गुरूंनींच घालून दिला. पण शिष्यानें गुरूचा पराजय करावा हेंच विहित आहे, असें म्हणून शिष्याचें नुसतें कौतुक करण्यांतच ब्रिटिश लोकांनीं आनंद मानून स्वस्थ बसण्याचें सोडून दिलें पाहिजे. त्यांनीं आतांपासून पूर्वीचें आपलें श्रेष्ठ स्थान परत मिळविण्याचा जर मनापासून उद्योग केला तर त्यांनां हां हां म्हणतां यश येईल. हा उद्योग करतांनां आपल्या प्रतिस्पर्ध्यांबरोबर धिम्मेपणाचें वर्तन ठेवणें अगत्याचें आहे, त्यांत चिडखोरपणा किंवा आततायीपणा करतां कामा नये. अशी शांतवृत्ति ठेवून उद्योगीपणांत इतरांनां हार जावयाचें नाहीं, असा दृढनिश्चय जर केला तर पूर्वीच्या काळांत शांततेचे आणि सुधारणेचे जे अनेक विजय ब्रिटिश लोकांनीं मिळविले तशाच स्वरूपाचे विजय प्रस्तुत चढाओढीच्या काळांत देखील मिळविणें त्यांनां कठिण जाणार नाहीं.

# जर्मनीचा पूर्वेतिहास व इतर माहिती



जर्मनी, म्हणजे जर्मन लोकांनीं वसलेला युरोपांतील पूर्वीच्या काळचा प्रांत, हल्लीं 'जर्मन राज्य' म्हणून जें युरोपच्या नकाशांत दाखविलें जातें त्याच्यापेक्षां, विस्तारानें फार मोठा होता व आस्ट्रिया-हंगारींतील आस्ट्रियाचा त्यांत समावेश होत होता. १९ व्या शतकाचे पूर्वीं जर्मनीचें बादशाही पद आस्ट्रियाच्या सध्यां गादीवर असलेल्या हॅप्सबर्ग घराण्याकडे शेंकडों वर्षें होतें. सहाव्या शतकांत रोमन पादशाहीचा ट्युटॉनिक लोकांनीं विध्वंस केल्यापासून १२७३ सालापर्यंत जर्मनीचा बादशहा कोणीहि नव्हता असें म्हटलें तरी चालेल. त्या सालीं हॅप्सबर्ग घराण्यांतील रुडोल्फ हा बादशहा झाला. त्यानें १२७३ पासून १२९१ पर्यंत राज्य केलें. पुढें चवथ्या चार्ल्सच्या कारकीर्दींत (१३४७–७८) १३५६ सालीं जर्मनसंस्थानांस साम्राज्यांत जोडून, बादशाही पद चिरस्थायी करणारी 'गोल्डन बुल' (Golden bull) नांवाची सनद मुख्य धर्माधिकारी पोप याच्या मंजुरीनें अंमलांत आली. या सनदेअन्वयें जर्मनींतील जीं लहानमोठीं अनेक संस्थानें होतीं त्यांपैकीं फक्त सात संस्थानांनां बादशहा निवडण्याचा अधिकार मिळाला; आणि या अधिकाराचें चिन्ह म्हणून 'इलेक्टर' (निवड करणारे) ही पदवी त्या संस्थानांच्या राजांनां मिळाली. या सात संस्थानांपैकीं (१) आस्ट्रिया, (२) बव्हेरिया, (३) साक्सेन, (४) ब्रॅंडेनबर्ग येथें राजे राज्य करीत असत. परंतु बाकी राहिलेल्या तीन म्हणजे कोलोन, ट्रीव्झ आणि मेंझ येथें राजाच्या जागीं आर्चबिशप होते. या सातांत पुढें पॅलाटिनेट आफ-ऱ्हाइन (हॅनोव्हर ब्रन्सविक) हें आठवें संस्थान जास्त झालें. या सर्व संस्थानांत आस्ट्रियाचें संस्थान अनेक कारणांमुळें अत्यंत बलिष्ठ होतें. यामुळें बादशाही निवडणुकींत आस्ट्रियाचे इलेक्टरासच बादशहा निवड-

ण्याचा प्रघात पडला. पुढें पुढें या बादशहाचे वडील मुलासच बादशहा निवडण्याचा क्रम सुरू झाला. याप्रमाणें जर्मन बादशाही पद हें निवडणुकीनें प्रथम प्राप्त होत असे, तें कालांतरानें आस्ट्रिया-हंगारीच्या हॅप्सबर्ग राजघराण्यांतील वडील मुलाकडे वंशपरंपरेनें येऊं लागलें, व नेपोलियन बोनापार्टच्या वेळेपर्यंत असाच क्रम चालू राहिला.

सोळाव्या शतकांत प्रॉटेस्टंट धर्माची स्थापना झाली. त्या वेळेस उत्तरेकडील सर्व जर्मन संस्थानांनीं नवीन धर्म स्वीकारला व आस्ट्रियानें स्पेनबरोबर कॅथलिक धर्माच्या मुख्य प्रवर्तकाचे व संरक्षकाचें व्रत स्वीकारलें. त्या वेळेपासून जर्मनींत मोठी दुही माजून राहिली, व आस्ट्रियाच्या बादशाही सत्तेस विरोध उत्पन्न होऊं लागला. हॅप्सबर्ग घराण्याच्या हातून बादशाही पद हिरावून घेण्याचा विचार कित्येक महत्त्वाकांक्षी जर्मन संस्थानिकांनां सुचूं लागला. दुसऱ्या फ्रेडरिक बादशहाच्या कारकीर्दीत (१६१९–३७) तीस वर्षांचें युद्ध या नांवानें इतिहासांत प्रसिद्ध असलेलें युरोपांतील प्रॉटेस्टंट आणि कॅथलिक यांच्यामध्यें धर्माच्या बाबतींत तुमुल युद्ध झालें. या युद्धांत जर्मन संस्थानांत परस्पर वितुष्ट वाढेल असें फ्रान्सनें धोरण ठेवलें होतें. यामुळें या युद्धाच्या अखेरीस फ्रान्सनें जर्मनीचा कांहीं मुलुख आपल्या राज्यांत सामील केला व स्वित्झरलंडसारखीं कांहीं नवीन स्वतंत्र राष्ट्रें उदयास आलीं.

अशा तऱ्हेनें परस्परांत फूट पडलेल्या जर्मनीच्या अर्धवट अराजकतेच्या परिस्थितींत हल्लींच्या जर्मन बादशहाचें होहेन-झोलर्न घराणें उदयाला आलें. या राजघराण्यांतील पुरुषांची वंशावळ हल्लींच्या कायसरपर्यंत पुढें लिहिल्याप्रमाणें आहे:—

फ्रेडरिक वुइल्यम, ग्रेट इलेक्टर, १६४०–८८

फ्रेडरिक (तिसरा) इलेक्टर. १७०१ नंतर प्रशियाचा पहिला

फ्रेडरिक १६८८–१७१३ (मुलगा)

फ्रेडरिक वुइल्यम (पहिला) १७१३–४० (मुलगा)
फ्रेडरिक 'धी ग्रेट' (दुसरा) १७४०–८६ (मुलगा)
फ्रेडरिक वुइल्यम (दुसरा) १७८६–९७ (पुतण्या)
फ्रेडरिक वुइल्यम (तिसरा) १७९७–१८४० (मुलगा)
फ्रेडरिक वुइल्यम (चवथा) १८४०–६१ (मुलगा)
वुइल्यम (पहिला) १८६१–८८ (भाऊ)
फ्रेडरिक (तिसरा) १८८८ (मुलगा)
वुइल्यम (दुसरा) १८८८ (मुलगा) कायसर बादशहा.

होहेन-झोलर्न घराणें मूळचें सुआबिआ (Suabia) येथील राहणारें. हें ठिकाण स्विस् सरहद्दीपासून फार दूर नाहीं. या घराण्याचा पहिला पुरुष जो फ्रेडरीक तो न्युरेम्बर्ग शहराचा 'बरो काउंट' (Borough Count) होता. त्यानंतर १४११ सालीं दुसरा एक फ्रेडरिक झाला. त्यानें बादशहा सिगिसमंड याला कांहीं कर्जाऊ रकम दिली व शिवाय इतर प्रकारचीहि पुष्कळ मदत केली. याबद्दल खूष होऊन ब्रँडेनबर्गच्या इलेक्टरची बादशहानें त्याला पदवी दिली. बादशहा निवडण्याचा हक्क असणाऱ्या संस्थानिकांत ब्रँडेनबर्गचा इलेक्टर हा एक होता हें वर सांगितलें आहेच. या संस्थानानें प्रशियाची डयूकडम १६१८ सालीं मिळविली व त्याबरोबरच आसपासचे कांहीं अधिक प्रांतहि आपल्या ताब्यांत घेतले. वरील वंशावळींतील तिसरा फ्रेडरिक यानें १७०० सालीं हॅप्सबर्ग बादशहाच्या संमतीनें प्रशियाचा राजा ही पदवी मिळविली व तेव्हांपासून तो प्रशियाचा पहिला फ्रेडरिक या नांवानें प्रसिद्ध झाला. प्रशिया त्या वेळेस बादशहाच्या अमलाखालची एक "डची" (duchy) होती व तेथील लोक जर्मन रक्ताचे नव्हते. या नव्या राज्यांत एकंदर निरनिराळे सहा प्रांत होते व ते परस्परांशीं विलगपणानें वागत होते. हा विलगपणा नाहींसा करून प्रशियन राजाच्या अमलाखालीं

त्यांच्यांत ऐक्य उत्पन्न करणें हें काम हाइेन-झोलर्न्सवर येऊन पडलें व तें त्यांनीं उत्कृष्ट रीतीनें पार पाडलें. प्रशियन राज्याची इभ्रत दिवसानुदिवस वाढत चालली व खुद्द आस्ट्रियाबरोबर टक्कर देण्याचें सामर्थ्य प्रशियन राज्यांत आलें. १७४० सालीं आस्ट्रिया हंगारीचा हॅप्सबर्ग घराण्यांतील राजा व जर्मनीचा बादशहा सहावा चार्लस मरण पावला व त्याच्या पश्चात् त्याच्या गादीचा वारसा त्याची मुलगी मराया थेरेसा इच्याकडे आला. शेजारच्या संस्थानिकांना ही गोष्ट कबूल नव्हती व त्यामुळें " वॉर ऑफ आस्ट्रियन सक्सेशन " नांवाचें युद्ध सुरू झालें. या युद्धांत प्रशियाचा राजा प्रसिद्ध फ्रेडरिक दि ग्रेट यानें आपला हात शिरकविला आणि सायलीशिया नांवाचा आस्ट्रियाचा प्रांत आपल्या राज्यांत सामील केला. फ्रेडरिक दि ग्रेट हा राजा फार शूर, धाडसी आणि राजकारणपटु होता. त्याच्या सैन्याची तयारी जय्यत होती. त्याच्या कारकीर्दींत प्रशियन युनिव्हर्सिट्यांची स्थापना होऊन भाषाशास्त्रवेत्ते, तत्त्ववेत्ते, शास्त्रज्ञ लोक आणि कायदेपंडित तयार होऊं लागले. लष्करांत त्यानें त्या वेळेस जी कडक शिस्त ( iron discipline ) सुरू केली, ती आजमित्तीला कायम आहे. फ्रेडरिकची अशी तयारी पाहून मराया थेरेसानें पडती बाजू घेतली आणि सायलीशिया प्रांत प्रशियाकडेच रहावा असें वेस्ट फालिया येथिल तहांत ठरलें. प्रशियाचें सामर्थ्य दिवसानुदिवस वाढत चाललेलें पाहून शेजारच्या राष्ट्रांत मत्सर उत्पन्न झाला व रशिया फ्रान्स आणि आणि आस्ट्रिया यांनीं प्रशियाला पादाक्रांत करून तें राज्य आपआपसांत वांटून घेण्याचा मनसुबा कायम केला. फ्रेडरिकनें इंग्लंडचें साहाय्य मागितलें आणि यामुळें सात वर्षांचें ( १७५६ ते १७६३ पर्यंतचें ) घनघोर युद्ध सुरू झालें व त्यांत प्रशियाचा व इंग्लंडचा जय झाला. सदरच्या युद्धांत प्रशियन सैन्यानें फ्रेडरिकच्या नेतृत्वाखालीं अवर्णनीय पराक्रमाचीं कामें केलीं. प्रशियन लोकांत आत्मविश्वास उत्पन्न झाला.

व इतर राष्ट्रांवरहि त्यांचा चांगला वचक बसला. आस्ट्रियाचें आपल्या मानेवरील जूं एकदां कायमचें झुगारून द्यावें अशी त्यांच्या मनांत इच्छा उत्पन्न झाली. परंतु फ्रेडरिक दि ग्रेटच्या पश्चात् जे प्रशियन राजे झाले त्यांच्यांत कर्तृत्वशक्ति मुळींच नव्हती. यामुळें ही इच्छा जागच्या जागीं दाबून टाकणें लोकांनां भाग पडलें; इतकेंच नाहीं, तर त्यांचें परस्परांतील ऐक्यहि नाहींसें झालें. पुढें नेपोलियन नें आस्ट्रिया व प्रशिया या उभयतांस युद्धांत जिंकलें आणि आपल्या अमलाखालीं 'कान्फिडरेशन ऑफ ऱ्हाइन' ही राजव्यवस्था जेना येथील लढाईनंतर अमलांत आणिली. वाटर्लूच्या लढाईनंतर नेपोलियनची राज्यव्यवस्था बंद पडली व पुनः आस्ट्रियाच्या प्रभुत्वाखालीं जर्मन साम्राज्य स्थापित झालें.

व्हाएना येथील कांग्रेसमध्यें होहेन-झोलर्नूसचें विशेष तेज पडलें नाहीं. त्या कांग्रेसनें पूर्वींच्या त्यांच्या पोलिश प्रांतांपैकीं कांहीं प्रांत आणि ऱ्हाइन नदीच्या कांठचे एकमेकांपासून तुटक असे कांहीं नवे प्रांत त्यांनां दिले. यानंतर पुढील कांहीं वर्षेपर्यंत ग्रेट इलेक्टरच्या कारकीर्दींत जशी प्रशियन राज्याची स्थिति होती तशी स्थिति चालू झाली. वाटर्लूच्या लढाईत ड्यूक ऑफ वेलिंगटनच्या बरोबरीनें प्रशियन सेनापति ब्लूचर यानें पराक्रम गाजविला; परंतु १८१५ पासून तों १८६४ अखेर प्रशियन सैन्य आपल्या राज्याच्या बाहेर कोठेंहि चमकलें नाहीं. सर्व राज्यांत जिकडे तिकडे औदासीन्य पसरलेलें दिसत होतें. राजकीय बाबतींत जर्मनींतील बरेच संस्थानिक व खुद्द प्रशिया देखील आस्ट्रियाच्या तंत्रानें वागूं लागला. १८४८ मध्यें फ्रांकफोर्ट येथें भरलेल्या सभेनें त्या वेळेचा प्रशियाचा राजा फ्रेडारिक वुइल्यम (चौथा) याला जर्मन राज्याचें प्रभुत्व देऊं केलें, पण तें त्यानें पतकरलें नाहीं; इतकेंच नाहीं, तर ऑलमुट्स (Olmütz) येथील परिषदेंत आपण आस्ट्रियाच्या सत्तेला विरोध करणार नाहीं असें त्यानें अभिवचन दिलें. ही स्थिति लक्ष्यांत घेऊन

प्रशियांतील या इतिहासाच्या काळाला "Dark ages for Prussia" (म्ह० प्रशियाचा विद्येच्या व प्रगतीच्या शून्यत्वाचा काळ) अशी इतिहासकारांनीं संज्ञा दिली आहे. १८६१ मध्यें पहिला वुइल्यम गादीवर आला. हा राजा मोठा कर्तृत्ववान, धोरणी व राजकारणांत कुशल होता. त्यानें गादीवर बसल्यापासून आपल्या जवळचीं संस्थानें आणि इतर मुलुख सैन्याच्या मदतीनें आपल्या ताब्यांत घेण्याचा क्रम सुरू केला. १८६६ सालीं त्यानें खुद्द आस्ट्रियाबरोबर युद्ध आरंभिलें. या युद्धांत सात आठवड्यांतच आस्ट्रियाचा पूर्ण पराभव झाला. युद्धाच्या शेवटीं प्रेग येथील इतिहासप्रसिद्ध तह झाला. त्या तहानें असें ठरलें कीं, याउप्पर आस्ट्रियाचा जर्मनीशीं मुळींच संबंध राहूं नये व आस्ट्रियाच्या बादशहानें 'जर्मनीचा बादशहा' ही पदवी आपल्या नांवापुढें न लावतां 'आस्ट्रियाचा बादशहा' ही पदवी लावावी. याच वेळेस प्रशियानें डेन्मार्कपासून स्लेस्विग व होल्स्टेन हे प्रांत घेतले व हॅनोव्हर आणि दुसरीं नाजिकचीं दहा जर्मन संस्थानें खालसा केलीं. पुढें युरोपियन राष्ट्रांचे कान्फरन्स भरून ही व्यवस्था सर्वांनीं मान्य केली. या सर्व खटपटींत जर्मन बादशहाला त्याचा प्रसिद्ध मुत्सद्दी प्रिन्स बिस्मार्क याचें साहाय्य होतें. वुइल्यम राजाला मनुष्याच्या गुणांची फार चांगली पारख असे. प्रिन्स बिस्मार्कच्या अंगांत असलेल्या अनेक गुणांची त्याला तेव्हांच ओळख पटली व जर्मनीचें एकीकरण करण्याच्या कामांत त्यानें या धूर्त मुत्सद्द्याचा चांगला उपयोग करून घेतला.

१८७० सालीं फ्रान्सबरोबर जर्मनीचें युद्ध झालें. त्या युद्धांत सेडेन येथें फ्रान्सचा पूर्ण पराभव झाला, व शेवटीं व्हर्सेलिस येथें २१।२।७१ रोजीं एक तह झाला. या तहांतील कलमांअन्वयें फ्रान्सनें ॲल्सेस व लोरेन हे आपल्या पूर्व सरहद्दीवरील दोन प्रांत आणि लढाईची खंडणी म्हणून २० कोटी पौंडांची रक्कम जर्मनीस देण्याचें कबूल केलें. या

रकमेची पूर्ण फेड १८७३ सालीं झाली. तोंपर्यंत जर्मन लष्कराचें ठाणें फ्रान्समध्यें होतें.

१८७१ च्या जानेवारी महिन्याच्या अठराव्या तारखेला जर्मन साम्राज्याची स्थापना झाली व त्या साम्राज्याचें बादशाही पद प्रशियाच्या राजघराण्याकडे वंशपरंपरेनें चालावें असें ठरलें. साम्राज्यान्तर्गत एकंदर सव्वीस संस्थानें आहेत व त्यांनीं आपला कारभार स्वतंत्रपणानें चालवावा, व सार्वभौम कारभार बादशहा व बुण्डेसराट व राइशटॅग या दोन अर्धवट पार्लमेंटसारख्या सभांनीं चालवावा असें ठरलें. बादशहा पहिला वुइल्यम १८८८ सालीं मरण पावला व त्याच्या पश्चात् त्याचा मुलगा व महाराणी व्हिक्टोरियाचा जांवई गादीवर बसला. परंतु तो अकालींच मृत्यु पावला. त्यानंतर त्याचा मुलगा दुसरा वुइल्यम, हल्लींचा कायसर बादशहा, तक्तावर बसला. त्या पूर्वींच प्रिन्स बिस्मार्कनें आस्ट्रिया व इटली यांशीं अनुक्रमें १८७८ व १८८२ सालीं परचक्र आलें असतां, परस्परांस मदत करण्याविषयीं तह केले होते. फ्रान्सच्या मनांत आपल्या पराभवाचा जर्मनीवर सूड घेण्याचें आलें तर आपल्याला इतरांचेंहि साहाय्य असावें या दूरदर्शीपणाच्या धोरणानें बिस्मार्कनें या तिरंगी संधीची (Triple Alliance) ची युक्ति योजिली होती. याला उत्तर म्हणून फ्रान्सनें रशियाबरोबर १८९५ सालीं दुरंगी संघ (Dual Alliance) या नांवाचा संधि केला. याचें कारण असें झालें कीं, कायसर बादशहानें राज्यपदारूढ झाल्यावर लौकरच प्रिन्स बिस्मार्कला कामावरून दूर केलें, व त्याचें नेमस्तपणाचें धोरण सोडून जिकडे तिकडे कुरापती काढण्याचा व आपलें घोडें पुढें ढकलण्याचा क्रम सुरू केला. जगाला आक्रमण करणारें सामर्थ्य—'World-power' हे शब्द कायसरनेंच प्रथम प्रचारांत आणले—जर्मन साम्राज्यांत आणिलें पाहिजे अशी त्यानें मनांत हाव धरली. यामुळें पुढेंमागें पुनः आपल्यावर जर्मनी कदाचित् संकट

आणील तर आपल्या बाजूनेंहि बळकटी केलेली असावी, असें फ्रान्सनें ठरविलें व त्याचा परिणाम रशियाशीं मैत्री हा होय. या मैत्रीनंतर देखील तिरंगी संधीनें प्रबळ झालेल्या जर्मनचें पारडें जड होतेंच. तें पारडें खालीं आणण्यास युरोपांतील एकच राष्ट्र समर्थ होतें, व तें राष्ट्र म्हणजे ग्रेट-बिटन होय. ग्रेटब्रिटन पुढें फ्रान्स व रशिया यांनां सामील झालें. या तीन राष्ट्रांच्या संघाला "Triple Entente" असें नांव आहे व त्यालाच मराठींत संयुक्त अथवा स्नेही (Allies) राष्ट्रें असें म्हणण्यांत येतें. हीं तीन संयुक्त राष्ट्रें हल्लीं जर्मनी व आस्ट्रिया यांचेबरोबर लढत आहेत हें तर सर्वश्रुत आहेच.

प्रस्तुतच्या युद्धापर्यंत हा पूर्व इतिहास आणून भिडविल्यानंतर जर्मन साम्राज्याची राज्यव्यवस्था कोणच्या स्वरूपाची आहे याचा आतां थोडक्यांत विचार करावयाचा आहे.

जर्मन साम्राज्य म्हणजे पंचवीस स्वतंत्र राज्यांचा (Sovereign states) संघ होय. या पंचवीस राज्यांत चार राज्यें, सहा ग्रँड डाचिस, पांच डाचिस, सात प्रिन्सिपॅलिटीज् व तीन स्वतंत्र शहरें आहेत. ऑल्सेस-लोरेन हा २६ वा प्रांत आहे व तेथील मुख्य अम्मलदाराची नेमणूक खुद्द बादशहा करतो. उत्तरेस प्रशिया व दक्षिणेस बव्हेरिया, वुर्टेम्बुर्ग, साक्सेन आणि बेडन हीं पांच मुख्य संस्थानें आहेत. साम्राज्याचा विस्तार जवळजवळ २०८,००० चौरस मैल, म्हणजे फ्रान्सपेक्षां जरा अधिक आहे. लोकसंख्या सरासरी सहा कोटी आहे. ट्युटॉनिक लोकांचा भरणा फार मोठा आहे. पूर्वेकडील भागांत स्लाव्ह लोक विशेष आहेत. दोनतृतीयांश लोक प्रॉटेस्टंट पंथाचे आहेत व बाकीचे एकतृतीयांश मुख्यत्वेंकरून रोमन कॅथलिक आहेत. साम्राज्याच्या लष्करी व राजकीय बाबतींत मुख्य अधिकार राइश्टॅगच्या ठरावाअन्वयें प्रशियाच्या राजाला दिलेला असल्यामुळें त्याला जर्मनीचा बादशहा ही पदवी प्राप्त झाली आहे.

बादशाही पद होहेन-झोलर्न घराण्याकडे असावयाचें हें वर सांगितलेंच आहे. शिवाय तें पद वडील मुलाकडेच चालावें असाहि निर्बंध आहे. बादशहा आपला सार्वभौम अधिकार संयुक्त संस्थानांच्या नांवानें चालवितो. त्याला राज्यकारभारांत मदत करण्याकरतां बुण्डेसराट नांवाचें संयुक्त संस्थानांचें एक कौन्सिल आहे. त्या कौन्सिलांत प्रत्येक संस्थानातर्फें एक किंवा अधिक सभासद असतात. सभासदांची संख्या ५८ आहे. कायदेकानू करण्याचा अधिकार बादशहा, बुण्डेसराट आणि राइश्टॅग सभा या तिघांकडे मिळून आहे. राइश्टॅगमध्यें एकंदर ३९७ सभासद असतात. वयांत आलेल्या प्रत्येक पुरुषाला या सभेंतील प्रतिनिधि नेमण्याचा हक्क आहे व ही नेमणूक दर तीन वर्षांनीं पुनः व्हावी लागते. मतें गुप्तपणानें घेण्यांत येतात व जवळजवळ एक लक्ष रहिवाशांच्या वतीनें एक प्रतिनिधि निवडला जातो.

लष्कर आणि लढाऊ जहाजें, सार्वभौम उत्पन्नाच्या बाबी, जर्मन व्यापार, पोष्ट व तार खातें व राज्याच्या संरक्षणाशीं ज्यांचा संबंध आहे अशा आगगाड्या, यांसंबंधानें कायदेकानू करण्याचा संपूर्ण व स्वतंत्र अधिकार साम्राज्याकडे आहे. तथापि बव्हेरिया व वुर्टेम्बुर्ग या संस्थानांनीं आपल्या टपाल व तार खात्याची व्यवस्था स्वतःकडे ठेवली आहे. जर्मन लोकांना देशत्यागाची मोकळीक ठेवणें, त्यांनीं परठिकाणीं कायमची किंवा तूर्तातूर्त वस्ती करून राहणें, जर्मन प्रजेचे सर्वसाधारण हक्क, बँकिंग, पेटंटें, ग्रंथकर्त्यांचे विशेष हक्क, नद्या आणि कालवे यांवर जहाजें चालविणें, दिवाणी व फौजदारी कायदे, कोर्टांतलि काम चालविण्याची रीत, सॅनिटरी पोलीस आणि छापखाने व सभा यांचें नियमन, याविषयींचे मुख्य कायदेकानू साम्राज्यानें अगोदर करावयाचे आणि नंतर त्यांच्या अनुरोधानें संस्थानिकांनीं आपल्या संस्थानांच्या सोईप्रमाणें वाटेल तर निराळे कायदे करावे, असें ठरविण्यांत आलें आहे.

अम्मलबजावणीचा अधिकार बादशहाच्या हातांत आहे. राष्ट्रां-राष्ट्रांतील व्यवहारांत बादशहाच साम्राज्याचा प्रतिनिधि असतो. देशा-च्या बचावाकरतां युद्ध करण्याचा त्याला अधिकार आहे; दुसऱ्या राष्ट्राबरोबर तह किंवा संधि त्याला करतां येतात; आपल्या राज्याचे वकील तो दुसऱ्या राजांकडे पाठवितो, व त्यांचे वकील आपल्या दर-बारांत ठेवून घेतो. दुसऱ्यावर मुद्दाम चढाई करण्यासाठीं युद्ध करा-वयाचें झालें तर त्याला फेडरल ( संयुक्त ) कौन्सिलाची संमति घ्यावी लागते. दुसऱ्या राजांच्या दरबारांत आपले वकील पाठविण्याचा संस्था-निकांनां स्वतंत्र हक्क आहे; परंतु परठिकाणीं राहणारे सर्व कॉन्सल्स ( व्यापारी वकील ) हे साम्राज्याचे नोकर गणले जातात, आणि त्यांची नेमणूक बादशहाकडून होते.

फेडरल कौन्सिल आणि राइशटॅग यांच्या वार्षिक बैठकीचा आरंभ बादशहा करतो. या सभांच्या बैठकी तहकूब करण्याचा किंवा त्या बर-खास्त करण्याचा त्याला अधिकार आहे; परंतु साठ दिवसांपेक्षां जास्त तहकुबी त्याला देतां येत नाहीं, व सभा बरखास्त केल्या म्हणजे साठ दिवसांचे आंत फेरनिवडणुकी झाल्या पाहिजेत आणि नव्वद दिवसां-च्या आंत नवीन सभा भरविल्या पाहिजेत. एखादा कायदा मंजूर होण्यापूर्वी फेडरल कौन्सिल आणि राइशटॅग या दोन सभांत तो अधिक मतांनीं पसंत झाला पाहिजे. प्रत्येक संस्थानाला फेडरल कौन्सिलमध्यें जितकीं मतें असतील तितके सभासद तेथें पाठविण्याचा हक्क आहे. या कौन्सिलांत प्रशियाला १७, बव्हेरियाला ६, साक्सेनला ४, वुर्टेम्बुर्गला ४, बेडेन आणि हेसी ( Hesse ) यांनां प्रत्येकीं ३, आणि मॅक्लेनबर्ग-श्वेरिन व बन्स्विक यांनां प्रत्येकीं २ व बाकीच्यांनां प्रत्येकीं १ असे सभासद पाठविण्याचा हक्क आहे.

साम्राज्याचा चॅन्सेलर हा फेडरल कौन्सिलचा अध्यक्ष असतो. हें

कौन्सिल व राइशूटॅग यांनीं पास केलेल्या साम्राज्यविषयक कायद्यांचा अम्मल सुरू करण्यापूर्वी त्यांनां बादशहाची मंजुरी मिळवावी लागते. आणि ती मंजुरी मिळून अम्मल सुरू होण्यापूर्वी साम्राज्याच्या चॅन्सेलरनें त्यांच्यावर आपली सही करावी लागते. राइशूटॅग सभेंतील वादविवादाच्या वेळीं तेथें हजर राहण्याचा फेडेरल कौन्सिलमधील सर्व सभासदांनां हक्क आहे. फेडेरल कौन्सिल हें चॅन्सेलरच्या देखरेखीखालीं कार्यकारी व सल्ला देणारें मंडळ आहे; आणि म्हणून त्याच्या एकंदर नऊ स्टॅंडिंग कमिट्या आहेत. त्या येणेंप्रमाणें:--(१) सैन्य आणि किल्ले; (२) लढाऊ जहाजें; (३) जकातपट्ट्या, देशांतल्या देशांतील जकाती आणि कर; (४) व्यापार; (५) रेल्वे, पोस्ट आणि तार; (६) दिवाणी व फौजदारी कायदे; (७) साम्राज्याचा वसूल; (८) परराष्ट्रीय व्यवहार; (९) ऑल्सेस-लोरेनचा कारभार. प्रत्येक कमिटींत निदान चार संस्थानांचे तरी प्रतिनिधि असतात.

सार्वभौम कामाच्या व्यवस्थेकरतां निरनिराळ्या पुष्कळ कचेऱ्या स्थापन केल्या आहेत. या सर्व कचेऱ्यांवर चॅन्सेलरची प्रत्यक्ष किंवा अप्रत्यक्ष देखरेख असते. या सर्वांत मुख्य कचेऱ्या (१) चॅन्सेलरी ऑफिस, (२) फॉरिन ऑफिस, आणि (३) जनरल पोस्ट आणि टेलेग्राफ ऑफिस या तीन आहेत. परंतु या कचेऱ्यांवरील मुख्य अधिकारी हे इंग्लंडप्रमाणें कॅबिनेटचे सभासद नसतात.

३१ मे १८६९ च्या निवडणुकीच्या कायद्याअन्वयें २१ वर्षें वयाच्या प्रत्येक जर्मनला निवडणुकीचा अधिकार आहे; तसेंच ज्याच्या वयाला पंचवीस वर्षें पुरीं झालीं आहेत, आणि जो एक वर्षपावेतों संयुक्त संस्थानांपैकीं कोणच्या हि एका संस्थानांत राहिला आहे, त्याला प्रतिनिधि होण्याचा हक्क आहे. प्रतिनिधींनां पगार नसतो; परंतु सभेची बैठक चालू असतां त्यांनां रेल्वेनें फुकट प्रवास करतां येतो.

राइश्‌टॅगमध्यें निरनिराळे मुख्य राजकीय पक्ष कोणचे आहेत व १८७१ पासून १९१२ पर्यंत त्यांचे किती किती प्रातिनिधि निवडून आले, हें खालील कोष्टकांत दाखविलें आहे:—

| | १८७१ | –७४ | –७७ | –७८ | –८१ | –८४ | –८७ | –९० | –९३ | –९८ | १९०३ | १९०७ | १९१२ |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| कन्सर्वेटिव | ५६ | २१ | ४० | ५९ | ५१ | ७६ | ८० | ७२ | ७० | ५७ | ५८ | ६२ | ४५ |
| फ्री कन्सर्वेटिव म्हणजे लिबरल | ३९ | ३६ | ३८ | ५७ | २७ | २८ | ४१ | २१ | २८ | २२ | १९ | २२ | १४ |
| नॅशनल लिबरल्स | १२० | १५२ | १२७ | ९८ | { ४५ ४७ | ५१ | ९८ | ४१ | ५३ | ४८ | ५० | ५४ | ४५ |
| रॅडिकल्स | ४८ | ५० | ३९ | २८ | ७० | } ७४ | ३५ | ७१ | ४९ | ५३ | ३८ | ५३ | ४४ |
| सेंटर किं. कॅथलिक्स | ६३ | ९१ | ९२ | ९४ | १०० | ९९ | ९८ | १०६ | ९६ | १०२ | १०० | १०४ | ८१ |
| सोशल डेमोक्रॅट्स | २ | ९ | १२ | ९ | १२ | २४ | ११ | ३५ | ४४ | ५६ | ८१ | ४३ | ११० |

यांशिवाय पोल्स, डेन्स वगैरे आहेत; परंतु त्यांचें महत्त्व फारसें नाहीं म्हणून ते आंकडे दिले नाहींत.

१८७१ सालापासून १९१२ पर्यंत एकंदर तेरा सभा ठरीव मुदतीच्या अंतरानें भरल्या, असें वरील कोष्टकांत दाखविलें आहे. प्रथम प्रतिनिधींची संख्या ३४७ होती, ती मागाहून ३९७ करण्यांत आली. यांपैकीं प्राशियातर्फे २३६ आणि बव्हेरियातर्फे ४८ सभासद असतात. बाकीच्या जागा इतर संस्थानांत कमीअधिक प्रमाणानें वांटल्या आहेत. वरील कोष्टकावरून राइश्टॅगमध्यें निरनिराळे बरेच संघ असल्याचें स्पष्ट दिसून येतें. पार्लमेंटरी सत्तेच्या अभावीं या गोष्टीपासून फार अनिष्ट परिणाम होतात. इंग्लंडमध्यें जसा एक सत्ताधारी पक्ष व दुसरा विरुद्ध पक्ष असतो, तसा प्रकार जर्मनींत नाहीं. जो तो पक्ष आपलें मताधिक्य करण्याची खटपट करीत असतो, व त्यामुळें गव्हर्नमेंटचें म्हणजे बादशहा व त्याचे मंत्री यांचें चांगलेंच फावतें. आज या पक्षाला हातांत धर, उद्यां त्या पक्षाला हातांत धर, असे त्यांचे डावपेंच नेहमीं चालू असतात. इंग्लंडमध्यें जशी द्विपक्षीय राज्यपद्धति आहे तशी जर्मनींत नाहीं आणि यामुळें राज्यकारभारांत लोकांच्या हातांत जशी सत्ता असावयाला पाहिजे तशी मुळींच नाहीं. ब्रिटिश पार्लमेंटचा बाह्य थाट सर्व आहे; परंतु राइश्टॅगच्या हातांत त्या मानानें अगदीं बेताचा अधिकार असल्यानें, बादशहा व त्याचे मंत्री यांचा कल पाहूनच सभासदांनां आपलीं मतें द्यावीं लागतात. १९१२ सालीं सोशियालिस्टांची संख्या फार वाढली. स्वतंत्रतेचा बाणा जर कोणाच्या अंगांत असेल तर तो याच लोकांच्या अंगांत आहे. यांची ही प्रगति जर अशीच कायम राहिली तर पार्लमेंटरी गव्हर्नमेंट जर्मनींत कांहीं वर्षांनीं तरी सुरू होईल अशी आशा करणें अस्थानीं होणार नाहीं.

साम्राज्यांतील सर्व संस्थानांचा ( ॲल्सेस लोरेन व मॅक्लेन्बर्गच्या दोन

ग्रँड डचीस खेरीजकरून) सनदशीर पद्धतीनें राज्यकारभार चालतो. ६ मोठ्या संस्थानांत 'लोअर हाउस' व 'अपर हाउस' अशा दोन-दोन सभा आहेत, बाकीच्या संस्थानांत एकएकच सभा आहे.

या विषयाचा अधिक विचार २१ व्या प्रकरणांत आला आहे, म्हणून तो येथेंच पुरा करून जर्मन साम्राज्यांत प्रशियाचें महत्त्व किती व कां आहे याचें वर्णन करून हें प्रकरण पुरें करूं.

जर्मनींत प्रशियाचा दर्जा काय आहे यासंबंधानें बऱ्याच देशांतील लोकांचा गैरसमज आहे. प्रशिया म्हणजेच वस्तुतः जर्मनी आणि बाकीचीं संस्थानें त्याचीं उपांगें होत, असा किती तरी लोकांचा समज आहे. परंतु हा समज अगदीं चुकीचा आहे. जर्मन साम्राज्य १८७१ सालीं जें स्थापन झालें तें निरानिराळ्या स्वतंत्र जर्मन संस्थानिकांच्या एकीकरणानें झालें. इतर संस्थानें जशीं साम्राज्यांत मिळून गेलीं, तसेंच प्रशिया हें संस्थान जरी सर्वांत मोठें आहे तरी तें इतरांबरोबर साम्राज्यांत मिळून गेलें. साम्राज्यान्तर्गत संस्थांनांतील अगदीं छोट्या संस्थानांनां जे हक्क आहेत, त्यांपेक्षां एक रातिभर देखील जास्त हक्क प्रशियाला दिलेले नाहींत. अमेरिकन प्रेसिडेंटला जसे कांहीं विशेष अधिकार देण्यांत आले आहेत, तसे जर्मन बादशहा कायसर यालाहि दिले आहेत; परंतु ते अमेरिकन प्रेसिडेंटच्या मानानें बरेच कमी आहेत. तथापि, प्रशियाचा राजा या नात्यानें इतर संस्थानांच्या राजांपेक्षां त्याला यत्किंचितहि जास्त अधिकार नाहीं. साम्राज्याच्या व्यवस्थेसंबंधीं जे नियम आहेत त्यांत आणखी असें ठरविलें आहे कीं, कायसरनें इतर राजांच्या कारभारांत मुळींच ढवळाढवळ करूं नये. कायसरसारख्या चळवळ्या मनुष्याला हा नियम बराच जाचतो, तरी पण तो निमूटपणें पाळणें त्याला भाग पडतें. हा नियम बाजूला गुंडाळून ठेवण्याचा त्यानें अनेक वेळां यत्न केला; पण तो इतर संस्थानिकांनीं सिद्धीस जाऊं दिला नाहीं.

आपल्या हक्काला उत्तम प्रकारें जागणारें संस्थान म्हणजे बव्हेरिया; त्याच्या वाटेला जाण्याची तर कायसरची मुळींच सोय नाहीं. हें संस्थान विस्ताराच्या मानानें दुसऱ्या नंबरचें आहे, व तेथील लोकांना स्वतंत्रतेची विशेष चाड आहे. बव्हेरियन्सच्या मनांत प्रशिया व प्रशियन्स यांच्याविषयीं फारसें प्रेम नाहीं. बव्हेरिया साम्राज्यांत सामील करण्याला प्रिन्स बिस्मार्कला फार आयास पडले. शेवटीं या संस्थानाला रेल्वे, पोष्ट व तारेच्या बाबतींत विशेष हक्क जेव्हां दिले, तेव्हां तें बिस्मार्कच्या म्हणण्याला कबूल झालें. प्रशियासंबंधानें वुर्टेम्बुर्ग आणि साक्सेन या संस्थानांची मनोवृत्तिहि बव्हेरियाप्रमाणेंच आहे. राइश्टॅगमध्यें भाषणें करतेवेळीं या संस्थानांतील प्रतिनिधि प्रशियावर यथेच्छ तोंडसुख घेत असतात. बाकीच्या संस्थानांत देखील कमी अधिक प्रमाणानें प्रशियाविषयीं अप्रीति आहे. प्रिन्स बिस्मार्क ही स्थिति जाणून होता. परंतु कालान्तरानें प्रशियाविषयीं संस्थानिकांत प्रेम उत्पन्न होईल, या भरंवशावर त्यानें साम्राज्याची स्थापना केली. बिस्मार्कचा हा अदमास खरा ठरण्याचीं चिन्हें हळूहळू दिसूं लागलीं आहेत. परस्परांतील वैमनस्य आतां कांहींसें नरम पडत चाललें आहे. खुद्द बव्हेरियांत देखील हा नरमपणा दृग्गोचर होऊं लागला आहे. हीच स्थिति आणखी कांहीं वर्षें चालू राहिली तर सर्व संस्थानें एकमेकांशीं गुण्यागोविंदानें वागूं लागतील. परंतु प्रशियन लोकांचा स्वभाव कांहीं बाबतींत फार चमत्कारिक आहे, व त्यामुळें हा आनंदाचा दिवस आणखी किती दूर आहे तें निश्चयानें सांगतां येत नाहीं.

प्रशियांतील लोक निर्भेळ जर्मन रक्ताचे नाहींत, त्यांच्यांत मूळच्या स्लाव्ह जातीच्या रक्ताचें मिश्रण झालें असल्यानें त्यांची जात अस्सल जर्मन नाहीं, असें दक्षिण व पश्चिम भागांतील जर्मन समजतात. प्रशियनाचें वर्तन इतर लोकांशीं फार उद्धटपणाचें असतें. आगगाडींत, ट्रॅममध्यें, हॉटेलांत, कर-

मणुकीच्या ठिकाणीं अमका मनुष्य प्रशियन आहे हें त्याच्या उद्धटपणावरून व असभ्यपणाच्या वागणुकीवरून तेव्हांच ओळखतां येतें. त्याच्या अंगांत चांगले गुण पुष्कळ आहेत; परंतु त्यांच्या बरोबरीनें वाईट गुणहि पुष्कळ आहेत. तो नेहमीं गर्वानें फुगलेला असतो; त्याचा स्वभाव फार हट्टी असून त्याला कोणाची भीडमुरवत नसते. खर्चांत त्याचा कंजूषपणा फार, व घरीं आल्यागेल्यांचा आदरसत्कार करण्याचें त्याच्या गांवींहि नसतें. लोकांनां चीड येईल अशी त्याची वागणूक असते. नाकपुड्या फेंदारून स्वतःची बढाई मारण्याची व लोकांची निंदा करण्याची त्याला फार हौस. सारांश, त्याच्यांत मनमिळाऊपणा आणि चतुरस्रता काडीचीहि नाहीं. यामुळें त्याच्याशीं जितका कमी प्रसंग येईल तितका बरा असें इतरांनां वाटतें. त्याच्याविरुद्ध जे पूर्वग्रह आहेत ते त्याच्या अंगच्या आडदांडपणामुळें आहेत.

तथापि इतकें असूनहि, प्रशियनेतर लोक हें जाणून आहेत इतकेंच नाहीं, तर ते ही गोष्ट कबूल देखील करतात कीं, राष्ट्राची सुधारणा करण्याचें काम प्रशियनांच्या मदतीशिवाय तडीस जाणार नाहीं. प्रशियानें इतर संस्थानांनां आपलें ऋणी करून ठेविलें आहे, आणि जर्मनीच्या राजकीय बाबतींत प्रशियालाच पुढाकार दिला पाहिजे, याविषयीं कोणाचाहि मतभेद नाहीं. प्रशियाचें नेतृत्व, मारून मुटकून कां होईना, पण सर्वांनां मान्य आहे. प्रशियाचें इतर संस्थानांवर वजन राहणार हें निश्चित आहे; आणि तें तसें राहिलें पाहिजे याविषयींहि कोणाचा वाद दिसत नाहीं.

२६ संस्थानांपैकीं प्रशिया हें एक संस्थान आहे हें खरें; परंतु जर्मन राज्याच्या विस्ताराच्या तीनपंचमांश त्याचा विस्तार (१३४,००० चौरस मैल) आहे, आणि लोकसंख्याहि त्याच प्रमाणांत आहे. शिवाय प्रशियानें गेल्या शतकांत जे नवीन प्रांत मिळविले आहेत ते सुपीक

आहेत व त्यांतील लोक उत्कर्षाभिलाषी आहेत. यामुळें सर्व राज्यांत प्रशियाला मोठेपणाचा मान मिळावा हें अपरिहार्य आहे. जर्मनीच्या बाकी राहिलेल्या दोनपंचमांश भागाला त्याच्या विस्ताराच्या व लोकसंख्येच्या मानानें राज्यव्यवस्थेच्या नियमांखालीं जास्त महत्त्व दिलें आहे असें बाह्यतः दिसतें; परंतु वस्तुतः "कर्तुमकर्तुमन्यथाकर्तुम्" हें सामर्थ्य प्रशियाच्याच अंगांत आहे. प्रशियाचें हें सामर्थ्य कमी करणें कोणाच्याहि हातांत नाहीं. बव्हेरियन्स व इतर लोक जे चरफडतात ते ही वस्तुस्थिति धडधडित त्यांनां दिसते म्हणूनच चरफडतात.

बुण्डेसराट प्रशियाच्या म्हणजे कायसरच्या इच्छेविरुद्ध सहसा जात नाहीं. एखाद्या राजकीय प्रकरणाचा आपल्या इच्छेप्रमाणें मताधिक्यानें निकाल लावून घेण्याकरतां प्रशियाच्या सतरा मतांपेक्षां तेरा अधिक मतें त्याला मिळवावीं लागतात, आणि तीं मिळविण्याला त्याला मुळींच पंचाईत पडत नाहीं. कारण, आगगाड्यांचा एकमेकांशीं संबंध, मोठमोठ्या नद्यांसंबंधीं नियम, पोष्टाच्या सोई व याच प्रकारच्या इतर अनेक बाबतींत प्रशियानें जरा लगाम खेंचून धरला कीं लहानसहान संस्थानांनां नरम पडावें लागतें, व या मार्गानें तेरा मतें प्रशियाला बिन आयासानें मिळूं शकतात. शिवाय असा नरमपणा दाखविण्यांत इतरांचा तोटा नसतो; कारण, प्रशियाचे व त्यांचे आधिभौतिक हितसंबंध एकाच स्वरूपाचे असतात. याप्रमाणें प्रशियानें एखादा कायदा पास केला म्हणजे आपल्याइकडे देखील त्याच धर्तीवर कायदा पास करण्याला इतर संस्थानिक नेहमीं तयार असतात. प्रस्तुतच्या कायसरसारख्या दडप्या राजाच्या कारकीर्दीत इतर संस्थानिक केवळ गोगलगाय बनले आहेत. परंतु त्याच्या पश्चात् बादशाही पद मिळविणारे प्रशियन राजे जरी कमी योग्यतेचे असले, तरी त्यामुळें प्रशियाचें महत्त्व कमी होणार नाहीं हें निश्चित आहे. प्रशियाला चिडविण्यांत आपला फायदा नाहीं हें

संस्थानिक व त्यांची प्रजा अगदीं पूर्णपणें जाणून आहेत.

प्रस्तुतची स्थिति चिरकाल अशीच राहील असा भरंवसा नाहीं. हळूहळू प्रशिया इतर संस्थानें आपल्या घशांत टाकणार असें एका ग्रंथकाराचें मत आहे. पण हा प्रकार थोड्याच दिवसांत होणार का कांहीं कालान्तरानें होणार, यासंबंधानें आजला नुसत्या कल्पनाच करीत बसलें पाहिजे, असें तो म्हणतो.

प्रशियाविषयीं सर्वत्र पसरलेली अप्रीति हळूहळू कमी होत चालली आहे, हें मागें सांगितलेंच आहे. आणि हल्लींची पिढी जाऊन नवी पिढी आली म्हणजे जुन्या आठवणी बुजून जातील व परस्परांत प्रेमभाव वाढेल असा तूर्त रंग दिसत आहे. शिवाय सर्व जर्मन तितके एक (Pan German movement) ही लाट आतां चोहोंकडे जी उसळली आहे, तिचा या बाजूनें चांगलाच उपयोग होईल. या चळवळीचा आद्य प्रवर्तक प्रोफेसर हेन्‌रिच व्हॉन ट्रिश्चकी नांवाचा प्रसिद्ध इतिहासकार होय. या इतिहासकारानें केलेल्या राष्ट्रीय कामगिरीचें वर्णन करणारा डॉसननें लिहिलेला एक मार्मिक लेख जानेवारी १९१५ च्या "19th Century and After" या मासिकांत प्रसिद्ध झाला आहे, तो वाचकांनीं अवश्य वाचावा, अशी आमची शिफारस आहे. राजांच्या हातांतील सत्ता काढून घ्यावी, त्यांनां सालाची कांहीं तरी नेमणूक करून द्यावी व सर्व सत्ता लोकांनीं आपल्या हातांत घ्यावी, हें मत जर्मनींत हल्लीं बरेंच प्रचालित झालें आहे; व या मतानुसार इष्ट ती सुधारणा घडवून आणण्याचे अनेक उपाय सुचविण्यांत येत आहेत. परंतु ही सुधारणा अमलांत येण्याजोगी जर्मनींत अद्यापि तयारी नाहीं. तोंपर्यंत जर्मन राजांनां स्थानभ्रष्ट होण्याची भीति बाळगावयास नको. शिवाय प्रजानुरंजनाच्या कामांत बहुतेक जर्मन राजे तत्पर असल्यानें त्यांच्यासंबंधानें प्रजेंत बेदिली उत्पन्न होण्याचा संभवहि फार कमी आहे. जर्मन

कला, वाङ्मय व शास्त्रें यांना राजे उदार आश्रय देतात, यामुळें कर्तव्य-शून्यतेचा आरोपहि त्यांचेवर येऊं शकत नाहीं. पुढें मागें जर्मनीचा राज्यकारभार लोकांच्या हातांत येईल याविषयीं शंका नाहीं; परंतु तो काळ अजून किती दूर आहे हें आज निश्चयानें सांगतां येणें कठिण आहे.

ना० कृ० आगाशे.


उत्तर समुद्र
स्वीडन
डेन्मार्क
बाल्टिक समुद्र
पूर्व प्रशिया
कोनिंग्जबर्ग
टिलसिट
इन्स्टरबर्ग
गुंबिनेन
डॅनझिग
कोलिन
कॉनित्झ
प० प्रशिया
स्टारगार्ड
स्टेटिन
मर्कलेन्बर्ग
पोसेनी
पोसेन
थॉर्न
ब्राम्बर्ग
ब्रेस्ला
सिलीशिया
ऑपेल
नीसी
रॅटिबर
क्रॅको
ब्रिझ
ग्लोगॉ
हॅबर्ग
ब्रीमरहेवन
ब्रीमेन
आल्डेनबर्ग
एमडेन
इसेन
हॅनोव्हर
स्टेंडाल
बर्लिन
पॉटसडॅम
फ्रॅंकफोर्ट
मॅग्डेबर्ग
जर्मनी
लिपझिग
ड्रेसडेन
केम्नित्झ
कॅसल
कोलन
कोल्व्ह
वेस्ट फालिया
मन्स्टर
बीलेफेल्ड
हामेलन
आमस्टर्डाम
हॉलंड
अँटवर्प
ब्रुसेल्स
बेलजम
लीज
नामूर
कोलोन
एलाशापेल
प्रशिया
कोब्लेन्झ
फ्रॅंकफोर्ट
मेट्झ
ट्रेवेस
नॅन्सी
स्ट्रासबर्ग
फ्रान्स
मॅनहेम
स्पेअर
बेडन
वर्टेमबर्ग
उल्म
म्युनिच
बव्हेरिया
न्यूरेंबर्ग
वूर्झबर्ग
लिंझ
व्हिएना
आस्ट्रिया
बुडापेस्ट
हंगेरी
स्वित्झर्लंड
लॅंग्रीस
रीम्स
व्हर्दन
बुडापेस्ट
D.P.W. POONA CITY.

# आधुनिक जर्मनीची उत्क्रांति

प्रकरण पहिलें

## नवीन विचारक्रांति

गेल्या पन्नास वर्षांपूर्वीची जर्मनीची स्थिति पाहिली तर आपल्याला असें दिसून येईल कीं, त्या देशांतील लोकांच्या मनाची धांव अगदीं संकुचित होती; म्हणजे आपला देश, आपली भाषा, आपले आचारविचार, आपला धर्म व आपलें तत्त्वज्ञान, यांच्या चिंतनांतच ते गढून गेलेले होते. 'स्व' म्हणजे 'आपण' व 'आपलें' याव्यतिरिक्त अन्य विषय त्यांच्या बुद्धीला माहीत नव्हता. अलीकडील पन्नास वर्षांत मात्र ही स्थिति अगदीं पालटली आहे. आपल्या देशाच्या बाहेर पृथ्वीचा बराच भाग आहे, त्या भागांत प्रवेश करून आपल्या देशाचा व्यापार वाढवावा व आपला देश सधन करावा, इतकेंच नाहीं तर या साधनांच्या साहाय्यानें, त्याचें राजकीय महत्त्वहि इतर ठिकाणीं स्थापित करावें, अशी भावना या अलीकडच्या काळांत जर्मन लोकांच्या मनांत उद्भवली आहे व तदनुरोधानें त्यांचे उद्योग अव्याहतपणें चालू आहेत. पूर्वीचा मनाचा संकुचितपणा टाकून दिल्यानें त्यांच्या विचाराला अगदीं नवें वळण लागलें आहे. सर्व जगांत आपलें नांव गाजवावें, जगाच्या बऱ्याच मोठ्या भागावर आपली सत्ता चालवावी, विद्येच्या जोरावर नाना प्रकारच्या कला साध्य करून व नवे नवे शास्त्रीय शोध लावून, आपला देश सुसंपन्न करावा, असें प्रत्येक जर्मनला वाटूं लागलें आहे.

ही विचारक्रांति घडून येण्याला मुख्य कारण काय झालें याचा आपण विचार करूं लागलों म्हणजे सुमारें शंभर वर्षांपूर्वी उदयाला आलेले कांट, फिश्टे, गेटी आणि शिलर हे चार ग्रंथकार आपल्या डोळ्यांसमोर उभे राहतात. या चौघां ग्रंथकारांनीं आपआपल्या तऱ्हेनें आपल्या लेखणीच्या जोरावर जर्मन लोकांत नवीन चैतन्य उत्पन्न केलें. नेपोलियनच्या तडाख्याखालीं जर्मन लोक निस्तेज होऊन अगदीं नादान बनून गेले होते. हा त्यांचा नादानपणा नाहींसा करून त्यांच्यांत नवीन जोम व वीरश्री उत्पन्न करण्याचें श्रेय जर कोणाला द्यावयाचें असेल तर तें या ग्रंथकारांनांच दिलें पाहिजे. आपल्या देशाच्या अभ्युदयार्थ देशांतील प्रत्येक मनुष्यानें आत्मयज्ञ केला पाहिजे, हें या ग्रंथकारांचें तत्त्व जनतेच्या मनावर ठसलें व त्यामुळें नेपोलियननें विस्कळून टाकलेल्या घडीचा जम पुन: हळूहळू बसत चालला. लोकांच्या अंगांत शौर्याचें नवें वारें खेळूं लागलें व त्यामुळें पुढें थोड्याच काळानें कराव्या लागणाऱ्यां युद्धांत त्यांनां यश संपादतां आलें. या ग्रंथकारांनीं ही एकच कामगिरी केली असें नाहीं, तर शौर्याबरोबरच विद्येची अभिरुचिहि लोकांत जागृत केली. ही अभिरुचि पुढें पुढें इतकी वाढत गेली कीं, जर्मनी म्हणजे विद्येचें माहेरघर, असा सर्वत्र लौकिक झाला. याप्रमाणें शंभर वर्षांपूर्वींच्या जर्मनीची हल्लींच्या जर्मनीबरोबर तुलना करून पाहतां पूर्वींचा मनू पालटून आतां अगदीं नवा मनू सुरू झाल्याचें आपणांस दिसून येतें. एकोणिसाव्या शतकांतील पहिल्या पन्नास वर्षांचा इतिहास आपण वाचला तर काल्पनिक सृष्टींत भराऱ्या मारण्यांत व अध्यात्मविचारांत तेथील लोक गढून गेलेले होते असें अनुभवास येतें. तोच दुसऱ्या पन्नास वर्षांचा इतिहास पहा, म्हणजे त्यांत अगदींच निराळा प्रकार आपल्या दृष्टीस पडतो. काल्पनिक सृष्टि नाहींशी होऊन तिच्या जागीं ईश्वरानें निर्मिलेली दृश्य सृष्टि येऊन बसली, व मनुष्यजातीच्या सुखाकारितां परमे-

श्वरानें निर्माण केलेल्या अखिल वस्तू काय आहेत, त्यांचे गुणधर्म काय आहेत, याचा शोध करण्याकडे विचाराचा ओघ पालटला. या विचा-रांनां लवकरच परिणत स्वरूप प्राप्त होऊन आधिभौतिक संपत्तींत जर्मनीनें अग्रपूजेचा मान मिळविला. शंभर वर्षांपूर्वी जर्मन लोकांनीं भावनाधीन होऊन कल्पनासृष्टींत बरेंच मोठें वैभव संपादन केलें होतें, परंतु आर्थिक लाभ त्यांना मुळींच झाला नव्हता. आजला आर्थिक लाभ त्यांनीं करून घेतला आहे व जी सृष्टि आपण डोळ्यांनीं पहातों त्या सृष्टीवर—काल्पनिक सृष्टीवर नव्हे—ताबा मिळविण्याचें ध्येय त्यांनीं आपल्या डोळ्यासमोर ठेविलें आहे.

शंभर वर्षांमागें जर्मन लोकांची स्थिति कशी होती, याचें वर्णन त्यांच्याच एका ग्रंथकारानें केलें आहे व तें वाचण्याजोगें आहे. तो ग्रंथकार म्हणतो:—“[ पूर्वींच्या कालांत ] जर्मन लोक गरीब व दुबळे होते. जगांतील इतर लोक त्यांचा तिरस्कार करीत व वेळ पडली कीं त्यांनां बुचाडीत. लोकांनीं त्यांनां गुलामाप्रमाणें वागवावें, त्यांच्या शेतांत शिरून तेथील माल लुबाडून न्यावा, व प्रसंगविशेषीं त्यांची कत्तलहि करावी. आत्मसंरक्षणार्थ शत्रूशीं ते झगडत असत; परंतु हे लोक आपल्याला असे कां सतावतात व छळतात, याचें कारण शोधून काढण्याची खटपट त्यांनीं केव्हांच केली नाहीं. जगांतील संपत्ति इतर राष्ट्रांनीं आपआपसांत वांटून घ्यावी, व जर्मन लोकांना नुस्तें विचारूं देखील नये, असा प्रकार कां असावा, हा विचार त्यांच्या मनाला केव्हांहि शिवला नाहीं. पोटाकरितां जेवढा उद्योग करणें अवश्य होतें, तेवढा केल्यानंतर बाकीचा वेळ आपल्या घरांत शांत अशा जागीं बसून, जुने ग्रंथकार, कवि व तत्त्ववेत्ते यांच्या संगतींत घालवावा, त्यांच्याबरोबर आनंदानें डोलावें किंवा दुःखाकुल होऊन रडूं लागावें, अशी त्यांची दिनचर्या असे. तत्त्वज्ञानांत ही मंडळी गढून गेली म्हणजे स्वतःच्या शरीर-आच्छादनाची

अथवा खाण्यापिण्याची देखील शुद्ध त्यांना रहात नसे. मनोराज्यांत एकदां का त्यांनीं प्रवेश केला, म्हणजे आपल्याभोंवतीं जगांत काय चाललें आहे याची त्यांना मुळींच शुद्धि रहात नव्हती." याप्रमाणें वर्णन केल्यानंतर तोच ग्रंथकार पुढें म्हणतो, "पण आतां हें सर्व पालटलें आहे. निरुपयोगी तत्त्वज्ञान आम्हीं बाजूला गुंडाळून ठेवलें आहे. लहान वयांत आम्हीं आपला वेळ फुकट घालविला हें खरें; पण आम्ही आतां मोठे झालों आहों, आमचा फायदा कशांत आहे हें आम्हांला चांगलें कळूं लागलें आहे, आम्ही आतां नवीन उद्योगाला लागलों आहों. वाटेल तितक्या जरी अडचणी आल्या तरी, त्यांना न जुमानतां शेवटची मजल गांठावयाची, असा आमचा पक्का निर्धार झाला आहे."

जर्मन लोक स्वभावतः मोठे उत्साही, उद्योगप्रिय व बुद्धिमान आहेत. जगाच्या इतर भागांत आधिभौतिक सुधारणा मोठ्या झपाट्यानें होत असतां ते मागें पडतील हें शक्य नव्हतें. एकोणिसाव्या शतकाच्या आरंभालाच कल्पनासृष्टींतून बाहेर पडून बाह्य सृष्टीकडे अधिक लक्ष पुरविण्याचा अंकुर त्यांच्या मनांत उद्भवल्याचीं स्पष्ट चिन्हें दिसूं लागलीं होतीं. हा अंकुर फुटून फार वर्षें झालीं नाहींत तोंच त्याचा हल्लीं आपण पाहतों तेवढा विस्तृत वृक्ष बनेल अशी मात्र कल्पना त्या वेळीं कोणाला झाली नाहीं. १८७० सालीं फ्रेंचांबरोबर केलेल्या युद्धांत जर्मन लोकांचा विजय झाला व हा विजयच त्यांच्या अभ्युदयाला मुख्यत्वेंकरून कारणीभूत झाला. नवे नवे शास्त्रीय शोध लावून व्यापारांत एक एक पाऊल पुढें टाकण्याला त्यांनीं तेव्हांपासून सुरुवात केली. आजला सर्व जगाशीं त्यांचा व्यापार इतका वाढला आहे कीं, तो पाहून कोणीहि मनुष्य थक्क झाल्याशिवाय राहणार नाहीं! ज्याच्या हातांत व्यापार त्याच्या घरांत संपत्ति, या न्यायानें जर्मन राष्ट्र सुसंपन्न झालें आहे. १८७० सालचा युद्धप्रसंग आला नसता तर आजची स्थिति प्राप्त

होण्याला जर्मनीला आणखी अनेक वर्षें वाट पहावी लागली असती, असें बऱ्याच इतिहासकारांचें मत आहे.

या युद्धांत जर्मनीला अधिक मुलुख मिळाला, जित राष्ट्राकडून लढाईच्या खंडणीदाखल फार मोठी रक्कम मिळाली, हा झाला सांपत्तिक फायदा. परंतु याच्याबरोबरच, जर्मन लोकांच्या विचारांत फार मोठी क्रांति घडून आली, व तिच्यापासून त्यांचा जो फायदा झाला तो सांपत्तिक फायद्यापेक्षां सहस्रपटीनें जास्त आहे.

या विचारक्रांतीमुळें औद्योगिक बाबतींत जर्मनीची सुधारणा कशी झाली, परदेशांशीं व्यापार करण्यांत त्यानें कसें यश संपादन केलें, या विषयाचें विवेचन तूर्त येथें करावयाचें नाहीं; प्रसंगानुसार तें पुढें करण्यांत येईल. जर्मन लोकांच्या वागणुकींत प्रमुखपणानें दृष्टोत्पत्तीस येणारें नवीन वळण कोणच्या स्वरूपाचें आहे, याचीच ओळख पटवून देणारीं बिनचुक चिन्हें वाचकांना सांगण्याचा प्रस्तुत इरादा आहे.

जर्मनींत विद्यार्थ्यांनां हल्लीं जें शिक्षण देण्यांत येतें, तें या चिन्हांपैकीं-च एक चिन्ह आहे. ज्या शिक्षणाच्या योगानें विद्यार्थ्यांच्या मनांत भौतिक विषयांवर आसक्ति जडेल, अशा प्रकारचें शिक्षण शाळांतून व कॉलेजां-तून देण्याकडे जर्मनींतील शिक्षणखात्याचा हल्लीं विशेष कटाक्ष आहे. हें शिक्षण देण्याचा आरंभ जर्मनीनेंच काय तो केला, इतर राष्ट्रांत तें पूर्वीं मिळत नव्हतें, व आतांहि मिळत नाहीं, असा आमच्या म्हण-ण्याचा अर्थ नाहीं. शिक्षणाची ही प्रवृत्ति थोड्याफार प्रमाणांत चोहों-कडे होतीच. परंतु आतां जर्मनींत ती जशी स्पष्टपणें दिसून येते, तशी ती इतरत्र दिसून येत नाहीं, एवढेंच सांगण्याचा आमचा हेतु आहे. असो. नवीन शिक्षणाचें स्वरूप निश्चित केल्यावर पहिला हल्ला जो तेथें झाला तो जिम्नेशिया ( Gymnasia ) नांवानें प्रसिद्ध असलेल्या दुय्यम प्रतीचें शिक्षण देणाऱ्या शाळांवर झाला. या शाळांनां मिळत

असलेलें उत्तेजन कमी करून नवीन पद्धतीच्या शाळा स्थापन होऊं लागल्या, व त्यांची संख्या दिवसानुदिवस वाढत्या प्रमाणावर होऊं लागली. प्राशियांतील दुय्यम शाळांत आजपर्यंत कधीं मिळालें नाहीं इतकें इंग्रजी भाषेचें शिक्षण सध्यां मिळूं लागलें आहे. इंग्रजी भाषा चांगली, तिच्यांतील वाङ्मय उच्च दर्जाचें, म्हणून त्या भाषेविषयीं प्रशियांतील लोकांच्या मनांत प्रेम उत्पन्न झालें आहे, असा याचा अर्थ नाहीं. फ्रेंच भाषेच्या ऐवजीं इंग्रजी भाषा अवश्य विषय म्हणून शिकवावी असा जो सरकारानें ठराव केला, त्या ठरावांत इंग्रजी भाषेचा गौरव करणारी शब्दरचना केली आहे, हें खरें; परंतु ती केवळ शब्दरचना आहे, प्रेमाची खूण नाहीं, हें आपण विसरतां कामा नये. व्यापारी लोकांत इंग्रजी भाषा चालते, जगांत कोठेंहि जा, इंग्रजी येत असलें म्हणजे कोणच्याहि व्यापाऱ्याचें कोठेंहि अडावयाचें नाहीं, ही तिच्यांत व्यवहारदृष्ट्या विशेष सोय आहे, आणि या सोयीकडे लक्ष पुरवूनच जर्मनीनें तिचा अंगीकार केला आहे, तिच्यावर प्रेम जडलें म्हणून नव्हे! व्यवहारोपयोगी शास्त्रें शिकविणाऱ्या पाठशाळांनां प्रशियन सरकार सढळ हातानें वाटेल तितका पैसा देतें; पण तत्त्वज्ञानाचें शिक्षण देणाऱ्या संस्थांनां मात्र वाटाण्याच्या अक्षता मिळतात, अशी किती तरी प्रशियन प्रोफेसरांची तक्रार आहे. या विषयासंबंधानें एक ग्रंथकार म्हणतो:—"सृष्टिविज्ञान व धंदेशिक्षण यांकडे विशेष लक्ष पुरविल्यानें मानसशास्त्रें आणि कला यांकडे कोणी फारसें बघेनासें झालें आहे. कोणताहि व्यवसाय करणारा आधुनिक जर्मन पहा; बाह्यसृष्टीचें ज्ञान करून घेण्याकडे त्याच्या मनाचा ओढा फार! आत्मज्ञान संपादन करून आत्मसुखाची इच्छा बाळगणारा माणूस फारच विरळा! उद्योग, व्यापार, ऐहिक संपत्ति यांत आम्हीं बराच वर नंबर पटकावला आहे. परंतु ही सृष्टि केव्हां निर्माण झाली, तिचा निर्माता कोण, या सृष्टींत कोणतीं गूढ तत्त्वें भरलीं आहेत,

त्या तत्त्वांचें खरें रहस्य काय आहे, या विषयांचा विचार करणारा व त्या विचारापासून होणाऱ्या आनंदाचा आस्वाद घेणारा गृहस्थ प्रस्तुत आपल्याला फारसा पहावयाला मिळत नाहीं, ही केवढी दुःखाची गोष्ट आहे !"

सरकारी नोकरी करून जो संपत्तीचा लाभ व्हावयाचा, त्यापेक्षां फार मोठा लाभ व्यापारांत होतो, असें जर्मन लोकांच्या अनुभवाला येऊं लागलें आहे, आणि त्याचा परिणाम मोठ्या व हलक्या दर्जाच्या सरकारी नोकरांवर सारखाच होऊं लागला आहे. व्यापाराची चव लोकांना लागण्यापूर्वी सरकारी नोकरी करणें अधिक फायद्याचें होतें, आणि यामुळें मोठमोठ्या सरकारी हुद्द्यावर असणारीं माणसें लोकांत विशेष आढ्यतेनें वागत असत. सरकारी अधिकारी म्हणजे वरिष्ठ प्रतीचे लोक अशी समजूत दृढमूल होऊन बसली होती; आणि म्हणून ते रयतेशीं अगदीं तुटून व तुसडेपणानें वागत असत. परंतु व्यापाराचीं साधनें वाढल्यानें वाटेल त्याला संपत्ति मिळविण्याचे अनेक मार्ग खुले झाले, व सरकारी नोकरी न करतां शेकडों माणसें भराभर श्रीमंत होऊं लागलीं. त्याबरोबर अधिकाऱ्यांच्या डोळ्यांवरील अधिकाराची व श्रीमंतीची धुंदी उतरली, व इतर लोकांबरोबर मोकळ्या मनानें आणि बरोबरीच्या नात्यानें ते वागूं लागले. सरकारांत आपल्या कामगारांची प्रतिष्ठा व मानमान्यता पूर्वीप्रमाणेंच आहे, या नोकरींत जी एक प्रकारची मोहिनी आहे ती अद्यापि कायम आहे, व तिच्यामुळेंच "आम्हांला सरकारी नोकरी द्या" असे अर्ज करणाऱ्या लोकांची संख्याहि अजून कमी नाहीं, या सर्व गोष्टी खऱ्या आहेत; परंतु जेवढा म्हणून उत्तम माणूस असेल तेवढा सरकारी नोकरींत मात्र सांपडावयाचा, अन्य ठिकाणीं सांपडावयाचा नाहीं, ही पूर्वीची स्थिति मात्र आतां राहिली नाहीं. आतां देशांतील खरी बुद्धिमत्ता जर कोणाला पहावयाची असेल, तर त्यानें निरनिराळ्या

कंपन्या, कारखाने किंवा बँकांकडे नजर दिली पाहिजे. हें स्थित्यंतर कशामुळें झालें असावें, याचा आपण शोध करूं लागलों म्हणजे चटकन् ही गोष्ट आपल्या ध्यानांत येते कीं, सरकारी नोकरीच्या बाहेर राहून खाजगी धंद्यांत लोकांनां जितकें द्रव्य कमावतां येतें, त्याच्या तोलाचें द्रव्य, पगाराच्या रूपानें, सरकारला आपल्या नोकरांनां देणें परवडत नाहीं; आणि यामुळें सरकारी नोकरीकडे लोकांचा ओढा अर्थातच कमी झाला. आपल्या नोकरींत हुषार माणसें असावीं या हेतूनें सरकार लांबलचक पदव्यांचें व सोन्याच्या पदकांचें आमिष लोकांनां दाखवीत असतें; परंतु या पदव्यांपासून किंवा या पदकांपासून नोकरींत शिरणाऱ्या माणसांचा खिसा थोडाच गरम होणार आहे! मोठमोठ्या सरकारी जागेचे राजीनामे देऊन खाजगी धंद्यांत शिरलेल्या लोकांचीं उदाहरणें जर आपण पाहूं लागलों तर तीं अनेक सांपडतील. पूर्वीं मोठ्या हुद्द्यावर असलेला गृहस्थ आतां पहावा, तर तो एखाद्या कंपनीचा मॅनेजिंग डायरेक्टर किंवा साधा डायरेक्टर झालेला आपल्या दृष्टीस पडेल. दुसरा इसम पहावा, तर तो एखाद्या ट्रामवे कंपनींत शिरलेला दृष्टीस पडेल. तिसरा पहावा, तर तो एखाद्या मोठ्या लोखंडाच्या कारखान्यांत मॅनेजर म्हणून काम करीत असेल. अशीं उदाहरणें कोठवर द्यावीं? वाचकांनींच त्याची कल्पना करावी हें बरें.

अलीकडच्या काळांत इतर लोकांवर वरचढ करण्याची जी मनीषा जर्मन लोकांत उत्पन्न झाली आहे, तिचें मुख्य महत्त्व, बरवर विचार करणाऱ्या इंग्रज लोकांच्या मतानें या गोष्टींत आहे कीं, तेथील उद्योगधंदा करणारे आणि व्यापारी यांनीं जगांतील व्यापार आपल्या हातांत घेतला आहे. तथापि या विषयाची विशेष बारकाईनें चवकशी करणारे लोक नुसत्या व्यापाराकडेच न पाहतां चोहोंकडे आपली नजर फेंकतात. आणि तसें केल्यावर जर्मनींत प्रकट झालेल्या नवीन तेजाचा

प्रभाव इतर अनेक बाबतींतहि पडत असल्याचीं स्पष्ट चिन्हें त्यांनां दृग्गोचर होतात. शरीरांत रग असणें यांतच खरा पुरुषार्थ, असें जर्मन लोकांनां अधिकाधिक वाटूं लागलें आहे, हें त्या चिन्हांपैकीं आणखी एक चिन्ह आहे. गेल्या शतकांतील उत्तरार्धाच्या आरंभीं तीन युद्धांत प्राशियानें विजय संपादन केला, त्याचाच हा परिणाम आहे हें निर्विवाद आहे. एखादें राजकारण साधावयाचें असेल तर तेवढ्यापुरती शरीर-सामर्थ्यावर विशेषेंकरून भिस्त ठेवणें स्वाभाविक आहे. गेल्या पिढींत जर्मनीनें, देशांतल्या देशांत म्हणा, अथवा परदेशांत म्हणा, जें जें राज-कारण केलें, तें तें मणगटांतील जोरावरच लक्ष देऊन केलें. हें राज-कारण करणारा प्रसिद्ध मुत्सद्दी, प्रिन्स बिस्मार्क, या मताचा आद्य-प्रवर्तक होता. "राजकीय प्रश्न म्हणजे शक्तीचे प्रश्न" हें बिस्मार्कचें ठरीव मत होतें, व तें तो नेहमीं आपल्या हृदयाशीं बाळगून होता. लढायांत त्यानें शक्तीचा उपयोग केला हें वाजवी होतें; परंतु लढाई-खेरीज इतर बाबतींतहि तो शक्तीच्या मात्रेचा उपयोग करीत असे, याचें समर्थन कसें करावयाचें ?

अमुक शास्त्राचा अमुक सिद्धान्त आहे, असें प्रतिपादन करणाऱ्या माणसाचें बोलणें शांतपणानें ऐकून घेण्याची बिस्मार्कला मुळींच संवय नव्हती. एखाद्या विषयाचें आपल्या मनाशींच चिंतन करणारा व त्यांत मग्न होणारा मनुष्य त्याला दृष्टीसमोर देखील नको होता. एखादें काम करावयाचें असें एकदा मनानें ठरविलें म्हणजे तें दृढनिश्चयानें तडीस न्यावयाचें, हा त्याचा बाणा असल्यानें लोकांच्या मनावर याचा काय परिणाम होईल, त्यांच्या फार दिवसांच्या समजुतींचा व विचारांचा आपल्या हातून अनादर होईल किंवा काय, याची पर्वा त्यानें केव्हांहि केली नाहीं. अशा प्रकारचा दृढनिश्चय म्हणजे मणगटांतील जोराची दुसरी प्रतिमा होय, हें उघड आहे. प्रिन्स बिस्मार्कच्या या कृतीचें

मंडन करणारे व त्याच्या मताचा अनुवाद करणारे लोक जर्मनींत आजमित्तीला कितीतरी आहेत! त्याचा शहाणपणा, त्याचें आटोकाट धोरण हें कोणाला कां नसेना; पण त्याच्या मतांचा अनुवाद करण्याला या लोकांनां कोणची हरकत आहे! "आमच्या मुत्सद्द्यांत मुत्सद्दीपणा कमी पडला तर तो केवळ आम्ही आपल्या शरीरसामर्थ्यानें भरून काढूं" असे उद्गार एका प्रसिद्ध लष्करी जर्मन अम्मलदारानें थोडक्या दिवसांपूर्वी काढले होते. खऱ्या राजकारणांत जर्मन मुत्सद्दी इतकी लष्करी थाटाची भाषा वापरीत नाहींत हें खरें; परंतु या दोघांची जाति एकच यांत वाद नाहीं.

आधिभौतिक सामर्थ्याचा इतका देव्हारा माजविण्याचा साहजिकच असा परिणाम झाला कीं, पूर्वी कधींहि नव्हती इतकी सत्ता सरकारच्या हातांत आली. सरकारच्या हातांत जितकी सत्ता किंवा अधिकार जास्त, तितकी प्रजेची सत्ता किंवा अधिकार कमी, हें मग ओघानेंच प्राप्त झालें, व त्याच्या योगानें हरएक बाबतींत सरकारच्या तोंडाकडे रयतेला पहावें लागतें, अशी आजला स्थिति प्राप्त झाली आहे. सरकारवर जों जों जास्त भिस्त ठेवावी, तों तों त्याच्या अधिकाराचें क्षेत्रहि वाढत जातें. याचें प्रत्यंतर कोणास पाहिजे असेल तर त्यानें जर्मनीच्या प्रचंड सैन्याकडे पहावें. शक्य त्या उपायांनीं आपलें सामर्थ्य व बळ वाढवावयाचें ही जी जर्मन लोकांची इच्छा त्या इच्छेचें मूर्त स्वरूप म्हणजे ही प्रचंड सेना होय. जर्मन सैन्य म्हणजेच जर्मन राष्ट्र असा समज सार्वत्रिक झाला आहे. जमीनीवर

१. जर्मन समाजांत सैन्याचें प्रस्थ किती माजलें आहे याचें वर्णन 'जर्मनी' नांवाच्या ग्रंथांत फार मौजेनें केलें आहे. त्यांत म्हटलें आहे:—

One of the most striking features of German life is the presence every where of the regular soldiery and the great place the army holds in the thoughts and affections of the nation. Neat and tidy in appearance, you will see

लढणाऱ्या अजिंक्य फौजेला लढाऊ गलबतांची जोड दिली पाहिजे, अशी जी सर्वत्र हाकाटी चाललेली ऐकूं येते, त्याचें बीज जर्मन सामर्थ्य वाढविण्याच्या इच्छेंतच आहे. लष्करी सामर्थ्य वाढविण्याची इतकी जय्यत तयारी चालू आहे, तरी तिच्यापासून इतर राष्ट्रांनीं भीति बाळगण्याचें मुळींच कारण नाहीं, असा आव घालून कित्येक ग्रंथकार असें प्रतिपादन करतात कीं, आमच्या राष्ट्राइतकें शांतताप्रिय राष्ट्र दुसरें कोणचेंहि नाहीं. शिवाय व्यापारांत जर्मनीचें पाऊल पुढें पडावें ही आमची इच्छा खरी; पण ती पूर्ण करण्याकरतां इतर राष्ट्रांशीं हातघाईवर येण्याचें आम्हांला मुळींच कारण नाहीं. राज्यांत प्रचंड सैन्य असावें एवढ्याचकरतां तें ठेवलें आहे, त्याचा इतर राष्ट्रांविरुद्ध उपयोग करून घेण्याकरतां तें ठेवलेलें नाहीं, असे विचार या ग्रंथकारांनीं आपआपल्या पुस्तकांत ग्रथित केलेले आहेत! भांडवलवाले व मजूरदार,

in every town officers strutting the streets with a look of conscious dignity, jingling their spurs and clanking their sabres. ... ... .... The daily press in Germany, while often ignoring political topics that seem to touch the masses more closely, is foever devoting much space and time to a discussion of the different phases of army life, and their readers demand this. ... ... ... No where else in the world is the army so much identified with the nation, and no where else is respect and tender regard for the army so deep-seated and general. P. P. 216-17.

१. हें त्यांचें म्हणणें खरें आहे असें गृहीत धरून चाललें तरी त्याचा व्यवहारांत काय परिणाम होतो हें पाहण्याजोगें आहे. व्यापाराच्या उन्नतीकरतां कां होईना, पण प्रचंड सैन्य आणि लढाऊ आरमार राष्ट्रांत पाहिजे, असें लोकांना वाटूं लागल्यामुळें या दोन कामांकरितां वाटेल तितका पैसा खर्च करण्याला पार्लमेंटांतील लोकांचे प्रतिनिधि सरकारला मागचा पुढचा विचार न करतां संमति देऊं लागले. पार्लमेंटांतील इतर अनेक बाबतींत देखील सरकारचा वरचढपणा पदोपदीं अनुभवास येतो.

कारखानेवाले व शेतकरी पहा, त्यांच्यांत देखील सरकारचें उदाहरण डोळ्यापुढें ठेवून "बळी तो कान पिळी" हाच प्रकार चाललेला पहावयास सांपडतो.

जॉन रस्किन एके ठिकाणीं असें म्हणतो कीं, एखाद्या राष्ट्राचें हृद्गत आपल्याला कळून घ्यावयाचें असेल, किंवा कोणचें ध्येय साधण्याची त्या राष्ट्राची खटपट चालू आहे, हें अजमावयाचें असेल, तर त्या राष्ट्रांतील वास्तुविद्या—आर्किटेक्चर—आपण पहावी म्हणजे झालें. जर्मनींत प्रस्तुत प्रचलित असलेल्या वास्तुविद्येच्या कसोटीला हें रस्किनचें मत जर आपण लावलें, तर तें अक्षरशः खरें आहे, असें आपल्या अनुभवास येईल. जर्मनीच्या उत्तरभागांतील शहरें पहा, किंवा खुद्द बर्लिन राजधानीकडे पहा. अलीकडील तीस वर्षांत या ठिकाणीं जेवढ्या म्हणून नवीन इमारती बांधल्या आहेत तेवढ्या सर्वांत इमारतींच्या मालकांचें सामर्थ्य दर्शविण्याकडेच इंजिनियरांनीं सर्व लक्ष पुरविल्याचें दिसून येतें. अठराव्या शतकांत किंवा त्याच्याहि पूर्वीं बांधलेला पण हल्लीं अवशिष्ट असलेला बर्लिन शहराचा भाग पाहिला म्हणजे कारागिरांचें कौशल्य पाहून आपलें मन आश्चर्यचकित होतें. याच्या उलट, अलीकडे बांधलेल्या सरकारी इमारती, प्रार्थनालयें किंवा पूल पहा. यांची बांधणी किती ओबडधोबड आणि किती अवाढव्य! या अवाढव्यपणामुळें इमारतींच्या मालकांचा मोठेपणा पाहणाऱ्याच्या लक्षांत येतो; पण त्याचें मन प्रसन्न न होतां एखाद्या मोठ्या ओझ्याखालीं दडपून टाकल्यासारखें होतें. कारागिरांच्या कुशलतेचा व कल्पकतेचा या इमारतींत मागमूसहि लागत नाहीं. खाजगी इमारतींत देखील वरीलप्रमाणें मालकांचें सामर्थ्य दाखविण्याचाच यत्न केलेला असतो.

आजकाल जर्मन राष्ट्राची सुधारणा सर्व अंगांनीं झाली आहे,

आणि पुढें याहूनहि ती जास्त जास्त होईल यांत शंका नाहीं. पंचमहाभूतांवर ताबा चालवून जर्मन लोकांनीं त्यांनां आपल्या अगदीं कह्यांत आणलें आहे; जगांतील बऱ्याच मोठ्या भागावर जर्मन सत्ता स्थापित केली पाहिजे, अशी आकांक्षा त्यांच्या मनांत उद्भवली आहे; व्यापार आणि उद्योगधंदे यांत ते इतर लोकांच्या फार पुढें गेले आहेत; आपलें लष्करी सामर्थ्य इतकें वाढवावयाचें कीं, परराष्ट्रांना डोळा वर करून आपल्याकडे बघण्याची छाती होऊं नये, असा त्यांचा आटोकाट यत्न चालू आहे; परोत्कर्ष सहन न होऊन समुद्रावर आपलें वर्चस्व स्थापन व्हावें या हेतूनें, समुद्राकडे मोठ्या आशेनें ते नजर लावून बसले आहेत. हीं सगळीं सर्वांगी सुधारणेचीं लक्षणें आहेत, नाहीं असें कोण म्हणेल? पण या सुधारणेच्या मुळाशीं काय आहे, याचा आपण विचार केला, तर आपल्याला काय दिसतें बरें? आधुनिक जर्मनीला गौरवोन्माद वायूचा झटका आला आहे, व त्या वायूच्या लहरींत त्याला इतर राष्ट्रांचा उत्कर्ष सहन होईनासा झाला आहे. सर्व राष्ट्रें आपल्या अंकित असावीं व सर्वत्र आपला विजय व्हावा, असें त्याला वाटूं लागलें आहे. सारांश, वर वर्णन केलेल्या सुधारणेचें मूळ 'विजिगीषा' या एका शब्दांत आहे. विजिगीषा हें आधुनिक जर्मनीचें मुख्य सूत्र आहे.

सर्व जगाचे डोळे दिपवून टाकणारी जर्मनीची ही सुधारणा म्हणजे खरी खरी सुधारणा आहे किंवा नाहीं याचा आपण विचार केला पाहिजे. आणि तसा विचार करतांना जर्मनीनें आपल्यापुढें कोणचें उच्च ध्येय ठेविलें आहे, हें पाहणें जरूर आहे. अशा प्रकारचें ध्येय जर्मनीनें आपल्या डोळ्यांपुढें ठेवल्याचें पूर्ण विचारांतीं देखील अनुभवास येत नाहीं, असें मोठ्या कष्टानें म्हणावें लागतें. शारीरिक व भौतिक सामर्थ्य जर्मनीपाशीं पुरून उरेल इतकें आहे. परंतु या सामर्थ्याबरोबर लोकांचीं मनें जास्त सुसंस्कृत करण्याचें, अथवा त्यांच्या नीतिचा व बुद्धिचा विकास करण्याचें सामर्थ्य त्या

देशाला यावें तितकें आलें आहे असें वाटत नाहीं. हीं दोन सामर्थ्यें एकस्वरूपी नाहींत असें दर्शविणारीं उदाहरणें सुधारणेच्या इतिहासांत पावलोंपावलीं आढळतात. पहिल्या प्रकारचें सामर्थ्य हें केवळ पशुवृत्तीचें लक्षण होय; दुसऱ्या प्रकारचें सामर्थ्य मात्र विशेष महत्त्वाचें आहे. शारीरिक सामर्थ्याला बुद्धिसामर्थ्याची जर जोड मिळाली नाहीं तर तें फार दिवस टिकत नाहीं. रोमनें आपल्या सैन्याच्या जिवावर, म्हणजे शरीरबळावर, राज्य केलें. परंतु सैन्याची वाताहात झाल्याबरोबर रोमची सत्ता धुळीस मिळाली. ग्रीसजवळ मोठें सैन्य नव्हतें, पण सैन्याची मदत जेथें कमी पडली तेथ ग्रिक लोकांनीं उच्च ध्येय डोळ्यासमोर ठेवून आपल्या बुद्धीच्या सामर्थ्यावर लोकांचीं मनें जिंकलीं, व अशा सत्तेखालीं पुढें खुद्द रोमन लोकांनां देखील मान वांकवावी लागली !

जर्मनीची आजला हुबेहुब रोमसारखी स्थिति आहे. सुमारें पन्नास वर्षांपूर्वीं रोमचें व ग्रीसचें अशीं दोन उदाहरणें जर्मन पुढाऱ्यांपुढें उभीं होतीं. त्यांपैकीं कोणतें उदाहरण ते ग्रहण करतात, हें पाहण्याकडे जगाचे डोळे लागले होते. पण खेदाची गोष्ट ही कीं, ग्रीक लोकांना मागें सारून रोमन लोकांचेंच अनुकरण करण्याचें त्यांनीं ठरविलें असावें, असें सध्या तरी दिसतें. आतां यापुढें शारीरिक उन्नतीबरोबर मानसिक उन्नति करण्याच्या उद्योगाला ते लागतील किंवा नाहीं हें कालान्तरानें ठरावयाचें आहे. श्रेष्ठ प्रतीचें तत्त्वज्ञान, मनुष्याच्या मनाला रंजविणारें व विसावा देणारें काव्य आणि श्रेष्ठ वाङ्मय, यांची देणगी जुन्या जर्मनीनें जगाला दिलेली आहे, व त्यायोगानें जगावर अनंत उपकार झाले आहेत. पण अशा प्रकारची कोणची देणगी नवीन जर्मनी जगाला यापुढें देणार, हें सांगणें कठिण आहे. धान्यानें भरलेलीं कोठारें किंवा मालानें भरलेलीं व्यापारी अवजड गलबतें अथवा नवीन नवीन शास्त्रीय शोध लावून वाढविलेली अपार संपत्ति ही कांहीं अशा प्रकारची देणगी नव्हे, हें खास.

आणि त्याबद्दल कोणी जर्मनीचा फारसा धन्यवादहि गाणार नाहीं. "जर्मन संस्कृति म्हणतात ती आहे कोठें?" असा अलीकडील एका जर्मन ग्रंथकारानें प्रश्न केला आहे, त्यांतील रहस्य तरी हेंच आहे.

जर्मनींतील लोकांच्या मनावर अलीकडे कोणत्या गोष्टींचा पगडा बसत चालला आहे, याचें आतांपर्यंत केलेलें विवेचन जर वस्तुस्थितीला धरून असेल, तर त्यांच्या आयुष्यक्रमांत आणि स्वभावांत प्रकट होणाऱ्या स्थित्यंतराची बरोबर मीमांसा कोणालाहि करतां येण्याजोगी आहे. जडसृष्टीवर त्यांना प्रभुत्व स्थापन करतां यावें, परंतु मनस्सृष्टी-वर मात्र तसें करतां येऊं नये, यांतील बीज तरी हेंच कीं, शारीरिक आणि आधिभौतिक सामर्थ्यावरच त्यांनीं आपली सर्व मदार ठेविली आहे. पंचमहाभूतांनां खेंचून आपल्या ताब्यांत आणण्याचें सामर्थ्य यांच्या अंगांत जितकें आहे तितकें इतर कोणाच्याहि अंगांत नाहीं. यांची काम करण्याची शिस्त मोठी नमुनेदार आहे. जर्मनींत तयार झालेली यंत्रसामग्री सर्वोत्कृष्ट असते असें नाहीं; पण त्या यंत्रांच्या साहाय्यानें जें कांहीं काम करतां येईल तें मात्र अगदीं उत्तम प्रतीचें अस-वयाचें हेंहि निर्विवाद आहे; तथापि हीं अचेतन यंत्रें सोडून मनुष्यरूपी सचेतन यंत्राला यांनीं हात घातला कीं तेथें तो लटपटावयास लागतो, याचें कारण काय? याचें कारण देखील वर सांगितलेली मनोवृत्ति, दुसरें नाहीं. जर्मनींतील कॉलेजांत व युनिव्हर्सिटयांत मोठे मोठे पंडित निर्माण होतात, धंदेशिक्षणाच्या शाळांत अवजड यंत्रांची खडानूखडा माहिती असणारे व तीं यंत्रें चालविणारे कारागीर उत्पन्न होतात; परंतु विद्या-र्थ्यांचें शील बनविण्यांत, किंवा त्यांच्या अंगांत एखादा विशिष्ट गुण उत्पन्न करण्यांत, या युनिव्हार्सिट्यांचा व विद्यालयांचा मुळींच उपयोग होत नाहीं. देशांत प्रचलित असलेली राज्यव्यवस्था या दोषाच्या मु-ळाशीं असल्यानें तिला नांवें ठेवणारे अनेक सुशिक्षित लोक तेथें

आहेत. ही राज्यपद्धति वाईट कां, तिच्यांत दोष कोणते आहेत व ते कसे काढून टाकतां येतील, यासंबंधाची स्पष्ट कल्पना या सुशिक्षितांनां अद्यापि झालेली नसल्यानें त्यांच्या तक्रारी अजून बऱ्याच अस्पष्ट आणि संदिग्ध आहेत हें खरें; परंतु विद्यासंपन्न माणसांचा आपल्या देशाच्या राज्यकारभारांत जितका हात शिरावयाला पाहिजे तितका तो हल्लींच्या राज्यपद्धतीमुळें शिरत नाहीं, व त्यामुळें राज्याचें तारू भलतीकडे झुकत चाललें आहे असें त्यांनां वाटतें. तरी हातांत सत्ता नसल्यामुळें जागच्या जागीं चरफडत बसण्यापलीकडे त्यांनां कांहींएक करतां येत नाहीं.

जर्मन लोकांच्या अंगांत चांगले गुण पुष्कळ आहेत, त्या गुणानुरूप त्यांची जगांत उन्नति व्हावी अशी इच्छा बाळगणारे जर्मनीच्या बाहेरहि अनेक लोक आहेत. त्यांच्या मतानें या लोकांच्या हातून जी एक मोठी चूक झाली आहे ती ही कीं, पूर्वींचीं आपलीं राष्ट्रीय ध्येयें अजीबात सोडून देऊन ते एकसारखे ऐहिक संपत्तीच्या मागें लागले आहेत. ऐहिक संपत्तीचा हा त्यांचा निदिध्यास पुढेंमागें कमी झाला म्हणजे त्यांच्यांत सात्त्विक वृत्तीचा उदय होईल व राजसी वृत्ति लयाला जाईल. कांहीं वर्षांनीं हा सुपरिणाम झाल्याचें आपल्याला खचित दिसून येईल, अशी आम्हांला बळकट आशा आहे. जर्मन राष्ट्र सुधारणेच्या दृष्टीनें अद्यापि बाल्यावस्थेंत आहे. बाळपणचा हूडपणा अजून त्याच्या अंगांत आहे. हा हूडपणा नाहींसा होऊन बुद्धीला जरा स्थैर्य आलें व पोक्त विचार करण्याचें सामर्थ्य अंगीं आलें म्हणजे जर्मनी हें एक सर्व बाजूंनीं नमुनेदार राष्ट्र होईल अशी आशा करणें खचित अस्थानीं नाहीं.

प्रकरण दुसरें

# जर्मनीचे तीन विभाग

"डॉइशलान्ड" अथवा जर्मनी व जर्मनींतील लोक यांच्यासंबंधानें सर्वसाधारण सिद्धान्त बसविण्याचें काम फार कठिण आहे. 'जर्मनी' या एका शब्दांत निरनिराळ्या २६ प्रांतांचा समावेश होतो व या प्रांतांत निरानिराळया प्रकारचे लोक राहतात. त्या प्रांतांत भूगोलाच्या दृष्टीनें फार फरक आहेत, त्यांचे राजकीय इतिहास भिन्नभिन्न स्वरूपाचे आहेत, जातीजातींत पोटभेद बरेच आहेत, आणि घरची रहाणी व ज्ञानार्जनाचे मार्गहि वेगवेगळे आहेत.

या भिन्नतेमुळें सर्वसाधारण सिद्धान्त ठरविणें जरी बरेंच कठिण आहे, तरी योग्य सावधगिरी बाळगली असतां, तसें करणें अगदींच अशक्य मात्र नाहीं. जर्मन राष्ट्राचे आपण जर कांहीं विभाग केले, तर हें काम बरेंच सुकर होईल असें आम्हांला वाटतें. हे विभाग निर्दोष किंवा प्रमाणबद्ध होतील असें आमचें आम्हांलाच वाटत नाहीं. तरी पण जर्मनी व जर्मन लोक यांचा बरोबर अदमास जर आपल्याला करावयाचा असेल, तर अशी एखादी योजना करणें अपरिहार्य आहे. आणि तसें केलें म्हणजे वर वर्णन केलेल्या भिन्न प्रकारांनां कांहीं तरी स्थानिक मर्यादा घालून देतां येतील.

आमच्या मतानें आम्हीं जर्मनीचे तीन विभाग करण्याचें ठरविलें आहे. लोरेन, बेडन, बव्हेरिया आणि साक्सेन या प्रांतांच्या सरहद्दीवरून पश्चिमेकडून पूर्वेकडे एक रेषा काढावी. या रेषेनें जर्मनीचे उत्तरजर्मनी आणि दक्षिणजर्मनी असे दोन भाग पडतात. फ्रान्स व बेल्जमनजीकच्या र्‍हाइन प्रॉव्हिन्सपासून पूर्वेकडे रशियन पोलंडच्या सरहद्दी-

पावेतों सर्व प्रशिया प्रांत, याशिवाय मॅक्लेन्सबर्ग्स, ओल्डेनबर्ग आणि ब्रन्सविक इतका प्रदेश उत्तरजर्मनींत पडतो. ऑल्सेस, लोरेन, साक्से-नचीं तीन राज्यें, बव्हेरिया आणि व्युर्टेंबर्ग, तसेंच ग्रँड डची ऑफ् बेडन इतका प्रदेश दक्षिणजर्मनींत येतो. या दोहोंच्या दरम्यान असणारीं थुरिंजियन स्टेट्स हीं दोहोंपैकीं कोणच्याहि एका भागांत न घालतां तशींच स्वतंत्रपणानें मध्यें राहूं दिलीं आहेत, व तसें करण्याला आमचीं कांहीं कारणेंहि आहेत.

पूर्वपश्चिम रेषेवर दुसरी एक लंबरेषा काढावी, म्हणजे या रेषेनें खुद्द प्रशियाचे दोन भाग पडतात. यांपैकीं पश्चिमेकडील व पूर्वेकडील भागांनां, पूर्वींच्याच संज्ञा कायम ठेवून, 'पश्चिम एल्बा प्रांत' व 'पूर्व एल्बा प्रांत' अशीं नांवें अनुक्रमें आपण देऊं. पहिल्या भागांत हॅनोव्हर, हेसी-नॉसा, ऱ्हाइनलँड आणि वेस्टफालिया हे प्रदेश येतात; व दुसऱ्या भागांत शेतीच्या उपयोगीं पडणारा प्रशियाचा सखल भाग आणि मेक्लेंबर्ग्सचे दोन प्रांत यांचा समावेश होतो. एल्ब नदीच्या पूर्वेकडील हा भूभाग म्हणजे जर्मन राष्ट्राचे धान्याचें कोठार आहे असें म्हणावयास कांहीं हरकत नाहीं. कारण, वर्षाच्या बेगमीला जितका गहूं आणि राय (Rye) नांवाचें धान्य लागतें, त्यापैकीं जवळजवळ दोनतृतीयांश धान्य या प्रांतांत पिकतें.

आम्हीं केलेले हे तीन भाग अनेक बाजूंनीं दोषास्पद आहेत, हें आमचें आम्हांलाच दिसत आहे. परंतु या व्यवस्थेनें, जर्मन राष्ट्रांत जे निरनिराळ्या प्रकारचे लोक आहेत त्यांच्या स्वभावांत, त्यांच्या व्यव-सायांत व हितसंबंधांत साम्य कोणचें, विरोध कोणचा, याचा सांगोपांग विचार करणें व त्यापासून बरेच महत्त्वाचे सिद्धान्त काढणें सोपें जाईल याविषयीं आम्हांला शंका नाहीं.

प्रथमच आपल्याला असें दिसून येईल कीं, आम्हीं जी पश्चिमेकडून

पूर्वेकडे एक आडवी रेषा काढली, त्या रेषेनें जर्मनीचे राजकीय दृष्ट्या, स्थूल मानानें कां होईना, पण अगदीं निरनिराळे दोन भाग पडतात. उत्तरभागांत ( हँबर्ग आणि ब्रेमेन हे दोन प्रांत खेरीज करून ) कान्सरवेटिव पक्षाच्या लोकांचें बळ अधिक आहे. जर्मनीचा इतिहास मुख्यत्वेंकरून या पक्षांतील लोकांच्या मतानुसार सिद्ध झाला आहे, इतकेंच नाहीं, तर हल्लींसुद्धां देशांतल्या देशांत ज्या व्यवस्था अमलांत येतात, त्या यांच्या मताला अनुकूल अशाच असतात.

प्रशिया म्हणजेच जर्मनी असा पुष्कळ लोकांचा गैरसमज आहे, आणि म्हणून प्रशियाची राजकीय, सामाजिक आणि औद्योगिक स्थिति अवलोकन करून सगळ्या जर्मनीसंबंधानें यांनीं काढलेलीं अनुमानें चुकीचीं आणि आक्षेपार्ह असतात, यांत नवल नाहीं. प्रशियांत संपत्ति विपुल आहे, सुधारणेच्या कामांत त्याचें पाऊल सर्वांत पुढें आहे, तेथील राज्यव्यवस्था उत्तम प्रकारची आहे, लष्कराची शिस्त नमुनेबाज आहे, हें सर्व ठीक आहे; पण राजकीय बाबतींत प्रशिया अजून बराच मागें आहे, दक्षिणेकडील लहानलहान संस्थानें या बाबतींत त्याच्या किती तरी पुढें गेलेलीं आहेत.

उत्तरजर्मनी व दक्षिणजर्मनी या दोन्ही ठिकाणीं सुमारें पन्नास वर्षांपूर्वीं लोकमताला कांहीं अंशीं अनुकूल अशी राज्यव्यवस्था अमलांत आली; पण त्या दोहोंत त्या वेळेस जो एक महत्त्वाचा फरक राहून गेला, तो हा काळपावेतों तसाच कायम आहे. आज जवळजवळ साठ वर्षें प्रशियांत पार्लमेंट सभा आहे, पण त्यामुळें अनियंत्रित सत्तावाद्यांचें प्रस्थ कमी झालेलें नाहीं. त्यांच्या मतानें पार्लमेंटची देणगी आपण होऊन राजानें प्रजेला दिली, प्रजेनें आपल्या सामर्थ्याच्या जोरावर राजापासून घेतली, असें नाहीं. राजा स्वसंतोषानें प्रजेला जेवढे हक्क देईल तेवढ्यांत तिनें समाधान मानावें, राजाच्या इच्छेविरुद्ध जाण्याचा

उद्योग करूं नये, हें प्रशियन राजनीतींतील मुख्य तत्त्व आहे व तें तत्त्व राजा व प्रजा दोघेहि पूर्णपणें ओळखून आहेत. राज्यव्यवस्थेचा मुख्य प्रवर्तक राजा असल्यानें प्रशियांतील राज्यव्यवस्थेंत एक प्रकारचा ताठरपणा आला असून लवचिकपणा मुळींच राहिलेला नाहीं. गेल्या पन्नाससाठ वर्षांच्या अवधींत राजानें आरंभीं कृपाळू होऊन आपली सत्ता अंशमात्रानें जेवढी प्रजेला दिली, तेवढीच ती आजमित्तीला तिच्या हातांत आहे. याचा परिणाम असा झाला आहे कीं, राजा व प्रजा उभयतां एकमेकांविषयीं साशंक आहेत. राजाला वाटतें कीं, प्रजा आपल्यापाशीं आणखी जास्त हक्क मागेल; उलट प्रजेला वाटतें कीं, जे थोडे हक्क आपल्याला प्राप्त झाले आहेत तेहि राजा केव्हां तरी आपणां-पासून हिरावून परत घेईल. राजाबरोबर भांडण्याला प्रजेच्या बाजूला जितकें पाठबळ असावयाला पाहिजे तितकें नाहीं. कारण, ज्या लोकांचें राजदरबारांत वजन आहे, ते कान्सरवेटिव पक्षाचे आहेत व ते नेहमीं राजाच्या बाजूला असतात. दक्षिणेकडे मात्र याच्या उलट स्थिति आहे. तेथें लिबरल पक्षाचा भरणा पहिल्यापासून मोठा आहे. राजाची सत्ता नियंत्रित होऊन प्रजेला ती मिळाली पाहिजे हें त्यांचें ध्येय आहे, व तें साध्य करून घेण्याच्या मार्गांत ते आहेत.

याप्रमाणें उत्तर व दक्षिण जर्मनीमधील लोकांत प्रचलित राजकीय मतांतच तेवढा फरक आहे असें नाहीं; तर दोघांच्या संस्कृतींतहि अशा प्रकारचा फरक दिसून येतो. उत्तरेकडील लोक मनाचे कठोर, स्व-भावानें रुक्ष आणि बिनमुरवतखोर आहेत. याच्या उलट दक्षिणेकडील लोकांत जास्त सौजन्य असून त्यांचा स्वभाव आनंदी, मोकळा व दिलदार आहे. त्यांची रहाणी डौलदार व थाटमाटाची नाहीं. ईश्वरानें दिलेलें आयुष्य आनंदांत आणि सुखांत घालविण्याकडे त्यांच्या बुद्धीचा कल विशेष आहे.

उत्तरजर्मनीचे पुनः आम्हीं दोन विभाग केले आहेत, हें वाचकांच्या स्मरणांत असेलच. या दोन भागांत देखील वरच्याप्रमाणेंच विसदृशता आहे, व ती स्पष्टपणें कोणाच्याहि नजरेस येण्याजोगी आहे. ही विसदृशता वरच्याप्रमाणें एकांगीं म्हणजे राजकीय विषयापुरतीच आहे असें नाहीं; तर सांपत्तिक बाबतींत देखील तिचें अस्तित्व स्पष्टपणें अनुभवाला येतें. एल्ब नदीच्या पश्चिमेकडील प्रांत जर्मनींत प्रसिद्धीस आलेल्या उद्योगधंद्यांचें मुख्य ठिकाण आहे. उलट, एल्ब नदीच्या पूर्वेकडील भाग पहावा, तर तो एकट्या प्रशियाची नव्हे, तर सगळ्या जर्मन देशाची धान्यभूमि आहे; तेथें कारखाने वगैरे कांहीं नाहींत. या भागांत धान्याशिवाय 'बीट' नांवाच्या मुळ्या ( कांदे ) पिकतात व त्या मुळ्यांपासून साखर तयार करतां येते. मधूनमधून चराऊ रानेंहि बरींच आहेत. विशेषेंकरून जों जों आपण पूर्वेकडे म्हणजे थेट रशियन सरहद्दीपर्यंत जावें, तों तों हीं रानें अधिकाधिक दृष्टीस पडतात व त्या मानानें गोरक्षकांचा व मेंढपाळांचा धंदा तेथें विशेष तेजीचा आहे. पूर्वभागांत व पश्चिमभागांत धर्माच्या बाबतींत हा विलगपणा तितका स्पष्ट नाहीं. प्रॉटेस्टंट व कॅथलिक लोकांची चोहोंकडे सळभेसळ झालेली आहे. कोठें प्रॉटेस्टंट जास्ती, तर कॅथलिक कमी; कोठें याच्या उलट प्रकार आहे. प्रशियांत रोमन कॅथलिकांचा भरणा फार आहे; इतका कीं, जर्मनीच्या एकंदर लोकसंख्येच्या एकतृतीयांशाइतके कॅथलिक लोक त्या राज्यांत आहेत.

प्रशियन राज्याच्या या दोन विभागांत सांपत्तिक दृष्ट्या जो फरक दिसून येतो, त्याचा परिणाम तेथील लोकसंख्येवर व मोठमोठ्या शहरांच्या संख्येवर झाला आहे. पूर्वेकडील भागांत लोकवस्ती विरळ आहे, आणि गांवें व शहरें एकमेकांपासून दूर अंतरावर वसलेलीं आहेत. प्रशियांत एकंदर २८ मोठीं—म्हणजे एक लाखावरील लोकवस्तीचीं—शहरें आहेत. यांपैकीं ९ पश्चिम भागांत व ४ पूर्वभागांत असून बाकीचीं कांहीं

उत्तरेकडे आणि दक्षिणेकडे व कांहीं बर्लिन राजधानीप्रमाणें मध्यभागांत वसलीं आहेत. पूर्वेकडील भागांत उद्योगधंदे कमी आहेत, आणि त्यामुळेंच मुख्यत्वेंकरून तेथील लोकवस्ती विरळ आहे. पश्चिमेकडील भागांत लोखंडाच्या व कोळशाच्या खाणी पुष्कळ आहेत. त्या खाणींत काम करण्याकरतां पूर्वेकडून पुष्कळ मजूर पश्चिमेकडे जातात; व हा क्रम गेलीं २५ वर्षें सारखा चालू आहे. शिवाय पूर्वेकडे मृत्यूचें प्रमाण जास्ती असून त्या मानानें नवीं मुलें जन्माला येत नाहींत. लोकवस्ती विरळ होण्याला वर सांगितलेल्या मुख्य कारणाच्या मानानें हीं आतां सांगितलेलीं दोन कारणें दुय्यम प्रतीचीं आहेत. मोठमोठ्या कारखान्यांत किंवा खाणींत काम करून जास्त मजुरी मिळविण्याची मजूरवर्गाला चट लागल्यानें पूर्वेकडील भागांतील शेतीचें फार नुकसान होऊं लागलें आहे. कारण, शेतांत खपावयाला अवश्य तितके मजूर मिळणें दिवसानुदिवस कठिण होत चाललें आहे. आणि हीच स्थिति आणखी कांहीं वर्षें अशीच चालू राहिली, तर एकंदर राष्ट्राला लागणाऱ्या धान्याचा पुरवठा कसा करावयाचा, ही एक मोठी अडचण उत्पन्न होईल. १९०० सालाचे जे आंकडे प्रसिद्ध झाले आहेत, त्यांवरून असें दिसतें कीं, त्या एका सालांत २,४५० कुटुंबांतील १०,२७० तरुण मजूर लग्नाच्या अगोदरच पूर्वप्रशियांतून निघून पश्चिमप्रशियांत उद्योगाकरतां गेले. हें प्रमाण त्या सालानंतर अलीकडे पुष्कळच वाढलें असलें पाहिजे, यांत शंका नाहीं.

पूर्व आणि पश्चिम यांत आणखी एक महत्त्वाचा फरक असा आहे कीं, पूर्वेकडील शेती क्षेत्राच्या मानानें फार मोठ्या प्रमाणावर आहे व पश्चिमेकडील थोडीफार जी आहे, ती अगदीं लहान प्रमाणावर आहे. जमीन कसण्याची पद्धतहि त्या त्या प्रांतांत निराळी आहे. आपल्या हिंदुस्थान देशांत जसे मोठमोठे जहागिरदार आहेत, तसे पूर्व भागांत पुष्कळ आहेत व ते अगदीं स्वतंत्र आहेत. यामुळें प्रशियन राज्याच्या

या भागांतील लोकांनां नागरिकत्वाचे जितके राजकीय हक्क वास्तविक मिळावयाला पाहिजे होते तितके मिळालेले नाहींत; फार तर काय त्यांचे स्थानिक स्वराज्याचे हक्क देखील फार संकुचित आहेत! इंग्लंडांत व इतर ठिकाणीं लष्करी नोकरी करण्याच्या अटीवर मुख्य जहागिरदाराकडून पोटजहागिरदाराला लष्करी मोकासा मिळण्याची " फ्यूडल सिस्टिम " या नांवाची जी एक पद्धत होती, तिचाच हुबेहुब नमुना प्रशियाच्या या भागांत आहे, व तिला " मॅनोरियल सिस्टिम " अशी संज्ञा आहे. ही पद्धति अस्तित्वांत असल्यानें मोठमोठे जहागिरदार आपल्या पोटजहागिरदारांनां व त्यांच्या हाताखालच्या रयतेला फार वाईट रीतीनें वागवितात. अर्थात् हे लोक फार निकृष्ट स्थितींत आहेत व सुधारणेच्या कामांत फार मागें आहेत. ही निकृष्ट स्थिति सुधारण्याची स्टीन नांवाच्या गृहस्थानें फार खटपट केली. ह्या गृहस्थानें या विषयावर अनेक लेख लिहिले, व हे लक्ष्मीपुत्र आपल्या हाताखालच्या लोकांनां केवळ गुलामाप्रमाणें कसें वागवितात, हें लोकांच्या निदर्शनास आणून दिलें. स्टीनच्या या खटपटीची सरकारांत लवकरच दाद लागली व कुळांची गुलामगिरी बंद करण्याकरतां प्रशियन डायट-(Diat)नें, म्हणजे पार्लमेंटानें, कांहीं कायदे पास केले. या कायद्यांचा अम्मल होऊं लागल्यापासून कुळांच्या कपाळची गुलामगिरी सुटून स्वातंत्र्यसुखाचा त्यांनां थोडासा अनुभव घेतां येऊं लागला. परंतु एवढ्यानें नागरिकांचे सर्व हक्क त्यांनां प्राप्त झाले, असें म्हणतां येत नाहीं. 'मॅनोरियल सिस्टीम'ची पाळेंमुळें या कायद्यांनीं खणून काढलीं नाहींत. आणि म्हणून रयत व त्यांचे जहागिरदार या दोघांची प्रगति हल्लींच्या सुधारणेच्या मन्वंतरांत देखील बेताबेतानेंच होत आहे.

पूर्वप्रशियांत राज्यकारभाराच्या जुन्या पद्धति अजून चालू आहेत. उदाहरणार्थ, वर सांगितलेल्या जहागिरदारांनां त्यांच्या त्यांच्या जहागिरी-

पुरते दिवाणी, मुलकी व फौजदारी अधिकार दिलेले आहेत. ही स्थिति सुधारण्याकरतां १८५० सालीं पार्लमेंटांत एक बिल पुढें आलें होतें. परंतु तें या लोकांनीं हाणून पाडलें. १८९२ सालीं एक कायदा नाहीं होय करतां करतां पास झाला. परंतु या कायद्यानंतर देखील या जहागिरी म्हणजे राज्यकारभाराचे स्वतंत्र इलाखे असें समजण्यांत येत असल्यानें, आपण ज्याला खरें स्थानिक स्वराज्य म्हणतों तें या मुलुखांतील लोकांनां मिळालें नाहीं.

प्रशियन राज्याचा पूर्वेकडील प्रांत सांपत्तिक आणि सामाजिक बाबतींत असा मागसलेला आहे, याचीं आणखी अनेक कारणें आहेत. येथील शेती मोठ्या प्रमाणावर, म्हणजे एकाच मालकाकडे हजारों एकर जमीन असल्यानें, जगापासून विलग राहण्याची प्रवृत्ति इकडील लोकांत विशेष रीतीनें दिसून येते, व त्यापासून त्यांचा फार तोटा होतो. जमीनीचे मालक व जमीन वाहणारीं त्यांचीं कुळें शहरांपासून दूर पडल्यानें शहरांतील लोकांची सामाजिक, सांपत्तिक, औद्योगिक व राजकीय सुधारणा कशी होत आहे, इकडे त्यांचें लक्षच जात नाहीं. इतकें अज्ञान जेथें आहे, तेथें स्वसुधारणेचा कितपत प्रयत्न होत असेल याची वाचकांनींच कल्पना करावी. आपल्या तंतुमय जाळ्याच केंद्र साधून बसणारा कोळी जसा आपल्याला तेवढ्या जागेचा राजा समजतो, तसे हे मोठमोठे जमीनदार आपल्या मुलुखाचे आपल्याला राजेच समजतात. लोकांवर हुकमत चालविण्याचा आपला अधिकार आहे, आपल्या इच्छेविरुद्ध हाताखालच्या लोकांनीं जातां कामा नये, फार तर काय, पण आपण सोडलेल्या हुकुमांविरुद्ध त्यांनीं तोंडावाटे ब्रहि काढतां उपयोगी नाहीं, असा यांचा नबाबी अम्मल आहे. अशा अमलाखालीं दडपून गेलेल्या लोकांची सामाजिक उन्नति होत नाहीं व बुद्धि विकास पावत नाहीं, यांत आश्चर्य नाहीं. एल्ब आणि विस्चुला

या दोन नद्यांमधील या मुलुखांवर बरेच वर्षांपूर्वी स्लाव्ह जातीच्या लोकांचा अम्मल होता. त्या अमलांत येथील लोकांची स्थिति चांगली होती. परंतु जर्मन लोकांच्या ताब्यांत हा मुलुख गेल्यापासून त्याची जी एकदा अवनति सुरू झाली, ती आजामित्तीला देखील कमी झालेली नाहीं! असो. येथें एक गोष्ट सांगितली पाहिजे ती ही कीं, या प्रांताची हवा पश्चिमप्रांतासारखी चांगली नाहीं व जमीनहि तिकडील जमिनीइतकी सुपीक नाहीं. या दोन कारणांमुळें जमीनींत जितकें पीक यावें तितकें येत नाहीं. पिकाच्या मानानें जमीनीवरील साऱ्याचें उत्पन्नहि कमी म्हणजे पश्चिमेकडील साऱ्याच्या उत्पन्नाच्या एकतृतीयांश इतकें आहे. शेतीची ही निकृष्ट स्थिति सुधारावी म्हणून प्रशियन सरकारनें आजपर्यंत अनेक प्रयत्न केले, परंतु त्यांपासून इष्ट परिणाम घडून आला नाहीं.

राजकीय बाबतींत जर्मनीचा दक्षिणभाग उत्तरभागाच्या पुष्कळ पुढें आहे, हें आम्हीं मागें सांगितलेंच आहे. आतां उत्तरभागाचा विचार केला तर असें दिसून येतें कीं, पश्चिमेकडील भाग पूर्वेकडील भागापेक्षां या कामांत बराच पुढें आहे. एल्ब नदीच्या पूर्वेकडील शेतीवर निर्वाह करणाऱ्या मुलुखांत प्रशियांतील कान्सरवेटिव लोकांचा फार मोठा भरणा आहे. पार्लमेंटांत सभासद निवडून देण्याचा अधिकार इतका मर्यादित केलेला आहे कीं, गरीब लोकांनां पार्लमेंटांत शिरतां तर येत नाहींच, पण आपल्या तर्फे एखादा सभासद निवडून पाठवू म्हटलें तर तेंहि त्यांनां साध्य नाहीं. यामुळें पार्लमेंटात सर्व सत्ता श्रीमंतांच्या हातांत आहे व ते प्रगतीला विरोधक म्हणजे 'कान्सरवेटिव' आहेत. लिबरल व कान्सरवेटिव हे दोन पक्ष विलायतेंत आहेत, ही गोष्ट सर्वांस महशूर आहे. तेथील लिबरल प्रगतीला अनुकूल आहेत, पण कान्सरवेटिव प्रगतीचा विरोध करणारे नाहींत; सुधारणा करावयाची

ती दमादमानें करावी, इतकेंच त्यांचें म्हणणें असतें. एक पक्ष दुसऱ्याला आवरून धरीत असतो, व यामुळें राज्यकारभार कसा सुयंत्रित चालतो. जर्मनींतील कान्सरवेटिव म्हणजे सुधारणेचा पूर्ण द्वेषी व चालत्या गाड्याला खीळ घालण्याचें कसब त्याच्या अंगांत विशेष आहे. या नमुन्याच्या व्यक्ति प्रशियाच्या पूर्वभागांत जितक्या आहेत, तितक्या युरोपांतच काय पण जर्मनीच्या इतर भागांतहि पहावयाला मिळावयाच्या नाहींत!

पार्लमेंटांतील पुष्कळ जागा या नबाबांनीं हस्तगत केल्या आहेत व त्या जागेवर बसून रयतेच्या कल्याणाची एखादी बाब पुढें आली म्हणजे केवळ स्वार्थबुद्धीनें ती ते फेटाळून लावतात, वगैरे गोष्टींचा उल्लेख पूर्वीं जातां जातां आलाच आहे. शिक्षणाच्या कामांत तरी हे कांहीं उदारपणा दाखवीत असतील असें म्हणावें, तर तेंहि नाहीं. सुमारें शंभर वर्षांपूर्वीं शिक्षणाच्या कामांत यांच्या ज्या कोत्या समजुती होत्या, त्या आजतागायत हयात आहेत. या समजुतींप्रमाणें प्रस्तुत काळांत शिक्षण देण्याची जर व्यवस्था केली तर उत्तरजर्मनी व पूर्वप्रशिया या प्रांतांतील खेडेगांवच्या शाळांत (Rural classes) लिहिणेंवाचणें व साधारण हिशेब करणें याच्या पलीकडे विद्यार्थ्यांची मजल केव्हांहि जातीना! शेतकऱ्यांच्या मुलांनां उदार शिक्षण दिलें तर त्यांच्या मनांत नवीन तऱ्हेच्या महत्त्वाकांक्षा उत्पन्न होतील व तीं फार शेफारून जाऊन आपल्याला जुमानीतनाशीं होतील, ही मोठी भीति त्यांनां आहे. आणि म्हणून पूर्वींचे शेतकऱ्यांची र ट फ करण्यापलीकडे जशी केव्हांहि मजल गेली नव्हती, तशीच त्यांच्या मुलांची व नातवांचीहि जातां कामा नये, अशी त्यांची स्वार्थमूलक समजूत आहे. ही समजूत धाब्यावर बसवून खेडेगांवच्या शाळांतील शिक्षणक्रमांत सरकारनें पुष्कळ सुधारण्या केल्या आहेत. प्रशियांत शिक्षणाची व्यवस्था जितकी उत्तम आहे, तितकी

उत्तम व्यवस्था जगांतल्या कोणच्याहि देशांत नाहीं, अशी प्रौढी नेहमीं मिरविण्यांत येते. ही प्रौढी अनाठायीं आहे असें आमचें म्हणणें नाहीं. उलट प्रशियांत उत्तम म्हणून नांवाजलेलें जें शिक्षण आहे, त्याच्या तोडीचें शिक्षण इतर देशांत मिळत नाहीं असेंच आम्ही म्हणतों. इतकें असूनहि खेडेगांवांतील शिक्षणाच्या कामांत अजून बरींच वैगुण्यें आहेत, व जें शिक्षण देण्यांत येतें तेंहि उच्च कोटींतलि नसतें, असें आमचें मत आहे. प्रशियांतील शेतकरीवर्गाकरतां घातलेल्या पुष्कळ शाळा "तात्या पंतोजी"च्या शाळेप्रमाणें आहेत. इंग्लंडांत व विशेषेंकरून आयर्लंडांत १८७० सालापर्यंत अशा प्रकारच्या पुष्कळ शाळा होत्या, पण त्या आतां नामशेष झाल्या आहेत; व त्याचें पुष्कळसें श्रेय मि० मॅथ्यू आर्नोल्ड या नांवाच्या गृहस्थास आहे. त्यानें वर्णन केलेली आयर्लंडच्या शाळांची स्थिति आज उत्तरजर्मनींत आपणांस पहावयास सांपडते. विद्यार्थ्यांच्या संख्येच्या मानानें शिक्षकांची कमी संख्या, भिकार व मोडकळीस आलेलीं शाळागृहें, हुषार परंतु कमी पगाराचे शिक्षक, खर्चाच्या बाबतींत कंजूषपणा करणारे व्यवस्थापक व द्रव्याच्या अभावामुळें पुस्तकालयें, प्रयोगशाळा वगैरे उपकरणांचा अभाव, या सर्व कारणांमुळें शाळेंत होम्योपॅथिक तत्त्वाप्रमाणें, म्हणजे अल्प, शिक्षण विद्यार्थ्यांनां मिळतें हें साहजिकच आहे. याबद्दल प्रशियन सरकारला मुळींच दोष देतां येणार नाहीं. ही स्थिति सुधारावी म्हणून सरकार शक्य ते उपाय करतें; परंतु लोकप्रतिनिधींचा त्यांनां मिळावा तितका पाठिंबा मिळत नसल्यानें ते उपाय परिणामकारी होत नाहींत. एल्ब नदीच्या पूर्वभागातर्फे पार्लमेंट—डायट—मध्यें जे प्रतिनिधि येतात, त्यांनीं आपली पुराणप्रियता सोडून, सरकारच्या प्रयत्नांनां दुजोरा देण्याचें जर मनांत आणलें, तर ही शोचनीय स्थिति हां हां म्हणतां नाहींशी होईल.

आतांपर्यंत केलेल्या विवेचनावरून पूर्वप्रशियांतील सर्व धनिक जमीनदार सुधारणेला प्रतिकूल आहेत, असा वाचकांचा कदाचित् समज होईल. परंतु तो तसा न व्हावा म्हणून आम्ही शेवटीं येथें इतकें सांगतों कीं, या गोष्टीला पुष्कळ अपवादहि आहेत. यांच्यापैकीं कित्येक माणसें अशीं आहेत कीं, त्यांनां अलीकडची सुधारणा व ती घडवून आणण्याचे मार्ग सर्वस्वीं पसंत आहेत. शेतीची व त्याबरोबर शेतकऱ्यांची सुधारणा व्हावी, या हेतूनें शास्त्रीय पद्धतीनें शेती करण्याला कयांची पूर्ण अनुकूलता आहे. अशा लोकांची संख्या वाढून चोहोंकडे त्यांचें वजन बसलें म्हणजे पूर्वप्रशियाला सुस्थिति प्राप्त झाल्याशिवाय राहणार नाहीं; आणि कालांतरानें कां होईना, पण शेवटीं ती प्राप्त होईल, असा आम्हांला पूर्ण भरंवसा आहे. जमीनदारांनां त्यांच्या त्यांच्या मुलुखांत जें राजकीय महत्त्व आहे, तें प्रथमतः नाहींसें झालें पाहिजे; आणि तसें झालें म्हणजे जमीनदार व त्यांचीं कुळें यांनां समसमान हक्क प्राप्त होतील. हातांत अपार संपत्ति आणि विशिष्ट स्वरूपांचे राजकीय हक्क व लोकांशीं तुटकपणानें वागण्याची संवय, या कारणत्रयीनें जमीनदारांच्या अंगांत बरेच दोष उत्पन्न झाले आहेत. हे दोष नाहींसे होऊन राजकीय बाबतींत इतर लोकांशीं बरोबरीच्या नात्यानें वागण्याची एकदां यांनीं सुरुवात केली, म्हणजे यांची नैतिक आणि सांपत्तिक स्थिति सुधारण्याला अवकाश लागणार नाहीं.

प्रकरण तिसरें

# उद्योगयुग

सन १८७१ सालीं फ्रान्सबरोबर केलेल्या युद्धांत जर्मनीचा विजय झाला व तेव्हांपासून देशांतील उद्योगधंद्यांची आणि व्यापाराची मोठ्या झपाट्यानें वाढ होऊं लागली. याच सालांत जर्मन साम्राज्याची स्थापना झाली व तेव्हांपासून राजकीय बाबतींत व व्यापाराच्या कामांत जर्मन लोक विशेषच चमकूं लागले. जर्मनी हें एकराष्ट्र आहे, ही भावना प्रथम याच वेळेला त्यांच्या मनांत उत्पन्न झाली. संघशक्ति वाढली, आणि या संघशक्तीच्या जोरावर मोठमोठ्या कार्यांनां हात घालण्याची ताकद त्यांच्या अंगांत आली. जर्मनीची वृद्धावस्था नाहींशी झाली. ययातिराजानें म्हातारपणीं तारुण्यावस्था प्राप्त करून घेतली, तद्वत् एकोणिसाव्या शतकांत जर्मन लोकांच्या अंगांत तारुण्य मुसमुसूं लागलें. तरुणपणचा उत्साह, आवेश आणि धाष्टर्य यांचा परिणाम त्यांच्या वर्तनावर होऊं लागला. आपल्या शेजारला असणाऱ्या राष्ट्रांसंबंधानें त्यांच्या मनांत जो दबदबा होता, तो एकदम नाहींसा होऊन त्यांच्यांशीं चढाओढ करण्यास त्यांनीं सुरुवात केली. एखाद्या मुलाच्या अल्लड चेष्टांकडे वृद्धांनीं कौतुकानें नुस्तें पहावें, तिकडे विशेष लक्ष देऊं नये, असाच प्रकार जर्मनीशीं शेजारला असणाऱ्या वृद्ध राष्ट्रांनीं आरंभीं आरंभीं केला. जर्मनीला युद्धांत बऱ्याच जखमा झाल्या होत्या. निरनिराळ्या रोगांनीं तेथें आपला अम्मल बसविल्यानें असंख्य तरुण अकालीं मृत्युमुखांत पडले होते. अशी चोहोंकडून जर्मनीची दुर्दशा झाली होती. अल्पकाळांत लढाईत झालेल्या जखमा सृष्टिक्रमानुसार भरून आल्या; व "उद्योगधंद्यांची वाढ झपाट्यानें होत असली म्हणजे लढायांत कितीहि प्राणहानि झाली तरी ती तेव्हांच भरून येते" हा माल्थसचा सिद्धान्त

जर्मनीनें लवकरच खरा करून दाखविला. फ्रान्सबरोबर झालेल्या युद्धाच्या पूर्वी सातआठ वर्षें आस्ट्रियाबरोबर जर्मनीची लढाई झुंपली होती. त्या लढाईकरतां केलेली लष्करी तयारी जर्मनीनें पुढें तशीच जय्यत चालू ठेविली व तिचा उपयोग फ्रान्सबरोबर केलेल्या युद्धांत फार झाला. फ्रान्सबरोबर केलेलें युद्ध म्हणजे जर्मनीच्या जीवावरीलच प्रसंग होय. पण त्या युद्धांत विजयश्रीनें जर्मन वीरांच्या गळ्यांत माळ घातली. त्या विजयानें फुगून न जातां, युद्धानंतर लवकरच उद्योग-भूमींत आपला पराक्रम गाजवून तेथील विजयश्री अंकित करण्या-करतां ते कायावाचामनेंकरून झटूं लागले. लोकांजवळचें भांड-वल, जें आजपर्यंत तळघरांत दडवून ठेवलें होतें, तें भराभर बाहेर पडूं लागलें. या भांडवलाच्या आधारावर नवे नवे कारखाने निघून भांडवलवाल्यांनां पूर्वीपेक्षां जास्त किफायत होऊं लागली. विशेष धाडसाचीं व जोखमीचीं कामें अंगावर घेण्याची ज्याला त्याला तळमळ लागून राहिली. जीं गांवें व शहरें हा कालपावेतों मागें पडून राहिलीं होतीं, तीं हळू हळू भरभराटीला येऊं लागलीं व तेथील लोकसंख्या व संपत्ति वर्षाकाळांतील नदीच्या वेगानें वाढूं लागली. एकट्या बर्लिन राजधानीचें उदाहरण घेतलें तर असें दिसतें कीं, सुमारें १०० वर्षां-पूर्वी तेथील लोकसंख्या एक लक्ष साठ हजार होती, ती १९०५ सालीं वीस लक्ष चाळीस हजारांपर्यंत आली. बर्लिन शहरांत संपत्तीचा तर नुस्ता पाऊस पडत आहे. असो. शहरांच्या या भरभराटीबरोबर तेथील जागेला विलक्षण किंमत चढली. त्यामुळें गरीब रहिवाशांनां मोठी अड-चण उत्पन्न झाली. शहरांत व शहरांच्या आसपास इतर ठिकाणच्या मानानें घरभाडें इतकें जबर होऊं लागलें आहे कीं, मध्यम व गरीब स्थिती-च्या लोकांनां बेताचें भाडें पडून रहावयाला घरें कशीं मिळतील, हा सध्यां मोठा बिकट प्रश्न होऊन बसला आहे.

शहरांच्या या वाढत्या संपत्तीबरोबर लोकसंख्याहि वाढली. गेल्या पन्नाससाठ वर्षांत जी लोकसंख्या वाढली, तिचा बराच मोठा भाग उद्योगधंद्यांत पुढें सरसावलेल्या प्रांतांच्या वांट्यास आला. १८५५ व १९०५ या दोन सालांतील लोकसंख्येचे जे आंकडे प्रसिद्ध झाले आहेत, त्यांवरून आपल्याला असें स्पष्ट दिसून येईल कीं, कृषिप्रधान प्रांतांत जितकी लोकसंख्या वाढली आहे, तिच्या अनेक पटींनीं व्यापार करणाऱ्या प्रांतांत वाढली आहे.

जर्मनींत उद्योगयुगाला प्रारंभ झाल्यापासून दगडी कोळसा, लोखंड आणि इतर खनिज द्रव्यें यांची पैदास फार मोठ्या प्रमाणावर होऊं लागली आहे. जर्मन कारखानदारांनां जितका दगडी कोळसा लागतो तितका बहुतेक जर्मनींत तयार होतो. कांहीं थोडा, म्हणजे जवळजवळ नव्वद लक्ष टन, इंग्लंडांतून आणावा लागतो. या कोळशाकरतां देखील इंग्लंडच्या तोंडाकडे बघण्याचा प्रसंग आपणांवर येऊं नये, अशी कोळशाच्या व्यापाऱ्यांची सारखी धडपड चालू आहे. कोळशाच्या व्यापारापेक्षां लोखंडाचा व्यापार फारच जोरानें चालला आहे, व त्या मानानें लोखंडाचे कारखान्यांची संख्याहि वाढत्या प्रमाणावर आहे. इतर धातू म्हणजे तांबें, जस्त, शिसें व पोटॅशसाल्ट पूर्वीपेक्षां जास्त उत्पन्न होतात. परंतु या जिनसांची निर्गतीपेक्षां आयात अजून जास्त आहे.

ज्या धंद्याकडे ग्रेटब्रिटनच्या संयुक्त राज्यामधील लोकांचें विशेष लक्ष वेधलें आहे, तो धंदा म्हणजे जहाजें व गलबतें बांधण्याचा; आणि तो तर अलीकडे अलीकडे जर्मनींत विशेष जोरानें व नेटानें चालला आहे. गलबतें बांधण्याला लागणारा माल परदेशांतून न आणतां स्वदेशींच उत्पन्न करावयाचा, असा जर्मनांचा इरादा आहे; व दरवर्षी त्यांच्या या उद्योगाला यश येत चाललें आहे. सरकारी रिपोर्टांत या विषयाचा पुढें

लिहिल्याप्रमाणें उल्लेख केलेला आढळतो:—" गलबतें बांधावयास लागणारे लोखंडी पत्रे देशांतल्या देशांत मिळूं लागण्याची सोय झाल्यानें त्याकरतां परदेशांवर व त्यांतल्या त्यांत इंग्लंडवर अवलंबून राहण्याचे पूर्वींइतके प्रसंग आतां येत नाहींत, ही विशेष आनंदाची गोष्ट आहे. "

चांगलीं गलबतें जगांत जर कोठें होत असतील तर तीं फक्त इंग्लंडांतच, तेथील गोद्यांतून वाईट गलबत कधीं बाहेर पडावयाचेंच नाहीं, असा पंचवीसतीस वर्षांपूर्वीं सार्वत्रिक समज होता. टाइन (Tyne) आणि क्लाइड (Clyde) येथील गलबतें तयार करणाऱ्या लोकांचा हात जगांत कोणीहि केव्हांहि धरूं शकणार नाहीं, अशी ख्याति होती. यामुळें मोठमोठीं गलबतें आपण आपल्या देशांत करून पहावयाचीं असें जेव्हां जर्मन कारखानदारांनीं प्रथम ठरविलें तेव्हां हें अवघड काम आपल्या हातून कसें सिद्धीस जाईल, या कामाला लागणारें अगणित द्रव्य आपल्याला कोठून व कसें मिळेल, याची त्यांनां मोठी काळजी होती. पण ही काळजी धनिक लोकांच्या सहानुभूतीनें व कारागिरांच्या कुशलतेनें लवकरच दूर झाली. आजला तर अशी स्थिति प्राप्त झाली आहे कीं, स्वत:ला लागणारीं सारीं गलबतें जर्मन लोक आपलीं आपण तयार करतात, इतकेंच नाहीं, तर दुसऱ्या लोकांनीं मागितलीं तरी देखील तीं त्यांनां करून देतात! " गलबतें बांधण्याचा धंदा जर जर्मनींत सुरू करतां आला नाहीं, तर लढाऊ आरमार बाळगण्याची हांव जर्मनीनें धरतां कामा नये " असे उद्गार ॲडमिरल स्टॉशनें सुमारें ३५ वर्षांपूर्वीं काढले होते, त्यांत त्याचा खरा दूरदर्शीपणा दिसून येतो. या धंद्याची जशी जशी भरभराट होऊं लागली, तसें तसें जर्मनीचें समुद्रावरील सामर्थ्य वाढूं लागलें, हें वाचकांनां सांगण्याची आवश्यकता राहिली आहे, असें आम्हांस वाटत नाहीं. " लढाऊ गलबतें आम्हीं तयार करावयाला तुम्हांला सांगितलीं, तर एका वर्षांत तुम्ही

तीं किती तयार करूं शकाल?" असें १९०६ सालीं नेव्ही लीगनें उत्तर व बॉल्टिक समुद्रांच्या बंदरांतील खाजगी कंपन्यांस विचारलें होतें. तेव्हां त्यांनीं उत्तर दिलें कीं, आमच्या सहा मोठ्या कारखान्यांतून दरवर्षी १५ लढाऊ जहाजें आम्ही तयार करून देऊं! यावरून या धंद्याची कशी चलती आहे व कारखानदारांस किफायत तरी किती होत असेल याची वाचकांनींच कल्पना करावी. सर्व राष्ट्रांचें लक्ष नाविक सामर्थ्य वाढविण्याकडे वेधलें आहे. समुद्रावर चिरकाल असलेलें इंग्लंडचें स्वामित्व हिरावून घेण्याचा त्यानें पूर्ण निश्चय केला आहे, हें उघड दिसतें.

वरील धंद्याप्रमाणेंच जर्मनींत विजेच्या कारखान्यांचीहि राक्षसी वाढ झाली आहे. हा धंदा करणाऱ्या मुख्य कंपन्या थोड्या आहेत. यांपैकीं एका कंपनीचें भांडवल पन्नास लक्ष पौंड आहे; व रिझर्व्ह फंड व लोकांनां दिलेलें कर्ज मिळून चाळीस लक्ष पौंडांची रक्कम शिल्लक आहे. यावरून या कंपन्या किती श्रीमंत आहेत हें सहज कळून येण्याजोगें आहे. विजेच्या ट्रामवे व लाइटरेल्वे करणें, म्युनिसिपालिट्यांनां विजेचा पुरवठा करणें, विजेचीं यंत्रें तयार करणें, हीं सर्व कामें या कंपन्या करतात. जर्मनीच्या बाहेर आपला व्यापार वाढावा या हेतूनें आपल्या देखरेखीखालीं किती तरी लहान लहान कंपन्या या मोठ्या कंपन्यांनीं काढल्या आहेत, व त्यांपासून हा व्यापार वाढण्याच्या कामाला फार चांगली मदत होत आहे.

याचप्रमाणें रासायनिक द्रव्यें, सुती व रेशमी कापड, कागद व साखर तयार करण्याचे कारखाने पुष्कळ निघाले आहेत, आणि तेथें तयार होणारा माल सर्व जगांत खपूं लागला आहे. स्थलसंकोचामुळें त्या सर्वांची माहिती येथें देणें अशक्य आहे, म्हणून त्यांचा नुस्ता नामनिर्देश करून आम्ही दुसऱ्या विषयाकडे वळतों.

थोड्या भांडवलाच्या लहान लहान पुष्कळ कंपन्या असण्यापेक्षां

पुष्कळ भांडवलाच्या मोठ्या कंपन्या थोड्या असणें अधिक फायद्याचें आहे, असा जर्मन लोकांनां अनुभव आल्यावरून लहान कंपन्या असतील त्या मोडून त्यांच्याऐवजीं मोठ्या कंपन्या ते अलीकडे स्थापन करूं लागले आहेत. यावरून जर्मनींत लहान कंपनी एकहि नसेल अशी मात्र वाचकांनीं कल्पना करूं नये. लहान कंपन्या तर आहेतच, पण त्याशिवाय नुसत्या हातकामावर उदरनिर्वाह करणारे लोक देखील थोडथोडके नाहींत. हातकाम करणारा एक मुख्य मालक, त्याच्या हाताखालीं मदतीला पांच सहा नोकर, व धंदा शिकण्याकरतां जवळ राहिलेलीं ३।४ मुलें, असा या लोकांचा छोटेखानी कारखान्यांतील थाट असतो. हल्लींच्या परिस्थितींत मोठमोठ्या गिरण्या व कारखाने यांच्याशीं टक्कर देण्याचा त्यांचा यत्न चालू आहे. त्यांच्या हुषारीच्या व श्रमाच्या मानानें त्यांनां मोबदला मिळत नाहीं, हें तर उघडच आहे; पण तेवढ्यानें हताश न होतां आपले हातकामाचे धंदे त्यांनीं चालू ठेवले आहेत हें त्यांस भूषणावह आहे. आजला जवळजवळ पंचवीस लाख पुरुष व स्त्रिया मिळून अशा धंद्यांवर आपला चरितार्थ चालवीत आहेत. विजेच्या व वाफेच्या जोरावर चालणाऱ्या यंत्रांनां धडक देण्याचा त्यांचा चाललेला यत्न पाहून त्यांच्याविषयीं मनांत कींव उत्पन्न झाल्याशिवाय रहात नाहीं. कारण, आज नाहीं उद्यां, केव्हां तरी त्यांनां हार ही खावी लागणार, हें त्यांच्या कपाळचें ब्रह्मलिखित चुकावयाचें नाहीं. आतां यांत्रिकशक्तीच्या माऱ्यापुढें हातधंदे अगदीं ठार होणें हें सांपत्तिक व सामाजिक स्वास्थ्याच्या दृष्टीनें हितावह आहे किंवा नाहीं हा एक प्रश्नच आहे; पण तो विचार येथें अप्रासंगिक होय.

यांत्रिक शक्तीपुढें बारिकसारिक हातधंदे ठार व्हावे, हें निसर्गसिद्ध आहे. परंतु या नियमाला कांहीं कारखाने अपवादादाखल आहेत, म्हणजे त्यांच्यामुळें हातधंद्यांचा नाश न होतां उलट त्यांचा परिपोष

होतो. चाकू, सुऱ्या वगैरे लोखंडी हत्यारें व इतर किरकोळ जिन्नस करण्याचे कारखाने जेथें विद्युच्छक्तीच्या साहाय्यानें चालतात, तेथें हस्त-कौशल्याची जरूर असते; आणि त्यामुळें या कारखान्यांच्या जीवावर बरेच हातधंदे चालू राहतात व त्यांच्यावर पुष्कळ कुटुंबांचा उदरनिर्वाह होतो. रेशमी विणकामाच्या गिरण्या जेथें चालतात तेथेंहि कमीअधिक प्रमाणांत हा प्रकार पहावयास सांपडतो.

हल्लींच्या सांपत्तिक चढाओढींत हातधंद्यांनां अनुकूल असे कायदे सरकारनें जर केले नसते, शिवाय खुद्द धंदेवाल्यांनीं जी चिकाटी धरली आहे ती जर धरली नसती, तर आजला जर्मनींतील सर्व हातधंदे पार रसातळाला गेले असते. १८६१ सालीं प्रशियांत हजारीं २८.९ असें स्वतंत्र हातधंदे करणारांचें प्रमाण होतें; आतां हें प्रमाण हजारीं १८ वर येऊन बसलें आहे. कापसाचें सूत काढणें, कापड विणणें, पिपें व टब, लोखंडी खिळे, दोर व बटणें करणें हे धंदे तर यापूर्वींच ठार झाले आहेत; कुंभार, चाकूकाऱ्या करणारे जिनगर, तांबट, लोहार, व कांहीं अंशीं सुतार आणि चांभार यांचेहि धंदे दिवसानुदिवस आंखडत चालले आहेत. खिशांतील व मोठीं घड्याळें करणारे लोकांवर मात्र अजूनपर्यंत धोंड पडली नाहीं, त्यांचा धंदा पूर्वीप्रमाणें सुरळीत चालला आहे. हातधंदे तगून रहावे या हेतूनें एकाच वर्गांतील किंवा धंद्यांतील लोकांचीं परस्पर साहाय्यकारी मंडळें (Guilds) स्थापन करण्याच्या कामांत सरकारनें बरेंच उत्तेजन दिलें आहे; व त्याप्रमाणें अशा मंडळ्या दिवसानुदिवस ज्यास्त स्थापन होऊं लागल्या आहेत. पण यांपासून हात-धंद्यांचा कितपत बचाव होईल हें आजला सांगतां येत नाहीं. कांहीं वर्षें लोटल्यावर काय अनुभव येईल तो खरा.

हातधंद्याचें एखादें दुकान किंवा वर्कशॉप न घालतां घरांतल्या घरां-तच हे धंदे करण्याचा एक प्रकार आहे; व तो खेडेगांवांत राहणाऱ्या

लोकांत फार प्रचारांत आहे. हे धंदे अजून चांगले तगले आहेत ही मोठी आश्चर्याची गोष्ट आहे. ज्यांची प्रकृति नेहमीं तोळामाशावर असते, तेच लोक जास्ती दिवस जगतात, असा आपला अनुभव आहे; व हा अनुभव या धंद्यांनां चांगला लागू पडतो असें म्हणावें लागतें. हातमागांवर विणकाम करणें, घड्याळें, टोपल्या, बुचें, लांकडावर नक्षीचें काम करणें, आणि हजारों प्रकारच्या खेळांतील बाहुल्या व इतर खेळणीं करणें हे धंदे अशा स्वरूपाचे होत. हे धंदे खेडेगांवांत चालू आहेत; म्हणून कितीतरी बायका, मुलें, तरुण आणि वृद्ध आपला चरितार्थ चालवीत आहेत. ते जर कां बुडाले, तर या लोकांवर उपाशी मरण्याची, किंवा रोजगाराकरतां आपलीं घरेंदारें सोडून दुसऱ्या ठिकाणीं देशोधडीला जाण्याची पाळी आल्यावांचून राहणार नाहीं. हल्लींच्या स्थितींत त्यांची जीवनयात्रा मोठी सुखानें चालली आहे असें म्हणवत नाहीं; तरी पण त्यांची तूर्त उपासमार होत नाहीं येवढें खरें.

आपल्या अमलाखालच्या लोकांनीं, पोटाची उपासमार होते ती टाळण्यासाठीं, परमुलुखांत जावें ही गोष्ट हितावह नाहीं, हें जाणून, त्या त्या संस्थानांनीं शक्य ते उपाय योजून या धंद्यांची जोपासना करण्याचे स्तुत्य प्रयत्न चालविले आहेत. कोणच्या गांवांत कोणता धंदा चालतो हें लक्षांत घेऊन, गांवोगांव धंदेशाळा सरकारांतून स्थापन झाल्या आहेत, व फिरते शिक्षक नेमून लोकांनां नवीन तऱ्हेचें शिक्षण देण्याची व्यवस्था केलेली आहे. याशिवाय आपत्कालीं देणगीच्या रूपानें द्रव्याचीहि मदत सरकारांकडून होते. उदाहरणार्थ, बव्हेरिया संस्थानांत हातमाग पुष्कळ आहेत, म्हणून तेथील सरकारनें वर सांगितल्याप्रमाणें फिरत्या शिक्षकांची योजना केली आहे. हे शिक्षक गांवोगांव हिंडतात, हातमागावर कोष्टी कसें काय विणकाम करतात यावर देखरेख करतात, जुन्या मागांत नवीन सुधारणा कशा करतां येतील हें त्यांनां समजावून

सांगतात, व जे अगदीं नवशिके असतील त्यांनां विणकामाचें शिक्षण देतात. इतक्यानेंच त्यांचें काम संपलें असें होत नाहीं. कोष्टी लोकांकडून माल विकत घेऊन तो शहराच्या ठिकाणीं विकणारे जे व्यापारी असतात ते प्रसंगविशेषीं या अडाणी लोकांनां फसवितात. ही त्यांची फसवणूक होऊं नये, व त्यांच्या श्रमाच्या मानानें व्यापाऱ्यांकडून त्यांनां योग्य मोबदला मिळावा, या गोष्टीवर देखील अशा शिक्षकांनां नजर पुरवावी लागते. कोणच्या मालाची कोठें विशेष जरूर आहे, व कोठें जरूर नाहीं, ही माहिती या लोकांकडून मिळत असल्यानें, खपेल इतका व पसंत पडेल तोच माल कोष्टी लोक काढतात. यामुळें जास्ती माल निघून, मागणीच्या अभावामुळें, घरच्या घरींच तो कुजत पडला आहे अशी स्थिति कधीं येत नाहीं.

प्रकरण चौथें

# परदेशांशीं चालणारा व समुद्रावरील व्यापार

जर्मनीच्या परदेशीय व्यापाराचे सरकारी रीतीनें प्रसिद्ध झालेले आंकडे आपण पाहिले म्हणजे तेथील उद्योगधंदे आणि कारखाने कसे वाढत गेले याची बरोबर कल्पना आपल्याला करतां येते. हे सर्व आंकडे येथें दिले तर कदाचित् कांहीं वाचकांनां कंटाळा येईल, म्हणून आयात व निर्गत मालाचें दरमाणशीं प्रमाण सुमारें पन्नास वर्षांपूर्वीं काय होतें व अलीकडे तें काय आहे एवढेंच आम्ही येथें सांगतों. १८६० सालीं आयात मालाचें व निर्गत मालाचें हें प्रमाण अनुक्रमें १ पौंड १२ शि० ६ पे० आणि २ पौंड १ शि० ५ पे० होतें. १९०७ सालीं हें प्रमाण अनुक्रमें ७ पौंड २ शि० १० पे० आणि ५ पौंड १५ शि० असें झालें.

१. विशेष माहिती ज्यांनां पाहिजे असेल त्यांनीं खालील कोष्टकें पहावीं.

**जर्मनीचा व्यापार (१८६०, १९०७).**

| —— | १८६० | १९०७ |
|---|---|---|
| | पौंड | पौंड |
| १ वर्षांतील आयात | ५४,७५०,००० | ४४३,०००,००० |
| १ वर्षांतील निर्गत | ७०,०००,००० | ३५६,०००,००० |

**जर्मनीचा व्यापार (१९११-१२-१३).**

| —— | १९११ दशलक्ष पौंड | १९१२ दशलक्ष पौंड | १९१३ दशलक्ष पौंड |
|---|---|---|---|
| १ वर्षाची आयात | ४७७.२ | ५२५.६ | ५२५.८ |
| १ वर्षाची निर्गत | ३९८.५ | ४४०.३ | ४९५.६ |
| एकूण आयात व निर्गत. | ८७५.७ | ९६५.९ | १०२१.४ |

या थोड्याशा आंकड्यावरून असें सिद्ध होतें कीं, जर्मनीचा आयात व्यापार निर्गत व्यापाराशीं व्यस्त प्रमाणांत आहे; म्हणजे जर्मनींतून परदेशांत जाणाऱ्या मालापेक्षां, परदेशांतून जर्मनींत येणारा माल अधिक आहे. दरवर्षीं कारखान्यांत तयार झालेला माल जर्मनींतून परदेशांत जास्त जास्त जाऊं लागल्यानें कच्च्या मालाची मागणी वाढूं लागली व त्यामुळें बाहेर जाणाऱ्या मालापेक्षां जास्त माल आंत येऊं लागला हें साहजिकच आहे. जर्मनीचा व्यापार एकट्या युरोप खंडाशींच चालतो असें नाहीं, तर सर्व जगाशीं चालतो. इतक्या अवाढव्य व्यापाराचे आंकडे कोठवर द्यावे? आपल्या हिंदुस्थानाशीं जर्मनीच व्यापार किती रुपयांचा चालतो यवढें सांगूनच या कामांत आम्ही आपलें समाधान करून घेतों. हे आंकडे तरी अगदीं अलीकडचे नसून १९०५ सालचे आहेत हें वाचकांनीं लक्षांत ठेवावें. त्या सालीं ब्रिटिश इंडियांतून १३.८९ ( दशलक्ष ) रुपयांचा माल जर्मनींत गेला व जर्मनींतून ४.३० ( दशलक्ष ) रुपयांचा माल हिंदुस्थानांत आला. आयात व निर्गत मालांतील वर सांगितलेलें व्यस्त प्रमाण हिंदुस्थानाशीं होत असणाऱ्या व्यापारांत देखील आहे, हें मार्मिक वाचकांच्या लक्षांत आल्यावांचून राहणार नाहीं. एखाद्या देशाच्या व्यापारांत असें व्यस्त प्रमाणच जर असलें तर त्या देशांतील भांडवल एकंदरीनें वाढतें कां कमी होतें, हा अर्थशास्त्रवेत्त्यांनीं सोडविण्याचा प्रश्न आहे. त्याचें उत्तर देण्याच्या भानगडींत आम्ही पडत नाहीं.

जर्मनीचा परदेशांशीं व्यापार वाढला, त्याच मानानें समुद्रावरून मालाची ने-आण करणाऱ्या जर्मन व्यापारी गलबतांची संख्याहि वाढली आहे. सर्व जगाच्या व्यापारी गलबतांत १८७४ सालीं जर्मनीचीं गलबतें शेंकडा ५·२ होतीं, तीं १९०५ सालीं शेंकडा ९·९ झालीं. जर्मन लोकांनीं जे नाना तऱ्हेचे अचाट उद्योग चालविले

आहेत, त्या सर्वांत नवीन गलबतें बांधण्याचा उद्योग हल्लींच्या जर्मन बादशहाला फार पसंत आहे; व त्याची भरभराट व्हावी एतदर्थ त्याचे एकसारखे प्रयत्न चालू आहेत. हॅमबुर्ग आणि ब्रेमेन येथील गलबतांचे कारखाने राजाश्रयाच्या जोरावरच इतके भरभराटीस आले आहेत! या कारखान्यांत तयार झालेल्या कांहीं जहाजांचा प्रथमचा जलपर्यटनाचा समारंभ राजघराण्यांतील पुरुषांच्या हातून झाला आहे. एखादें मोठें जहाज, मग तें कोणच्याहि कारखान्यांतील असो, पहिल्यानें समुद्रपर्यटनाला निघालें कीं, बादशहाकडून अभिनंदनपर तार त्या जहाजाच्या मालकांनां आलीच म्हणून समजावें. जहाजें बांधणारी एक कंपनी तर अशी आहे कीं, तिच्या डायरेक्टर मंडळींत आडमिराल्टींतील बडे बडे सरकारी नोकर आहेत!

व्यापारी गलबतांची संख्या जरी पुष्कळ वाढली आहे तरी हॅम्बुर्ग येथील एक व्यापारी वर्तमानपत्रकार कसा शोक करतो तो पहा: तो पत्रकार म्हणतो, "इंग्लंडांत व्यापारी जहाजें इतकीं नवीं नवीं होतात कीं, आमचा देश या कामांत नेहमीं मागसलेला तो मागसलेलाच. लोकसंख्येच्या मानानें पाहिलें तर गेल्या सोळा वर्षांत जर्मनीनें जितकीं व्यापारी गलबतें बांधलीं त्याच्या पांचपट इंग्लंडनें बांधलीं. इंग्लंडचा परदेशांतील व्यापारसुद्धां बळावत चालला आहे!' या बिचाऱ्याच्या मतानें जर्मनीनें आणखी काय केलें पाहिजे कोणास ठाऊक!

सर्वांत मोठीं व अतिशय वेगानें चालणारीं जहाजें इंग्लंडांत जशीं आहेत तशीं जगावरील इतर कोणच्याहि देशांत अजूनपर्यंत नाहींत. जर्मनीपाशीं मात्र कांहीं जहाजें अशीं आहेत कीं, त्यांचे टनेज (ओझें वाहण्याची पात्रता) इंग्लिश जहाजांच्या टनेजच्या जवळजवळ आहे. मोठीं आणि जलद चालणारीं जहाजें बांधून समुद्रावरील व्यापार वाढविण्याच्या कामांत जर्मन राष्ट्र अतोनात पैसा खर्च करीत आहे. त्याच-

प्रमाणें बंदरांची सुधारणा करणें आणि नव्या नव्या गोद्या बांधणें यांकडेहि मनमुराद पैसा खर्च होत आहे. समुद्रकिनाऱ्यावर किंवा मोठ-मोठ्या नद्यांच्या कांठावर जीं बंदरें आहेत त्यांची मर्यादा वाढवून मोठीं जहाजें त्या बंदरांत उतरूं शकतील अशी व्यवस्था करण्याकडे जास्त लक्ष पुरविण्यांत येत आहे. गलबतें लागण्याचे लांकडी व दगडी धक्के, त्या धक्क्यांनां सोईवार अशा आगगाड्या, वखारी, गलबतांवरील मालाची चढउतार करणारीं यंत्रें यांची सिद्धता इतकी नमुनेबाज आहे कीं, ती पाहून मनुष्य थक्क होऊन जातो. जेथून थेट समुद्रापर्यंत जातां येतें अशीं नदीकांठचीं बंदरें प्रशस्त व जास्त सोईचीं करण्याचा प्रयत्न नेटानें चालू आहे. मॅनहिम नांवाचें ऱ्हाइन नदीच्या कांठावर एक शहर आहे व तें कोलोनच्या दक्षिणेस सरासरी १६० मैलांवर म्हणजे बरेंच आंतल्या बाजूस आहे. तेथील म्युनिसिपालिटीनें औद्योगिकदृष्ट्या या शहराचें महत्त्व वाढविण्याकडे इतका पाण्यासारखा पैसा खर्च केला आहे कीं, तो पाहून जर्मन लोकांनीं एकदां एक गोष्ट मनावर घेतली म्हणजे ते काय करतील आणि काय नाहीं याचा नेम लागणार नाहीं, असेंच आपणांस वाटतें. मॅनहिमच्या लोकांनीं केलेला अचाट उद्योग व त्या उद्योगांत त्यांनां आलेलें यश पाहून एल्ब, वेसर आणि ओडर या नद्यांवरील हॅम्बुर्ग, ब्रेमेन, फ्रँकफोर्टसारख्या शहरांनींहि तोच कित्ता गिरविण्यास सुरुवात केली आहे. व्यापार वाढवावयाचा झाला तर मालाची ने-आण पाण्यावर होण्याचीं साधनें जितकीं वाढतील तितकीं चांगलीं, हें तत्त्व जर्मन लोकांच्या मनांवर चांगलें ठसलें आहे, व त्यास अनुसरून नदीच्या पाण्याची खोली वाढविणें व नवे कालवे काढणें हे उद्योग वर दिलेल्या तीन नद्यांच्या कांठावर राहणारे लोक मोठ्या हिमतीनें करीत आहेत.

प्रकरण पांचवें

# विशिष्ट लक्षण

प्रस्तुत काळीं जर्मनीचा व्यापार व तेथील उद्योगधंदे या विषयांकडेच इंग्लिश लोकांचें विशेष लक्ष्य लागलें आहे. संगीतशास्त्र, काव्य, नाटकें व तत्त्वज्ञान या विषयांवर मात्र आपण परिश्रम करावयाचे, आणि सर्व जगाला यंत्रें, कापड आणि कापूस पुरविण्याचें काम इंग्लिशांकडे सोंपवावयाचें, असा जर जर्मन लोकांनीं क्रम ठेवला असता तर तो अर्थातच इंग्लिशांनां पसंत पडला असता. परंतु "काव्यशास्त्रविनोदेन" काळ घालविण्याचें सोडून ज्या अर्थीं हे लोक व्यापारी बनले आहेत त्या अर्थीं, हल्लींची सांपत्तिक स्थिति त्यांनां कोणत्या उपायांनीं प्राप्त झाली, व तिची मूळ प्रेरणा कोठून झाली, या विषयाचा विचार करणें इंग्रजांसहि अवश्य आहे.

आणि प्रथमतः असें पहा कीं, जर्मनींत सध्यां जी उद्योगप्रियता दिसते ती इंग्लंडचें उदाहरण डोळ्यापुढें ठेवल्यानें उत्पन्न झाली आहे, ही गोष्ट पुष्कळ लोकांच्या ध्यानांत येत नाहीं. जर्मन लोक इंग्लिशांबरोबर जिकडे तिकडे चढाओढ करूं लागले आहेत व ती इंग्लिशांनां खपेनाशी झाली आहे. पण न खपून करणार काय? आपण दिलेलें शिक्षणच आपल्याला भोंवतें आहे असें पाहून स्वस्थ बसण्याचा प्रसंग त्यांचेवर आला आहे. कांहीं वर्षांपूर्वीं "कलोन गॅझेट" नांवाच्या पत्रानें आपल्या वाचकांनां अशी आठवण करून दिली होती कीं, "आगगाड्या, गॅसवर्क्स, ट्रॅमवे व यंत्रसामग्रीचीं दुकानें जर्मनींत सुरू करण्याचें काम इंग्लिशांनीं प्रथम आपल्या हातांत घेतलें. या कामाला लागणारे कोट्यवधि रुपये त्यांनीं खर्च केले, व याप्रमाणें जर्मनीच्या सांपत्तिक सुधारणेचा मार्ग त्यांनीं पुढें होऊन शोधून काढला." या पत्रकारानें

केलेलें कथन वस्तुस्थितीस अनुसरून आहे, हें सप्रमाण सिद्ध करून दाखवितां येण्याजोगें आहे. बर्लिन व हॅम्बुर्गप्रभृति पुष्कळ शहरांनां इंग्लिशांनीं पाण्याचा पुरवठा करून दिला. इंग्लिश भाषेंतलि 'ट्रॅमवे' हा शब्द जशाचा तसा जर्मन भाषेंत घेतला आहे. यावरून जर्मनींत प्रथम ट्रॅमवे कोणीं सुरू केली, हें लक्षांत येण्याजोगें आहे. सुती व लोंकरीं कापडें विकणाऱ्या कांहीं मोठमोठया कंपन्यांचीं नांवें अजूनपर्यंत इंग्लिश आहेत. दक्षिण जर्मनींतील कापसाच्या व्यापाराचें मुख्य शहर जें मुलहॉसेन (Mulhausen) त्यांतील एका मोठ्या रस्त्याचें नांव 'मॅंचेस्टर स्ट्रीट' असें आहे.

"मॅंचेस्टर चेंबर्स ऑफ कॉमर्स" या नांवाच्या संस्थेची एक सभा ता० १३ डिसेंबर १८३८ रोजीं भरली होती. त्या सभेच्या हकीगतीचा रिपोर्ट कोणाच्या फारसा पाहण्यांत नाहीं. त्या रिपोर्टांत सदरहू सभेंत मि. रिचर्ड कॉबडेननें केलेलें भाषण प्रसिद्ध झालें आहे, व तें फार महत्त्वाचें आहे. इंग्लिश लोक जर्मनींत जाऊन तेथें साहसाचीं व धाडसाचीं कामें अंगावर घेतात, व तीं सुयंत्रितपणानें पार पाडतात, हा प्रकार पाहून जर्मनींतील लोक शहाणे होतील; आणि कांहीं काळानें इंग्लिशांचीं बोटें इंग्लिशांच्याच डोळयांत घालावयाला ते कमी करणार नाहींत, असें त्यानें त्या सभेंत श्रोतेमंडळींस बजावलें होतें, असें त्या भाषणावरून दिसतें. कॉबडेननें हा इशारा दिल्यानंतर अनेक वर्षेंपावेतों इंग्लिशांनीं जर्मनींत जावें, आणि अचाट उद्योगाचीं कामें पार पाडावीं हा क्रम चालू होताच; आणि जोंपर्यंत जर्मन लोकांनां गरज होती तोंपर्यंत खुद्द इंग्रज लोक, त्यांचें साहस, त्यांची बुद्धिमत्ता व त्यांचा पैसा यांची जर्मनींत चहा होती. ते दिवस म्हणजे गुरुपदापाशीं बसून जर्मन लोकांचा शिक्षण घेण्याचा काळ संपल्यावरोबर हें पारडें फिरलें. जर्मन-शिष्यांसारखे चिम्मे आणि उद्यमशील विद्यार्थी इंग्लिश शिक्षकांनां

फारच थोडे मिळाले असतील! विद्यार्थिदशा संपल्याबरोबर स्वतःच्या हिंमतीवर मोठ्या जोखमीचीं कामें त्यांनीं आपल्या शिरावर घेतलीं व गुरुजींची आपआपल्या घरीं बोळवण केली. विद्यार्थी चांगले तयार झाले असें पाहून 'शिष्यादिच्छेत्पराजयम्' या वाक्याचा खुसखुशीत अनुभव घेत गुरुजींनींहि आपला पाय निसटता घेतला! आपल्या कारखान्यांत देशांतल्या देशांत खपेल इतकाच माल काढून जर्मन कारखानदार स्वस्थ बसतील अशी इंग्लिशांची आरंभीं कल्पना होती; पण ती चुकीची ठरली. कारण, पुढें अल्प अवकाशांतच आपली गरज भागवून इतर देशांचा परामर्ष घेण्याचीहि धमक त्यांच्या अंगांत उत्पन्न झाली. याचा परिणाम असा झाला कीं, जो बाजार हा वेळपावेतों एकट्या इंग्रज व्यापाऱ्यांच्या हातांत होता, तो त्यांच्यापासून हिरावून घेणारा एक प्रतिस्पर्धी दंड थोपटून बाजारपेठेंत उभा राहिला. शेवटीं इंग्रजी कारखानदार व व्यापारी यांनां जगाच्या बाजारांतून हाकून जर्मन लोकांनीं त्यांची जागा कशी पटकावली, या प्रश्नाचा विचार येथें आतां केला पाहिजे.

जर्मन राष्ट्र सध्यां ऐश्वर्याच्या ऐन रंगांत आहे. सांपत्तिक चढाओढींत पहिली जागा पटकावण्याचा त्या राष्ट्राचा कृतसंकल्प आहे, व या संकल्पानुरूप उद्योगधंदे आणि व्यापार यांनां तेथील लोकांनीं आपल्याला सर्वस्वीं वाहून घेतलें आहे, आणि यांतच जर्मन प्रगतीचें रहस्य आहे. व्यापाराविषयींचा पूर्वींचा उत्साह व चिकाटी—अथवा पूर्वींचा आदर म्हटलें तरी देखील चालेल—इंग्रजांच्या अंतःकरणांत प्रस्तुतकाळीं आहे किंवा नाहीं, हा एक चिंतनीय प्रश्न आहे. जर्मनीला तर व्यापाराचें वेड लागलें आहे. एखादा मनुष्य व्यापारांत शिरला म्हणजे त्यानें आपली सगळी लाज व भीड बाजूला गुंडाळून ठेवून त्यांतच अहर्निश गुंगलें पाहिजे. व्यापार म्हणजे पोरखेळ नाहीं, कांहीं दिवस धरावा, कांहीं दिवस सोडावा, असा आळसत चालविण्याचा धंदा नाहीं, किंवा व्यापार

म्हणजे चैनीचें साधनहि नाहीं, ही वृत्ति तेथील व्यापारी वर्गाची आहे. आपल्या कामांत यश संपादन केलेला जर्मनींतील धंदेवाईक माणूस, मग तो कारखानदार असो, किंवा व्यापारी असो, उन्हाळ्याच्या प्रखर हवेंत समुद्रपर्यटनाला निघेल, किंवा एखाद्या रम्य सरोवराच्या कांठीं जाऊन राहील, किंवा डोंगवरावरील थंड हवेच्या जागेंत विश्रांति घेईल. पण एकदां त्यानें उन्हाळ्याची सुट्टी घेतली म्हणजे हिंवाळ्याची दुसऱ्यांदा सुट्टी घेण्याला तो कधीं इपापणार नाहीं. कांहीं देशांत (त्यांपैकीं कांहीं व्यापारांत अजून बरेच मागें आहेत) वीक-एन्डचें जें खूळ माजत चाललें आहे, तें त्यांच्या मतें राष्ट्राच्या अवनतीचें व कमजोरपणाचें लक्षण होय. वर्षांतून अकरा महिने हा गृहस्थ, आपल्याला गिरणींत, किंवा कारखान्यांत, किंवा बँकेंत, एकसारखा काम करीत राहील, टेल-टिकोरींत एक क्षणहि घालविणार नाहीं. धंद्यांत यश मिळविण्यासाठीं कसलेहि परिश्रम करावे लागले तरी तो ते निमूटपणें व सहजप्राप्त या भावनेनें करील, त्यांत चुकवाचुकवी करणार नाहीं.

आणखी एक गोष्ट अशी आहे कीं, उद्योगधंद्यांत पुढें सरसावलेल्या जर्मन लोकांची ही नुक्ती पाहिलीच पिढी आहे. असें आम्ही म्हणतों यावरून जर्मनींत पूर्वीं व्यापारधंद्याच्या नांवानें आवळ्याएवढें शून्य होतें असा आमच्या म्हणण्याचा अर्थ आहे, असें मात्र कोणीं समजूं नये. त्या देशांतील लोखंड व पोलादाचे आणि शिल्पकामाचे कांहीं कारखाने फार जुने आहेत व कित्येक धंद्यांतील पेढ्या, मग त्या लहान का असेनात, ५०, ८० व क्वचित् १०० वर्षांच्या देखील जुन्या आहेत, ही गोष्ट आम्ही पूर्णपणें जाणून आहों. तथापि सर्वसाधारण विचार केला असतां, या पॅरिग्राफाच्या आरंभीं जें विधान आम्हीं केलें आहे तेंच, बरोबर आहे, असें आम्हांला वाटतें; व त्यावरून आम्ही असें म्हणतों कीं, जर्मनींतील धंदेवाल्यांचा जोम अजून बराच शिल्लक आहे,

व तो कमी होत चालल्याचीं लक्षणें अजून दिसूं लागलीं नाहींत.

सर्वांच्या आघाडी मारण्याचा जर्मन लोकांचा हा जो मोठ्या कष्टाचा प्रयत्न सतत चालू आहे त्याला दुजोरा आणणारी एक गोष्ट जर्मन लोकांनां साध्य झाली आहे; व ती ही कीं, साध्याच्या मानानें साधनांची योजना मोठ्या कुशलतेनें व मार्मिकपणानें कशी करावी, हें ते पूर्णपणें जाणतात. साधारण समजुतीच्या इंग्लिशाला असें वाटतें कीं, व्यापार हा एक गतानुगतिकन्यायानें साध्य होणारा धंदा आहे. पण जर्मन लोकांच्या मतानें व्यापार हें एक शास्त्र आहे, व्यापार ही एक कला आहे, व ती साध्य करून घेण्यासाठीं शास्त्रीय पद्धतीनें तिचा ते अभ्यास करतात. जगाचा सर्व व्यापार, जुन्या प्रतिस्पर्ध्यांनां मागें हटवून आपल्या हातांत घेण्याचा त्यांचा पूर्ण हेतु आहे, व तो साध्य करण्याकरितां ते जे उपाय योजतात व ज्या मार्गांचें अवलंबन करतात, त्याच्या मुळाशीं एक मुख्य तत्त्व आहे. हें तत्त्व नुसत्या व्यापारांतच नव्हे, तर इतर वागणुकींतहि त्यांनीं आपल्या हृदयाशीं बाळगल्याचें आपणांस दिसून येतें. तें तत्त्व हें कीं, प्रत्येक गोष्ट, मग ती रोजच्या व्यवसायांतील असो किंवा त्याहून भिन्न असो, चिकित्साबुद्धीनें प्रथम तिचें परीक्षण करावयाचें आणि नंतर ती साध्य करून घेण्याच्या उद्योगाला लागावयाचें.

स्थूल मानानें आपण विचार करूं लागलों म्हणजे औद्योगिक बाबतींत जेथें जेथें जर्मनांची इतर लोकांवर सरशी झाली आहे, तेथें तेथें तिच्या मुळाशीं तीन मुख्य कारणें दिसतातः—(१) जर्मन मालाचा इतरांच्या मानानें स्वस्तपणा, (२) त्यांची श्रेष्ठ प्रकारची अथवा निदान प्रसंगाला अनुरूप अशी वागणूक, व (३) गिऱ्हाईक मिळवून आपल्या हातांत ठेवण्याची वाखणण्यालायक अशी हातोटी.

यांपैकीं मालाचा स्वस्तपणा हें जें पहिलें कारण आहे त्याचा आपण विचार करूं. इंग्लंडांतील लोकांपेक्षां जर्मन लोकांची एकंदर वागणूक

पाहिली तर ती कमी आढ्यतेची दिसते. मनुष्य गरीब असो, मध्यम स्थितींतील असो वा श्रीमंत असो, त्याच्या वागणुकींत फारसा भपका असावयाचा नाहीं. विशेष श्रम न करतां व फारशी वाट पहावी न लागतां हातांत यथेच्छ पैसा खेळूं लागल्यानें त्यांच्यांत चैनबाजीचा—पण तो योग्य प्रमाणानें—प्रकार आतां सुरू झाला आहे. तरी, एकंदरींत त्यांच्यांतील श्रीमंतांची सुद्धां रहाणी अधिक साधी व कमी खर्चाची असते; केवळ चैनीखातर अत्तराचे दिवे लावणारे लोक फार थोडे. यामुळें जर्मन व्यापाऱ्याला कमी फायदा झाला तरी तो डगमगत नाहीं. इंग्लिश व्यापाऱ्याची स्थिति याच्या उलट असल्यानें जबर नफा मिळाला तरच तो खूष रहातो. थोड्या नफ्यावर त्याचा थाटाचा संसार चालत नाहीं. इंग्लंड व जर्मनी या उभयतांत आणखी एक महत्त्वाचा फरक आहे. तो हा कीं, जर्मनींतील कारागिरांनां व मजुरांनां इंग्लंडच्या मानानें अजूनपर्यंत तरी कमी रोजमुरा पडतो. आपल्याला ज्यास्ती रोजमुरा मिळावा, काम करण्याचा वेळ कमी व्हावा, असें जर्मन कामगार अलीकडे कांहीं वर्षे ओरड करूं लागले आहेत, व त्या ओरडीमुळें इष्ट त्या सुधारणा घडून आल्या आहेत. तरी पण इंग्लंडच्या मानानें जर्मन कामगारांचा पगार अद्यापपावेतों कमीच आहे, व त्यांनां कामहि जास्त वेळ करावें लागतें. पण याच्याबरोबरच येथें हें सांगणें अवश्य आहे कीं, विम्याच्या रूपानें (आजार, अपघात आणि वार्धक्य यांचा विमा) या दोन गोष्टींचा योग्य मोबदला त्यांनां मिळण्याची व्यवस्था कायद्यानें केली आहे. कारखान्यांत कामावर असणाऱ्या मुलांच्या शरीरप्रकृतीसंबंधानें कशी काळजी घेतली पाहिजे याबद्दल सक्त नियम झाले आहेत. वर सांगितलेल्या या बाबतींत इंग्लंडांतील व्यवस्था असावी तितकी समाधानकारक नाहीं. असो. व्यापाराला अनुकूल असणारी ही स्थिति जर्मनींत यापुढेंहि अशीच टिकेल असा मात्र भरंवसा वाटत नाहीं.

पोटाचा खर्च दिवसानुदिवस जास्त वाढूं लागला आहे, व कामगार-वर्गांत संघशक्ति वाढून 'ट्रेड्स यूनियन'सारख्या संस्था जास्त जास्त निघूं लागल्या आहेत. अशा संस्था उदयाला आल्या म्हणजे आपण म्हणूं तें मालकाला ऐकावयाला लावण्याची धमक कामगार लोकांत अधिकाधिक चमकूं लागते. याचा अखेर परिणाम असा होईल कीं, माल तयार करण्याचा खर्च इंग्लंडच्या बरोबरीनें येऊं लागेल. या विषयाचा विचार आम्ही पुढच्या एका भागांत करणार आहों व तेथेंच त्याचा सांगोपांग विचार करणें अधिक सोईचें होईल. तूर्त येथें इतकेंच विवेचन पुरे.

जर्मन कारखान्यांतील यंत्रसामग्री व धंद्याला लागणारें स्थायिक सामानसुमान नवीन पद्धतीनें तयार केलेलें असतें, ही आणखी एक गोष्ट लक्षांत घेण्याजोगी आहे. नवीन पद्धतीची व शास्त्रीय शोधांच्या अनुरोधानें तयार केलेली यंत्रसामग्री म्हणजे काय अलौकिक चीज आहे, हें जर कोणाला पहावयाचें असेल तर त्यानें लोखंड व पोलादाच्या एखाद्या कारखान्यांत जाऊन पहावें. तेथील सर्व प्रकार एकदां पाहिला म्हणजे जर्मन लोकांच्या बुद्धीचें, त्यांच्या अचाट उद्योगाचें व कार्यकुशलतेचें कौतुक करावेंसें वाटल्याशिवाय राहणार नाहीं. इंग्लिश भट्ट्यांतून काढलेलें लोखंड (Pig-iron) जर्मन लोखंडापेक्षां कमी दर्जाचें असतें. जर्मनीचा जर पहिला नंबर तर इंग्लंडचा तिसरा. "लंडन टाइम्स" पत्राच्या ७ एप्रिल १९०६ च्या अंकांत एका गृहस्थानें इंग्लंडचा नंबर खालीं कसा गेला याचीं कारणें दिलीं आहेत. त्याची मुख्य तकरार ही आहे कीं, लोखंड तयार करण्याची वाडवडीलांपासून जी पद्धति चालत आलेली आहे, तीच अजून इंग्लिश कारखानदार आपल्या छातीशीं बाळगून बसले आहेत. धातुविद्येचें (Metallurgy चें) जें शास्त्र अलीकडे निर्माण झालें आहे, त्यांतून लोखंडासंबंधाची सर्व माहिती गोळा करून शास्त्रीय पद्धतीवर जर्मन लोक आपले कारखाने चालवूं

लागले व त्यामुळें त्यांचा नंबर वर गेला, असें या लेखकानें निदान ठरविलें आहे; आणि प्रत्यक्ष अनुभवान्तीं हें निदान अगदीं बरोबर आहे असें कोणीहि म्हणेल.

या विषयाचा आपण अधिक बारकाईनें जर विचार केला तर असें आढळून येईल कीं, जर्मन कारखानदारांनां थोड्या किंमतींत लोखंड तयार करतां येऊं लागलें याचें आणखी एक विशेष कारण आहे, तें हें कीं, लोखंड तयार होण्याच्या मार्गांतील ज्या अनेक कृती आहेत, त्या सर्व एका इमारतींत आणून एका माणसाच्या देखरेखीखालीं करण्याचा क्रम त्यांनीं अलीकडे सुरू केला आहे. याचा अर्थ एखादें उदाहरण देऊन आम्ही स्पष्ट करून दाखवितों. "शिंप्याच्या घरची कारभारीण" सुईच कां घ्याना! अशुद्ध लोखंड गाळून शुद्ध करणें, त्याचें पोलाद बनविणें, त्याच्या सुया करणें, नंतर त्यांनां जिल्हई देणें, हीं कामें निरनिराळ्या कारखान्यांत पूर्वी चालत असत. यामुळें एका सुईला—अथवा सुईला लागणाऱ्या लोखंडाला पाहिजे तर म्हणा—अनेक ठिकाणीं नाचावें लागे आणि या प्रवासाला दर ठिकाणीं खर्चहि येत होता. आतां काय झालें आहे, तर वरील सर्व कारखाने एका इमारतींत आणल्यानें जाण्यायेण्यांत काळाचा व पैशाचा अपव्यय पूर्वीसारखा आतां होत नाहीं; व शिवाय जळणांत बचत होते ती निराळीच. अर्थात् एका सुईला पहिल्या मानानें तितकी किंमत कमी पडूं लागली. या एका उदाहरणावरून मोठमोठ्या लोखंडी जिनसा स्वस्त विकणें जर्मन व्यापाऱ्यांनां कसें परवडतें, हें सहज ध्यानांत येण्याजोगें आहे.

खर्च कमी करण्याच्या हेतूनें निरनिराळ्या ठिकाणीं असणारे कारखाने एके ठिकाणीं आणण्याचा क्रम जास्त जास्त प्रचारांत येऊं लागल्यानें "मिश्र कारखाने"—Mixed works—दिवसानुदिवस अधिक अस्तित्वांत येत आहेत. अशा कारखान्याचें उत्कृष्ट उदाहरण पाहिजे

असेल तर क्रुप येथील कारखाना पहावा. अशुद्ध लोखंडापासून सफाई-दार माल बाहेर निघेपर्यंत सर्व संस्कार या एका कारखान्यांत होतात, त्याकरितां बाहेर कोठेंहि जावें लागत नाहीं.

मिश्र कारखाने निघूं लागल्यानें, "निर्भेळ" ( Pure ) म्हणजे एकच एक काम करणारे कारखाने डबघाईला येऊं लागले आहेत. ते अगदीं नामशेष होतील असें वाटत नाहीं; परंतु अलीकडील शास्त्रीय शोधांचा योग्य उपयोग करून घेतल्याशिवाय मात्र त्यांनां मोठ्या कार-खान्यांशीं टक्कर देतां येणार नाहीं हें अगदीं उघड आहे. अशा तऱ्हेचा उपक्रम धाकट्या कारखान्यांचे मालक अलीकडे करूं लागले आहेत, ही समाधानाची गोष्ट आहे, व त्यापासून त्यांचा उपयोग झाल्याशिवाय राहणार नाहीं.

मागें सांगितलेल्या तीन कारणांपैकीं पहिल्या कारणाचा येथवर विचार झाला. आतां बाकीच्या दोन कारणांचा एकत्र विचार केला तरी चालण्याजोगें आहे. एखादा अगदीं नवा शोध लावण्याची ताकद जर्मनां-च्या डोक्यांत फारशी नाहीं हें खरें; परंतु दुसऱ्या कोणीं नवा शोध लावला तर तो आपल्या कामाशीं जुळता करून घेण्याची त्यांच्या आंगची कुश-लता वाखाणण्याजोगी आहे. व्यवहाराच्या दृष्टीनें पाहिलें तर ही कुश-लता अंगांत असणारा मनुष्यच मूळ शोध लावणारापेक्षां अधिक यश-स्वी होतो. एखादा शोधक संपत्तिमान झाल्याचें उदाहरण आढळांत येतें काय? दुसऱ्यांनीं पुढें आणलेल्या कल्पनांपैकीं चांगली कल्पना कोणची हें ठरविण्यापुरती चतुरस्रता अंगांत असली म्हणजे पुरे. ती कल्पना आपल्या कामाशीं जुळती करून पूर्णावस्थेला आणली व ती लोकांनां पटली म्हणजे इष्ट कार्यभाग साध्य झाल्याशिवाय रहात नाहीं.

विणकाम, यंत्रशास्त्र व आज जर्मनीची ज्यांत विशेष प्रगति झाली आहे तें रसायनशास्त्र, यांत प्रावीण्य येण्याला प्रारंभीं स्वदेशी कल्पकांची

बुद्धिमत्ता व शोध जितके उपयोगीं पडले तितकेच परदेशीयांचे शोधहि जर्मनीच्या उपयोगीं पडले आहेत. व्यापारदृष्ट्या रसायनशास्त्राचें महत्त्व किती आहे, हें इंग्रजांच्या ध्यानांत न आल्यानें इंग्लंडांतील उद्योग-धंद्यांची केवढी मोठी हानि झाली आहे, याची कल्पना करवत नाहीं; आणि ही हानि भरून निघेल असेंहि आम्हांला वाटत नाहीं. इंग्लंडां-तील रंगांचे कारखाने पहा. तेथील रंगारी जुन्या काळच्या रंगाऱ्यांप्रमाणें अनुमानधपक्यावर आपलें काम करीत असतात. रसायनशास्त्राचें ज्ञान त्यांनां मुळींच नसतें. विशेष प्रकारच्या रंगाची छटा असणारें पुष्कळसें कापड एका प्रसंगीं इंग्लडांत हवें होतें. "हें कापड तुम्ही तयार करून देत असाल, तर आम्ही तुम्हांलाच तें तयार करण्यास सांगूं," असें एका जुन्या पद्धतीनें काम करणाऱ्या रंगाऱ्याला अधिकाऱ्यांनीं कळविलें. त्या-वर तो म्हणाला "नमुन्याच्या अगदीं तोडीचें नाहीं तरी त्याच्या जवळ-जवळ कापड मी तयार करून देतों." अधिकारी म्हणूं लागले, "आमच्या नमुन्यावरहुकूम काम झालें पाहिजे, जवळजवळ होतां उपयोगी नाहीं." रंगाऱ्यानें उत्तर दिलें, "नमुन्यांतील लज्जत मला साधावयाची नाहीं, पण एकंदरींत काम चांगलें करून देईन." यावर हें काम परदेशी रंगा-ऱ्यांवर सोंपवावें लागलें, आणि हा प्रकार झाल्याला पुष्कळ वर्षें लोटलीं आहेत असें म्हणावें तर तेंहि नाहीं.

रसायनद्रव्यें तयार करण्याच्या कारखान्यांत जर्मन लोक शास्त्रीय पद्धतीचें पूर्णपणें अवलंबन करतात, व त्यामुळें त्यांचा तो धंदा अतो-नात वाढला आहे व त्यांत त्यांना किफायतहि फार चांगली होऊं ला-गली आहे. या कारखान्यांत सरासरीनें पाहूं गेलें असतां, चाळीस काम-गारांवर देखरेख करणारा एक युनिव्हर्सिटींत पास झालेला रसायनशास्त्र-वेत्ता असतो. हें प्रमाण जगांतील इतर कोणच्याहि देशांत दिसून येत नाहीं. मोठमोठ्या कारखान्यांला प्रयोगशाळा जोडलेल्या असतात व

त्या अगदीं नमुनेबाज असतात. या प्रयोगशाळेंत नवीन शास्त्रीय शोध लावण्याचें काम जारीनें चालू असतें. एक जर्मन ग्रंथकार मोठ्या अभिमानानें असें लिहितो कीं, "शास्त्र आणि हातानें घडणारा व्यवहार यांची सांगड घातलेली जर कोठें पहावयाची असेल, तर ती जर्मनींतच दृष्टीस पडेल, इतरत्र पडणार नाहीं. आणि या गोष्टीच्या जीवावरच रसायनांचा व्यापार त्या देशांत वृद्धीप्रत पावला आहे."

जर्मन कारखानदाराला आणखी एक यशाची गुरुकिल्ली सांपडली आहे. ज्या लोकांत आपला माल खपावा अशी त्याची इच्छा असते, त्या लोकांनां काय हवें आहे, त्यांची इच्छा काय आहे, हें समजून घेण्याचा तो शिकस्तीचा प्रयत्न करीत असतो. गिऱ्हाइकाला कारखानदार जसा माल देईल तसा तो त्यानें निमूटपणें घेतला पाहिजे, म्हणजे कारखानदाराकरतां गिऱ्हाईक, गिऱ्हाइकाकरतां कारखानदार नव्हे, ही जुनी समजूत जर्मनींतून पार निघून गेली आहे. गिऱ्हाइकांकरतां कारखानदार आहे, हें तत्त्व सर्व व्यापाऱ्यांनीं अंगीकारलें आहे. हें तत्त्व नजरेआड केल्यानें इंग्लंड आपल्या हातचा किती व्यापार अखेरचा घालवून बसलें आहे, हें सांगणें अशक्य आहे. एका कापडाच्या मोठ्या इंग्रजी पेढीची कांहीं वर्षांपूर्वीं अशी ऐट होती कीं, गिऱ्हाईक कितीहि नाखुष झालें तरी त्याच्या तब्बेतीप्रमाणें माल तयार करून बाजारांत आम्ही केव्हांहि मांडणार नाहीं. या पेढींत कोणी गिऱ्हाइक आलें म्हणजे त्याला पुढें लिहिल्याप्रमाणें रोखठोक जबाब मिळत असे. "आमच्यापाशीं तुम्हांला दिसतो त्या रंगाचा व तितक्या लांबी रुंदीचा माल मिळेल. तो तुम्हांला पसंत नसेल तर आपला रस्ता सुधारा." गिऱ्हाइकांनां काय, त्यांनीं आपला रस्ता सुधारला. अर्थात् या पेढीचें गिऱ्हाईक कमी झालें, व त्या मानानें तिची ऐटहि पुढें उतरली. पण व्यापारांत एकदां घडी बिघडली म्हणजे तिचा सळ पुनः पहिल्यासारखा बसत नाहीं; व

झालेल्या चुकीबद्दल मागाहून पश्चात्ताप करण्यांत अर्थ नसतो.

याहून वेगळी स्थिति जर्मनींत आहे. कारखानदार असो किंवा व्यापारी असो, बारीकसारीक गोष्टींत देखील लक्ष्य पुरविण्यांत तो सदा दक्ष असतो व त्यामुळें त्याला व्यापारांत यश मिळतें. गिऱ्हाइकाला आवडेल व त्याच्या रुचीला पटेल असाच माल काढून दुकानांत पाठवावयाचा, गिऱ्हाइकांची आवड निरनिराळी व वरचेवर पालटणारी, पण त्याबद्दल त्यांचा कधीं कंटाळा करावयाचा नाहीं, त्यांनां खूष ठेवण्याची नेहमीं खबरदारी घ्यावयाची, या गोष्टी जर्मन दुकानदाराच्या अंगांत पुरतेपणीं मुरल्या आहेत. आपला फायदा साधून आपल्या आश्रयदात्यांची मर्जी राखण्यांत जर्मन व्यापारी सदा एका पायावर तयार असतो. व्यापाराकरतां परदेशचें गिऱ्हाइक पुष्कळ येतें. या सर्वांनां जर्मन भाषा थोडीच येणार ! पण अशा गिऱ्हाइकांशीं जर्मन व्यापारी त्यांच्या भाषेंत —चुकत माकत कां होईना—स्वतः बोलतो. त्यांच्या देशांत चालू असणारें नाणें व वजन माप यांत आपल्या मालाची किंमत त्यांनां सांगतो. एखादे वेळेस पत्रोपत्रीं व्हावें तसें काम होत नाहीं. अशा प्रसंगीं तो आपण होऊन चालत गिऱ्हाइकाकडे जाईल किंवा गिऱ्हाइकाची भाषा जाणणारा आपला एखादा गुमास्ता त्याचेकडे पाठवील. सारांश, आलेली संधि दवडावयाची नाहीं, किंवा तिच्याकडे दुर्लक्ष करावयाचें नाहीं. इंग्रजी व्यापाऱ्यांनीं हें धोरण न बाळगल्यामुळें जर्मनीच्या मानानें इंग्लंडचा माल बाहेरगांवीं कमी खपूं लागला, यांत आश्चर्य तें काय ?

याप्रमाणें इंग्लिश व्यापाऱ्यापेक्षां जर्मन व्यापाऱ्यांत कोणचे गुण जास्त आहेत हें आतांपर्यंत आम्हीं सांगितलें. हे गुण दिसावयाला लहान दिसतात, पण त्या सर्वांचा समुच्चय परिणामकारी झाल्याशिवाय रहात नाहीं. असो. आतांपर्यंतच्या विवेचनावरून आमच्या वाचकांचा असा समज होईल कीं, जर्मन व्यापाराची इतकी भरभराट झाली असल्यानें इंग्लि-

शांची धडाडी व कामधंद्यांतील त्यांची मति, यांसंबंधानें जर्मन लोकांचा आदर कमी झाला असला पाहिजे; परंतु असा समज होऊं देणें चुकीचें होईल असा आम्ही आपल्या वाचकांस इशारा देतों. व्यापारधंद्यांचा मार्ग इंग्लंडनें प्रथम शोधून काढला, या गोष्टीचा जर्मनांनां विसर पडला नाहीं व त्याबद्दल इंग्लंडविषयींची त्यांची पूज्यबुद्धि अजूनहि कायम आहे. इंग्लंडचा कित्ता पुढें ठेवून त्याप्रमाणें कामधंदा करणारीं माणसें जर्मनींत आजमित्तीला थोडीं नाहींत! गुरुस्थानीं असणाऱ्या देशाशीं गुरुद्रोह करणारा कोणी जर्मन व्यापारी असला तर तो शिष्टच समजला पाहिजे.

मागें सांगितलेल्या तीन कारणांचा येथवर विचार झाला. आतां दुसऱ्या एका महत्त्वाच्या विषयाचा विचार करूं. जर्मनींतील निरनिराळ्या संस्थानांतून व खुद्द सार्वभौम सरकाराकडून तेथील उद्योगधंद्यांनां व व्यापाराला उत्तेजन देण्यांत येऊन व्यवहारोपयोगी मदतहि करण्यांत येते, हें विशेष लक्ष्यांत घेण्याजोगें आहे. परदेशाच्या दरबारांत असणारे जर्मनीचे राजकीय मंत्री, संधि साधेल तेव्हां, पण लोकांच्या नजरेला न येईल अशा बेतानें, व्यापाराला मदत करीत असतात. संरक्षक जकातीचे कायदे सरकारानें केले आहेत ही बाब जरी बाजूला ठेवली, तरी कांहीं थोडे अपवाद खेरीज करून, देशांतील रेल्वे सरकारनें आपल्या हातांत घेतल्या आहेत, याचा व्यापाराला व शेतीला फार फायदा होतो. विशेष प्रकारची परिस्थिति प्राप्त झाली असतां रेल्वेच्या भाड्यांत अनुकूल असा फेरफार सरकार तेव्हांच करतें. परदेशीं जाणाऱ्या मालावर सवलतीची जकात घेण्यांत येते व त्यामुळें देशांत उत्पन्न झालेला माल परदेशीं रवाना करण्यांत व्यापाऱ्यांचा मुळींच तोटा होत नाहीं. उलट असें करण्यास त्यांनां अधिक उत्तेजन येतें. तिकडच्या खासगी रेल्वेकंपन्या देखील व्यापाऱ्यांशीं बेपर्वाईनें वागत नाहींत. त्यांच्याकडे कोणीं एखादी

तक्रार नेली व ती रास्त आहे असें त्यांनां आढळून आलें तर तत्काळ तिचा बंदोबस्त होतो.

व्यापाराला उत्तेजन देण्याकरतां देशांतल्या देशांत जलमार्ग तयार करण्याकडे सरकारची विशेष प्रवृत्ति आहे. हें काम बहुतेक सरकारच करतें, खासगी लोक सहसा त्यांत पडत नाहींत. उत्तरसमुद्र व बाल्टिक-समुद्र यांनां जोडणारा प्रसिद्ध कील कालवा सरकारनेंच बांधला व तो १८९१ सालीं व्यापाराला खुला झाला. कील कालव्यासारखीं प्रचंड कामें व्यापाराच्या वृद्धीकरतां सरकारानें आपल्या अंगावर घेतल्याचीं उदाहरणें इतर देशांत फारच थोडीं असतील! ऱ्हाईन व एल्ब नद्यांचे मोठमोठे कालवे बांधण्याचें काम प्रशियांत सध्यां चालू आहे. लाखों रुपये खर्च करून लहानलहान कालवे देशाच्या सर्व भागांतून प्रशियानें किती तरी बांधले आहेत! इंग्लंडांत अशा तऱ्हेचे कालवे आहेत, नाहींत असें नाहीं. पण इंग्लंडांतील कालव्यांत मोठमोठीं जहाजें जाऊं शकत नाहींत, जर्मनींतलि कालव्यांत तीं जाऊं शकतात, हा दोहोंत महत्त्वाचा फरक आहे.

कारखानदार व व्यापारी यांनां शिक्षण देण्याच्या हेतूनें सार्वभौम सरकार व संस्थानें यांच्या आश्रयाखालीं औद्योगिक प्रदर्शनें जागोजाग भरत असतात. कांहीं संस्थानांत हीं प्रदर्शनें कायमचीं असतात व कांहींनीं तीं आपल्या हद्दींत फिरतीं ठेवलीं आहेत. "ग्रँड डची ऑफ् हेस्सी" या नांवाचें एक सर्वांत लहान संस्थान आहे. तेथील लोकसंख्या कमी असून त्यांत मोठें शहर काय तें एकच आहे. असें असून १८३६ सालापासून "सेंट्रल एजन्सी फॉर इंडस्ट्री" या नांवाची एक औद्योगिक संस्था तेथें आहे. राष्ट्राला औद्योगिक बाबतींत व व्यापारासंबंधीं जी कांहीं माहिती पाहिजे असेल ती या कचेरींत मिळूं शकते. आरंभींआरंभीं या संस्थेचा पसारा थोडा होता. परंतु वर्षानुवर्ष तिची उपयुक्तता जशी वाढत

चालली तसें राष्ट्रांत तिचें वजनहि अधिक वाढलें. औद्योगिक व धंदे-शिक्षण कशा पद्धतीनें द्यावें या कामांत निरनिराळीं संस्थानें येथील चालकांचा अभिप्राय घेत असतात. संस्थेच्या आश्रयाखालीं एक मोठें पुस्तकालय आहे. याशिवाय औद्योगिक पदार्थसंग्रहालय आणि रासायनिक प्रयोगशाळा आहे ती निराळीच. १९०६ सालीं सेंट्रल एजन्सीच्या आश्रयाखालीं १३६ धंदेशिक्षणाच्या शाळा चालू होत्या. म्हणजे संस्थानांतील लोकसंख्येच्या मानानें एक हजार लोकांनां एका शाळेहून किंचित् जास्त असें प्रमाण बसतें. प्रत्येक संस्थानांत कमीअधिक प्रमाणानें या प्रकारच्या एजन्सीज् आहेत व त्या आपलीं कामें चोख रीतीनें बजावीत आहेत.

या बाबतींत शक्य तितकें उत्तेजन देण्यांत जर्मन बादशहा दक्षता ठेवीत असतो. मेमेल येथें १९०७ च्या सप्टेंबर महिन्यांत त्यानें केलेल्या भाषणाचा उतारा खालीं दिला आहे. राष्ट्रीय अभिमान आणि महत्त्वाकांक्षा श्रोत्यांच्या मनांत जागृत करण्याचा गुण त्या भाषणांत किती आहे तो पहा. "नवीन अस्तित्वांत आलेल्या जर्मन साम्राज्यांत कल्पना करवणार नाहीं इतक्या अल्प काळांत सर्वत्र सुधारणा झाली आहे. या सुधारणेंतील जोमदारपणा पाहून परदेशचे लोक आश्चर्यचकित होतात. आपल्या व्यापाराचा विस्तार विस्मय वाटण्याजोगा आहे. निरनिराळ्या शास्त्रांतील व शिल्पकलेंतील आपण लावलेले शोध वाखाणण्याजोगे आहेत. जर्मनींतील निरनिराळ्या जातींचे लोक परस्परांतील भेदभाव विसरून आपल्या जन्मभूमीच्या अभ्युदयार्थ एका साम्राज्यांत सामील झाले, त्याचा हा प्रभाव आहे. जगाच्या सर्व भागांत प्रमुख स्थान मिळविण्याचें जों जों आपल्या अंगांत जास्त सामर्थ्य येईल तों तों तें परमेश्वरी कृपेचें फल आहे, हें राष्ट्रांतील सर्व दर्जाच्या व सर्व धंद्यांतील लोकांनीं लक्षांत ठेवलें पाहिजे. आपल्या हातून महत्कृत्यें

होऊं नयेत असा जर परमेश्वराचा हेतु असता, तर त्यानें आपल्या अंगांत इतकें सामर्थ्य दिलेंच नसतें." उद्योगधंदे, व्यापार, जहाजें बांधणें या सर्वांवर बादशहाचें एकसारखें लक्ष आहे. सर्व राष्ट्रभर हिंडून मोठमोठे कारखाने आपल्या डोळ्यांनीं पहावयाचे व तेथील सर्व माहिती करून घ्यावयाची हा त्याचा नेहमींचा क्रम आहे. समुद्रकिनाऱ्यावरील जहाजें बांधण्याचा एकूणएक कारखाना त्याला माहीत आहे, व व्यापारी जहाजें कारखान्यांत किती तयार होतात, इकडे त्याची फार नजर असते.

राष्ट्राची सांपत्तिक स्थिति सुधारण्याच्या कामांत सरकाराकडून याप्रमाणें जरी प्रोत्साहन मिळतें, तरी तेवढ्यावर संतुष्ट होऊन व्यापारीवर्ग ऐदी बनला नाहीं; स्वावलंबनाचें महत्त्व तो पूर्णपणें ओळखून आहे. सर्व मोठ्या शहरांत व उद्योगधंद्यांत गुंतलेल्या प्रांतांत "चेंबर ऑफ कॉमर्स" नांवाच्या सभा आहेत. या सभांचा पत्रव्यवहार सरकार व रेल्वेकंपन्या यांजबरोबर नेहमीं चालू असतो. या सभांच्या अंतर्व्यवस्थेंत सरकारचा मुळींच हात नसतो; परंतु सरकाराशीं यांचा फार निकट संबंध असल्यानें व्यापाराच्या महत्त्वाच्या बाबींचा विचार परस्परांच्या सल्ल्यानें होत असतो. यामुळें या चेंबर्सचें परराष्ट्रांत फार वजन आहे, आणि त्यांच्याकडून प्रसिद्ध होणारी माहिती कधींहि खोटी असावयाची नाहीं, असा व्यापारी जगाचा अनुभव आहे. इंग्लंडांतील अशा संस्था सरकाराबरोबर एकदिलानें वागत नाहींत म्हणून त्यांच्या सचोटीसंबंधानें परदेशांतील लोक साशंक असतात. थोड्या वर्षांपूर्वीं युनायटेड स्टेट्सच्या सेक्रेटरी आफ स्टेटनीं उघडपणें असें प्रसिद्ध केलें कीं, "जर्मनींतलि चेंबर ऑफ कामर्सच्या माहितीवर आम्ही जसा विश्वास ठेवतों तसा तो इंग्लंडांतील चेंबरांच्या माहितीवर ठेवणें अनुभवान्तीं आम्हांला अशक्य झालें आहे."

प्रत्येक संस्थानच्या चेंबर ऑफ कॉमर्सचे कायदे वेगवेगळे आहेत,

तरी काम करण्याची सर्वांची पद्धत एकाच नमुन्याची आहे. व्यापारासंबंधीं सर्व माहिती गोळा करणें, लोकांत ती प्रसिद्ध करणें, व्यापाऱ्यांच्या तक्रारींची सरकारांत व रेल्वे-कंपन्यांकडे दाद लावणें, कस्टमड्यूटी व इतर कर व्यापाऱ्यांनां त्रासदायक होतात किंवा काय इकडे नजर पुरविणें, बँकांकडून सवलतीच्या व्याजानें गरजवंत व्यापाऱ्यांनां भाडवल पुरविणें, अशीं एक ना दोन, हजार तऱ्हेचीं कामें या संस्थांमार्फत चालत असतात. त्यांचें त्यांनांच इतकें काम असतें कीं, राजकीय विषयांत मन घालण्यास सभासदांनां अवकाशच सांपडत नाहीं. व्यापाराची बाब असली म्हणजे ते या राजकीय पक्षाला किंवा त्या पक्षाला जाऊन मिळतात. परंतु तें काम आटोपलें म्हणजे ते नामानिराळे, आपलें काम बरें कीं आपण बरें, अशी त्यांची वागणूक असते. या सभांत बर्लिनची चेंबर सर्वांत फार मोठी आहे व तिचा व्याप सर्व जगभर आहे. चेंबर ऑफ कॉमर्सला मदत करण्याकरतां कित्येक मोठ्या शहरांत "इंडस्ट्रियल असोसिएशन्स" आहेत. परदेशांबरोबर व्यापार करणाऱ्या लोकांच्या "असोसिएशन्स ऑफ एक्सपोर्ट फर्मस्" नांवाच्या सभा आहेत व त्या विशेषेंकरून प्रशिया व मध्यजर्मनींत फार आहेत. स्टेटिन ( Stettin ) येथें आज बरींच वर्षें एक मोठी मौजेची संस्था आहे. परदेशांत जाण्याला तयार असलेल्या तरुणांनां व्यापाराचें शिक्षण देऊन, ब्रिटिश वसाहती, युनायटेड स्टेट्स यांसारख्या देशांत त्या संस्थेच्या खर्चानें पाठविण्यांत येतें. संस्थेनें आपल्यावर जो विश्वास टाकला आहे त्याचा दुरुपयोग मी करणार नाहीं, तिच्या कल्याणाकरतां मनापासून झटेन, अशी शपथ, प्रत्येक इसमाला, संस्थेच्या प्रेसिडेंटाचा हस्तस्पर्श करून घ्यावी लागते, आणि नंतर तो परदेशांत रवाना होतो. परदेशीं गेल्यावर तेथील परिस्थितीवर त्याला नेहमीं नजर ठेवावी लागते, व ठरीव मुदतीला, आपण स्टेटिनचा व्यापार वाढविण्याची काय खट-

पट केली, याचा रिपोर्ट पाठवावा लागतो. याप्रमाणें परदेशांत गेलेल्या दलालांच्या दीर्घ परिश्रमानें त्या शहराचा परदेशांशीं व्यापार अतिशय वाढला आहे, आणि त्यामुळें आपण योजिलेली नवीन युक्ति चांगली साधली, अशी संस्थेच्या चालकांची खात्री झाली आहे.

एखाद्या धंद्यांत पडणें जर फायद्याचें असेल तर त्याचा पिच्छा पुरविल्याशिवाय रहावयाचें नाहीं, हें व्यापाराचें तत्त्व सर्व जर्मनींत संमत आहे. गेल्या तीसपस्तीस वर्षांत जर्मनीचा परदेशांशीं जो व्यापार वाढला तो तेथील कारखानदारांच्या दीर्घ परिश्रमानें किंवा सतत उद्योगानें न वाढतां दैवबलानें वाढला असें जो कोणी म्हणत असेल, त्याला जर्मनीनें व्यापारांत जें यश संपादन केलें त्याचें मर्म काय आहे हेंच समजलें नाहीं, असें म्हणणें भाग आहे. एखाद्या स्त्रीला ( तिकडील रिवाजाप्रमाणें ) विवाहाला तयार करण्यापूर्वी तिची मनधरणी करावी लागते, तद्वत् जर्मनांनीं व्यापाराची मनधरणी केली; व ती देखील जातीनिशीं, पत्रोपत्रीं नव्हे, हें ध्यानांत घेण्याजोगें आहे.

बर्लिन येथें सरकारच्या आश्रयाखालीं " कोलोनियल स्कूल " नांवाचें एक विद्यालय स्थापन केलें आहे. शेतकरी, मळेवाले व व्यापारी म्हणून जर्मन वसाहतींत जाऊन राहण्याची ज्या धाडसी व तरुण गृहस्थांची इच्छा असेल त्यांनां या विद्यालयांत विशेष प्रकारचें शिक्षण मिळतें. विद्यालयांत राहणाऱ्या विद्यार्थ्यांनां दरसाल चाळीस ते साठ पौंडांपर्यंत व बाहेर राहणाऱ्या विद्यार्थ्यांस पंधरा ते तीस पौंडांपर्यंत खर्च येतो व हा खर्च विद्यार्थ्यांनां होणाऱ्या उपयोगाच्या मानानें पुष्कळ कमी आहे.

उद्योगधंदे व व्यापार करावा तर आम्हींच करावा, अशी समजूत इंग्लिश लोकांची होऊन बसली आहे. ही समजूत चुकीची आहे हें सिद्ध करून दाखविणारा एक प्रतिस्पर्धी प्रस्तुत काळीं उत्पन्न झाला

आहे. हा प्रतिस्पर्धी किती उद्योगी आहे व इंग्लिशांनां मागें सारण्या-करतां त्यानें कोणचे उपाय योजिले आहेत हें आम्हीं आतांपर्यंत सांगि-तलें. या प्रतिस्पर्ध्यांचे जे दीर्घ प्रयत्न चालले आहेत ते शिथिल पड-तील किंवा तो ज्या क्लृप्त्या योजीत आहे त्या तो यापुढें योजणार नाहीं, असा जर इंग्लिश लोकांचा अजमास असेल तर तो साफ फसेल. जर्मनीचा हा प्रभाव पाहून इंग्लंडनें स्वस्थ डोळे मिटून बसण्यांत अर्थ नाहीं. जोंपर्यंत इंग्लंडला कुशल, दृढनिश्चयी आणि संपत्तिमान पुरुषांचें पाठबळ आहे तोंपर्यंत भिण्याचें कांहीं कारण नाहीं हें खरें; पण वेळींच सावध होणें फार चांगलें.

प्रकरण सहावें

# धंदेशिक्षण

सार्वजनिक शिक्षण हा विषय सरकारनें विशेष लक्ष्य पुरविण्याजोगा नाहीं, अशी जर्मनीच्या प्रतिस्पर्धी राष्ट्रांची पूर्वी समजूत होती. ही समजूत चुकीची आहे असें आतां सर्वांच्या मतें निश्चित झालें आहे. परंतु हा निश्चय होण्याला त्या राष्ट्रांनां बराच काळ घालवावा लागला; जर्मनराष्ट्र मात्र ह्या बाबतींत त्यांच्यापूर्वीं अनेक वर्षें सावध झालें होतें, व सार्वजनिक शिक्षणाचें काम व्यवस्थितपणानें सरकारच्या देखरेखीखालीं होऊं लागलें होतें. यामुळें जर्मन लोकांचा फायदा तर झालाच; परंतु उद्योगयुगाला आरंभ होऊन जर्मनीचा माल परदेशांत जसा अधिकाधिक रवाना होऊं लागला तसा हा फायदा त्यांनां अधिक स्पष्ट दिसूं लागला. सुमारें पस्तीसचाळीस वर्षांपूर्वीं, म्हणजे नवीन उद्योगयुगाला आरंभ होण्याच्या सुमाराला, व्यापारोपयोगी शास्त्र या दृष्टीनें रसायनशास्त्राची योग्यता लोकांच्या निदर्शनास नुक्तीच आली होती, व संपत्त्युत्पादनांत विजेच्या शक्तीचा उपयोग करून हवें तें काम तिच्याकडून करून घेतां येण्याजोगें आहे, असें अनुभवानें समजलें होतें. शिक्षणाच्या कामांत मागसलेल्या युरोपियन राष्ट्रांनां या नवीन परिस्थितीचा उमज लवकर पडला नाहीं, त्यांचा पूर्वीचा घोटाळा तसाच कायम राहिला. शिक्षणांत जर्मनीची तयारी अगोदरच होऊन बसली होती, म्हणून ही परिस्थिति अवलोकन करून इतरांप्रमाणें न बावरतां जर्मन लोक सर्व जगाचा व्यापार हस्तगत करून घेण्याच्या उद्योगाला लागले व इतर राष्ट्रांशीं झुंजण्याकरतां त्यांनीं आपल्या कमरा बांधल्या. एखाद्या सेनापतीनें हुकुम करण्याचा अवकाश, कीं पडलें सैन्य बाहेर, तद्वत् धंदेशिक्षणाच्या कालेजांतून शिक्षण मिळविलेले डायरेक्टर, एंजिनियर, रसायनशास्त्रवेत्ते जणूं काय एखाद्याच्या हुकमासरसे भर-

कन रणांगणांत इतस्ततः चमकूं लागले. नवीन शास्त्रीय शोधाच्या शस्त्रास्त्रांनिशीं हे लोक सज्ज होते व कोणच्या अस्त्राचा कोठें उपयोग केला असतां तें अमोघ होईल ही विद्या त्यांनां त्यांच्या गुरूंनीं कानांत सांगून ठेविली होती. ही लष्करी भाषा सोडून साध्या भाषेंत बोलावयाचें म्हणजे असें कीं, धंदेशिक्षणाच्या कॉलेजांनीं नवीन उद्योगयुगाच्या सुरुवातीच्या वेळेस देशाची फार मोठी कामगिरी बजावली. या कॉलेजांच्या कामाला प्राथमिक शाळांकडूनहि योग्य आणि भरपूर मदत मिळाली. नवीन उद्योगधंद्याचे कारखाने व वर्कशाप ( कलागृहें ) यांत काम करणाऱ्या हुषार कारागिरांचा लागेल तितका पुरवठा या शाळांतून होऊं लागला. या शाळांत मिळणारें शिक्षण प्राथमिकच असे, परंतु तें सढळ मनानें शिक्षकांकडून मिळत असल्यानें विद्यार्थ्यांच्या बुद्धींत जास्त कुशाग्रता दिसून येई. प्राथमिक शाळेच्या पुढची पायरी म्हटली म्हणजे अन्वर्थक संज्ञा असणारी ‘ कन्टिन्यूएशन ’ Continuation शाळा. याच शाळेला “ प्रोफेशनल ” म्हणजे “ धंदेशाळा ” असेंहि दुसरें नांव आहे. या वरच्या प्रतीच्या शाळांत सर्व धंद्यांनां उपयोगीं पडणारें धंदेशिक्षण देऊन विद्यार्थ्यांच्या हातून प्रत्यक्ष कांहीं काम करून घेण्याचा प्रघात आहे. यामुळें येथें तयार झालेल्या विद्यार्थ्यांनां कोणच्याहि कारखान्यांत उमेदवार म्हणून राहतां येतें व कामधंद्यांत त्यांचा हात अगोदरच तयार झाला असल्यानें कारखान्यांतील वरिष्ठ प्रतीचीं कामें त्यांच्यावर सोंपवितां येतात.

वर वर्णन केलेल्या गोष्टींचा जर्मनीला अतोनात फायदा झाला व त्यांच्या योगानेंच मुख्यत्वेंकरून जर्मनीची प्रगति लवकर झाली व तिच्यांत स्थैर्यहि आलें. आगामी औद्योगिक युद्धाची याप्रमाणें सर्व जगाच्या डोळ्यांदेखत जर्मनीची तयारी चालली असतां इतर राष्ट्रें हात जोडून स्वस्थ बसलीं होतीं हें विशेष लक्षांत घेण्याजोगें आहे. शिवाय उत्तम म्हणून नांवाजलेल्या ज्या मोठ्या धंदेशाळा जर्मनींत आहेत, त्यांपैकीं कांहीं

पन्नाससाठ व कांहीं शंभर वर्षांमागेंच स्थापन झालेल्या आहेत हें विशेषच आश्चर्य आहे. हल्लीं या शाळांची संख्या खूपच वाढली आहे. मोठ्या शहरांत त्या असाव्या यांत नवल नाहीं; परंतु अगदीं लहान खेडे-गांवांत देखील त्यांचा प्रवेश झाला आहे, व सर्व प्रकारचे उद्योगधंदे व औद्योगिक कला यांचें त्यांच्या द्वारें शिक्षण मिळतें. आणि शि-क्षणाप्रीत्यर्थ येणारा खर्च त्यापासून होणाऱ्या फलप्राप्तीच्या मानानें जास्ती नसतो. इंग्लंडांतील लोकोपयोगी संस्थांपैकीं कांहींचा खर्च फार अवाढव्य आहे. त्यांनां झालेला गौरवोन्माद वायूचा झटका हानिकारक आहे. मोठ्या कल्पनांनां मूर्त स्वरूप देण्याचें काम अवश्य-मेव मोठ्या प्रमाणावर व थाटांत झालें पाहिजे, असें गृहीत धरून चालण्याची इंग्लंडांत प्रवृत्ति पडली आहे. याचा पहिला परिणाम हा होतो कीं, आरंभाला खर्चाची रक्कम फार फुगते, व शेवटीं फार करून धंदा साफ बुडतो तरी, किंवा यशस्वी झालाच तर फार बेताबातानें होतो. जर्मनींत धंदेशिक्षणाचीं टोलेजंग कॉलेजें व शाळा अनेक आहेत, परंतु खर्चाच्या ओझ्याखालीं त्यांची उपयुक्तता दडपून न जाईल अशी विशेष खबरदारी तेथें घेतली जाते. या संस्थानांत निव्वळ पोषाखी माणसांना कधींहि थारा मिळत नाहीं. शिक्षक लोक पहिल्या प्रतीचे व्यवहारकुशल असतात. त्यांच्यांत वरिष्ठ प्रतीच्या प्रोफेसरांनां जो पगार मिळतो तो पाहून इंग्लंडांतील त्या धंद्याचीं माणसें नाकें मुरडतात. जर्मन प्रोफेसर मात्र तेवढ्या पगारांत संतुष्ट असतात व तो पगार देणाऱ्या अधि-काऱ्यांनांहि, या विद्वान् लोकांचो आपण उपासमार करतों, किंवा त्यांचा अपमान करतों, असें वाटत नाहीं. इमारत–कारखान्यांवरील मुख्य माण-साला जर्मनींत २१० पासून ३१० पौंड पगार मिळतो, तसेंच युनिव्हर्सि-टींत शिकून तयार झालेल्या एंजिनियरला १७५ पासून २६० पौंडांपर्यंत सालिना पगार मिळतो. हे पगार व त्या पगारांच्या मानानें ह्या माणसांनां

करावीं लागणारीं कामें पाहून इंग्लिश लोकांचा नुस्ता संताप होईल, व जर्मनींतील पगाराचें प्रमाण इंग्लंडांतहि लागू करावें, असा जर कोणीं यत्न केला तर त्या त्या धंद्यांतील वर्तमानपत्रें या माणसावर तुटून पडतील, व प्रसंगविशेषीं कांहीं सभासद कॉमन्स सभेंत सरकारला प्रश्न विचारावयालाहि कमी करणार नाहींत ! जर्मनींतील कोणत्याहि भागांत प्रोफेसरांच्या पगाराचें प्रमाण मोठें नाहीं; शिवाय युनिव्हर्सिटींतून माणूस बाहेर पडावयाचा अवकाश, कीं त्याला वाटेल तितका रोजगार हवा तेथें मिळूं शकतो; व याचा परिणाम असा होतो कीं, मागणीच्या मानानें माणसांचा पुरवठाहि भरपूर असतो. अशी स्थिति असल्यानें धंदेशिक्षणाच्या उत्तम शाळांकरतां पहिल्या प्रतीचीं माणसें बेताच्या पगारावर वाटेल तितकीं, वाटेल तेव्हां, मिळूं शकतात. आतां, यावरून इंग्लिश प्रोफेसरांनां मिळणारा पगार त्यांच्या योग्यतेच्या मानानें फाजील असतो असें सिद्ध होत नाहीं. तथापि ही गोष्ट मात्र सिद्ध होते कीं, जर्मनींतील धंदेशिक्षणाच्या संस्थांनां या बाबतींत विशेष प्रकारचा आणि महत्त्वाचा फायदा मिळतो. या कारणांमुळें अशा संस्था स्थापन करणें व त्यांचा खर्च चालविणें त्या देशांत अधिक सोपें आहे.

धंदेशिक्षणाच्या मोठमोठ्या संस्थांकडून होणारी कामगिरी आपण क्षणभर जरी बाजूला ठेविली तरी, अगदीं साध्या व कमी खर्चाच्या साधनांनीं महत्त्वाची कामगिरी बजावणाऱ्या संस्था जर्मनींत थोड्या थोडक्या नाहींत:—हिंवाळ्याच्या दिवसांत सायंकाळीं लहानशा शाळेंत तेलाच्या प्रकाशांत अभ्यास करणारे खेडेगांवांतील मुलांचे वर्ग; फिरतीं प्रदर्शनें व प्रांतोप्रांतीं लोकांच्या मनांत महत्त्वाकांक्षा उद्दीत करणारे त्या प्रदर्शनांत दाखविले जाणारे उत्तम हातकामाचे नमुने; डोंगराळ भागांतील लोकांनां घरच्या घरीं कांहीं तरी धंदे करून वर्षांतून सहा महिन्यांची पोटगी काढावी लागते, अशा लोकांकरतां एका खेडेगांवा-

हून दुसऱ्या खेडेगांवाला, व एका शेतांतील खोपट्याकडून दुसऱ्या खोपट्याकडे जाणारा फिरता, आणि धंदेशिक्षणाचीं मूलतत्त्वें उत्कृष्ट तऱ्हेनें जाणणारा शिक्षक, यांच्याकडून होणारी कामगिरी किती तरी महत्त्वाची आहे ! कारण, धंदेशिक्षणाला जर्मनींत जें परिणत स्वरूप आलें आहे, त्यांत विशेष लक्षांत घेण्याची गोष्ट म्हणजे त्या शिक्षणाचा व्यापकपणा होय. ह्या व्यापांतून कोणचाहि धंदा, मग तो किती कां लहान असेना, वगळला जात नाहीं. शिक्षणाशिवाय धंदा चालविण्यापेक्षां शिक्षण घेऊन तो चालविणें धंदेवाइकांनां जर अधिक हितावह असेल तर त्यांनां अवश्य तें शिक्षण मिळण्याची अडचण कधींहि भासत नाहीं. कारण, सर्व धंद्यांचें शिक्षण देणाऱ्या शाळा तेथें आहेत. हा व्यापकपणा किती तरी स्तुत्य व अनुकरणीय आहे.

धंदेशिक्षण महत्त्वाचें आहे व अवश्य आहे, हा राष्ट्रीय विश्वास किती दृढमूल आहे याचें उदाहरण पाहिजे असल्यास, मोठ्या संस्थानांपैकीं कोणतेंहि एखादें संस्थान पाहिलें तरी पुरें आहे. कारण, प्रत्येकांत या बाबतींत विशेष असा कांहीं तरी गुण आढळतो. प्रशियांतील धंदेशाळा बऱ्याच प्रसिद्ध आहेत. उदाहरणार्थ, चार्लोटेनबुर्ग येथील रॉयल टेक्निकल कॉलेज (ज्यांत शेंकडों शिक्षक कामावर आहेत), व क्रेफेल्ड येथील विणकामाची शाळा, या दोन संस्था पाहण्यालायक आहेत. पण साक्सेन, बव्हेरिया, वुर्टेंबर्ग, आणि ब्रेडेन येथील शाळा वर सांगितलेल्या शाळांहूनहि श्रेष्ठ प्रतीच्या आहेत. साक्सेनमधल्या शाळा तर, त्या प्रांतांतील शहरवासी व शाळांत शिकविले जाणाऱ्या धंद्यांतील लोक, या उभयतांच्या आश्रयावर मुख्यत्वेंकरून चालल्या आहेत, व स्वावलंबनाच्या दृष्टीनें त्या विशेष महत्त्वाच्या आहेत, आणि म्हणून त्यांचें वर्णन जरा विस्तारपूर्वक करण्याचें आम्हीं योजिलें आहे.

साक्सेन येथील लोकांनां धंदेशिक्षण जीव कीं प्राण आहे. इतकें

तादात्म्य जर्मनींत देखील अन्यत्र कोठेंहि झालेलें नाहीं. आणि यांत आश्चर्य करण्याचें फारसें कारण नाहीं. कारण, त्या प्रांतांतील फ्रेबर्ग येथील सर्वांत जुनी धंदेशाळा १७६६ सालीं स्थापन झाली आहे. यानंतर पुढें तीन वर्षांनीं सक्तीच्या शिक्षणाचें तत्त्व साक्सेन लोकांनीं पसंत केलें. या तत्त्वाचा व्यवहारांत अम्मल होण्याला बराच काळ लागला, म्हणजे १८०५ सालीं तें अमलांत आलें ही गोष्ट निराळी. चेमूनिट्झ (Chemnitz) शहरांत १७९६ सालीं एक धंदेशाळा होती, व एकोणिसाव्या शतकाला आरंभ झाल्यानंतर लवकरच कांहीं वर्षांनीं आणखी तीन नवीन शाळा स्थापन झाल्या. सांगण्याचें तात्पर्य हें कीं, साक्सेनमधील लोक उद्योगधंद्यांत पुरे कसलेले आहेत व त्यांच्या शिक्षणसंस्था जुन्या-पुराण्या आहेत.

साक्सेन संस्थानांत प्राथमिक (पूर्वभाग) म्हणजे "प्रायमरी" प्राथमिक (उत्तरभाग) म्हणजे मागें सांगितलेल्या "कंटिन्युएशन," मध्यम म्हणजे "मिड्ल," आणि श्रेष्ठ म्हणजे "हायर," अशा चार प्रकारच्या शाळा आहेत. परंतु त्या शाळांतील शिक्षण कितीहि उच्च दर्जाचें असलें तरी तें प्राथमिक शिक्षणांतच मोडतें. म्हणून या शाळांचा विचार आपण बाजूला ठेवूं. त्या तशा बाजूला काढल्या तरी बाकी जवळजवळ ३६० धंदेशाळा एवढ्याशा लहान प्रांतांत आहेत. आणि त्या शाळांमधून निरनिराळ्या धंद्यांचें शिक्षण देण्याची व्यवस्था केली आहे. १९०५ सालांत या प्रांताची लोकसंख्या ४५ लाख होती. म्हणजे सरासरीनें प्रत्येक तेरा हजार माणसांमागें एक धंदेशाळा असें प्रमाण पडतें; आणि याबद्दल तेथील लोकांनां अभिमान वाटावा हें साहजिक आहे. जर्मन राष्ट्राच्या एकंदर लोकसंख्येच्या $\frac{१}{१४}$ इतकी साक्सेनची लोकसंख्या पूर्वीं होती. पण १८७१ सालानंतर इतर संस्थानांच्या मानानें तेथील लोकसंख्येचें प्रमाण उद्योगधंद्यांच्या वाढीबरोबर कोणीच्या को-

णीकडेच वाढलें! १८७१ व १९०५ यांच्या दरम्यान साक्सेनची लोकसंख्या शेकडा ७६.४ वाढली, प्रशियाची ५१.१, बव्हेरियाची ३४.२, वुर्टेम्बर्गची २६.६, आणि बेडेनची ३७.६, याप्रमाणें वाढली. यावरून प्रशिया व इतर संस्थानें यांजवर साक्सेननें कशी चढाई केली, हें दिसून येतें.

साक्सेनमध्यें धंदेशिक्षणाच्या शाळांचें जें आश्चर्यकारक जाळें पसरलें आहे तें त्या संस्थानावर कोणीं जुलुमानें लादलें नाहीं, किंवा सरकारानें सक्तीनें योजलेल्या कृत्रिम उपायांनींहि सिद्ध झालें नाहीं, हें विशेषेंकरून लक्ष्यांत ठेवलें पाहिजे. धंदेशिक्षणाविषयींचा लोकांचा उत्साह व तें प्राप्त करून घेण्याची त्यांची सहजस्फूर्ति, या दोन कारणांचा हा निःसंशय परिणाम आहे. लोकांनीं स्वतःच्या प्रेरणेनें, इतर कोणांवर भिस्त न ठेवतां, पदरचा पैसा खर्च करून धंदेशिक्षणाला इतक्या उन्नतावस्थेला आणून पोंचाविलें, ही सामान्य गोष्ट नव्हे. धंदेशिक्षणांत लक्ष्य घालणें अवश्य आहे असें संस्थानांतील सरकारला वाटूं लागण्याच्यापूर्वींच लोकांनीं अशा अनेक संस्था स्थापन केल्या होत्या व त्यांच्या हातून उत्कृष्ट तऱ्हेनें काम होत होतें. साक्सेनसरकार अलीकडे या विषयांत मन घालूं लागलें आहे; परंतु या संस्थांच्या अंतर्व्यवस्थेंत कोणच्याहि तऱ्हेची ढवळाढवळ करावयाची नाहीं, लोकांनींच ती आपली आपण पहावी, शिक्षणक्रमांत अवश्य ते फेरफार त्यांचे त्यांनींच करावे, असें धोरण त्यानें ठेविलें आहे. कांहीं गोष्टी अशा असतात कीं, त्या लोकांच्या हातून नीटपणें सिद्धीस जात नाहींत, त्यांचा आरंभ सरकाराकडून व्हावा लागतो. अशा वेळेस मात्र सरकार द्रव्याची म्हणा किंवा अन्य तऱ्हेची म्हणा, मदत करण्यास कसूर करीत नाहीं. उच्चप्रतीच्या धंदेशाळा इतर कमी दर्जाच्या शाळांप्रमाणें चालविणें व्यक्तिशः व्यापाऱ्यांनां किंवा व्यापारी लोकांच्या सभांनां खर्चाच्या मानानें कठिण जातें, म्हणून त्या सरकारनें

आपल्या खर्चानें चालविल्या आहेत. त्याचप्रमाणें खेडेगांवांतील घरधंदे शिकविण्याच्या शाळा स्थापन करण्याचा आरंभ सरकारनेंच मोठ्या शहाणपणानें केला. कारण, त्यानें असें पाहिलें कीं, आपण पुढें झाल्याशिवाय लोकांच्या हातून द्रव्याच्या अभावामुळें कांहीं होणार नाहीं. लोकांनीं चालविलेल्या शाळांनां सरकारांतून दरवर्षी देणगी मिळते. पण ती देणगी देण्यांत, स्वावलंबनाचा मार्ग शाळेचे व्यवस्थापक सोडणार नाहींत, अशी खबरदारी घेण्यांत येते. शेतकऱ्यांच्या शाळांनां सरकारी मदत भरपूर असते, औद्योगिक शाळांनां त्याहून कमी, व सर्वांत कमी व्यापारी शाळांनां. असा हा फरक कां असावा याचीं कारणें स्पष्टच आहेत. शेवटीं सांगितलेल्या शाळा विशेषेंकरून शहरांत असतात, आणि तेथील व्यापारी आणि कारखानदार त्यांनां पैशाची भरपूर मदत करण्यास तयार असतात. कारण, शिक्षणासाठीं खर्च केलेला पैसा अनाठायीं जाणार नाहीं, तो पुनः सव्याज आपला आपल्याला परत मिळेल, अशी अनुभवान्तीं त्यांची खात्री झालेली असते. "ट्रेड गिल्ड्स" नांवाच्या ज्या व्यापारी संस्था आहेत त्या देखील या कारणामुळेंच औद्योगिक धंदेशाळांनां मदत करण्यास राजनिष्ठापूर्वक तयार असतात. लोकांनीं आतांपर्यंत दाखविलेली ही हिंमत वर्णनीय आहेच आहे; परंतु याहूनहि जास्त हिंमत त्यांनीं यापुढें दाखवावी या हेतूनें धंदेशिक्षणांतून सरकार आपला हात काढता घेण्याच्या प्रयत्नांत आहे. धंदेशिक्षणाच्या उच्च दर्जाच्या किंवा त्याहून कमी प्रतीच्या शाळा यापुढें बंद केल्या तर चालतील असें वाटूं लागल्यानें, किंवा धंदेशिक्षणाविषयींची त्यांची आस्था कमी झाल्यानें, सरकार मागें परतूं पहात आहे असा या धोरणाचा अर्थ नाहीं; तर उद्योगधंदे व व्यापार करणाऱ्या माणसांनीं आपल्या गरजा स्वतःच्या बळावर भागवाव्या, हें सार्वजनिकदृष्ट्या हितकर आहे असें सरकारास वाटतें, आणि म्हणूनच त्यानें आपलें

धोरण बदलण्याचा उपक्रम केला आहे. कदाचित् हें नवीन धोरण सररहा यशस्वी होणारहि नाहीं, परंतु साक्सेन प्रांतांत कांहीं ठिकाणीं तें विलक्षण यशस्वी झालें आहे, आणि त्यामुळें धंदेशिक्षणांत या प्रांतानें सर्वांच्यावर कडी केली आहे.

साक्सेन संस्थानांत एकंदर पांच प्रकारच्या धंदेशिक्षणाच्या संस्था आहेत. स्थलसंकोचास्तव त्या सर्वांचें वर्णन आम्हांला देतां येत नाहीं, ही नाइलाजाची गोष्ट आहे. असो. या शाळांपैकीं कोणत्याहि शाळेंत जाण्याची विद्यार्थ्यांवर सक्ती नसते. सक्ती नसते असें आम्हीं म्हटलें इतकेंच; परंतु वास्तविक पाहिलें तर सक्तीहि आहेच, पण ती उघड उघड नाहीं, आडमार्गानें आहे, एवढेंच काय तें! मुलें अथवा मुली प्राथमिक शाळेंतून बाहेर पडल्या म्हणजे पुढचीं तीन वर्षें त्यांनीं "कन्टिन्युएशन" शाळेंत गेलेंच पाहिजे, अशी सक्ती करणारा कायदा तर उघड रीतीनें १८९३ सालापासून अमलांत आहे; इतर बाबतींत असा कायदा उघडपणें केलेला नाहीं हाच काय तो फरक. हें सक्तीच्या शिक्षणाचें तत्त्व प्रथम प्रशियानें अंगीकारलें, आणि नंतर त्याचा कित्ता साक्सेननें गिरविला. हें तत्त्व स्वीकारल्यानें शिक्षणाच्या कामांत नवीन युगालाच आरंभ झाला आहे असें म्हणावें लागतें.

धंदेशिक्षणाची साक्सेनमधील बहुसाळ पद्धति या प्रकारची आहे. तिला हल्लींचें स्वरूप प्राप्त होण्याला मोठया शहाणपणानें पुष्कळ काळ व द्रव्य खर्चावें लागलें आहे. तिला पूर्णप्रकारें यश आलेलें पाहून साक्सेन लोकांविषयीं कांहीं लोकांच्या मनांत आदर उत्पन्न झाला आहे, तर कांहींनां वैषम्य वाटूं लागलें आहे. या कामांत सरकारच्या मदतीवर फारशी भिस्त न ठेवतां स्वावलंबनाची या लोकांनीं कास धरली, हें या यशाचें बीज आहे. त्याचप्रमाणें विद्यार्थ्यांनां केवळ पुस्तकी ज्ञान न देतां व्यवहारांत ज्याचा उपयोग होईल असें शिक्षण देण्याचें धोरण

नेहमीं डोळ्यांपुढें ठेवल्यानें या शिक्षणसंस्थांनां विलक्षण उपयुक्तता आली आहे हें विशेष विचारांत घेतलें पाहिजे. व्यावहारिक शिक्षणाचा एक नमुना येथें वाचकांकरतां आम्हीं देतों. निरनिराळ्या शाळांत विद्यार्थ्यांनीं केलेल्या कामाचीं प्रदर्शनें ठरीव मुदतीला भरविण्याची व्यवस्था केलेली असते. या प्रदर्शनांत विद्यार्थी व त्यांचे शिक्षक यांशिवाय इतर लोकांचा प्रवेश होत नाहीं. प्रत्येक शाळेनें आपले जिन्नस प्रदर्शनांत पाठवावे, मग ते चांगले असोत वा वाईट असोत, अशी प्रदर्शनांच्या चालकांची इच्छा असते, व त्यामुळें सर्व शाळांनां उत्तेजन मिळतें. या प्रदर्शनांत थाटमाट किंवा भपका असावयाचा नाहीं. कारण, देखावा दाखवून लोकांनां खूष करावयाचे हा त्यांचा हेतु नसून त्यांपासून कांहीं तरी फळ प्राप्त व्हावें हा हेतु असतो.

शेवटीं एक महत्त्वाची गोष्ट सांगावयाची ती ही कीं, उच्च प्रतीच्या धंदेशाळांत जाण्याचा कोणालाहि मज्जाव नाहीं. हें झालें शास्त्र, व त्याला अनुसरून व्यवहारांत बरीचशी वागणूकहि आहे हें खरें; तथापि साक्सेन लोक व्यवहारनिपुण असल्यानें परदेशच्या विद्यार्थ्यांविषयीं, अगदीं तिटकारा जरी नाहीं तरी नापसंती, अलीकडे त्यांच्यांत दिसूं लागली आहे. या कामांत एका प्रोफेसराचे उद्गार पुढें लिहिल्याप्रमाणें आहेत:—"पूर्वीं लोकांनां आम्ही असें म्हणत होतों कीं, प्रत्येक माणसानें आमच्याकडे यावें, आम्ही त्याला हरकत करणार नाहीं; पृथ्वी विपुला आहे व आमच्यापाशीं जागाहि रगड आहे. परंतु आतां आम्ही असें म्हणत नाहीं." यांतील वास्तविक प्रकार हा आहे कीं, प्रत्येक (परदेशी) विद्यार्थी पुढेंमागें आपल्याशीं चढाओढ करूं लागेल अशी शिक्षकांनां शंका वाटूं लागली आहे. आणि अनियंत्रित चढाओढीचें तट्टू मरेपर्यंत दामटावयाचें असा साक्सेन लोकांचा स्वभावहि नाहीं. यामुळें अधिकारीवर्गांत "ऊटलंडर" म्हणजे परदेशी माणसासंबं-

धानें उदासीनता उत्पन्न झाली आहे. ज्ञानाच्या मेजवानींत परकी लोक घरच्या माणसाच्या पाटाला पाट लावून पूर्वीं बसत होते; परंतु आतां त्यांनां निराळ्या पंक्तीला बसविण्यांत येतें व त्यांच्यापासून दुप्पट किंवा तिप्पट फी घेण्यांत येते. परंतु इतकी पदरमोड करून देखील परदेशांतील विद्यार्थी तिकडे जावयाला कमी करीत नाहींत असें दिसतें; कारण, अशा विद्यार्थ्यांची संख्या या उपायांनीं फारशी कमी झालेली नाहीं.

प्रकरण ७ वें

# कारखानदार आणि मजूर

जर्मन कारखानदार मजुरांची निंदा करतात, व मजूर कारखानदारांची करतात, असा प्रकार आज बरेच दिवस चालू आहे. परंतु या दोघांपासून दूर राहून वस्तुस्थितीचें निरीक्षण करणाऱ्या तिऱ्हाइत माणसास हे दोघेहि, परस्परांस जितके वाईट वाटतात, तितके वाटत नाहींत. तथापि, ही गोष्ट निर्विवाद आहे कीं, या उभयतांत बांकाबांकी बरीच आहे, व कांहीं धंद्यांत तर ती चांगलीच विकोपाला गेली आहे. मजुरांनीं आपले संघ बनविले, तसें त्याला प्रत्युत्तर म्हणून कारखानदारांनींहि आपले संघ बनविले. पण कारखानदारांचे संघ विशेष बलिष्ठ आहेत व कांहीं कारखान्यांत त्यांची फळी फोडणें मजुरांनां जवळजवळ अशक्यच झालें आहे.

एखाद्या कारखान्यांतील किंवा कारखान्याच्या विवक्षित शाखेंतील मजूर, कारखान्याच्या मालकांकडून विशेष सवलती मिळविण्याकरतां, आपआपसांत संघ किंवा मंडळ्या करतात. अशा संघांनां इंग्रजींत "ट्रेड्स यूनियन" अशी संज्ञा आहे. आम्हीं आपल्या पुस्तकांत हें इंग्रजी नांवच कायम ठेविलें आहे. त्याचा अर्थ काय हें केवळ मराठी वाचकांनीं ध्यानांत ठेवलें म्हणजे इंग्रजी नांव वापरल्यापासून त्यांची गैरसोय होणार नाहीं असें आम्हांस वाटतें. असो. जर्मनींत मजुरांच्या अशा मंडळ्या अनेक स्थापन झाल्या आहेत. त्यांच्या संघशक्तीवर मजुरांचें कल्याण अकल्याण बरेंच अवलंबून राहणार असल्यानें या मंडळ्यांचें सामर्थ्य किती आहे, त्यांच्या मागण्या कोणच्या स्वरूपाच्या आहेत, हें समजून घेणें अवश्य आहे.

मजूर व त्यांच्या संस्था यांसंबंधानें जर्मनींत कायद्याचें स्वरूप काय आहे, हें, प्रस्तावनेदाखल, प्रथम सांगणें इष्ट आहे. "इंडस्ट्रियल

कोड " या नांवाचा एक कायदा सध्यां तेथें अमलांत आहे. त्या कायद्यांतील १५२ कलमानें, आपली सांपत्तिक स्थिति सुधारण्याच्या हेतूनें मजुरांना आपआपसांत एक जूट किंवा कट करण्यास मोकळीक दिली आहे. मजुरांना जशी ही मोकळीक या कलमानें दिली तशीच ती उलट बाजूनें कारखान्याच्या मालकांनांहि दिली आहे. म्हणजे मजुरांचा पुंडावा मोडण्याकरतां आपला कारखाना अजीबात बंद करण्याचा कारखानदारांनां अधिकार आहे. याला इंग्रजींत "लॉक आउट" म्हणजे कारखान्याचे दरवाजे बंद करणें, असें नांव आहे. याप्रमाणें सांपत्तिक बाबतींत मजुरांना संप करण्याचा व कारखानदारांना त्यांना 'मज्जाव' करण्याचा कायद्यानें हक्क प्राप्त झाला आहे. परंतु हा हक्क राजकीय किंवा इतर सार्वजनिक बाबतींत देखील उभयतांनीं अमलांत आणावयाचा नाहीं, असा त्याच कलमांत निर्बंध आहे.

संप करून आपलें कल्याण साधण्याची मजुरांना कायद्यानें जी मोकळीक दिली आहे, तिचा त्यांना वास्तविक फायदा किती मिळतो, हें ठरवितांना नुस्ते कायद्यांतील शब्द पाहून काम भागत नाहीं. त्या शब्दांचा अर्थ कोर्टांत न्यायाधीश कसा करतात, व वेळोवेळीं त्यांनीं दिलेले निकाल कोणच्या स्वरूपाचे असतात, याचाहि विचार करावा लागतो. कोर्टांत कांहीं उदाहरणें अशीं झालीं आहेत कीं, "तुम्ही आमचें म्हणणें ऐकत नाहीं तर आम्ही संप करतों" अशी मजुरांनीं मालकाला केवळ धमकी दिली, किंवा जास्ती पगाराची नुस्ती मागणी केली, तरी पोलीस त्यांच्यावर खटले करतात, व त्या खटल्यांत न्यायाधीश त्यांना अपराधी ठरवून दंड चोपतात. कांहीं न्यायाधीश अशा खटल्यांत आरोपींनां निरपराधी ठरवून सोडूनहि देतात. परंतु अशा तऱ्हेचीं उदाहरणें फार थोडीं आहेत. तेव्हां दोहोंचें सरासरी मान काढून आपण जर पाहूं लागलों तर आपली अशी खात्री होईल कीं, कायद्यांतील शब्द कायदे

करणारानें मजुरांचे कल्याणासाठीं उदारपणाचे योजिले आहेत; परंतु न्यायाधीशांकडून त्यांचा अर्थ मात्र अनुदारपणाचा होतो. यामुळें कारखानदार व मजूर या दोघांच्या दरम्यान उपस्थित होणाऱ्या वादांत न्यायाचा काटा कारखानदारांच्या बाजूला बराच झुकता राहतो व नेहमीं नाहीं तरी बऱ्याच वेळां यशाचा वांटा त्यांनां मिळतो.

मजुरांच्या मंडळ्यांचे तीन मुख्य वर्ग आहेत:—( १ ) " फ्री " अथवा सोशल डेमोक्रॅटिक, ( २ ) हर्श-डंकर किंवा रॅडिकल, आणि (३) क्रिश्चियन अथवा रोमन कॅथलिक. यांपैकीं पहिल्या वर्गाच्या 'यूनियन्स' सर्वांत अधिक वजनदार आहेत व पुढारीपणाचा मानहि त्यांनांच आहे. १८९० सालीं यांतील सभासदांची संख्या पावणेतीन लाख होती, ती १९०६ सालीं जवळजवळ सत्रा लाख झाली! अलीकडे बायकादेखील या नमुन्याच्या सभा स्थापन करूं लागल्या आहेत. १९०६ सालीं बायकांच्या संस्थांची संख्या ३७ होती व त्यांत सव्वालाख स्त्रीसभासद होते. फ्री यूनियन्सचें उत्पन्न फार मोठें आहे व त्या मानानें खर्चहि तसाच आहे. " सोशियालिझ्म " नांवाची जी राजकीय चळवळ जर्मनींत व इतर देशांत चालू आहे तिला या लोकांची पूर्ण सहानुभूति आहे व त्यामुळें बरेच मजुरदार सोशियालिस्टांच्या सभांचे सभासद झाले आहेत. यूनियनमधील सभासद मोठे मेहनती, कर्तव्याला जागरूक, मोठे युक्तिबाज, व आपल्या हिताच्या बाबतींत कधींहि पड न घेणारे असे आहेत. इतर मंडळ्यांच्या मानानें यांनां द्रव्याची व इतर साधनांची विशेष अनुकूलता असल्यानें मजूरदारांच्या फायद्याच्या गोष्टी यांनां जितक्या साध्य करतां येतात तितक्या इतरांनां करतां येत नाहींत. मुख्य संस्थांच्या आश्रयाखालीं मजुरांचे सेक्रेटरीएट किंवा " सल्लागार मंडळी " या नांवाच्या पोटसंस्था त्यांनीं स्थापन केल्या आहेत व त्यांपासून मजुरांचा फार उपयोग होतो.

दुसरा वर्ग म्हणजे 'हर्श-डंकर किंवा रॅडिकल'. या संस्थांचा मूळ उत्पादक डॉ. मॅक्स हर्श या नांवाचा गृहस्थ होता. पार्लमेंटांत रॅडिकल नांवाचा जो एक राजकीय पक्ष आहे त्या पक्षाचा हा होता. आरंभाला या संस्थांचा राजकीय व सांपत्तिक असा दुहेरी हेतु होता, व मजुरांत रॅडिकल पक्षाचे जे लोक असत तेच या संस्थांत सभासद होत असत. परंतु अलीकडे या संस्थांचें राजकीय स्वरूप अगदीं नाहींसें होऊन सांपत्तिक बाबीखेरीजकरून इतर राजकीय विषयांचा विचार करण्याचें त्यांनीं सोडून दिलें आहे. मजूरवर्गांतील निवडक लोक या संस्थांचे सभासद आहेत; परंतु त्यांची संख्या फार मोठी नाहीं व त्यांच्यापाशीं द्रव्यबळहि बेताचेंच आहे. कारखानदारांबरोबर भांडण्याचा प्रसंग आला असतां हाणामारीचा प्रसंग जितका टाळवेल तितका टाळण्याचा यांचा यत्न असतो. तथापि कारखानदार म्हणतील तें निमूटपणें कबूल करण्याची त्यांची प्रवृत्ति नाहीं. दंडाचा उपयोग करण्याऐवजीं सामाचा उपयोग करण्याकडे यांच्या मनाचा विशेष कल आहे. सामाचें बोलणें फार दिवस लांबलें तरी ते उतावीळपणा करीत नाहींत.

तिसरा म्हणजे क्रिश्चियन अथवा रोमन कॅथलिक वर्ग. या वर्गांतील संस्था विशेषेंकरून ऱ्हीनीश-वेस्ट फालिया भागांत आहेत. या भागांत रोमन कॅथलिक धर्म चालतो. या धर्मांतील मतांचा लोकांच्या मनावर पगडा असल्यानें या संस्थांतील सभासद दंगामस्तीच्या अगदीं विरुद्ध आहेत. लोकांविषयीं सहानुभूति असणाऱ्या धर्मोपदेशकांनीं या संस्था मूळ स्थापन केल्या व अजूनहि त्यांनां या मंडळींचा बराच आश्रय आहे. आरंभींआरंभीं त्या केवळ धार्मिक स्वरूपाच्या होत्या, व आपल्या गोटांतील माणसें दुसऱ्या धर्माच्या यूनियनकडे न जातील एवढीच खबरदारी घेण्यांत येत होती. पुढें कांहीं काळानें ही स्थिति पालटली व इतर ट्रेड यूनियनच्या पद्धतीबरहुकुम मजुरांच्या हितांचीं कामें येथेंहि होऊं लागलीं.

इतकें झालें तरी धर्मांची व यांची अजून देखील पुरती फारखत झालेली नाहीं. मजुरांच्या सर्व मंडळ्यांत गरीबीनें काम करणारे लोक जर कोठें सांपडावयाचे झाले तर ते या वर्गांत सांपडतात, असा सार्वत्रिक समज आहे. प्रसंग पडलाच तर हे लोक सोशियालिस्ट किंवा इतर मंडळ्यांत सामील होऊन एकदिलानें काम करतात. परंतु तेवढा तो प्रसंग पार पडला कीं, पुन: ते या लोकांपासून अलग होतात व वेगळे राहूनच आपलीं कामें करूं लागतात. १९०५ सालीं कोळशाच्या खाणींतील मजुरांचा फार मोठा संप झाला. या संपाच्या वेळीं हे लोक सोशियालिस्ट पक्षाला जाऊन मिळाले, दोघांनीं मिळून आपला इच्छित हेतु साध्य करून घेतला आणि नंतर लागलीच पुनः ते वेगवेगळे झाले. सोशियालिस्ट पंथाचीं मतें यांनां मुळींच मान्य नाहींत. त्या मतांचा जर प्रसार झाला तर गरीब व श्रीमंत यांमध्यें रणें माजतील, व तेणेंकरून समाजाच्या सुस्थितीला फार जबरदस्त धक्का बसेल, अशी यांची दृढ समजूत असल्यानें सोशियालिस्ट संस्थांत व यांच्यांत प्रायः बरीच फाटाफूट आहे. द्रव्याच्या बाबतींत या संस्थांची स्थिति पुष्कळ समाधानकारक आहे. सोशियालिस्टांप्रमाणें यांनींहि सल्ला देणाऱ्या पोटमंडळ्या स्थापन केल्या आहेत. धर्मोपदेशकांचें प्राबल्य असल्यामुळें या संस्था कोणत्याहि कामांत जहाल जात नाहींत.

वर वर्णन केलेल्या तीन प्रकारच्या मुख्य संस्थांशिवाय आणखीहि अनेक किरकोळ संस्था आहेत; परंतु त्यांचें वर्णन देण्याचें कारण नाहीं. त्यांच्या उद्योगाची दिशा कोणची हें वरील विवेचनावरून सहज ध्यानांत येण्याजोगें आहे. मजूरवर्गाला संघशक्तीचें महत्त्व कळूं लागल्यानें व त्यांच्यांत एकोपा वाढल्यानें निरनिराळ्या धंद्यांत दरवर्षी अधिक संप होऊं लागले आहेत. १९०६ सालांत एकंदर ३,३२८ संप झाले, व त्यांचा परिणाम १६,२४६ कारखान्यांस भोंवला. या संपांत

२७२,२१८ मजूर सामील झाले होते, आणि २४,४३३ मजूर कामधंद्यावांचून रिकामे राहिले होते ते निराळेच. या एका उदाहरणावरून जर्मनींतील उद्योगधंद्यांनां संपरूपी रोग कसा जडत चालला आहे हें स्पष्ट दिसून येणार आहे.

गेल्या पंचवीस वर्षांत मजुरांनां जास्ती पगार मिळूं लागला व एकंदरींत त्यांचें स्वास्थ्य वाढलें, या गोष्टीचें बरेंचसें श्रेय ट्रेड यूनियन्सनां देणें वाजवी आहे. मजुरांनां कमी तास काम करावें लागून पगारहि जास्ती मिळूं लागला, यांत त्यांचें हित झालें हें निर्विवाद आहे. आतां कारखानदारांवर यामुळें खर्चाचा जास्त बोजा बसला, व या बोजाखालीं ते दडपून जातात किंवा काय अशी भीति वाटूं लागली होती. पण जर्मनींत तयार झालेल्या मालाला परदेशांतून जास्त मागणी येऊं लागल्यानें अनुभवान्तीं ही भीति निराधार ठरली, हें चांगलें झालें. मजुरांचें मागणें होतां होईल तितकें कबूल करावयाचें नाहीं, असा कारखानदारांनीं वेळोवेळीं शिकस्तीचा प्रयत्न केला, व मजूरवर्गाचे पुढारी लेचेपेचे असते तर त्यांनां मूग गिळून स्वस्थ बसावें लागलें असतें. परंतु त्यांनींहि चांगली चिकाटी धरली आणि शेवटीं यश संपादन केलें हें त्यांस भूषणावह आहे.

जर्मनींत ट्रेड यूनियन्सची ही झालेली वाढ वाजवीपेक्षां जास्त आहे असा लोकांचा समज आहे, आणि त्यामुळें केव्हां केव्हां असें भविष्य वर्तविण्यांत येतें कीं, मालक आणि मजूर या उभयतांत प्रस्तुत उत्पन्न झालेला वाद एकदां मिटला म्हणजे ट्रेड यूनियन्सचें महत्त्व मजूरदारांनां कमी वाटूं लागेल. परंतु आमच्या मतानें हा निव्वळ भ्रम आहे. या उभय पक्षांतील वादाचा सलोख्यानें, आज नाहीं कांहीं काळानें, निकाल लागेल असें चिन्ह आज तारखेला तरी दिसत नाहीं. आपल्या अंगांत किती सामर्थ्य आहे हें ट्रेड यूनियन्सनां नुक्तें कोठें समजूं लागलें आहे, आणि वादाचा निकाल होण्याऐवजीं त्याला आतांसा कोठें आरंभ झाला

आहे, असें म्हणणें जास्त शोभेल. आतां कांहीं लोकांचें असें म्हणणें आहे, आणि अनुभवानें तें खरेंहि दिसतें कीं, प्रस्तुतच्या सारखा एखादा मोठा वाद उपस्थित झाला म्हणजे लोकांच्या वतीनें भांडणाऱ्या पक्षाला पुष्कळ लोक सामील होतात आणि त्या वादाचा समाधानकारक निकाल झाला म्हणजे त्यांपैकीं बरेच खोगीरभरतीचे लोक आपलें अंग काढून घेतात. अशा तऱ्हेचीं कांहीं उदाहरणें अलीकडे प्रत्यक्ष घडलीं आहेत, आणि त्यांमुळें कांहीं यूनियन्समधील सभासदांची संख्याहि कमी झाली आहे. अशा प्रकारची भरती व ओहोटी विवक्षित स्थळीं जरी दृष्टीस पडली तरी त्यापासून निश्चित असें एखादें अनुमान काढणें चुकीचें होईल. कारण, हल्लीं जो प्रकार आपण डोळ्यांनीं पहातों तो तर असा आहे कीं, ह्या भरती-ओहोटीला न जुमानतां ट्रेड यूनियन्सची संख्या धिम्मेपणानें आणि नेटानें वाढत आहे; आणि ही वाढ आणखी कांहीं दिवस अशीच चालू राहणार असा अदमास आहे; व मजुरांची स्थिति प्रत्येक बाबतींत कशी सुधारली आहे हें लक्षांत घेतलें म्हणजे हा अदमास चुकीचा ठरेल असा संभव नाहीं. आपलें हित साधण्याकरतां कारखानदारांनीं स्थापन केलेलीं सिंडिकेटें म्हणजे सभा, अथवा यूनियन्स, पुनः या सभा मिळून झालेल्या संयुक्त सभा, या सभांचें विस्तृत कार्यक्षेत्र आणि त्यांनां असणारी द्रव्याची अनुकूलता, जास्ती कर बसूं लागल्यानें मजुरांनां खर्चांत करावी लागणारी काटकसर, आपली जीवयात्रा अधिक सुखावह व बिनजिकीरीची करण्याची त्यांची इच्छा—या सर्व कारणांमुळें कडोसरीला जास्त पैसे बाळगण्याकडे मजुरांची प्रवृत्ति व्हावी हें साहाजिक आहे. आपण जास्त पगार मागूं लागलों तर गिऱ्हाइकांच्या खिशांनां शेवटीं चिमटा बसेल हा विचार त्यांच्या मनाला शिवत नाहीं, त्यांचें सारें लक्ष्य, प्रस्तुत वादांत तरी, त्यांनां रोजगार देणाऱ्या कारखानदारांकडेच फक्त आहे.

ट्रेड यूनियन्सनां, त्यांतहि विशेषेंकरून, सोशियालिस्ट वर्गातील ज्या ट्रे. यु. आहेत त्यांनां, आपली चळवळ व्यवस्थितपणानें चालविण्याच्या कामांत वजनदार वर्तमानपत्रांची मोठी मदत आहे. सोशियालिस्ट पक्षाचीं ६८ शहरांत दैनिक पत्रें आहेत, त्यांपैकीं तीन शहरांत दोन दोन तीन तीन दैनिक पत्रें आहेत. चार वर्तमानपत्रें दर आठवड्याला निघणारीं आहेत, आणि १८ पत्रें उशिरा–उशिरानें निघणारीं आहेत. यांशिवाय निरनिराळ्या उद्योगधंद्यांसंबंधाची माहिती देणारीं व ट्रेड यूनियन्सच्या आश्रयानें चालणारीं पत्रें अनेक आहेत. त्यांपैकीं बरींच दर आठवड्याला प्रसिद्ध होतात. याच स्वरूपाचीं जवळ जवळ १२ मासिक पुस्तकें आहेत व त्यांचें संपादकत्व सोशियालिस्ट किंवा ट्रेड यूनियन्सच्या सभासदांकडे आहे. पोलंड व इटलींतील जे मजूर आहेत त्यांच्या उपयोगाकरतां त्यांच्या भाषेंत निघणारीं वर्तमानपत्रें आहेत. दैनिक पत्रांचा खप मोठा आहे. धातूंच्या कारखान्यांसंबंधानें यूनियननें चालविलेल्या पत्राचे दोन लाख वर्गणीदार आहेत. बहुतेक दैनिक पत्रें मोठ्या कुशलतेनें आणि बाणेदारपणानें चालविलीं आहेत. उलट बाजूनें असेंहि म्हणतां येईल कीं, वादविषयांत खोल दृष्टि पोंचविण्याकडे या पत्रांचें फारसें लक्ष्य नसतें, किंवा अमुक कागदपत्र गुप्त स्वरूपाचे आहेत, ते कसे छापावे, याचीहि विचक्षणा तीं फारशी करीत नाहींत. असो. यांच्या लिहिण्याचा रोंख अगदीं उघडपणें धर्मसंस्थांविरुद्ध असतो, इतकेंच नाहीं, तर अनेक प्रसंगीं नास्तिक मतांचाहि त्यांत जोरानें अनुवाद केलेला आढळतो. सोशियालिस्ट लोक असें म्हणतात कीं, "आम्ही धर्माच्या विरुद्ध नाहीं; धर्म ही एक 'ज्याची त्याची खाजगी बाब' आहे, एवढेंच आमचें म्हणणें आहे." परंतु या म्हणण्याचा व तत्पक्षीय वर्तमानपत्रांतील धर्माविरुद्ध येणाऱ्या लेखांचा त्यांनां मेळ कसा घालतां येईल तो येवो. एवढी गोष्ट मात्र निश्चित आहे कीं, अशा प्रकारच्या

लेखांनीं लोकांत खूप चळवळ उत्पन्न होते व तेंच त्यांनां हवें असतें. दैनिक पत्रें सोशियालिस्ट पक्षाचें समर्थन करणारीं आहेत व आपल्या बाजूला लोकांनीं येऊन मिळावें हा त्यांचा मुख्य उद्देश आहे. मजुरांचें हित पहाण्यांत तीं सदा जागरूक असतात, आणि कारखानदारांबरोबर वाद खेळण्याचा प्रसंग आला म्हणजे मजुरांच्या वतीनें भांडण्यांत तीं मुळींच कसूर करीत नाहींत.

या पत्राचे संपादक सुशिक्षित आहेत व त्यांपैकीं कित्येकांनीं आपल्या विद्वत्तेनें 'डाक्टर' ची पदवी मिळविली आहे. अर्थशास्त्राचा व्यासंग जबर असल्यानें सांपत्तिक प्रश्नांवरील यांचे लेख, जरी एकतर्फी असले तरी, फार विचारपूर्वक आणि काळजीनें लिहिलेले असतात, व त्यांवरून लेखकांची बुद्धिमत्ता स्पष्टपणें दिसून येते. पत्रांतील माहिती केव्हां केव्हां चुकीची असते, परंतु ही चूक जाणून बुजून केलेली नसते हें लक्षांत ठेवलें पाहिजे. त्यांनीं प्रतिपादिलेले सिद्धान्त प्रसंगविशेषीं चुकीचेहि असतात; परंतु या चुका प्रतिपाद्य विषयावर असलेल्या त्यांच्या अंधप्रेमामुळें होतात, अज्ञानानें किंवा बुद्धिपुरःसर होत नाहींत, आणि त्यामुळें त्या दोषास्पद ठरवितां येणार नाहींत.

उच्च प्रतीचें वाङ्मय थोडक्या किमतींत वाचकांना देण्याच्या कामांत जर्मनी इंग्लंडच्या बराच मागें आहे; परंतु कामगार पक्षाचीं वर्तमानपत्रें व मासिक पुस्तकें यांतील लेख, इंग्लंडांतील तत्पक्षीय लेखांच्या मानानें, अधिक सरस व व्यापक असतात, यांत शंका नाहीं. विवक्षित धंद्यांतील कांहीं वर्तमानपत्रकारांचे विविधकला, वाङ्मय, पदार्थविज्ञान व इतर आनुषंगिक सृष्टिशास्त्रें, प्राचीन शोध, अध्यात्मविद्या या विषयांवरचे लेख इतके विद्वत्ताप्रचुर असतात कीं, जाड्या विद्वानांनां सुद्धां त्यांच्या वाचनापासून फायदा झाल्याशिवाय राहणार नाहीं. आतां या लेखांत देखील सोशियालिस्ट मतांची झांक असतेच; परंतु वाचकांनीं

तिकडे दुर्लक्ष्य केलें म्हणजे झालें ! वाचकांच्या रुचीला पटतील असे लेख वर्तमानपत्रांत प्राय: येतात असें गृहीत धरून आपण चाललों तर आपल्याला असें म्हणावें लागेल कीं, इंग्लंडांतील मजूर-वाचकांपेक्षां जर्मनींतील हीं स्वस्तीं वर्तमानपत्रें वाचणाऱ्या मजुरांची बुद्धिमत्ता अधिक आहे. अथवा न जाणों, हे लेख लेखकांच्या मात्र बुद्धिमत्तेचे दर्शक आहेत, वाचकांच्या नव्हेत, असेंहि असूं शकेल ! या दोहोंपैकीं कोणचेंहि कारण खेरं असो, एक गोष्ट मात्र निश्चित दिसते व ती ही कीं, इंग्लंड व जर्मनी या दोन देशांतील मजुरांच्या वर्तमानपत्रांची एकमेकांशीं तुलना करतां येण्याजोग्या बऱ्याच मौजेच्या बाबी आहेत. असो. सोशियालिस्ट पत्रकार झाले तरी आपलीं पत्रें परोपकाराचें पुण्य पदरीं बांधण्याकरतां चालवीत नसतात. पत्रांत लेख लिहिणाऱ्या इसमाला पगार असतात, मात्र हे पगार जाडे नसून बेताचे असतात. पगार भागवून स्वपक्षीय चळवळी व उद्योग करण्याला वर्गणीच्या पैशांतून कूस रहावी अशा बेतानें आपल्याला वर्गणीदार मिळावे अशी व्यवस्थापकांची इच्छा असते व मोठाल्या शहरांत प्रसिद्ध होणाऱ्या या पत्रकारांजवळ अशी कूस थोडीथोडकी नसते. वर्गणीचें उत्पन्न चांगलें होण्याकरतां, जो मनुष्य ज्या पक्षाचा असेल त्यानें इतरांचें पत्र न घेतां आपल्या पक्षाचेंच घेतलें पाहिजे, हें तत्त्व बहुतेक ठरून गेलें आहे, आणि त्याचें उल्लंघन करणारा इसम प्राय: क्वचितच आढळतो.

"हर्श-डंकर" आणि "क्रिश्चियन" या वर्गांतील यूनियन्सच्या आश्रयाखालीं देखील वर्तमानपत्रें व मासिकें प्रसिद्ध होतात; परंतु सोशियालिस्ट पक्षाच्या मानानें त्यांची संख्या कमी आहे व त्यांचें महत्त्वहि बेताचेंच आहे. त्यांतल्या त्यांत क्रिश्चियन यूनियन्स या कामांत फारच मागें आहेत. या तीनहि पक्षांतील वर्तमानपत्रांत नेहमीं बरीच धुसफुस् चालू असते व यावरून परस्परांत मतभेद आणि विरोध असला पाहिजे

असें अनुमान काढणें चुकीचें होणार नाहीं.

साधारणपणें आपले पुढारी व त्यांनीं केलेली व्यवस्था यांचा उपमर्द करावयाचा नाहीं अशी भावना सर्व यूनियनपक्षी लोकांत असते. एकदा एक व्यवस्था अमलांत आणली म्हणजे ती सर्वांनीं मानली पाहिजे, तिला येणाऱ्या यशाचे अथवा अपयशाचे आपण वांटेकरी झालें पाहिजे, आपले पुढारी एखाद्या गोष्टीचा जो निर्णय करतील त्याबरहुकूम सर्वांनीं वागलें पाहिजे, मग त्यांत स्वतःची निराशा किंवा फजिती झाली तरी पतकरली, अशा प्रकारच्या विचारांचा उदय आरंभाला कांहीं दिवस यूनियनवाल्यांच्या मनांत झाला नव्हता व त्यामुळें यूनियनच्या कामांत दिसावा तितका नेट दिसत नव्हता. परंतु ट्रेड यूनियनचीं तत्त्वें काय आहेत, आपआपसांत दुही माजविली असतां कसे अनर्थ ओढवतात, याची प्रतीति जेव्हां अनुभवानें येऊं लागली तेव्हां—

**बहूनामप्यसाराणां समवायो हि दुर्जयः ।**
**तृणैरावेष्ट्यते रज्जुर्यया नागोऽपि बद्ध्यते ॥**

हें तत्त्व त्या लोकांच्या मनांत पुरतेपणीं बाणलें व अधिकाऱ्यांविरुद्ध चरफडण्याचें त्यांनीं सोडून दिलें. राजकीय आचारविचारांचें शिक्षण या लोकांना मिळूं लागल्यानें त्यांचीं मनें विशेष प्रगल्भ झालीं व मुख्यत्वें-करून त्याचा परिणाम वर सांगितल्याप्रमाणें झाला यांत संशय नाहीं. परंतु राजकीय विषयांचें औद्योगिक विषयांशीं इतकें तादात्म्य केल्यानें जर्मन मजुरांचा सांपत्तिक फायदा झाला आहे किंवा नाहीं, हा विचाराचाच प्रश्न आहे. असो. वर सांगितल्या प्रकारची सुधारणा जरी झाली तरी पुढाऱ्यांच्या हातून संघांतील इतर मंडळी निसटून गेल्याचीं उदाहरणें हमेष घडतात, व त्यांवरून असें दिसतें कीं, संपरूपी ज्वर एकदां अंगांत भरला म्हणजे सारासार विचार बाजूला गुंडाळून ठेवून मुख्य माणसांचा अधिकार हे लोक वाऱ्यावारीं उडवून देतात. १९०७ सालीं गंवड्यांनीं केलेला संप

अशाच प्रकारचा होता. पुढाऱ्यांनीं मालकाबरोबर केलेली तडजोड हाताखालच्या लोकांनां पसंत नव्हती, म्हणून त्यांनीं लागलीच संप केला व पुढाऱ्यांनां तोंडघशीं पाडलें. अशा प्रकारच्या बेबंदशाहीनें एकंदर मजूरसमाजाचें दुहेरी नुकसान झालें. कारखानदार म्हणूं लागले कीं, मजुरांतील प्रमुख माणसांबरोबर पगाराच्या किंवा इतर बाबतींत केलेला ठराव त्यांच्या हाताखालचे लोक जर धाब्यावर बसवूं लागले तर स्वतः त्यांच्याशीं ठराव करण्यांत तरी काय अर्थ आहे? त्यांच्या सोईला आलें म्हणजे तो ठराव देखील ते वाटेल तेव्हां फेटाळतील. याकरतां पगाराबद्दल कोणाशीं बोलणें म्हणून यापुढें करावयाचें नाहीं, असें त्यांनीं ठरवून टाकलें. दुसरी युक्ति त्यांनीं अशी केली कीं, मजुरांनां एक काम नेमून द्यावयाचें व त्या कामाच्या मजुरीबद्दल उक्ता ठराव करावयाचा; यायोगानें पगार कमी किंवा जास्ती हा प्रश्नच उत्पन्न होत नाहीं, मग भांडणतंटा तो कोणाशीं राहिला?

ट्रेड यूनियन्सचा खर्च चालविण्याकरतां यूनियनमधील सभासदांनां त्यांचा धंदा व समाजांतील दर्जा यांच्या मानानें शेंकडा ५ या प्रमाणांत दर आठवड्याला वर्गणी द्यावी लागते. कित्येक लोकांच्या मतानें हें प्रमाण शंभरांत सात पूर्णांक एकद्वितीयांश असें आहे. सरासरीच्या मानानें शेंकडा ६ वर्गणी द्यावी लागते, असें आपण गृहीत धरून चालण्यास हरकत नाहीं. या संस्थांचें यंत्र सुरळीतपणानें चालविण्याकरितां अधिकारी म्हणून जीं माणसें नेमण्यांत येतात तीं फार हुशार आणि मनापासून काम करणारीं असतात, व त्यांनां जो पगार मिळतो तो त्यांच्या श्रमाच्या व त्रासाच्या मानानें फार कमी असतो; म्हणजे एखाद्या विशेष कुशल कारागिराला मिळणाऱ्या रोजमुऱ्यापेक्षां जास्ती नसतो. येवढ्या अल्प प्राप्तीवर त्यांनां आठवड्यांतील सहा दिवस व केव्हां केव्हां रविवारीं सुद्धां सकाळीं, दुपारीं, रात्रीं, आपल्या ठिकाणावर हजर

असावें लागतें. आपलें हित साधण्याकरतां दुसऱ्यांशीं भांडण-तंटे करण्यांत त्यांचा बराच वेळ खर्च होतो व शारीरिक त्रास सोसावा लागतो. इतकें करून शिवाय कोर्टाची पायरी चढण्याचा प्रसंग न यावा याबद्दल फार खबरदारी घ्यावी लागते. आपण सत्पक्षाकरतां भांडत आहों असा त्यांच्या मनांत जर दृढविश्वास नसता, व आपल्या कामावर प्रेम नसतें, तर इतक्या थोड्या प्राप्तीकरतां इतका जिवाचा आटापिटा कोणीहि करणार नाहीं. सारांश, निढळाच्या घामावर मिळविलेल्या आपल्या सोबत्यांच्या पैशावर आपण मन मानेल तसें चरावें, अशी अशिव वासना यांच्या मनांत नसते, हा त्यांचा उदारपणा किती प्रशंसनीय आहे!

मागें सांगितलेल्या तीन वर्गांपैकीं प्रत्येक वर्गांतलि अनेक ट्रेड यूनियन्सच्या मिळून संयुक्त संस्था असतात, त्यांचें नांव "वर्क मेन्स सेक्रेटरिएट" (work-men's secretariate) असें आहे. लोकांनां लागेल ती माहिती पुरविणें व सल्लामसलत देणें, अडचणींत सांपडलेल्या स्त्रीपुरुषांनां मित्रत्वाच्या नात्यानें मदत करणें, व आपल्या टापूबाहेरील सर्वसाधारण लोकांस देखील अडीअडचणीच्या प्रसंगीं साहाय्य करणें, इतकीं कामें या संस्थांमार्फत चालतात. या संस्था फार लोकप्रिय झाल्या आहेत व त्यांचा दर्जा समाजांत इतका वाढला आहे कीं, त्यांच्या धर्तीवर चालणाऱ्या इतर सार्वजनिक कामाच्या अनेक संस्था बऱ्याच शहरांत निर्माण झाल्या आहेत. या संस्थांकडून दिवाणी, फौजदारी आणि औद्योगिक कायदेकानूंच्या बाबतींत लागणारी मदत लोकांनां मोफत देण्यांत येते. १९०७ सालीं सोशियालिस्ट वर्कमेन्स सेक्रेटरिएटांची संख्या ९६ होती, व त्यांच्या हाताखालच्या पोटसंस्थांची संख्या १३२ होती. ही संख्या पाहून कोणालाहि आश्चर्य वाटल्यावांचून राहणार नाहीं, असें आम्हांस वाटतें.

## कारखानदार आणि मजूर

आतांपर्यंत केलेल्या विवेचनावरून अशी मात्र कोणीं कल्पना करूं नये कीं, मजूरवर्गानें इकडे आपलीं सैन्याचीं पथकें तयार करून औद्योगिक संपत्तीच्या दुर्गावर हल्ला चढविण्याचा मनसुबा कायम केला असतां तिकडे भांडवलवाले व्यापारी व कारखानदार झोंपा घेत स्वस्थ बसले होते. उलट ट्रेड यूनियन्सच्या तत्त्वांनां या लोकांकडून जर्मनींत प्रस्तुत कालीं जितका विरोध दर्शविण्यांत येतो, तितका यापूर्वीं कधींहि येत नव्हता, त्यांतून देशांतील कांहीं भागांत, तसेंच कांहीं धंद्यांत हा विरोध इतर धंद्यांच्या मानानें जोराचा आहे. पश्चिम प्रशियांत, दगडी कोळसा, लोखंड व पोलादाच्या कारखान्यांतील मालकांनीं आपआपसांत सिंडिकेटें—सहकारी मंडळ्या—स्थापन केल्या आहेत. या मंडळ्यांत हा विरोध जितका प्रखर आहे तितका तो इतर कारखानेवाल्यांत नाहीं. ट्रेड यूनियन्समधील लोकांचा प्रभाव जसा पश्चिम प्रशियांत विशेष दिसतो तसा ट्रेड यूनियन्स हाणून पाडण्याचा विडा उचललेल्या लोकांचा प्रभावहि तेथेंच पहावयास मिळतो. या दोन पक्षांची खरी रणभूमि ऱ्हाइनलंड वेस्ट फालिया प्रांत होय. सांपत्तिक युद्धाला सर्वस्वीं अनुकूल अशी तेथील परिस्थिति आहे.

जर्मनीचें प्रचंड वर्कशॉप—कलागृह—या प्रांतांत आहे. हें वर्कशॉप कधींहि बंद असत नाहीं. संपत्त्युत्पादनाचें काम तेथें अहर्निश चालू आहे. या गृहांत सत्ता चालविणारे जे लोक आहेत, त्यांत सहासात माणसेंच काय तीं प्रमुख आहेत, ही गोष्ट कोणाच्याहि सहज ध्यानांत येण्याजोगी आहे. उद्योगधंदे कसे साधावे, व्यापारांत यश कसें संपादन करावें, या विषयांत यांच्या बुद्धीची धाव फार विलक्षण आहे. धनीपणा गाजविण्याला लायक असा यांचा करारी स्वभाव आहे. लोकांवर कडक अम्मल चालविण्याची कला यांनां जन्मतःच साध्य झाली आहे. संवेदना (Sentiment) काय चीज आहे हें यांनां माहित नाहीं. यांच्या

अंगांत न्यायशीलता नाहीं असें म्हणतां येत नाहीं; पण न्यायाचा कांटा जरा झुकता ठेवावा असें म्हटलें तर तें त्यांच्या हातून होणार नाहीं. एकदा एक निश्चय झाला कीं त्यांत रतिभर फेर व्हावयाचा नाहीं. त्यांची इच्छाशक्ति बेसुमार आहे, आणि राजकीय बाबतींतील मनाच्या उदारपणाच्या कल्पनांनां त्यांच्या अंतःकरणांत मुळींच थारा मिळत नाहीं. प्रशियांतील नवीन उद्योगयुगाचा 'श्रीगणेशा' करण्याच्या कामांत या माणसांनीं बजावलेली कामगिरी जगाला महशूर आहे. राजाच्या पदरचे मंत्री व कायदेकानू करणारे अधिकारी या दोघांनां मिळून राज्यांत जें सामर्थ्य असतें त्यापेक्षां अधिक सामर्थ्य यांच्या अंगांत आहे. प्रशियाच्या पूर्वभागांतील फ्यूडल लॉर्ड इतउत्तर कमी कमी होत जाण्याचा रंग दिसत आहे. पण अलीकडील उद्योगभूमींत या फ्यूडल लॉर्डांचें सामर्थ्य दिवसानुदिवस वृद्धि पावत आहे ! हजारों ट्रेड यूनियन्स झाल्या तरी त्याची त्यांनां पर्वा नाहीं. यासंबंधानें कोठें बोलणें निघालें तर "आमच्या घरांत आमचीच सत्ता अप्रतिहतपणानें चालविण्याचा आमचा निर्धार आहे" हें ठरीव वाक्य त्यांच्या तोंडावाटें आलेंच म्हणून समजावें; आणि या वाक्यानुसार हातानें कृति करून दाखविण्याची त्यांच्या अंगांत शक्तिहि तशीच आहे. १९०५ सालच्या सप्टेंबर महिन्यांत मॅनहिम येथील एका सभेंत वेस्ट फालियांतील प्रसिद्ध कारखानदार, व एकदोन सहकारी सभांचा अध्यक्ष, हर् किरडॉर्फ यानें कारखानदारांतर्फे एक भाषण केलें तें वाचण्याजोगें आहे. त्यांत तो म्हणतो:—

"आमच्या मजुरदारांनां वाटेल तेव्हां हातांतील काम टाकून जातां येते ही स्थिति फार शोचनीय आहे. कामावरील मजूर तगून राहिले तरच एखादा धंदा ऊर्जितावस्थेला येईल. या कामांत कायद्याच्या मदतीची मला अपेक्षा नाहीं; परंतु आज या कारखान्यांत तर उद्यां त्या

कारखान्यांत असा मजुरांचा जो सारखा नाच चालू असतो, त्याला आळा घालण्याचे जे उपाय आम्ही अमलांत आणूं त्यांच्या आड कोणी येतां कामा नये. यच्चयावत् मजुरांनीं सहकारी सभांत सामील व्हावें आणि मग या सभांशीं कारखानदारांनीं काय बोलावयाचें असेल तें बोलावें, अशी एक सूचना कोणीं केल्याचें माझ्या ऐकण्यांत आहे. परंतु या सूचनेप्रमाणें वागण्यास मी मुळींच तयार नाहीं, असें माझ्यापुरतें मी सांगतों. "सोशल डेमोक्रॅटिक" किंवा "क्रिश्चियन" हें नांव धारण करणाऱ्या सभा यांच्याशीं मध्यस्थीचें भाषण करावयाला मी केव्हांहि तयार होणार नाहीं. कारण, सोशल डेमोक्रॅटिक यूनियन्सपेक्षां क्रिश्चियन यूनियन्स अधिक अपायकारक आहेत असें मला वाटतें. हल्लींची समाजरचना आम्ही उलथून पाडणार आहों, असें पूर्वोक्त मंडळी उघडपणानें बोलतात तरी; परंतु उत्तरोक्त मंडळी सामना देण्याकरतां निघाली म्हणजे त्यांच्या आघाडीला खोटें निशाण असतें—क्रिश्चियानिटीचें पांघरुण अंगावर घेऊन हे लढत असतात. सोशल डेमोक्रॅटचा हेतु केव्हांहि सिद्धीस जाणार नाहीं, हें या लोकांनां माहीत आहे आणि म्हणून भांडवलवाल्यांनां धर्मोपदेशकांच्या ताब्यांत देण्याचा त्यांचा यत्न चालू आहे. मजुरांबरोबर उत्पन्न होणाऱ्या वादांत सरकार केव्हां केव्हां मध्यें पडतें याबद्दल देखील मला दिलगिरी वाटते."

वरील उतारा देण्याचा हेतु इतकाच कीं, या वादांत कारखानदारांचें म्हणणें काय आहे हें वक्त्यानें सरळपणानें सांगितलें आहे, त्याच्या बोलण्यांत लपंडावीचा प्रकार कोठेंहि नाहीं. हर किरडॉर्फप्रभृति कारखानदारांनां प्रामाणिकपणानें असें वाटतें कीं, मजुरांच्या सहकारी संस्था अपायकारक आहेत आणि त्यांचा प्रतिकार अवश्य केला पाहिजे. तसें करण्याला नवीन कायद्यांची जरूरी त्यांनां वाटत नाहीं, सरकारी मदतीचीहि अपेक्षा त्यांनां नाहीं. कारण, हे लोक म्हणजेच जर्मनींतील सर-

कार होय अशी वास्तविक स्थिति आहे. या संस्थांकडे दुर्लक्ष केलें म्हणजे त्या आपोआप लयाला जातील, व असें दुर्लक्ष करणें हीच मजुरांनां जडलेल्या रोगावर जालीम मात्रा आहे, अशी त्यांची पक्की समजूत आहे. मजुरांनीं जास्त पगाराची मागणी केली व ती रास्त असली तर थोडक्या पैशाकरतां ते घासाघीस घालीत नाहींत. पण या मागणीबरोबर त्यांनीं जर कां धाकदपटशा दाखविला तर मग प्रत्यक्ष ब्रह्मदेव जरी खालीं आला तरी त्याचें म्हणणें ते ऐकणार नाहींत. यांच्या मोठ्या कारखान्यांतील व्यवस्था इतकी दूरदर्शीपणाची व पोक्त विचारान्तीं केलेली असते कीं, लोकांनीं तिचें उदाहरण घ्यावें. कामकरी लोकांच्या कल्याणाकरतां ज्या सोई कायद्याप्रमाणें त्यांनां कराव्या लागतात त्या करूनच्या करून आणखी अनेक सोई आपण होऊन ते करून देतात. पण कामकरी लोकांच्या सभा म्हटल्या कीं त्यांच्याकडे ते ढुंकून पाहणार नाहींत; मग त्यांच्याबरोबर बोलणेंचालणें करण्याची गोष्ट तर बोलावयालाच नको.

वेस्ट फालियांतील कारखानदारांचें हें कुर्रेबाजपणाचें वर्तन सामान्य जनसमूहाला बरेच वेळां पसंत पडत नाहीं, आणि यामुळेंच १९०५ सालीं कोळशाच्या खाणींतील मजुरांनीं जो संप केला त्यांत शेवटीं कारखानदारांनां हार खावी लागली. हा संप इतका विकोपाला गेला कीं, शेवटीं सरकारानें पुढें होऊन व अवश्य ते कायदे करून संपाचा शेवट केला. या संपानें एका सालांत कोळशाच्या १५ खाणीवाल्या कंपन्यांचें पांच लाख पौंडांचें नुकसान झालें!

याप्रमाणें मोठ्या कारखानदारांनां मजुरांनीं संघ स्थापन करावे ही गोष्ट आवडत नसल्यानें, त्यांनींहि आपल्या बाजूनें बंदोबस्त करण्यास सुरुवात केली आहे व दिवसानुदिवस व्यापारीवर्गाच्या असोसिएशन्स (मंडळ्या) नव्यानव्या स्थापन होऊं लागल्या आहेत व त्यांचें कार्य-

क्षेत्र मोठ्या झपाट्यानें वाढत आहे. ट्रेड यूनियन्स हाणून पाडण्याचा व त्यांच्याबरोबरच सोशल डिमॉक्रसीचा बीमोड करण्याचा या असोसिएशन्सचा मुख्य प्रयत्न आहे.

या वादांत सरकारच्या मदतीवर अवलंबून रहावयाचें नाहीं, असा कारखानदारांचा निश्चय झाला आहे. मजुरांचे संघ कायद्याच्या मार्गानें बंद करणें जवळजवळ अशक्य आहे हें ते जाणून आहेत, आणि म्हणून बहिष्काराचें शस्त्र त्यांनीं आतां हातांत घेतलें आहे. संघशक्ति उदयाला आली म्हणजे बहिष्काराचा उपाय लोकांनां आपोआप सुचतोच, असा अनुभव आहे. तो अनुभव कारखानदारांच्या बाबतींत खरा ठरला यांत आश्चर्य कसचें ? वायव्य प्रांतांतील दगडी कोळसा, लोखंड, पोलाद आणि रासायनिक द्रव्यें यांच्या मोठ्या कारखान्यांत सोशियालिस्ट म्हणून प्रसिद्ध असलेल्या लोकांनां मज्जाव करण्यांत आला आहे. रोजगार मागावयास आलेल्या प्रत्येक माणसाचा पूर्वेतिहास समजून घेण्यासाठीं त्यांनीं आपलें 'सी. आय्. डी.' खातें ठेवलें आहे. मोठ्या कारखानदारांच्या संग्रहाला "ब्लॅक लिस्टें" आहेत. या लिस्टांचा आपआपसांत फार मोठा उपयोग होतो. तपासाचें काम फार गुप्तपणानें चालतें. सोशियालिस्टाला नवीन जागा तर मिळावयाचीच नाहीं, पण एखादा जुना मनुष्य त्या पंथाचा आहे असा नुस्ता संशय आला तरी त्याला अर्धचंद्र मिळतो. कांहीं कारखानेवाल्यांनीं असा नियम केला आहे कीं, एका कारखान्यांतून एखादा इसम कोणत्याहि कारणाकरतां जरी कमी केला तरी, कमी झाल्या दिवसापासून तीन ते सहा महिन्यांच्या आंत, दुसऱ्या कारखानदारानें त्याला आपल्या कामावर घेऊं नये. केव्हां केव्हां हीं ब्लॅक लिस्टें उघडकीस येतात आणि तसें झालें म्हणजे बरेच मजूर अब्रुनुकसानीबद्दल लिस्टाच्या मालकावर दिवाणी कोर्टांत दावे लावतात आणि त्यांच्याकडून नुकसान चोपून घेतात. अशा प्रकारानें चाललेल्या वादाला कडू फळें

आली म्हणजे भविष्यत्काळीं अनेक भानगडी उपस्थित झाल्याशिवाय राहणार नाहींत. असो.

याच्या उलट स्थिति दक्षिण जर्मनींतील बव्हेरिया आणि वुर्टेम्बर्ग प्रांतांत दिसून येते. तेथील कारखानदारांनां असें वाटतें कीं, प्रत्येक मजुराबरोबर पगाराबद्दल उरस्फोड करण्यापेक्षां यूनियनमधील मुख्य माणसांबरोबर बोलणें करणें अधिक सोईचें आहे. यामुळें कारखानदारांचीं सिंडिकेटें आणि कामकऱ्यांचीं ट्रेड यूनियनें या परस्परांत त्या भागांत मोठ्या गुण्यागोविंदानें कामें चालतात, व दोघांच्या समजुतीनें वादाचा निकालहि समाधानकारक होतो!

प्रस्तुतकाळीं मजुरांनीं जी चळवळ चालविली आहे तिचा व्यवहाराच्या दृष्टीनें थोडासा विचार करून हा विषय पुरा करूं. जगांत वाटेल तेथें जा, "आमचे पगार वाढवा व कामाचे तास कमी करा," हें मजुरांचे मागणें चोहोंकडे सर्वसाधारण आहे. मजुरांचे पगार जर्मनींत सररहा वाढले आहेत हें खुद्द मजुरांनांच कबूल केलें पाहिजे. परंतु याला उत्तर म्हणून ते असें म्हणतात कीं, कारखानदारांचें भांडवल व त्यावर त्यांनां मिळणारा नफा ज्या मानानें वाढला आहे त्या मानानें मजुरीची वाढ झालेली नाहीं. देशाच्या निरनिराळ्या भागांत मजूरीच्या दरांत बरेच फरक आहेत. धंदा एकच पण ऱ्हाइन लंड, वेस्ट फालिया व बर्लिन येथें त्या धंद्यांतील मजुरांनां सर्वांत जास्त पगार मिळतो, आणि साक्सेनमधील कांहीं भागांत व साधारणपणें दक्षिण प्रांतांत सर्व ठिकाणीं तो कमी मिळतो. ग्रेटब्रिटनच्या संयुक्त राज्यांत त्यांच धंद्यांतील मजुरांनां जो पगार मिळतो, तो जर्मनींतील सर्वांत जास्ती मिळणाऱ्या पगाराहून अधिकच आहे. ज्या धंद्यांत विशेष कुशलपणाची फारशी जरूर नसते तेथें मात्र दोनहि देशांतील पगाराचें मान सारखें आहे. फरक असला तर तो थोडा असेल.

कामाची मुदत कमी करण्याच्या बाबतींत बरीच प्रगति झाली आहे.

पण उद्योग व स्थळपरत्वें कित्येक फरक अजून कायम आहेत. प्रशियांतील खाणींत, म्हणजे भूपृष्ठाखालीं काम करणाऱ्या मजुरांनां आठ तासांची इयत्ता कायद्यानें ठरवून दिली आहे. साधारण मानानें कामाचा दिवस दहा तासांचा हें चोहोंकडे ठरलें आहे. कांहीं धंद्यांत, विशेषतः विणकामाच्या धंद्यांत, अकरा तासांचा दिवस आहे. कारखानदारांपासून सवलत घेऊन चोहोंकडे एक प्रमाण सुरू करावें म्हटलें तर तें अशक्य आहे, असें पाहून सोशियालिस्ट पक्षाचे लोक पार्लमेंटांत हा प्रश्न वरचेवर उपस्थित करतात. परंतु तेथेंहि त्यांनां यावें तसें यश आतांपर्यंत आलेलें नाहीं. दहा तासांचा दिवस हें प्रमाण त्यांनां बहुतेक मान्य झाल्यासारखें आहे; पण ते तेथेंच थांबतील असा मात्र कोणास भरंवसा वाटत नाहीं. आठ तासांचा दिवस हें त्यांचें अंतिम साध्य आहे. ही शेवटची मजल एकदम गांठतां यावयाची नाहीं म्हणून नऊ तासांवर तें एक दरम्यानचा मुक्काम करतील; परंतु शेवटच्या मुक्कामाला जाण्याचा प्रयत्न केल्यावांचून ते कधीं राहणार नाहींत.

कामाचे तास कमी करण्यासंबंधानें पार्लमेंटांत विचार होऊं लागला म्हणजे मुख्य तक्रार आपल्याला ऐकूं येते ती ही कीं, मजुरांनां ज्यास्त मोकळीक मिळाली म्हणजे ते वेळेचा दुरुपयोग करतील. (प्रशियांतील कारखान्यावरील एका इन्स्पेक्टरानें अगदीं अलीकडच्या एका रिपोर्टांत गंभीरपणानें असें प्रतिपादिलें आहे कीं, कामाचे तास कमी केल्यामुळें आपल्या ताब्यांतील प्रांतांत 'दासीपुत्रांची' संख्या वाढली आहे!) परंतु वेळेचा दुरुपयोग होण्याची भीति व्यर्थ आहे; कारण, हल्लींच्या पद्धतीनें आठवड्यांतील सहा दिवसांत रोज तेरा तास प्रत्येक मजुराला घराबाहेर घालवावे लागतात, रविवारीं तेवढी कांहीं तास रिकामपणांत व मौजेंत घालविण्यास त्याला सवड मिळते. रविवार हा सुटीचा दिवस असें कायद्यानें ठरविलें आहे; परंतु कांहीं संस्थानांत या दिवशीं देखील

मजुरांकडून काम करून घेण्याचा प्रघात आहे.

बरें, उलटपक्षीं असें म्हणतां येईल कीं, कामाचे तास कमी केले तर एका मजुराच्या हातून जितकें काम व्हावयाला पाहिजे तितकें होईलच असा भरंवसा कोण देणार? कांहीं ठिकाणीं कामाचा दिवस आठ तासांचा केला असूनहि भरपूर काम झाल्याचीं उदाहरणें आहेत हें खरें, आणि केवळ जास्ती विश्रांति मिळावी हाच जर या चळवळीचा हेतु असता, तर कारखानदारांनां कमी कामाची तक्रारहि करतां येतीना. तथापि वर सांगितलेल्या हेतूशिवाय मजुरांचा आणखी एक हेतु असा आहे कीं, कामाचे तास कमी होऊन भरपूर काम होईनासें झालें म्हणजे ओघानेंच जास्त मजूर कामावर ठेवणें प्राप्त होईल, आणि यायोगानें जे आपले स्नेही-सोबती कामधंद्यावांचून रिकामे भटकत असतात त्यांनां घरीं चालून आल्यासारखा उद्योग मिळेल!

इंग्लंडांत मजुरवर्गांनां सरकार व म्युनिसिपालिट्या या उभयतांकडून उद्योगाची योग्य दिशा दाखविण्याच्या कामांत जशी मदत होते तशी जर्मनींत होत नाहीं. जर्मन सरकारचें या बाबतींतील धोरण आतांपर्यंत तरी थबकतें आहे. मजूरवर्गांशीं त्यांची सहानुभूति आहे; परंतु विमा उतरण्याचे व कारखान्यांचें नियमन करणारे कायदे (Factory legislation) पास केल्यानें कारखानदारांच्या पाठीवर अगोदरच जास्त ओझें लादण्यांत आलें आहे, त्यांत आणखी भर घातली तर ओझ्याखालीं त्यांची पाठ मोडून जाईल, अशी त्यांस भीति आहे. कांहीं कारखान्यांत मजुरांनां करावें लागणारें काम त्यांच्या शक्तीच्या मानानें भारी आहे, व हा भार हलका केला तर त्यापासून हल्लींच्या व पुढें येणाऱ्या मजुरांच्या पिढीचें कल्याण होईल याविषयीं सरकारला संशय नाहीं. एका जर्मन मुत्सद्द्यानें १९०५ सालीं म्हटलें आहे कीं, "जें राष्ट्र घट्टेकट्टें आणि कार्यक्षम आहे त्याचाच भविष्यत् काळ उजळ होणार. साधारण

जनतेचें शरीरसामर्थ्य वाढविण्याचा यत्न करणें म्हणजे आपल्या मातृभूमीचें सामर्थ्य आणि कल्याण वाढविण्याचा यत्न करण्याप्रमाणें आहे." व हें म्हणणें अक्षरशः खरें आहे. तथापि त्याच सालीं पुढें कामाचे तास कमी करण्याचा प्रश्न जेव्हां पार्लमेंटापुढें विचाराकरतां निघाला तेव्हां हाच मुत्सद्दी मजुरांच्या उलट बोलूं लागला. खुद्द प्रशियाच्या राजानें अनेक वेळां असें बोलून दाखविलें आहे कीं, "सरकारच्या खास देखरेखीखालीं चालणारे कारखाने नमुनेबाज असले पाहिजेत." पण एकदां असा प्रसंग आला कीं, एका सरकारी कारखान्यांतील मजुरांनीं आपला पगार वाढवावा असा सरकारांत अर्ज केला तेव्हां त्या अर्जावर राजाच्या मंत्र्यानें असें उत्तर दिलें कीं, "या कामांत सरकारनें खाजगी कारखानदारांच्या पुढें पाऊल टाकणें सयुक्तिक नाहीं." सरकार जास्त पगार जरी देत नाहीं तरी सामाजिक हिताच्या दृष्टीनें मजुरांच्या सुस्थितीकडे त्याची विशेष नजर असते—म्हणजे त्यांनां रहाण्याकरतां हवाशीर घरें बांधून दिलीं आहेत, पेन्शन देण्याची व्यवस्था केली आहे, व सुट्ट्यांची संख्या वाढविली आहे—आणि या सोई करून दिल्यानें कमी पगाराचा वचपा अन्य मार्गानें निघतो हें निर्विवाद आहे.

म्युनिसिपालिट्यांची स्थिति वरच्याप्रमाणेंच होती, परंतु अलीकडे तिच्यांत थोडा पालट पडूं लागला आहे. याचें कारण हें कीं, म्युनिसिपालिट्यांतच मजुरवर्गाचा अलीकडे जास्त जास्त प्रवेश होऊं लागला आहे. "लेबरपार्टी" म्हणजेच "सोशियालिस्ट पार्टी" ज्यांत नाहीं अशीं "टाउन कौन्सिलें" सध्यां फारच थोडीं आहेत. कौन्सिलांत यांची संख्या मोठी असते असें नाहीं; परंतु थोडक्या लोकांचाच कां असेना पण ओरडा फार असतो. कसेंहि असलें तरी या संस्थांत त्यांचा प्रवेश होऊं लागल्यापासून सरकारी नमुन्यावर पुष्कळ कमेट्यांनीं मजुरांच्या सुखाचीं साधनें वाढविलीं आहेत.

प्रकरण ८ वें

# औद्योगिक समेटाच्या योजना

भांडवलवाले आणि मजूर या उभयतांत कोणत्या प्रकारचे संबंध आहेत या विषयाचें आतांपर्यंत जें विवेचन केलें, त्यावरून उभयतांच्या हाडामासांत एकमेकांविषयींचें वैमनस्य कसें खिळून गेलें आहे हें वाचकांच्या नजरेस स्पष्टपणें आलें असेल. हें वैमनस्य म्हणजे एक ठरलेली गोष्ट (Sattled fact) असें सध्यां धरून चाललें पाहिजे. योग्यायोग्यतेचा विचार करून मग कोणतेंहि काम करावयाचें, असा जर्मन लोकांचा साधारणपणें स्वभाव आहे; परंतु या कामांत मात्र हा स्वभावाचा चांगुलपणा दिसून येत नाहीं हें मोठें चमत्कारिक आहे. हल्लींचा उभय पक्षांतील वाद बरेच दिवस चालू राहिला म्हणजे परस्परांनां परस्परांची शक्ति अजमावतां येईल, आणि तसें झाल्याखेरीज सरकारनें किंवा दुसऱ्या कोणीतरी मध्यस्थी करून उभयतांत समेट करण्याचा जर प्रयत्न केला तर तो निष्फळ होईल, असें भविष्य केलें तर तें चुकीचें होणार नाहीं असें आम्हांला वाटतें. या स्वरूपाच्या युद्धाचा जर्मनीला फारसा अनुभव नाहीं, दोन्ही बाजूंच्या बलाबलाचा चांगलासा अजमास अजून सांपडला नाहीं, सर्वच परिस्थिति अगदीं नवी आहे. दोघांत समेट होण्यापूर्वी निकराचें युद्ध झालें पाहिजे असें दोघेहि जाणून आहेत, आणि वादाचा निकाल लागेपर्यंत कितीहि नुकसान झालें तरी तें सोसून लढाई चालू ठेवावयाची असा उभयतांचाहि कृतसंकल्प आहे.

इतकें आहे तरी, प्रस्तुतच्या वादाचा उपशम करण्याचे अनेक मार्ग निरनिराळ्या दिशेनें योजण्यांत येत आहेत. ग्रेट ब्रिटनच्या संयुक्त राज्यांत प्रमुख धंद्यांत उत्पन्न होणाऱ्या वादांचा निकाल करण्याकरतां लवाद-मंडळ्या स्थापन झाल्या आहेत, व त्यांचें काम फार उत्कृष्ट रीतीनें

चाललें आहे. अशा मंडळ्या जर्मनींत अजून स्थापन झाल्या नाहींत. कोळशाच्या खाणींत व कांहीं विशेष प्रकारच्या धंद्यांत "वर्क्समेन कमिट्या" स्थापन कराव्या असें "इंडस्ट्रियल कोड"नें ठरविलें आहे. कमिटींतील लोकांची निवडणूक मजुरांनीं मतें देऊन करावयाची असते. निवडणूक होऊन कमिट्या स्थापन झाल्या म्हणजे मजुरांच्या हितान-हिताच्या प्रश्नांचा विचार त्यांच्यामार्फत व त्यांच्या सल्ल्यानें होतो. मजूरवर्गाच्या तक्रारी कमी करण्याचा हा मार्ग कारखानदारांनां पसंत नाहीं. याच्यायोगानें आपल्या अधिकाराला विनाकारण बाध येऊन तो संकुचित होतो, असें त्यांचें म्हणणें आहे. आपलें काय म्हणणें असेल तें कारखान्यांच्या मॅनेजरामार्फत मालकाच्या कानावर घालावें, ही जुनीपुराणी चाल सोडून देऊन, मजुरांनीं आपले संघ बनवावे आणि त्यांच्या वतीनें सर्वांकरतां म्हणून प्रत्यक्ष मालकाच्या तोंडाला तोंड देत कांहीं शिष्टांनीं पुढें यावें, येवढी शिष्टाचाराच्या कवाइतीची वागणूक त्यांनां हवी कशाला? असा प्रश्न करणारे मजुरांचे मालक किती तरी आहेत! तथापि, कांहीं ठिकाणीं वर सांगितलेल्या तऱ्हेच्या कमिट्या, उभय पक्षांच्या मान्यतेनें स्थापन झाल्या आहेत व त्यांचें काम सुरळीत-पणानें चालून उभयतांचाहि फायदा झाला आहे.

उभय पक्षांत तंटा सुरू झाला असतां तो तिऱ्हाइतानें तोडावा असें दोघांच्याहि मतानें ठरलें, तर सरकारनें स्थापन केलेलीं इंडस्ट्रियल कोर्टें हें काम करावयास तयार असतातच. ज्या शहरांची लोकसंख्या वीस हजारांवर आहे त्या शहरांत अशीं कोर्टें पूर्वींच स्थापन झालीं आहेत; परंतु कमी लोकसंख्येच्या शहरांत देखील तीं स्थापन केलीं असतां उप-योग होईल असें जर सरकारच्या नजरेस आलें, तर त्यांनां तशी व्यवस्था करण्याची कायद्यानें सवड ठेवली आहे. शिवाय उभय पक्षांकडून ठरीव संख्येच्या सह्यांचा अर्ज आला असतां कोर्टें भरवावीं व त्यांत निम्मे

पंच मालकांचे व निम्मे मजुरांचे अशी व्यवस्था असावी, अशीहि कायद्यानें सवलत दिली आहे. परंतु या कोर्टांची जी माहिती प्रसिद्ध झाली आहे तीवरून मजूरदार त्यांचा घ्यावा तितका उपयोग करून घेत नाहींत, व मालक तर क्वचित् प्रसंगींच घेतात, असें दिसून येतें.

कारखान्याचा मालक आणि त्याच्या हाताखालचे कामगार यांच्या एकविचारानें "वर्कमेन्सची कमिटी" जरी स्थापन झाली तरी ही व्यवस्था, किती केलें तरी, खाजगी स्वरूपाची असणार आणि त्याकरतांच "चेंबर्स आफ कॉमर्स अँड ॲग्रिकलचर"च्या नमुन्यावर "चेंबर्स ऑफ लेबर" हि सरकारनें स्थापाव्या अशी आज अनेक वर्षें राइशटागमध्यें ट्रेड यूनियन्सची व लेबर पार्टीची खटपट चालू आहे. सार्वभौम सरकार अशा चेंबर्स नेमावयाला तयार आहे व त्याचें म्हणणें असें आहे कीं, त्यांतील सभासद, निम्मे मालकांनीं व निम्मे मजुरांनीं निवडून द्यावे. अशा सभा यदाकदाचित् अस्तित्वांत आल्या तरी त्यांच्या विषयींचे पूर्वग्रह, व त्याहूनहि वाईट म्हटलें तर, त्यांविषयींची उदासीनता, आड येऊन त्यांच्यापासून व्हावा तो उपयोग होणार नाहीं. या सभांतील सर्व सभासद आमच्याच पक्षाचे असावे असा कामगारांचा आग्रह. उलट बाजूनें कारखानेवाले म्हणतात कीं, मजुरांनां जोडीला घेऊन न्याय निवडण्याचें काम आम्ही जर करूं लागलों तर ट्रेड यूनियन्सनीं आम्हांवर कुरघोडी करण्याला सुरवात केलीच म्हणून समजा. बरें, कामगारांचें म्हणणें सर्वस्वीं कबूल केलें तर तेवढ्यावरच ते कोठें थांबणार आहेत ? त्यांची मजल याच्याहि पुढें जावयाची. कारण आपल्या पक्षाचें एक सार्वभौम मंत्रिमंडळ (Imperial Ministry) किंवा बोर्ड असावें अशी त्यांची इच्छा आहे. मजूरदारांनीं उपस्थित केलेल्या प्रश्नांचा व इतर विषयांचा निकाल हल्लींच्या व्यवस्थेप्रमाणें "मिनिस्ट्री ऑफ दी इंपीरियर" या मंत्रिमंडळाकडून होतो. हा त्यांचा

अधिकार कमी करून तो स्वतंत्र " लेबर मिनिस्ट्री " कडे देण्याला सरकार तयार नाहीं. मजुरांचा विषय इतर अनेक विषयांशीं संलग्न झालेला असतो. ही गुंतागुंत सोडवून केवळ मजुरांचा विषय अमका असें निश्चितपणानें ठरविणें फार कठिण आहे; आणि तें तसें ठरवितां आलें नाहीं म्हणजे मजूर सुचवितात त्या व्यवस्थेनें इतर खात्यांत नस्ता बखेडा उत्पन्न होईल, अशी या वादांत सरकारची बाजू आहे आणि ती योग्य आहे, असें कोणीहि कबूल करील. घरें बांधण्याच्या कामांत सुधारणा, कारखाने व शाळागृहें येथील आरोग्यव्यवस्था, कारखान्यांची देखरेख, इन्शुअरन्स कायदे, हे व आणखी अशा प्रकारचे दुसरे अनेक प्रश्न असे आहेत कीं, त्यांत मजुरांचा हितसंबंध अमुक मर्यादेपर्यंत आहे असें ठरविणें जवळजवळ अशक्यच आहे.

किरकोळ धंद्यांत व विशेषेंकरून इमारतकारखान्यांत मजूरीबद्दल ठरीव मुदतीचे करार करण्याची पद्धति अलीकडे सुरू केली आहे व तीमुळें विवक्षित मुदतींत मजुरीसंबंधानें फारसे तंटे उपस्थित होत नाहींत. यायोगानें कांहीं धंद्यांपुरती व कांहीं वेळपावेतों मजुरांची जिकीर नाहींशी होते; परंतु त्यानें मुख्य वादाचा निकाल थोडाच लागणार आहे? आतां सांगितलेल्या मुदतबंदी करारांचा फायदा विशेषेंकरून कामदारांनांच मिळतो. पगाराचा दर ठरविला असतो तो बहुतकरून कमींत कमी किती असावा हें ध्यानांत घेऊन ठरविला असतो. यावरून कनिष्ठ मर्यादेपेक्षां जास्त पगार मागतां येत नाहीं असें होत नाहीं, उलट या मर्यादेच्या खालीं मालकाला मात्र जातां येत नाहीं, एवढी शाश्वती त्यांत येते. पगाराच्या करारासंबंधानें मालक अशी तक्रार करतात कीं, करार केले म्हणजे वादाचें मूळ नाहींसें होईल असें मधाचें बोट प्रथम आम्हांला लावलें होतें, परंतु व्यवहारांत जो अनुभव आला तो तर अगदींच निराळा आहे. मुदतीचे करार म्हणजे पगाराच्या शिखरावर जाऊन पोंचण्याची मजुरांची सोपान-

परंपरा आहे असें आम्हांला वाटतें. करार थोडक्या मुदतीचे असतात ही एक गोष्ट; दुसरी अशी कीं, ही मुदत संपली व नवा करार करण्याचा प्रसंग आला म्हणजे पूर्वी आपण काय ठराव केला होता हें कामगार लोक थोडेंच पहात बसणार! नवा करार म्हटला कीं जास्त पगार, आणि कामाचे तास कमी, हें तुणतुणें वाजविण्यास त्यांनीं सुरुवात केलीच म्हणून समजावें. कारखानदार पडले गरजवंत, यामुळें दर खेपेला या दोनहि बाबतींत मजुरांची समजूत त्यांनां घालावी लागते. एतावता करार म्हणजे एक लांबलचक स्क्रू आहे असें म्हणणें प्राप्त होतें. या स्क्रूची गति मंद आहे, डोळ्यांनां केव्हां केव्हां ती जाणवत देखील नाहीं, आणि म्हणून हळूहळूच कां होईना, पण त्याचा एक एक वेढा आंत शिरत असतो. बरें, ही व्यवस्था सर्व मजुरांनां सारखी हितावह आहे असें म्हणावें तर तेंहि नाहीं. ज्या मजुरांच्या अंगांत विशेष करामत नाहीं अशांचा मात्र त्यांत फायदा आहे; परंतु ज्यांच्या अंगांत जास्त पगार मिळविण्याची धमक आहे त्यांचा उलट तोटाच आहे. शिवाय हे करार असे असतात कीं, ते मोडण्यापासून झालेलें नुकसान कोर्ट-मार्फत भरून घेणें नेहमीं शक्य नसतें. कारण, या दाव्यांत अनेक भान-गडींचे कायद्यांचे प्रश्न उपस्थित होतात व त्यांचा निकाल न्यायाधीश काय देतील याचा भरंवसा नसतो. कित्येकांची अशी तक्रार आहे कीं, करारानें मजुरांचा पगार एकदां बांधला गेला म्हणजे ते कामांत कुच-राई करूं लागतात. परंतु ही तक्रार व्यर्थ आहे असें वाटतें. आतां कांहीं धंद्यांत तसें होत असेल, नाहीं असें आम्ही म्हणत नाहीं; परंतु तें अपवादादाखल समजलें पाहिजे. बव्हेरियन सरकाराचें उलट या करारांनां उत्तेजन आहे, व जेथें जेथें शक्य असेल तेथें तेथें ते अमलांत आण-ण्याचा यत्न करण्याबद्दल कारखाना–इनस्पेक्टरांनां त्यांनीं हुकूम दिले आहेत.

कारखानदाराला होणाऱ्या नफ्यांत मजुरांनां हिस्सा देण्याची युक्ति जर्मनींत पसंत नाहीं. इमारतकारखान्यांत बक्षीस किंवा बोनस देण्याचा प्रघात देशांतील बऱ्याच भागांत आहे. कित्येक लोक नाताळ-च्या सणांत किंवा नूतन वर्षारंभाला ग्रॅच्युइटी देतात; पण नफ्यांतला हिस्सा देण्याला बहुतकरून कोणीहि तयार नसतो. याच्या उलट असा प्रकार दिसतो कीं, मोठ्या कारखान्यांत मजूरवर्गाच्या व त्यांच्या बायका-मुलांच्या कल्याणाच्या अनेक व्यवस्था कारखानदार आपण होऊन करून ठेवतात. यांपैकीं कांहीं कायद्याप्रमाणेंच कराव्या लागतात हें खरें; परंतु स्वतःच्या चांगुलपणामुळें या कामांत त्यांची मजल कायद्याच्या पुढें बरीच जाते. कोळसा, लोखंड, पोलाद, रासायनिक द्रव्यें व विण-कामासारख्या मोठमोठ्या कारखान्यांत अशा सोई जास्त प्रमाणांत अस-तात. इन्शुअरन्स फंड कायद्यानेंच ठेवावा लागतो, त्याशिवाय पेन्शन व "बेनिफिट फंड" असतात व त्या फंडांतून मजुरांच्या बायकामुलांचा, त्यांच्या पश्चात्, चरितार्थ चालावा अशी योजना केलेली असते. सणा-वाराच्या व उन्हाळ्याच्या दिवसांत मजुरांनां व त्यांच्या मुलाबाळांनां मेजवान्या देण्यांत येतात. कित्येक मोठ्या कारखान्यांनां लागून दारूचीं व धान्याचीं वगैरे दुकानें, स्वयंपाकगृहें, दुधाचे डेपो ठेवलेले अस-तात, आणि त्यांत कमी किंमतीला खात्रीचे खाण्याचे पदार्थ मजुरांनां विकत घेतां येतात. त्यांनां सोईवार अशीं राहण्याचीं घरें कारखान्याला लागूनच बांधण्याची योजना हल्लीं सर्वत्र सुरू झाली आहे. या कामा-करतां कारखानदारांनां पैशाची जरूर लागली तर सरकारांतून कमी व्याजा-वर कर्ज मिळतें. कारखान्याला लागूनच मजुरांचीं राहण्याचीं घरें बांधण्यांत दोघांचाहि फायदा असतो. विशेषेंकरून मोठ्या शहरापासून दूर अंत-रावर जेथें कारखाने असतात तेथें हा फायदा अधिक स्पष्टपणें लक्षांत येतो. मजुरांनां हवाशीर घरें रहावयास सांपडून कारखान्याला माणसांचा

तुटवडा कधीं पडत नाहीं. ही सोय लहानसहान नाहीं. कोळशाच्या खाणी ज्या प्रांतात आहेत त्या प्रांतांत, इंग्लंडप्रमाणें, खाणींत काम करणारे लोक खाणीच्या मालकांनीं बांधलेल्या घरांत राहतात. मोठ्या शहराच्या बाहेर बांधलेलीं घरें सर्व बाजूंनीं सोइस्कर असतात. तीं मजबूत बांधलेलीं असून प्रशस्त असतात. त्यांच्या आजूबाजूचा भूप्रदेश रमणीय असून हवापाणी निरोगी असतें. शहरांत इतर खाजगी लोकांनीं बांधलेल्या भिकार घरांनां जें भाडें द्यावें लागतें त्यापेक्षां या सुंदर व सोइस्कर घरांचें भाडें फार कमी असतें. कांहीं ठिकाणच्या मजुरांच्या चाळी इतक्या उत्तम जागेवर बांधलेल्या असतात कीं, मध्यम प्रतीच्या गृहस्थांनां देखील अशा घरांत राहण्याचें सुख क्वचितच अनुभवायला सांपडतें !

तथापि, प्रत्यक्ष किंवा अप्रत्यक्ष तऱ्हेनें, मजुरांवर त्यांचे मालक जे उपकार करतात त्यांची जाणीव त्यांनां असावी तितकी नसते हें येथें कबूल केलें पाहिजे. नेहमीं जरी नाहीं, तरी बऱ्याच प्रसंगीं, याचा दोष मालकांकडेच येतो. एखादी देणगी देऊन द्यावयाची, परंतु तिच्याभोवतीं चमत्कारिक अटींचें काटेरी कुंपण इतकें मजबूत घालावयाचें कीं, आंत कोणाचा प्रवेशच होऊं नये. असें झालें म्हणजे त्या देणगीची शोभा नाहींशी होते आणि मजुरांनां असें वाटूं लागतें कीं, देणगी देण्यांत मालकाचा हेतु, दुसऱ्याचें कल्याण व्हावें हा नसून, फक्त स्वतःचेंच कल्याण व्हावें, हा आहे. पेन्शन् फंड व त्यासारखे जे इतर फंड आहेत त्यांकरतां मजुरांकडून, त्यांची इच्छा असो वा नसो, वर्गणीच्या रूपानें पैसे घ्यावयाचे, आणि वेळ आली म्हणजे पेन्शन् द्यावयाचें, किंवा निदान जितकी वर्गणी घेतली असेल तितकी तरी परत करावयाची, हें सर्वस्वीं मालकाच्या तब्बेतीवर असावयाचें. ही स्थिति मजुरांनां अर्थातच अगदीं नापसंत आहे. क्रूप[1] नांवाच्या प्रसिद्ध कारखान्यांतील मजुरां-

१. क्रूप नांवाचा लोखंडाचा व पोलादी युद्धसामग्रीचा कारखाना जर्मनलोकां-

कडून पेन्शन् फंडाकरतां सक्तीनें वर्गणी घेण्यांत येते; परंतु पेन्शन देण्याची वेळ आली म्हणजे मालकाची मर्जी प्रमाण, हा न्याय तेथें देखील लागू आहे. कारखाना सोडून एखादा इसम गेला तर त्याच्या वर्गणीची रक्कम त्याला परत करावयाची नाहीं, हा क्रम या कारखान्यांत किती तरी वर्षें चालू होता. कांहीं थोड्या वर्षांपूर्वी शेवटीं एकदा असा प्रसंग

---

च्या उद्यमप्रियतेचें व अचाट धाडसाचें जिवंत चित्र होय. हा कारखाना प्रथम १८१० सालीं पीटर फेडरिक क्रूप नावांच्या इसमानें एसन् गांवीं स्थापन केला. हें गांव त्या वेळीं आपल्या कांहीं मैलांच्या टापूबाहेर फारसें प्रसिद्ध नव्हतें. आरंभाला कारखाना अगदीं लहान होता. १८११ सालीं पोलाद तयार करण्याची एक भट्टी प्रथम बांधली व १८१८ सालीं कांहीं कलागृहें (Work-shops) तयार झालीं. तथापि क्रूपच्या कारकीर्दींत कारखाना भरभराटीस येण्याचें कांहीं चिन्ह नव्हतें. त्यानें आपला होता नव्हता तेवढा पैसा या कामांत खर्च केला; परंतु त्यांत कांहीं फायदा न झाल्यानें त्याला एकसारखी तळमळ लागून राहिली आणि अखेरीस १८२६ सालीं त्या दुःखांतच त्याचा अंत झाला. त्याचा मुलगा आल्फ्रेड यानें बापाचा कारखाना मोठ्या हिंमतीनें चालू ठेवला. आल्फ्रेड याचा जन्म एका खोपटांत झाला व त्याचें बालपण विपत्ति व हाल सोसण्यांत गेलें. हें खोपट आल्फ्रेडचें स्मारक म्हणून अजून राखून ठेवलें आहे. आल्फ्रेडनें आपल्या करामतीनें बापाचा कारखाना चांगला नांवारूपाला आणला व तेथें तयार झालेल्या बंदुका व तोफा परदेशांत फार खपूं लागल्या. आल्फ्रेडच्या पश्चात् कारखान्याची भरभराट फार जलद झाली. फ्रेडरिक क्रूप हा हल्लींचा मालक आहे, व त्याला ४,०००,००० डालर्स दरसाल इन्कमटॅक्स द्यावा लागतो. हल्लीं सर्व जगांत याच्या एवढा प्रचंड कारखाना कोठेंहि नाहीं. या कारखान्यावर कायसरची फार मर्जी आहे. सरदाराची पदवी मालकाला त्यानें अनेक वेळां देऊं केली, पण ती त्यानें पतकरली नाहीं. कायसर कित्येक वेळां फ्रेडरिककडे पाहुणा म्हणून जातो व तेथें कांहीं दिवस राहून कारखान्यांतील काम डोळ्यांनीं पहातो. हल्लींच्या युद्धांत लीज व नामूर या शहरांवर रोखलेल्या १७ इंची हॉविट्झर तोफा याच कारखान्यांत तयार झाल्या आहेत.

आला कीं, एका मजुरानें कारखान्याच्या मालकावर दिवाणींत दावा लावला. त्या दाव्याचा निकाल वादीसारखा झाला. अशा स्वरूपाच्या दाव्यांतील निकालावर अपील करण्याचा मार्ग कायद्यानें खुला ठेवलेला नाहीं. यामुळें वादाला बराच अवसर मिळतो. ही स्थिति नाहींशी करावयाची असेल तर सक्तीच्या फंडासंबंधानें हल्लीं जे कायदे अमलांत आहेत त्यांत योग्य दुरुस्ती केली पाहिजे. दिवाणी कोर्टांत प्रस्तुत कायद्याप्रमाणें दोन वर्षांच्या वर्गणीचीच रकम काय ती मिळते, मागील वर्षांची मिळत नाहीं; तरी देखील आपल्या एका सोबत्याला मालकाविरुद्ध यश आलेलें पाहून अनेक मजुरांनीं त्याच्यावर दावे लावले व दोन वर्षांच्या रकमा चोपून घेतल्या. पेन्शनें, प्रीमियम्स, सर्व तऱ्हेच्या ग्रॅच्युइटी—म्हणजे केवळ मालकांच्या वचनानुसार भविष्यत् काळीं मिळणाऱ्या देणग्यांसंबंधाची व्यवस्था वरच्यापेक्षांहि अधिक असमाधानकारक आहे. या देणग्या देण्याच्या बाबतींत घातलेल्या अटी इतक्या अनिश्चित आणि माणसांचें सत्त्व पाहणाऱ्या असतात कीं, त्या ज्या माणसांच्या पदरांत पडावयाच्या तीं माणसें जवळ जवळ देवकोटींतीलच असलीं पाहिजेत ! या देणग्या कोणालाहि हक्कानें मागतां येणार नाहींत हा मुख्य नियम ! अर्थातच त्या द्यावयाच्या किंवा नाहीं हें मालकांच्या मर्जीवर राहणार. मालकहि आपल्या हातांत धारवाडी कांटा घेऊन बसलेला असतो. एखाद्या मजुराच्या हातून एखादे वेळेस जरी कांहीं चुकी झाली असली तरी त्याला काम सोडते वेळेस देणगीच्या नांवानें आवळ्याएवढें शून्य, मग त्या बिचाऱ्यानें आपलें काम अनेक वर्षें कां बिनबोभाट केलेलें असेना !

कारखान्यानजीकच्या घरांत भाड्यानें रहावयाचें म्हटलें तर त्यांत देखील मजुरांच्या बऱ्याच गैरसोयी असतात. या घरांत राहिल्यानें त्यांची स्वतंत्रता कमी होते, आणि मालक व मजूर यांचे परस्पर हक्क काय

आहेत, याचा वाद उपस्थित झाला म्हणजे मजुरांना बरोबरीच्या नात्यानें तडजोडीचें बोलणें बोलावयाला वाव राहत नाहीं. या गैरसोयीमुळें मजुरांनीं मालकाच्या घरांत राहूं नये, अशी खटपट ट्रेड यूनियन्स करीत असतात. घरभाड्याचे करार कडक जरी नसले तरी, बरेच त्रासदायक असतात. जोंपर्यंत मनुष्य कामावर आहे तोंपर्यंत त्याला रहावयाला घर! आज जर तो कामावरून कमी झाला तर उद्यां त्यानें आपलें घर रिकामें करून दिलेंच पाहिजे. त्याला कांहीं दिवसांची नोटीस आगाऊ द्यावी असें कायद्यानें ठरविलेलें नाहीं. एकदम घर सोडावें लागल्यानें त्या बिचाऱ्यानें आपलीं बायकापोरें घेऊन कोणाच्या दारांत उभें रहावें? ही स्थिति अत्यंत दोषार्ह आहे, अशी सध्यां देशांत चोहोंकडे हाकाटी सुरू झाली आहे.

तथापि, या विषयासंबंधानें एखादा व्यापक सिद्धान्त ठरविणें अन्यायाचें होईल. मोठे कारखानदार, व त्यांतून ज्यांचे कारखाने स्थापन झाल्याला आज अनेक वर्षें होऊन गेलीं आहेत, अशा लोकांच्या अंतःकरणांत कामगार लोकांचें खरें खरें कल्याण करण्याची बुद्धि जागृत आहे, व तदनुसार त्यांनीं कायद्यानें न सांगितलेल्या अशा ज्या योजना केल्या आहेत त्या मारवाडी कांट्याच्या नसतात. इन्शुअरन्स कायदे सरकारनें अलीकडे केले; परंतु मजुरांवर येणाऱ्या आपत्तींचा भार हलका करण्याच्या तजविजी मोठ्या नांवानें प्रसिद्ध असलेल्या पुष्कळ कंपन्यांनीं आगाऊच करून ठेवल्या होत्या. यांत त्यांची परोपकारबुद्धि व मजुरांविषयींचा आपलेपणा दिसून येतो, इतकेंच नाहीं, तर सरकारापेक्षां अधिक दूरदृष्टि त्यांचे अंगांत आहे असेंहि सिद्ध होतें. कायद्यानें निर्माण केलेल्या फंडांच्या बरोबरीनें यांचे स्वतःचे आजारीपणाचे व पेन्शनाचे फंड चालू असतात. एखादा मजूर आजारी पडला, हातपायांनीं लुला झाला, किंवा म्हातारपणामुळें अतिशय थकला, तर त्याला

कायद्यानें काढलेल्या फंडांचा जो फायदा मिळावयाचा तो मिळून शिवाय मालकानें परोपकारबुद्धीनें काढलेल्या फंडांचाहि फायदा मिळतो, ही फार समाधानाची गोष्ट आहे.

बव्हेरियाचें सरकार मजुरांच्या हिताची जितकी काळजी वाहतें, तितकी इतर कोणतेंहि सरकार बाळगीत नाहीं, अशी त्याची ख्याति आहे. आपल्या संस्थानांतील कारखानदारांनीं मजुरांच्या हिताकरतां कोणच्या संस्था काढल्या आहेत, व त्यांच्याकडून मजुरांचा परामर्ष कशा रीतीनें घेतला जातो, या विषयावर त्यानें एक रिपोर्ट नुक्ताच छापून प्रसिद्ध केला आहे. या कामांत सरकारनें प्रथम १८७४ सालीं चवकशी केली होती. प्रस्तुत रिपोर्टांत प्रसिद्ध झालेली माहिती त्या सालानंतर पुढें अनेक वर्षांनीं मिळविलेली आहे. या माहितीवरून सरकारनें स्पष्टपणानें आपला अभिप्राय असा दिला आहे कीं, मजुरांचें कल्याण व्हावें अशी पुष्कळ कारखानदारांची मनापासून इच्छा आहे व त्याप्रमाणें १८७४ सालानंतरच्या अवधींत मजुरांची गृहस्थिति चांगली सुधारली आहे. तथापि, या दरम्यानच्या काळांत एक महत्त्वाचा फरक पडलेला त्यांनां दिसतो. तीस वर्षांपूर्वी संपांचें नांवहि कोणाला ठाऊक नव्हतें; परंतु ते यापुढें होणार नाहींत, असें मात्र आतां खात्रीनें सांगतां येत नाहीं. पूर्वीच्या मजुरांत जी कृतज्ञताबुद्धि होती ती अलीकडच्या मजुरांत नाहीं, आणि त्यामुळें आपण केलेल्या उपकारांचें व्हावें तसें चीज होत नाहीं, अशी पुष्कळ कारखानेवाल्यांची अलीकडे तक्रार सुरू झाली असल्याचें सरकारच्या नजरेस आलें आहे.

मजुरांच्या मनोवृत्तींत असा पालट कां पडावा याची मीमांसा निरनिराळ्या मार्गांनीं करतां येण्याजोगी आहे. उपकारकर्त्याला जें वर्तन अधमपणाचें वाटतें तें उपकार करून घेणाऱ्याला तसें वाटत नाहीं. मजूर म्हणतात, "आमच्यांत कृतज्ञताबुद्धि नाहीं असें मुळींच नाहीं,

परंतु आम्हांला अधिक स्वातंत्र्य पाहिजे आहे व लोकांच्या मदतीवांचून आमचा आम्हांला योगक्षेम चालवितां आला पाहिजे, आणि त्याकरतां आमची सर्व खटपट चालू आहे. हल्लींच्या औद्योगिक परिस्थितींत, काम देणारा मालक म्हणजे आमच्या कुटुंबांतील मुख्य माणूस, त्याच्यावर आम्हीं सर्वस्वीं अवलंबून राहिलें पाहिजे, ही भावना यापुढें बाळगणें म्हणजे काळाचा विपर्यास करण्यासारखें आहे. आमच्यावर तुम्हांला जर उपकार करावयाचा असेल तर आमचा पगार वाढवा म्हणजे झालें, तो कसा खर्च करावयाचा हें आमचें आम्हीं ठरवूं. आमचा पगार वाढविण्यांत मालकांची उदार बुद्धि जगाच्या निदर्शनास येईल व आमच्या अकृतज्ञतेचा डांगोरा पिटण्याचेंहि कारण पडणार नाहीं.''

प्रकरण ९ वें

# मजूर



ता. ६।२।१९०६ रोजीं जर्मनीच्या सार्वभौम पार्लमेंटांत एका प्रसिद्ध मुत्सद्द्यानें पुढील शब्दांनीं आपल्या देशांतील मजुरांची स्तुति केली:—"जर्मनींतील उद्योगधंद्यांचा अलीकडे जितका विस्तार झाला आहे, तितका जगांतील इतर कोणच्याहि देशांत त्या मुदतींत झाला नाहीं; याचें मुख्य कारण आमच्या मजुरांचें कर्तृत्व होय." या स्तुतीला जर्मन मजूर सर्वस्वीं पात्र आहे हें जितकें खरें, तितकेंच ती करणारा मुत्सद्दी अंत:करणाचा उदार असला पाहिजे हेंहि खरें आहे. कामधंद्याला व माणुसकीला अवश्य लागणारे श्रेष्ठ प्रतीचे गुण जर्मन मजुराच्या अंगांत आहेत, व त्याच्या हातून होणारें काम हेंच त्याच्या कर्तृत्वशक्तीचें खरें द्योतक आहे. आमच्या देशांतील माल म्हणजे "स्वस्त पण भिकार" असे उद्गार १८७६ सालीं एका जर्मन प्रोफेसरानेंच काढले होते. परंतु ही स्थिति आतां पालटली आहे. इतर देशांच्या मानानें तेथील माल अजून स्वस्त आहे; भिकार मालहि अद्यापि वाटेल तितका तयार होतो, परंतु त्याच्याच बरोबरीनें उत्कृष्ट नमुन्याचा मालहि तयार होऊं लागला आहे, व याचें बरेंचसें श्रेय, वरील मुत्सद्द्याच्या मताप्रमाणें, मजुरांनां आहे.

जर्मन मजुराची इंग्लिश मजुराबरोबर तुलना करून पाहण्याचा मोह आपल्याला व्हावा हें स्वाभाविक आहे, आणि अशी तुलना आपण करूं लागलों म्हणजे त्या उभयतांतील पहिला फरक जो आपल्या नजरेस येतो तो हा कीं, जर्मन मजुराच्या अंगांत स्वतंत्रपणानें काम करण्याची कुंवत नाहीं; म्हणजे जरा जाडी संस्कृत शब्दांत सांगावयाचें झालें तर, तो "पर-प्रत्यय-नेय-बुद्धि:" असतो असें म्हणावें लागतें. पदोपदीं त्याला दुसऱ्यांनीं वळण लावावें लागतें आणि त्याला त्याची

जरूरीहि भासते. त्याच्या स्वभावांत हा धर्म प्राय: या कारणामुळें उत्पन्न होतो कीं, जर्मन, त्यांतूनहि उत्तरभागांतील जर्मन, म्हटला म्हणजे, त्याला आपला सारा जन्म लोकांच्या देखरेखीखालीं व अनुशासनानुरूप घालवावा लागतो; यामुळें एखाद्या गोष्टीचा स्वत: उपक्रम करण्याची त्याच्या अंगांतील ताकद नाहींशी होते, व दुसऱ्यांनीं आपल्यावर अधिकार गाजवून वळण लावल्याशिवाय आपला आयुष्यक्रम सुरळित चालावयाचा नाहीं, अशी त्याच्या मनाची समजूत होऊन बसते. ज्या कारखान्यांत इंग्लिश व जर्मन बरोबरीनें काम करीत असतात त्या कारखान्याच्या मालकाचें नेहमीं असें म्हणणें असतें कीं, जर्मन कामगारांत स्वावलंबन आणि आत्मविश्वास हे गुण असत नाहींत. उपजत ग्रहणशक्ति आणि अभ्यासानें कमावलेली ग्रहणशक्ति यांत जो ढळढळीत फरक असतो तोच इंग्लिश व जर्मन कामगार यांत आहे. दोघेहि अनुभवाच्या शाळेंत आपले मुख्य धडे शिकतात; परंतु त्यांच्या कर्तृत्वशक्तींत व योग्यतेंत इतर साधनांनीं जी भर पडते ती मात्र जर्मन कामगारांत धंदेशिक्षणानें पडते; आणि इंग्लिश कामगारांत त्यांच्या उपजत व्यवहारकुशलतेनें आणि सारासार विचारानें पडते. पुस्तकी ज्ञान म्हणजे मंत्र व व्यवहारज्ञान म्हणजे तंत्र यांत जो भेद आपण पूर्वीपासून मानीत आलों आहों तोच या दोघांत आपल्याला दिसतो. मंत्रपठणानें जितकें ज्ञान मिळणें शक्य आहे तितकें जर्मनपाशीं असतें; परंतु मंत्रांच्या पलीकडे जावयाचें झालें म्हणजे त्याला मोठी अडचण वाटूं लागते, आणि तंत्र साधावयाचें असेल तर प्रसंगविशेषीं मंत्र बाजूला गुंडाळून ठेवले पाहिजेत, हेंहि त्याच्या ध्यानांत पुरतेपणीं येत नाहीं. इंग्लिश मजुराला पुस्तकी विद्येचें महत्त्व अधिकाधिक कळूं लागेल तर चांगलें होईल; परंतु अशा प्रकारचें ज्ञान तिरस्करणीय आहे असें, दुसरें कोणी नाहीं, तर स्वतः त्याचा मालकच

त्याला शिकवीत असतो. ही गोष्ट आपण ध्यानांत घेतली म्हणजे, त्याच्या हातून सध्यांच्या इतकें काम होतें, व दुसऱ्याची मात्रा तो आपल्यापुढें चालू देत नाहीं, याचेंच आश्चर्य वाटतें. इंग्लिश कामगारांत व्यवहारज्ञान अगोदरच भरपूर आहे, त्यांत पुस्तकी ज्ञानाची त्यानें शहाणपणानें जर का भर घातली, तर साऱ्या दुनियेंत आपला हात कोणी धरील अशी भीति बाळगण्याचें त्याला कारणच राहणार नाहीं !

जर्मन कामगार जरी परावलंबी असला तरी तो मेहनती व कष्टाळू आहे. त्याच्या अंगांत चलाखी नाहीं; पण चांगलीं हत्यारें व सामानसुमान आणि त्याला लागेल तितका वेळ, इतकी त्याची सिद्धता करून दिली म्हणजे, त्याच्या हातून होणारें काम इतरांचे मानानें अधिक चांगलें असतें. सोशियालिझमच्या तत्त्वांची प्रगति व जनतेच्या मनावर बसलेली त्यांची छाप, हीं पाहून ज्यांची कल्पनाशक्ति बहकूं लागली आहे, व चोहोंकडे पिछेहाटीचें धोरण स्वीकारलें पाहिजे असें ज्या लोकांनां वाटूं लागलें आहे, त्यांनीं मात्र जर्मन मजुराचें काढलेलें चित्र फार हिडिस आहे. तें चित्र पाहून आपल्याला निःशंकपणें असें वाटावयाला लागतें कीं, जर्मन कामगाराच्या अंगांतील नैतिक समतोलपणा पार नाहींसा झाला आहे, वागणुकीची ठरीव तत्त्वें म्हणजे काय हें त्याला मुळींच माहीत नाहीं, व ज्यांच्यावर त्याचा चरितार्थ चालतो ते कारखाने व व्यापारधंदे ठार बुडवावे, हाच त्याचा कृतसंकल्प आहे ! हें चित्र वस्तुस्थितीचें निदर्शक आहे असें जर म्हणावें तर ज्या काळांत सोशियालिझमची प्रगति झाली त्याच काळांत सांपत्तिक प्रगतिहि झाली याचा मेळ कसा घालावयाचा ? दरएक मोठ्या शहरांत दृष्टीस पडणारे उत्तम इमारतकामाचे नमुने, औद्योगिक कलाकुसरीच्या कामांचीं प्रदर्शनें, प्रत्येक मोठ्या दुकानांतील विविध वस्तूंनीं भरलेलीं कपाटें, इतका पुरावा पाहिला म्हणजे कामगारांच्या अंगांत हल्लीं जास्त कौशल्य आलें

आहे व बारीकसारीक गोष्टींत देखील तो बराच काळजीपूर्वक काम करूं लागला आहे, असें अनुभवास आल्याशिवाय रहात नाहीं. भांडवल-वाले आणि मजूर यांमधील संबंध उभयतांनांहि त्रासदायक असेल, नाहीं असें नाहीं; परंतु एवढी गोष्ट निश्चित आहे कीं, गेल्या पस्तीस वर्षांपूर्वी औद्योगिक सुधारणेचा जो पाया दोघांनीं रचला तो बराच खोल आणि बळकट आहे, व त्यावर जी इमारत आतां उभारण्यांत आली आहे ती या आरंभींच्या उद्योगाला साजेल अशीच आहे यांत शंका नाहीं.

जर्मनींतील व्यापारधंद्याचीं शहरें पहावयाला इंग्लंडांतील जो माणूस जातो, त्यानें एखाद्या रस्त्यानें जाणारे किंवा कारखान्यांत काम करीत असलेले मजूर पाहिले म्हणजे, त्यांची ती नीटनेटकेपणाची ढब व ठाक-ठिकीची वागणूक अवलोकन करून त्याला मोठें आश्चर्य वाटतें, आणि आपल्या देशांतलि मजुरांत हा प्रकार कां पहावयास सांपडूं नये, असा तो आपल्या मनाशीं विचार करूं लागतो. विचार करतां करतां जर्मनींतील मजुरांनां त्यांच्या राहणीच्या मानानें चांगला पगार मिळतो, व त्यांचीं राहण्याचीं घरें अधिक चांगलीं असतात, हीं दोन कारणें त्याच्या डोळ्यांसमोर उभीं राहतात. परंतु या दोन कारणांमुळेंच जर्मन मजुरांत वर सांगितलेले गुण उत्पन्न होतात, हा कार्यकारणभाव त्याला व कोणालाहि नीटसा पटत नाहीं. मग हा परिणाम असावा तरी कशाचा? शाळेंत मिळणाऱ्या कडक शिक्षणाचा हा परिणाम नसेल ना? उद्योग-धंद्यांत शिरणाऱ्या जर्मन लोकांनां अगदीं लहानपणापासून तर असें शिक-वीत नसतील ना कीं प्रत्येक माणसानें आपलें शरीर व कपडे स्वच्छ ठेवावे व चारचौघांत दक्षतेनें आणि मर्यादेनें वागावें? आतां हे गुण विद्यार्थ्यांच्या अंगांत यावे याविषयीं त्यांच्या शाळेंतलि शिक्षक विशेष दक्षता ठेवीत असतात, हें खरें; तरी पुष्कळशीं शाळेंत जाणारीं मुलें

उघड्या पायांनीं मातींत व चिखलांत खेळतांना इतर शहरांत जशीं आढळतात तशीं जर्मनींतील शहरांत देखील आढळतात.

हें खरें आहे कीं, मजूरवर्गातील जर्मन मुलगा साधारणपणें मर्यादशील असून त्याच्या अंगांत उच्छृंखलपणा कमी असतो. जर्मन मुलगी देखील विनयशील असते व तिच्या वागणुकींत डामडौल नसतो. याच दर्जातील इंग्लिश मुलांमुलींत हे गुण प्रायः कमी प्रमाणानें असतात. "मुलांवर नजर ठेवावी, पण त्यांचें बोलणें ऐकूं नये" अशा अर्थाची जर्मनींत एक जुनी म्हण आहे, ती म्हण तेथील शाळांत नेहमीं प्रचारांत आणीत असतात व त्याचा वर सांगितलेला हा परिणाम असावा असें वाटतें. कौमार व तारुण्य या दोन अवस्थांमध्यें जो काळ असतो त्या काळांत शाळेंत प्राप्त झालेल्या हितकारी शिक्षणापैकीं बरेंचसें शिक्षण विसरून जाण्याचा संभव असतो. या दरम्यानच्या काळांत मुलाचा मर्द बनविण्याची जर्मनीची कृति, व इंग्लंडांतील तीच कृति, या दोहोंत फरक आहे. प्राथमिक शाळेंत मुलाच्या मनावर जे संस्कार झाले असतील ते बळकट होऊन पुढें चालू रहावे एतदर्थ कौमार आणि यौवन यांमधील आणीबाणीच्या काळांत जर्मनींत दोन प्रकारांनीं त्याला शिक्षा लावण्यांत येते. इंग्लंडांत अशा तऱ्हेची खबरदारी फारशी कोणी घेत नाहीं.

पहिली शिक्षा ही कीं, प्राथमिक शाळेंतील शिक्षण संपल्याबरोबर विद्यार्थ्यानें कन्टिन्युएशन शाळेंत जावें; व दुसरी ही कीं, लष्करांत त्यानें नोकरी करावी. प्राथमिक शाळेंतून विद्यार्थी वरच्या शाळेंत गेला म्हणजे साहजिकपणें त्याच्या मनाची वाढ सारखी चालू राहते, त्याच्या वर्तनावर दुसऱ्याची नजर राहते, आणि वाईट मार्गाला लागण्याची भीति उरत नाहीं. लष्करी शिक्षण मिळाल्यानें अंगांत व्यवस्थितपणा येतो. जर्मनींत प्रत्येक सुजाण व सुदृढ शरीराच्या तरुणाला दोन वर्षें

सैन्यांत राहून लष्करी शिक्षण संपादावें लागतें. परचक्रापासून राष्ट्राचें निवारण करण्याकरतां प्रत्येक मनुष्याला लष्करी शिक्षण देणें अवश्य आणि फायदेशीर आहे किंवा नाहीं, या प्रश्नाचा येथें आपल्याला विचार करावयाचा नाहीं. आपल्याला पहावयाचें आहे तें एवढेंच कीं, लष्करांत राहिल्यापासून मजुरांच्या अंगांत कांहीं चांगले गुण उत्पन्न होतात किंवा नाहीं? आणि या बाबतींत कोणाचा मतभेद असेल असें आम्हांला वाटत नाहीं. लष्करी शिक्षणानें मनुष्याच्या वर्तनाला शिस्त लागते व एका माणसाच्या हुकमतीखालीं राहून इतर लोकांबरोबर काम करण्याची अगांत संवय जडते. लष्करी शिक्षण पुरें करून एखादा माणूस कारखान्यांत नोकरीला राहिला म्हणजे तेथील नवीन तऱ्हेची यंत्रसामग्री व काम करण्याची पद्धति पाहून तो डगमगत नाहीं, त्याची बुद्धि सुसंस्कृत झाली असल्यानें नवीन परिस्थितीशीं तो तेव्हांच मिसळतो.

लष्करी शिक्षणानें मजुरांची नैतिक आणि शारीरिक उन्नति लष्करी खात्यामार्फत होते, तर इकडे कारखान्यांत शारीरिक स्वच्छता राखण्याची व्यवस्था केलेली असते. प्रत्येक कारखान्याला जोडून मजुरांकरतां स्नानगृहाची, व तोंड, हातपाय वगैरे धुण्याची सोय मालकानें करून दिली पाहिजे असा कायदा आहे. या स्नानगृहांत ऊन किंवा थंड, ज्याला जसें पाहिजे तसें, पाणी मिळतें. कांहीं ठिकाणीं " तुषारस्नाना " ची योजनाहि केलेली असते. यामुळें जर्मन कारखान्यांतून बाहेर पडणार मजूर घामट किंवा मळकट असा तुम्हांला कधीं दिसावयाचा नाहीं. कपड्यासंबंधानेंहि अशीच शिस्त आहे. कारखान्यांत आल्याबरोबर पहिले कपडे काढून तेथील पोषाख मजूर अंगावर चढवितात व त्याकरतां त्यांना कपाटें व पेट्या दिलेल्या असतात. कारखान्यांतून बाहेर पडणारा इसम आंघोळ केलेला नाहीं, किंवा कामाच्या वेळचेच कपडे अंगावर ठेवून चालला आहे, असें मोकदमानें पाहिल्याबरोबर तो त्याला परत

बोलावतो आणि आंघोळ घालून व कपडे बदलावयास लावून मग त्याला बाहेर घालवितो, इतकी स्वच्छतेच्या कामांत दक्षता ठेवलेली असते. आतांपर्यंत सांगितलेलीं हीं सर्व कारणें, म्हणजे शाळेंतील शिक्षण, बराकींतील व परेडीच्या जागेवरील शिस्त, स्वच्छपणा आणि टापटिपीची वागणूक यांनां मिळत असलेलें उत्तेजन, हीं एकवटलीं असतां, जर्मन मजूर चालतो चांगला, काम करतो चांगलें, आणि दिसतो चांगला, यांत नवल नाहीं; आणि हा चांगुलपणा समाजस्थितीनें नव्हे, तर शिक्षणानें प्राप्त होतो हें लक्षांत ठेवलें पाहिजे.

व्यवस्थितपणें आणि काटकसरीनें संसार चालविण्याच्या कामांत मजुराला त्याच्या बायकोकडून चांगली मदत होते. या नियमाला कांहीं अपवाद आहेत; परंतु एकंदरींत ही बायको गृहिणीपदाला सर्वस्वीं योग्य असते. नवऱ्याच्या पगाराची सर्व व्यवस्था तीच करते. थोड्या खर्चांत त्याला खाण्यापिण्याचे चांगले पदार्थ तयार करून घालावयाचे, पैशाचा हिशोब ठेवावयाचा, घराचें भाडें व इतर कर भरावयाचे, सारांश, नवऱ्याच्या छोट्या खजिन्याची स्वामिनी तीच असते, व स्वतः श्रम करून त्या खजिन्यांत आपली स्वतःची भर देखिल ती घालीत असते. आपल्या इकडील साधुसंतांच्या वचनांत व्यवहार व तत्त्वज्ञान भरलेलें असतें, यामुळें तीं वचनें मोठ्या अक्षरांनीं कागदावर लिहून ते कागद घरांतील भिंतींनां चिकटवावयाचे, अशी आपल्यांत चाल आहे. जर्मनींत सुद्धां अशा तऱ्हेचीं साधुसंतांचीं वचनें पुष्कळ आहेत, व त्यांचा वरीलप्रमाणें उपयोग करण्याची तिकडे वहिवाट आहे; आणि तिला अनुसरून मजुरांच्या घरांत भिंतीवर किंवा टेबल-क्लाथवर अथवा खिडक्यांनां लावण्याच्या पडद्यांवर अशीं वचनें चिकटविलेलीं जागोजाग आपल्या नजरेस पडतात.

जर्मन मजुराला ऐषआराम आवडतो, पण तो बेताचा पाहिजे. चैन

करावयाची झाली तर तो आहाराबाहेर कधीं जाणार नाहीं, व जी थोडी करावयाची असेल ती मग कण्हत कुंथत करणार नाहीं. आठवड्यापैकीं सहा दिवस, रोज नऊ दहा व केव्हां केव्हां अकरा तासांप्रमाणें त्याला खपावें लागतें. रविवाराशिवाय हक्काची दुसरी सुट्टी त्याला नाहीं, यामुळें हा दिवस तो मौजेंत व करमणुकींत घालवितो. त्या दिवशीं मजूरवर्ग तुम्हांला देवळांत दिसावयाचा नाहीं; उन्हाळ्याचा दिवस असला तर, एखाद्या बागेंत किंवा जंगलांत, आणि इतर ऋतूंत, उपहारगृहांत दिसेल. मोठ्या शहरांनां या दोन्ही तऱ्हेच्या सोई पुष्कळ असतात. मध्यम स्थितींतील लोक आपलीं सगळीं बायकामुलें घेऊन जसे वनभोजनाला जातात तसे हे लोकहि जातात. सदा सर्वदा श्रम करावे लागल्यानें ज्याच्या हाताला घट्टे पडले आहेत असा तो मुख्य मालक, रविवारीं दुपारीं आपल्या बायकामुलांच्या संगतींत, आनंदानें काळ घालवितांनां पाहिला म्हणजे कोणालाहि मौज वाटल्यावांचून रहात नाहीं. हा प्रकार पाहून असें वाटतें कीं, जर्मनींत अलीकडच्या काळांत कुटुंबांतील माणसांत परस्परांमधील बंधनें शिथिल पाडणारीं अनेक कारणें जरी अस्तित्वांत आलीं आहेत, तरी जर्मन मजुराचें गृहसौख्य म्हणून जें कांहीं आहे तें अजून अबाधित आहे व त्याचा तो आपल्या इच्छेप्रमाणें अनुभव घेत असतो. जर्मन मजुराचे करमणुकीचे जे अनेक मार्ग आहेत त्यांतच, कांहींएक करावयाचें नाहीं, स्वस्थ बसून रहावयाचें, हा एक मार्ग आहे. असें स्वस्थ बसून करमणूक ती काय होणार याची कल्पना इंग्लिश मजुराला त्याच्या त्या चळवळया स्वभावानें मुळींच करतां येत नाहीं. उदाहरणार्थ, एखादा जर्मन मजूर तोंडांत चिरूट धरून व शून्य आकाशाकडे दृष्टि लावून तासनतास एखाद्या बाकावर किंवा गवताळ जागेवर बसून घालवील, व आपल्या मनाची त्यांतच करमणूक करून घेईल. पण हें इंग्लिश मजुराच्या हातून होणार नाहीं. आतां कित्येक लोक

असें म्हणतील कीं, जर्मन मजूर स्वभावानें मद्दड आणि म्हणून तोंडांत माशा जाईपर्यंत स्वस्थ बसण्याचें त्याला कांहीं वाटत नाहीं; परंतु हें म्हणणें रास्त आहे असें आम्हांला वाटत नाहीं. उलट आमचें मत असें आहे कीं, या गोष्टीवरून जर्मन स्वभावाचा साधेपणा, मर्यादित सुखापेक्षा आणि अल्पसंतुष्टता, जगाच्या निदर्शनास चांगल्या प्रकारानें येते.

मोठ्या शहरांत ठरीव मुदतीला, बहुतकरून रविवारीं दुपारीं, शर्यती होत असतात. परंतु मजूर लोक या शर्यतींच्या भानगडींत पडत नाहींत व त्यामुळें जुगार किंवा सट्टेबाजी यांच्या मोहजालांत ते सांपडत नाहींत. तथापि त्यांच्या देशांत सोडती बऱ्याच आहेत आणि सोडतीचीं तिकीटें विकत घेऊन आपली ललाटरेषा उमटते किंवा नाहीं, हें पाहण्याचा मोह त्यांनां आवरत नाहीं. स्वत: मजुरांची गोष्ट बोलावयालाच नको, पण त्यांचीं बायकामुलें देखील सोडतींच्या नादीं लागून आपल्या निढळच्या घामानें मिळविलेल्या पैशाचा असद्व्यय करतात. सोशियालिस्ट पत्रांत सोडतीची बातमी खेचून भरलेली असते. हींच पत्रें मजुरांच्या हातांत पडतात, यावरून सोडतवाल्यांचे आश्रयदाते मजूर मंडळींत पुष्कळ असतात, असें अनुमान काढलें तर तें चुकीचें होणार नाहीं.

मजुरांनां आपल्या ऐपतीच्या मानानें सुखांत राहतां यावें, व त्यांच्या आरोग्याची चांगली काळजी घेतली जावी, याकरतां जर्मन सरकारनें कांहीं कायदे केले आहेत. या कायद्यांत प्रमुख स्थान इन्शुअरन्स कायद्यांनां दिलें पाहिजे. एखाद्या मजुराला कांहीं अपघात झाला किंवा तो आजारी पडला तर त्यांतून तो बरा होईपर्यंत, या कायद्याअन्वयें, घरा किंवा दवाखान्यांत, त्याच्या औषधपाण्याची व्यवस्था होते व याबद्दल त्याला पदरचा पैसा खर्च करावा लागत नाहीं. त्याचप्रमाणें म्हातारपणीं किंवा हातापायांत कांहीं व्यंग उत्पन्न झालें तर, पेन्शन मिळण्याची व्यवस्था केलेली असते. आपले हातपाय चालतात तोंपर्यंत ठीक

आहे; परंतु एखादे वेळेस अपघातानें मरण आलें किंवा हातपाय तुटला तर आपल्या मागें पोरांबाळांचे हाल होतील, त्यांनां कोणी पोशिंदा नसल्यानें अन्नावांचून तीं उपाशीं मरतील, हा विचार मजुराच्या मनाला रात्रंदिवस त्रास द्यावयाचा; परंतु वरील व्यवस्था अमलांत आल्यानें त्याच्या मागचा हा त्रास चुकला आहे, व पोरेंबाळें उपाशीं मरण्याची भीति त्याला राहिलेली नाहीं. इन्शुअरन्स कायद्याबद्दल देखील सोशियालिस्ट पत्रांत हाकाटी चाललेली असते. पण ती किरकोळ बाबींपुरती असते; तत्त्वांसंबंधानें कोणाचा मतभेद नाहीं. उलट हे कायदे केल्याबद्दल सरकाराविषयीं कृतज्ञताबुद्धि मजूरवर्गांत वास करीत आहे. इतर कोणचेहि कायदे रद्द झाले तरी त्याला त्यांची हरकत नाहीं; परंतु इन्शुअरन्स कायद्यांनां जर कोणी हात लावूं लागला तर तो त्यांनां मुळींच खपणार नाहीं.

मजुरांवर केवळ उपकार करण्याच्या बुद्धीनें हे कायदे पास केले आहेत असें कांहीं लोकांचें म्हणणें आहे. तथापि वस्तुस्थिति अशी आहे कीं, या कायद्यांच्या योगानें पैशाचा बराचसा बोजा मालकांच्याऐवजीं मजुरांवर बसतो. आतां मजूर हा बोजा मुकाट्यानें सहन करतात व जी कांहीं वर्गणी अवश्य द्यावी लागते ती ते निमूटपणें देतात, ही गोष्ट स्वतंत्र आहे. अशा स्थितींत मालकाची परोपकारबुद्धि कशी व्यक्त होते कोणास ठाऊक? अपघाताच्या विम्याची सर्व रक्कम मालकाच्या अंगावर पडते हें स्वाभाविकच आहे. आजारीपणाच्या रकमेपैकीं $\frac{2}{3}$ रक्कम मजुरांनां द्यावी लागते, बाकीची $\frac{1}{3}$ मालक देतो. अशक्तता व वार्धक्य यांच्या विम्यांत दोघांचा निम्मा निम्मा हिस्सा असतो. शिवाय प्रत्येक पेन्शनामागें दरसाल २ पौंड १० शिलिंग सरकारी खजिन्यांतून मिळतात. इन्शुअरन्स कायद्यांनीं मालकांनां पैशाची जास्त तोशीस लागते हें उघड दिसतेंच आहे; परंतु आपल्यावरचें संकट त्यांनां गिऱ्हाइकांच्या

अंगावर लोटून देण्याची सवड असल्यानें, त्यांचें एकंदरींत कांहीं नुकसान होत नाहीं. उलट एका प्रकारानें त्यांचा नफाच होतो. विमे उतरले असल्यानें मजुरांच्या मागची जिकीर नाहींशी होते व त्यामुळें प्रसन्न मनानें ते चांगलें काम करतात, व यायोगानें अर्थातच मालकाचा अप्रत्यक्ष फायदा होतो.

मजुरांच्या शारीरिक उन्नतीबरोबर मानसिक उन्नतिहि झाली पाहिजे, हें तत्त्व त्यांच्या पुढाऱ्यांच्या मनांत चांगलें बिंबलें असल्यामुळें बर्लिन, लिप्झिग्, हॅम्बुर्ग, डुसेल डॉर्फ व म्यूनिचसारख्या मोठमोठ्या शहरांत मजुरांनां रात्रीं शिक्षण देण्याच्या शाळा निघाल्या आहेत. या शाळा लोकांनींच चालविलेल्या आहेत, सरकारांतून त्यांनां मदत मिळत नाहीं. शाळांतील वर्ग रात्रीं नऊ ते साडेदहा किंवा अकरा वाजेपर्यंत असतात. शिक्षण देण्याचें काम सोशियालिस्ट प्रोफेसरांकडे असतें. यांची विषयप्रतिपादनाची शैली एककल्ली असते, यामुळें विद्यार्थ्यांनां खरें ज्ञान प्राप्त होत नाहीं; तरी पण निरनिराळे सामाजिक, राजकीय व औद्योगिक विषय व्याख्यानाच्या रूपानें त्यांच्या कानांवरून जातात, हा फायदा लहानसहान नाहीं. पार्लमेंटांतील मजुरांचे सभासद, ट्रेड-यूनियनमधील पुढारी, वर्तमानपत्रकार, ग्रंथकर्ते, शाळामास्तर हे सर्व लोक आपल्याला सवड सांपडेल त्या बेतानें रात्रीच्या शाळांत शिक्षणाच्या कामांत मदत करीत असतात. बर्लिन येथें मजुरांकरतां जीं व्याख्यानें होतात, त्यांनां बायकामुलांची देखील अतोनात गर्दी होते. असें व्याख्यान होणार असल्याची बातमी लागली कीं पुरे, मग लोकांनां जेवणखाण देखील सुचत नाहीं. कसे तरी चार गोळे मारले कीं निघाले बायकामुलांनां घेऊन व्याख्यानाला ! व्याख्यानाचे विषय गहन असतात; परंतु सोप्या भाषेंत त्यांचें विवेचन होत असल्यामुळें लोक तीं मोठ्या उत्सुकतेनें ऐकतात.

मजुरांचें ज्ञान वाढविण्याच्या कामांत इतर लोकांची त्यांच्याशीं जशी सहानुभूति आहे, तशी सरकारी अधिकाऱ्यांची नाहीं. थोडे दिवसांपूर्वी सोशियालिस्ट पक्षाच्या कांहीं प्रमुख गृहस्थांनीं पोट्सडॅम येथें न्यायतत्त्वशास्त्रावर ( Jurisprudence ) व्याख्यानें देण्याचें ठरविलें, आणि त्याप्रमाणें वर्तमानपत्रांत जाहीर नोटिसा दिल्या. परंतु अधिकाऱ्यांनीं एक जुना कायदा शोधून काढला आणि त्या कायद्याच्या आधारावर ह्या व्याख्यानांनां मनाई केली. त्याचप्रमाणें चार्लोटेन्बर्ग येथें बालोद्यान-शिक्षणपद्धतीसंबंधानें व्याख्यानें होणार होतीं तीं देखील तेथील पोलीस अधिकाऱ्यांनीं बंद पाडलीं.

शिक्षणाप्रमाणें करमणुकीच्या बाबतींत सुद्धां मजूर लोक आपल्याकरतां खास योजना करूं लागले आहेत. बहुतेक सर्व शहरांत त्यांचीं नाटकगृहें, गायनाचे व वादनाचे समाज आणि तालमीचे व खेळाचे आखाडे आहेत. बर्लिनमध्यें "फ्री पीपल्स स्टेज" ( Free People's Stage ) म्हणून एक नाटकगृह आहे. तेथें थोड्या पैशांत वरिष्ठ प्रतीचीं नाटकें पहावयास सांपडतात. जर्मनींतील जुन्या व नव्या नाटककारांचीं नाटकें तेथें बहुतकरून नेहमीं होतात. राजकीय, सामाजिक आणि ऐतिहासिक विषयांवरील नाटकें लोकांनां विशेष आवडतात. शेक्सपियर व इतर इंग्लिश व परदेशीय नाटककार यांचींहि नाटकें मधुनमधुन होतात. गायनाचे जलसे आणि चित्रांचीं प्रदर्शनें यांनां त्यांचा बराच उदार आश्रय असतो. मोठे लोक तेवढी मजा मारतात, लहान मुलांची त्यांना आठवण देखील होत नाहीं, असा कोणी आक्षेप काढूं म्हणेल तर त्याला तसें करण्याला अवसर ठेवलेला नसतो. तालमीच्या आखाड्यांमार्फत दर रविवारीं मुलांच्या खेळण्याची व्यवस्था ठेवण्यांत येते. करमणुकीच्या कामांत देखील आपला पक्ष व त्या पक्षांतील लोकांचें कल्याण साधण्याची पक्षपातित्वाची बुद्धि दिसून येते हें खरें; पण त्या-

पासून करमणुकीच्या द्वारें ज्ञानप्राप्ति होण्याच्या कामांत व्यत्यय येत नाहीं

गेल्या दहापंधरा वर्षांत मितपानाची चळवळ मजुरांनीं सुरू केली आहे, व ती देखील खास आपल्या लोकांच्या हिताकरितांच त्यांनी सुरू केली आहे. ही चळवळ सुरू झाल्याला फार वर्षें झालीं नाहींत, तरी तिचा प्रसार सर्व देशभर झाला आहे. मितपानाचा प्रश्न सापेक्ष आहे. मितपानाचा अर्थ आणि त्याचें महत्त्व प्रत्येक देशांत निरनिराळें आहे. उदाहरणार्थ, इंग्लंड आणि जर्मनी हे दोन देश प्रत्येक बाबतींत एकमेकांपासून भिन्न आहेत; आणि यामुळें या प्रश्नाचा विचार त्या त्या देशापुरता भिन्न केला पाहिजे. खुद्द जर्मनींत देखील या विषयावर एखादा ठाम सिद्धान्त करतां येत नाहीं. कारण, त्या देशांत निरनिराळ्या प्रकारचें हवामान आहे, जमिनीच्या लागवडीचे प्रकार भिन्न आहेत, लोकांच्या जातीहि वेगवेगळ्या आहेत. खरा जर्मन जेवढा आहे तेवढा बीरचा ( Beer ) भोक्ता असतो; बाकीचे लोक निरनिराळ्या प्रकारची दारू पितात. जर्मन आणि इंग्लिशमन यांत जो मुख्य फरक आहे तो हा कीं, बीर हा मनुष्याला अवश्य खावा लागणारा पदार्थ आहे असें जर्मन समजतो, व इंग्लिशमन म्हणतो कीं तो एक चैनीचा पदार्थ आहे. इंग्लंडांत जसा चहा किंवा काफी तशी जर्मनींत बीर. " गरीब मनुष्याची बीर " ( Poor man's beer ) असें म्हणण्याचा तेथें प्रघात पडला आहे व त्यांत जर्मनांच्या दृष्टीनें मोठा अर्थ भरला आहे. तो हा कीं, कोणाहि माणसाचा संसार बीरशिवाय चालावयाचा नाहीं आणि याचकरतां या दारूवर जर्मनींत कर नाहीं. बीरवर जर्मनींत कर नाहीं असें ऐकलें म्हणजे इंग्लिशांना आश्चर्य वाटतें; परंतु त्यांतील वर सांगितलेलें रहस्य समजून घेतलें म्हणजे इतकें आश्चर्य वाटणार नाहीं.

याप्रमाणें जर्मन लोक जरी बीर पिणारे आहेत, तरी त्या कामांत ते अतिरेक करीत नाहींत. जर्मनींतील बीर दारूंत ऑल्कहोल म्हणजे मा-

दक पदार्थांचें प्रमाण शेंकडा २ असतें व इंग्लिश बीरमध्यें शेंकडा ५ असतें. जर्मन बीरचा मादकपणा जरी इतका कमी आहे तरी ती प्याल्या-पासून व्यक्तिश: पिणाऱ्याचें, व तो ज्या समाजाचा घटकावयव आहे त्या समाजाचें, फार नुकसान होतें, ही भावना मजूरवर्गांत दिवसानु-दिवस जास्त उत्पन्न होऊं लागली आहे. मितपानाची चळवळ प्रथम सोशियालिस्टांनीं सुरू केली. मजूर लोक पुढें कांहीं काळानें तींत सामील झाले व आतां तर ती देशाच्या सर्व भागांत पसरली आहे. ही चळवळ लोकांनीं आपण होऊन सुरू केली आहे व तिची व्याप्ति एका विशिष्ट वर्गापुरती आहे, ही गोष्ट विशेष ध्यानांत घेण्याजोगी आहे. इंग्लंडमध्यें या कामाची एक सोसायटी आहे, तिच्या आश्रयाखालीं काम करणारे अनेक लोक आहेत; परंतु जर्मनींत अशा प्रकारचा थाट आपल्याला मुळींच दिसावयाचा नाहीं. तिऱ्हाइतानें कानमंत्र सांगितला, किंवा कांहीं उत्तेजन दिलें, म्हणून ही चळवळ सुरू झाली अशांतील भाग तेथें नाहीं. मितपानाची सुधारणा घडवून आणणाऱ्या लोकांच्या सभा भरल्या म्हणजे त्या सभांत भाषणें करावयाला कोणी धर्मोपदेशक किंवा नीतिशास्त्रवेत्ते किंवा समाजांतील इतर धेंडें यावीं लागत नाहींत. श्रोते जसे मजूर तसे वक्तेहि मजूरच, सर्व व्यवस्था त्यांच्या त्यांच्यांतच होते. दारू पिणें वाईट आहे, त्यापासून समाजाची नीति बिघडते, दारू पिणारा माणूस मनुष्यत्वाला मुकतो, वगैरे नीतीच्या लांब गप्पा हे लोक सांगत बसत नाहींत. दारूच्या व्यसनानें शरीराची हानि होते, पैसा विनाकारण खर्च होतो, आणि यायोगानें समाजाचें नुकसान होतें. याकरतां ते असें म्हणतात कीं, दारूचें व्यसन अजीबात नाहींसें झालें तर फारच चांगलें; परंतु तें जर शक्य नसेल तर निदान तें पुष्कळ कमी तरी केलें पाहिजे. त्यापासून प्रत्येक व्यक्तीचा व त्याबरोबर सर्व समाजाचा फायदा होण्याचा संभव आहे. या सांपत्तिक फायद्याकडे केवळ लक्ष

देऊन त्यांनीं ती चळवळ चालू ठेविली आहे, नैतिक प्रश्नांचा त्यांत कांहीं संबंध नाहीं.

ही चळवळ सुरू होण्यापूर्वी, म्हणजे बीरचा चोहोंकडे अम्मल चालू असल्या वेळीं, ज्यांनीं जर्मनीची स्थिति पाहिली असेल त्यांनां तिच्यापासून किती चांगला परिणाम झाला आहे, हें तेव्हांच ध्यानांत येईल. मितपानाचें महत्त्व जाणणारा एक इसम देखील दहापंधरा वर्षांपूर्वी तुम्हांला त्या देशांत आढळला नसता; परंतु आज पहावें तों चोहोंकडे निरनिराळ्या समाजांत हे लोक संचार करीत असलेले दिसतात. ट्रेड यूनियनच्या सभागृहांतून मादक द्रव्याची हाकालपट्टी झाली आहे. बर्लिन येथील गवंडी अट्टल दारूबाज अशी पूर्वी ख्याति होती, परंतु आतां पहावें तर कामाला जातेवेळीं आपल्याबरोबर ते निरुपद्रवी दुधाच्या बाटल्या नेतात. परवाना घेतलेल्या दुकानांत, उपहारगृहांत व इतर ठिकाणीं दारूच्या ऐवजीं चहा, काफी, दूध व अशाच प्रकारचीं सात्विक पेयें मिळण्याची व्यवस्था सररहा सुरू झाली आहे. १८९९ ते १९०५ अखेर बीरचा खप किती झाला हें दाखविणारे आंकडे प्रसिद्ध झाले आहेत, त्यांवरून दिवसानुदिवस या दारूचा खप कमी होत चालला आहे हें स्पष्टपणें दिसून येतें.

निरनिराळीं सरकारें आणि सरकारी कामगार, मजुरांनीं बीरचा त्याग करावा, याविषयीं त्यांनां उत्तेजन देत आहेत. बव्हेरिया प्रांत म्हणजे बीरची जन्मभूमि! परंतु तेथील सरकार देखील या कामांत मनापासून मदत करीत आहे, ही आश्चर्याची गोष्ट आहे. रेल्वे, गोद्या, कालवे बांधण्याचीं कामें सरकारामार्फत चालू असतात; तेव्हां आपल्या दुकानांत मादक दारू विकावयाला ठेवूं नये, असा कामाच्या जागीं दुकानें घालणारांनां सक्त हुकूम असतो. कारखाने तपासणाऱ्या अम्मलदारांनीं कारखानदारांनां या गोष्टीचें महत्त्व नीट समजावून द्यावें अशी योजना

केलेली असते. सरकारी वर्कशापांत बीरच्या ऐवजीं काफी, चहा, दूध व खनिजोदकें ( Mineral waters ) मिळण्याची व्यवस्था केली आहे. बीर गाळणाऱ्या भट्ट्यांत काम करणाऱ्या मजुरांनां फुकट बीर पाजण्याची पूर्वीं वहिवाट होती तीहि आतां बंद झाली आहे. सारांश, बीरविरुद्ध सुरू केलेली मोहीम बरीच यशस्वी होत चालली आहे.

मितपानाच्या चळवळीचा आरंभ सोशियालिस्ट लोकांत झाला हें मागें सांगितलेंच आहे. तथापि त्या पक्षांतील सर्वच लोक आरंभीं या चळवळीला अनुकूल नव्हते, कित्येक तर उलट तिची चेष्टा करणारे होते. परंतु तिच्या उत्पादकांनीं या चेष्टेकडे लक्ष न देतां, वर्तमानपत्रें, मासिकपुस्तकें, हस्तपत्रकें आणि व्याख्यानें यांच्या द्वारें लोकमत जागृत करण्याचा मनापासून यत्न चालविला. हळूहळू या यत्नांनां यश येत चाललें व सोशियालिस्ट पक्षांतील प्रमुख व नामांकित माणसें या चळवळींत सामील होऊं लागलीं. १९०७ सालीं एसन या शहरांत या पक्षाची जी एक कांग्रेस भरली, त्या कांग्रेसनें या चळवळीला जणूं काय चिरंजीवित्वाचा आशीर्वादच दिला, व तेव्हांपासून मद्यपाननिषेध हा विषय सोशियालिस्टांनीं आपलासा केला. भांडवलवाल्या लोकांच्या तापांतून मजुरांनां कायमचें सोडवावयाचें या उद्देशानें त्यांनीं जे अनेक उद्योग आरंभिले आहेत, त्या सर्वांत मद्यपाननिषेधाला त्यांनीं हल्लीं बरेंच वरचें स्थान दिलें आहे.

या विषयाचें जरा विस्तारपूर्वक विवेचन केलें, याचीं दोन कारणें आहेत. मजुरीवर निर्वाह करणारे जेवढे लोक आहेत तेवढ्यांचा एक स्वतंत्र वर्ग तयार झाला पाहिजे ही जाणीव आपल्या लोकांत उत्पन्न करावयाची, आणि सर्व लोक एकदिलानें वागावयाला तयार झाले म्हणजे लोकांच्या मदतीची अपेक्षा न बाळगतां 'उद्धरेदात्मनात्मानं' या तत्त्वावर स्वावलंबनाच्या मार्गानें आपली स्थिति सुधारावयाची, या भावनेनें

मद्यपाननिषेधाचा प्रश्न मजुरांनीं आपल्या हातांत घेतला आहे, हें वाचकांच्या लक्षांत आणावें, हें एक कारण; व दुसरें हें कीं, या विषयाला जी एक सांपत्तिक बाजू आहे ती त्यांच्यापुढें मांडावी. ती बाजू अशी: मजुरवर्गापैकीं पुष्कळांची अशी पक्की खात्री झाली आहे कीं, मितपानाच्या योगानें उद्योगधंद्यांत आपल्याला जास्ती यश येईल व समाजांतील माणसें या नात्यानेंहि आपल्याला अधिक मान्यता मिळेल. दारू पिण्याच्या व्यसनाला आळा घालावयाला हे लोक जे तयार झाले आहेत, ते, त्यांनां कामधंदा देणाऱ्या लोकांवर त्यांचें प्रेम आहे म्हणून, किंवा आपल्या वांट्याला मजुरी करण्याचें जें काम आलें आहे तें आपण बिनबोभाट करावें म्हणून, तयार झालेले नाहींत. स्वार्थ व आपल्या विवक्षित वर्गाची सांपत्तिक उन्नति या दोन गोष्टी मुख्यत्वेंकरून या खटपटीच्या मुळाशीं आहेत. या खटपटीला जसजसें यश येत जाईल तसतसा कारखानदारांनां अनायासें जास्त फायदा मिळेल. कारण, दारूच्या व्यसनांतून मुक्त झालेले मजूर अधिक कार्यक्षम होतील; आणि म्हणून व्यापारांत जर्मनीबरोबर चढाओढ करणारीं जीं राष्ट्रें आहेत तीं, मितपानाच्या चळवळीचा मूळ हेतु काय आहे इकडे लक्ष्य न देतां, मुख्यत्वेंकरून तिचा एकंदर जर्मन व्यापारावर पुढें काय परिणाम होतो याकडे लक्ष्य लावून बसलीं आहेत. परंतु ही गोष्ट कालावधीनें साध्य व्हावयाची आहे, आज त्यासंबंधानें एखादें निश्चयात्मक विधान करणें धाडसाचें आहे.

प्रकरण १० वें

# सिंडिकेटें* अथवा कारखानदारांचे संघ

बर्लिन येथें असलेल्या आस्ट्रियाच्या कान्सलनें (वकिलानें) १९०६ सालीं आपल्या सरकारला एक पत्र लिहिलें, त्यांत पुढें लिहल्याप्रमाणें मजकूर होता:—" जर्मनीची सांपत्तिक स्थिति हल्लीं मूठभर, म्हणजे फार झालें तर पन्नास, माणसांच्या मर्जीवर जशी सर्वस्वीं अवलंबून आहे तशी पूर्वीं कधींहि नव्हती. औद्योगिक प्रगतीला कोणच्याहि तऱ्हेचा प्रतिबंध करणें इष्ट नाहीं, तिची ती होईल तशी होऊं द्यावी, हें पूर्वीचें तत्त्व १९०६ सालांत जितकें मागें पडलें आहे तितकें पूर्वीं कधीं पडलें नव्हतें. मोठमोठ्या बँका, औद्योगिक कारखाने व व्यापारांचे संघ यांतील प्रमुख माणसांच्या इच्छेनुरूप मालाची पैदास, परदेशांतील विक्री, मालाच्या किंमती, उधारीवर माल देणें, नवीन भांडवल उभारणें, मजुरांचा पगार व व्यापाराचा दर ठरविणें, या गोष्टी हल्लीं ठरूं लागल्या आहेत. ज्या उद्योगधंद्यांत व्यापाऱ्यांनीं संघ बनविले आहेत त्यांत किफायत जास्त होते, यामुळें जर्मनीच्या औद्योगिक सुधारणेबरोबर ज्यांचे खिसे जड झाले आहेत असे जर कोणी लोक असतील तर ते संघांत सामील झालेले व्यापारी होत."

कारखानदारांचे संघ म्हणजे सिंडिकेटें स्थापन करण्याचा जर्मनींत हल्लीं जो उद्योग चालू आहे त्याकडे परदेशांतील लोकांचें लक्ष्य कसें वेधूं लागलें आहे हें वरील अवतरणावरून स्पष्ट दिसण्याजोगें आहे. उद्योग-

---

* यालाच जर्मन भाषेंत कार्टेल (cartell) असाहि दुसरा एक शब्द आहे. 'कार्टेल' व 'सिंडिकेट' यांत थोडासा फरक आहे; पण तो विशेष लक्ष्यांत घेण्याजोगा नाहीं. प्रस्तुत पुस्तकांत, मूळ ग्रंथाप्रमाणेंच, हे दोन्ही शब्द समानार्थीं वापरले आहेत.

धंद्यांत जसा सिंडिकेटांचा प्रसार होत आहे, तसा तो भांडवलाच्या बाबतींतहि होत आहे, हें वरील लेखांत लेखकानें जें ध्वनित केलें आहे तें पूर्णपणें खरें आहे. प्रांतोप्रांतीं ज्या बँका होत्या त्या बर्लिन येथें असणाऱ्या मोठ्या बँकांत सामील झाल्या आहेत. बर्लिनच्या या बँकांनीं पुनः आपआपसांत कट केले आहेत. यामुळें पैशाची जी कांहीं व्यापाराकरतां उलाढाल होते ती केवळ पांचसहा बँकांच्या मार्फतच होते. यांपैकीं तीन बँकांचें भांडवल प्रत्येकीं दोन कोटी पौंडांचें आहे. समुद्रावरून परदेशांशीं जर्मनीचा जो व्यापार चालतो त्या व्यापाराला लागणाऱ्या पैशाचा पुरवठा या बँकांकडून होतो. शिवाय निरनिराळ्या उद्योगधंद्यांत सिंडिकेटें स्थापन करण्याचा जो क्रम सर्व देशांत हल्लीं झपाट्यानें सुरू आहे त्याला लागेल तितकें द्रव्यसाहाय्य करण्यालाहि त्या एका पायावर तयार असतात.

औद्योगिक संघ बनविण्याचा प्रघात जर्मनींत अलीकडेच सुरू झाला आहे असें नाहीं. एका इतिहासकाराचें असें म्हणणें आहे कीं, १८३६ सालीं एक सिंडिकेट होतें असा दाखला सांपडतो. या सालापासून पुढें सत्तर वर्षांच्या अवधींत म्हणजे १९०६ अखेर सिंडिकेटांची संख्या चारशें जवळ जवळ येऊन भिडली. यावरून परदेशांत रवाना होणाऱ्या मालाचे बहुतेक सर्व धंदे कांहीं पूर्णपणें व कांहीं अंशतः सिंडिकेटच्या कक्षेंत आले आहेत असें म्हटलें तर अतिशयोक्तीचें होणार नाहीं. निदान एवढें तरी निश्चयानें सांगतां येईल कीं, निरनिराळे उद्योगधंदे एका केंद्रांत आणून जोडण्याचा जो उपक्रम सध्यां चालू आहे तो व्यापारधंद्यांतील विशेष महत्त्वाचा माल उत्पन्न करणाऱ्या कारखान्यांपुरता तरी चांगला यशस्वी झाला आहे.

संरक्षक कायदे पास झाल्यानें सिंडिकेटें स्थापन करण्याला कितपत उत्तेजन मिळालें याबद्दल खुद्द जर्मनींत बराच मतभेद आहे. हे

कायदे १८७९ सालीं अमलांत आले; पण त्यापूर्वीं देखील सिंडिकेटें होतीं. यावरून आयात मालावर जकाती बसविल्यापासून त्यांची उत्पत्ति होते असें म्हणतां येणार नाहीं. संरक्षणाखेरीज औद्योगिक संघांनां परिपोषक अशा निरनिराळ्या अवस्था आहेत व त्या त्या अवस्थांत संघांचें कार्य पूर्णपणें यशस्वी होतें.—उदाहरणार्थ, ( अ ) कच्चा माल व्हावा तितका उत्पन्न न झाल्यानें, अथवा तो उत्पन्न करणाऱ्या माणसांची संख्या अल्प असल्यानें त्यांचा व्यापार थोड्या लोकांच्याच मर्जीप्रमाणें चालणें; ( ब ) कारखान्यांत अर्धामुर्धा किंवा पक्का तयार होणाऱ्या मालाचा व्यापार स्वाभाविकरीत्या मूठभर लोकांच्या हातांत राहणें; ( क ) बाजारांत पाठविण्याचा माल कोणच्या प्रकारचा असावा, तो किती तयार करावा, तो पराठिकाणीं कसा रवाना करावा, वगैरे बाबतींत स्थानिक संघ निर्माण करण्याला अनुकूल परिस्थिति असणें; आणि अशाच तऱ्हेचीं आणखी कांहीं उदाहरणें देतां येण्याजोगीं आहेत. ज्या उद्योगधंद्यांत हल्लीं सिंडिकेटें स्थापन झालीं आहेत त्यांनां वर सांगितलेल्या अवस्था कारणीभूत झाल्या आहेत.

१८७९ सालीं संरक्षक कायदे पास झाले हें वर सांगितलें आहेच. त्या कायद्यांचा अंमल सुरू झाल्या अवधींतच सिंडिकेटांची संख्याहि वाढली, ही गोष्ट मात्र येथें लक्षांत घेतली पाहिजे, आणि ती तशी घेतली म्हणजे साहजिकपणेंच असें अनुमान निघतें कीं, संरक्षण हें सिंडिकेटांचें आदिकारण कदाचित् नसेल; परंतु त्यामुळें तीं स्थापन होण्याला अनुकूल अशी परिस्थिति उत्पन्न झाली, आणि त्याच्या अभावीं सिंडिकेटांचा सध्यां जितका पसारा वाढला आहे तितका तो वाढला नसता. आम्हीं काढलेलें हें अनुमान चुकीचें नाहीं, असें दाखविणारे अनेक आधार जर्मन ग्रंथकारांच्या ग्रंथांतून देतां येण्याजोगे आहेत; परंतु विस्तारभयास्तव ते आम्ही येथें नमूद करीत नाहीं.

आतां आपण एवढें जरी गृहीत धरून चाललों कीं, संरक्षण हें सिंडिकेटांचें प्रत्यक्ष नव्हे पण आनुषंगिक कारण आहे, तरी तेवढ्यावरून आपल्याला असें अनुमान काढतां येणार नाहीं कीं, संरक्षक कायदे जरा ढिले केले तर त्यामुळें औद्योगिक संघ बनविण्याची व्यापाऱ्यांची प्रवृत्ति कमी होईल. प्रत्यक्ष उदाहरणें देऊन आपल्याला असं सिद्ध करून दाखवितां येईल कीं, कांहीं धंद्यांतील सिंडिकेटांवर परदेशच्या व्यापारी चढाओढीचा काडीइतका देखील परिणाम होण्याचा संभव नाहीं, आणि यामुळें या धंद्यापुरत्या तरी संरक्षक जकाती ठेवल्या किंवा न ठेवल्या तरी सारखेंच आहे. देशांतील भांडवल चोहोंकडे पांगलेलें न राहतां मर्यादित जागेंत तें यावें, तसेंच देशांतील उद्योगधंदे कांहीं विवक्षित लोकांच्या नजरेखालीं असावे, असें तत्पक्षपाती लोकांचें म्हणणें आहे. याच्या उलट कित्येक सोशियालिस्ट ग्रंथकारांच्या मतानें ही प्रवृत्ति बळावत जाण्याला मुख्य कारण धनिक वर्गाची द्रव्यतृष्णा होय. परंतु हें म्हणणें सयुक्तिक दिसत नाहीं. उद्योगधंद्यांनां व्यवस्थित स्वरूप देण्याचा एकदा निश्चय झाला म्हणजे तो कोणत्या मार्गानें व उपायानें सिद्धीस नेतां येईल याचा कोणी झालें तरी साहजिकपणें विचार करणारच, आणि त्या विचारांनां प्रगल्भपणा आला म्हणजे त्यांचें पर्यवसान सिंडिकेटांसारख्या संघांत व्हावें हें ओघानेंच प्राप्त होतें.

सिंडिकेटांनां तत्त्वतः प्रतिकूल नसणाऱ्या पुष्कळ लोकांचा याबरोबरच असा आक्षेप येतो कीं, या संस्था वाजवीपेक्षां जास्त प्रमाणांत अस्तित्वांत आल्याचा असा परिणाम झाला कीं, जर्मन राष्ट्र फार थोड्या अवकाशांत एक मोठें प्रचंड "वर्कशॉप" बनलें, व त्यामुळ देशांतील शेती, बारीकसारीक धंदे व हुन्नरकला रसातळाला जाऊन पोंचल्या. उद्योगधंद्याकडे लोकांचा विशेष ओढा असल्यानें शेतांत

काम करणारे मजूर जमिनीच्या मालकांनां मिळत नाहींत व ही अड-चण प्राय: कायमची होऊन बसली आहे. संपत्त्युत्पादनाच्या कामांत एकदम फार मोठा फेरबदल झाल्यानें शेतकऱ्यांवर ही अडचण अगदीं अनपेक्षित रीतीनें आली आणि ती कशी दूर करतां येईल हें त्यांनां कळेनासें झालें आहे.

तिसऱ्या पॅरिग्राफाच्या शेवटीं सांगितल्याप्रमाणें दगडी कोळसा आणि लोखंड यांचे खाणवाले व लोखंड आणि पोलाद यांचे कारखानदार यांनीं स्थापन केलेले संघ इतर संघांपेक्षां विशेष पूर्णत्वाप्रत पोंचले आहेत. खाणींतून इतकाच माल काढावयाचा, व कारखान्यांत इत-काच माल तयार करावयाचा, हें एकदां त्यांनीं ठरविलें म्हणजे तित-काच माल बाजारांत जाईल, जास्ती जाणार नाहीं, अशी या संघांची व्यवस्था आतांपर्यंत अबाधितपणानें चालू आहे. " ऱ्हीनिश-वेस्टफेलियन सिंडिकेट " हा संघ या सर्वांत प्रमुख आहे व त्याची स्थापना एसन् या शहरीं १८९३ सालीं झाली आहे. अशा प्रकारचे संघ इतर कारखा-न्यांच्या मालकांनींहि केले आहेत. बाजारांत किती माल पाठवावा हें जसें या संघांच्या मार्फत ठरतें, तसें तो माल बाजारांत मांडला म्हणजे किती किंमतीला विकावयाचा, हें ठरविणारे निराळेच संघ अस-तात व या दोघांचें काम एकादिलानें चालतें. अशा प्रकारानें मालाची पैदास व त्याची किंमत या दोन्ही गोष्टींवर सत्ता चालविणाऱ्या संघांवि-रुद्ध एकंदर चार प्रकारचे आक्षेप घेण्यांत येतात. ते आक्षेप खालीं लिहिल्याप्रमाणें आहेत.

[अ] उत्पादन आणि विभागणी यांनां लागणारा खर्च कमी व्हावा, आणि पूर्वीं चढाओढीमुळें जें नुकसान होत असे तें न व्हावें, एवढ्यावरच हीं सिंडिकेटें संतुष्ट न राहतां, मालाच्या किंमती मर्यादे-बाहेर वाढविण्याच्या कामांत आपल्या संघशक्तीचा उपयोग करतात.

[ब] कच्चा आणि कारखान्यांत अर्धामुर्धा तयार झालेला माल परदेशी व्यापाऱ्यांनां ज्या किंमतीला विकला जातो त्यापेक्षां देशांतील व्यापाऱ्यांनां जास्त किंमतीला विकला जातो. यामुळे कारखान्यांत अर्धामुर्धा तयार झालेला माल विकत घेऊन तो पुरता तयार करणाऱ्या कारखानदारांचें व देशांतील एकंदर गिऱ्हाइकांचें फार नुकसान होतें.

[क] कांहीं कांहीं धंद्यांत असा प्रकार होतो कीं, देशांतील मागणीला पुरेल इतका माल तयार न करतां मुद्दाम कमी तयार करावयाचा व त्याच्या किंमती मनास वाटेल तशा चढवावयाच्या. परदेशांतून येणाऱ्या त्या मालावर संरक्षक जकाती असतात. यामुळें बाजारांत आपल्याविरुद्ध चढाओढ सुरू होईल अशी त्यांनां मुळींच भीति नसते.

[ड] किरकोळीचा व्यापार करणारे आणि दलाल यांची तक्रार अशी आहे कीं, व्यापारांत आम्हाला पूर्वी जें स्वातंत्र्य होतें तें आतां नाहींसें झालें आहे, पूर्वीप्रमाणें व्यापार मिळेनासा झाला आहे, जेथें तेथें हीं सिंडिकेटें आडवीं येतात, आणि यांचा हेतुहि आमचा अगदीं नायनाट व्हावा असाच आहे.

प्रत्यक्ष वस्तुस्थिति कशी आहे हें जर आपण पाहिलें तर दुसऱ्यावर अवलंबून असणाऱ्या कारखानदारवर्गाचें व व्यक्तिशः व्यापाऱ्यांचें वरील म्हणणें खरें आहे असें आपल्याला आढळून येईल. सिंडिकेटांची स्थापना होऊं लागल्यापासून या लोकांचा तोटा होत आहे व त्यांनां अडचणी सोसाव्या लागत आहेत, हें अगदीं स्वतःसिद्ध आहे, त्याकरतां निराळा पुरावा देण्याचें कारण नाहीं. अडचण काय ती एवढीच कीं, प्रत्येक नुकसानीचे बाबतींत सिंडिकेटांनां कितपत जबाबदार धरावें व त्यांच्यावर कितपत दोषारोप करावा, हें विशेष सूक्ष्म रीतीनें सांगतां येणार नाहीं. "ऱ्हीनिश-वेस्ट फालियन कोल सिंडिकेट" स्थापन झाल्यापासून व विशेषतः त्या संस्थेनें आपल्या वागणुकीचें विशिष्ट धोरण स्वीकार-

त्यापासून कोळशाची किंमत वाढली आहे यांत शंका नाहीं. १९०७ सालीं कोळशाची किंमत बेसुमार वाढली. उत्तर जर्मनींत तर ती इतकी प्रमाणाबाहेर गेली कीं, कित्येक धंदे कोळशांच्या अभावीं अजीबात ठार होतात किंवा काय अशी भीति वाटूं लागली. खासगी उपयोगाकरतां लोकांनां कोळसा मिळेनासा झाला. इतक्या थराला जेव्हां गोष्ट येऊन पोंचली तेव्हां "राइश्टाग" व "प्रशियन डाएट" या दोन सभांत एकाच काळीं "कोलसिंडिकेट" वर शिव्याशापांचा भडिमार होऊं लागला. तेव्हां त्यांनीं जरा पडती बाजू घेतली. पण पुढें त्या सालच्या अखेरीला नवीन औद्योगिक लाट जेव्हां आली तेव्हां कोळशाची किंमत त्यांनीं पहिल्यापेक्षांहि जास्त चढविली. कोळशाचें हें एक उदाहरण झालें; पण अशा तऱ्हेचीं आणखी अनेक उदाहरणें देऊन असें सिद्ध करून दाखवितां येईल कीं, सिंडिकेटें आपल्या संघशक्तीच्या जोरावर जाणूनबुजून निरनिराळ्या मालांच्या किंमती योग्य मर्यादेच्या बाहेर चढवितात.

मालाच्या किंमती आपण आपल्या इच्छेप्रमाणें चढवितों, ही गोष्ट सिंडिकेटवाल्यांनां कबूल आहे. परंतु या गोष्टीचेंहि ते समर्थन करतात, तें कसें, हें आम्ही 'हर कालवर' (Herr Calwer) नांवाच्या ग्रंथकाराच्या शब्दांत सांगतों. "सिंडिकेटवाल्यांचें किंमती ठरविण्याच्या बाबतींतील धोरण अनेक वेळां वाहवलें आहे, व यापुढें देखील तें असेंच वाहवेल, यांतहि शंका नाहीं. संरक्षक जकातीच्या जोरावर बाजारांतील चढाओढीनें ज्या जिनसांच्या किंमतींत फेरफार होण्याची भीति नाहीं त्या जिनसा सिंडिकेटवाल्यांनीं आपल्या हातांत घेतल्या म्हणजे त्यांच्या किंमती मन मानेल तशा वाढविण्याचा मोह त्यांनां झाल्याशिवाय राहणार नाहीं. परंतु बाजारांत येणाऱ्या जिनसांच्या किंमती पूर्वीपेक्षां वाढत्या आहेत किंवा नाहींत, या एका गोष्टीकडेच लक्ष्य देऊन सिंडिकेटवाल्यांच्या कृतीचा विचार करून चालावयाचें नाहीं; या किंमती

चोहोंकडे सारख्या असून स्थिर राहिल्या आहेत किंवा नाहीं, याचाहि विचार केला पाहिजे, आणि मग त्यांच्या कृतीबद्दल अनुकूल किंवा प्रतिकूल अभिप्राय दिला पाहिजे. सिंडिकेटें अस्तित्वांत येण्याच्या पूर्वीच्या काळांत व्यापाराची स्थिति आणि बाजारांतील चढाओढ यांवर किंमतीचे फेरफार अवलंबून असत. मागणी जास्त झाली कीं किंमती आपोआप आणि एकदम चढत, आणि कांहीं थोड्या वेळानें मागणीला पुरून उरेल इतका माल तयार होऊन बाजारांत आला म्हणजे त्या इतक्या कांहीं उतरत कीं, त्यामुळें भांडवलवाल्यांचें व त्यांच्याबरोबर त्यांच्या कामावर असलेल्या मजुरांचेंहि अतोनात नुकसान होई. ज्या मालाचें उत्पादन सिंडिकेटांच्या हातांत आहे त्या मालाच्या किंमतींत असा एकदम चढउतार केव्हांहि व्हावयाचा नाहीं. व्यापाराला तेजी असली म्हणजे किंमती चढतील; पण त्या बेताबेतानें आणि दूरवर विचारान्तीं चढतील. याच्या उलट, म्हणजे व्यापार मंदावला म्हणजे त्या कमी होतील; पण त्या तरी एकदम न होतां हळूहळू कमी होतील. सिंडिकेटवाल्यांनीं किंमती ठरविण्याचें काम आपल्या हातांत घेतल्यानें पूर्वीचा किंमतींतील घोटाळा पार नाहींसा झाला आहे. त्याचप्रमाणें कोणचा माल किती तयार करावयाचा हें ते लोक अगोदर ठरवीत असल्यानें, बाजारांत उगीच्या उगीच खंडोगणती माल येऊन पडावा आणि मग तो मातीच्या मोलानें विकला जावा, असाहि प्रकार आतां आपल्या नजरेस पडत नाहीं. हा सिंडिकेटांचा केवढा मोठा फायदा आहे बरें ! कारखानदारांचा नफा किंवा तोटा पूर्वीं व्यापाराच्या चढउतारावर अवलंबून असे. परंतु सिंडिकेटवाल्यांच्या ताब्यांत असलेल्या कारखानदारांची ही पूर्वीची स्थिति आतां राहिली नाहीं."

येथपर्यंत पहिल्या आक्षेपाचा दोन्ही बाजूंनीं विचार केला. देशांतील व्यापाऱ्यांपेक्षां परदेशी व्यापाऱ्यांनां विशेष सवलतीनें माल विकला

जातो, असा लोखंड व पोलादाच्या कारखानदारांचा, दगडी कोळसा आणि पोलाद यांच्या सिंडिकेटांविरुद्ध जो दुसरा आक्षेप आहे, त्याचा आतां आपण विचार करूं. या व याच्या आनुषंगिक दुसऱ्या अनेक प्रश्नांचा विचार करण्याकरितां सरकारानें एक कमिशन नेमलें होतें. त्या कमिशनपुढें या आक्षेपाच्या समर्थनार्थ जो पुरावा पुढें आला तो पाहिला म्हणजे कारखानदारांचें हें म्हणणें अक्षरशः खरें आहे अशी आपली खात्री होते. निरनिराळ्या साक्षीदारांनीं आपल्या साक्षींत किंमतीच्या फरकाचे जे आंकडे दिले आहेत, ते पाहिले म्हणजे खुद्द सिंडिकेटवाल्यांनां देखील या आक्षेपांच्या खरेपणाबद्दल शंका घेण्यास मुळींच जागा राहत नाहीं. हे आंकडे बाजारांतील उघड विक्रीचे आहेत. व्यक्तिशः परदेशी व्यापाऱ्यांनां आंतून या लोकांकडून कशा सवलती मिळत असतात, हें सप्रमाण सिद्ध करून दाखविणें कठिण असल्यानें हा गुप्त प्रकार जगापुढें येत नाहीं; परंतु तो जर पुढें आणतां आला असता तर किती तरी नव्या आश्चर्यकारक गोष्टी आपल्याला कळून आल्या असत्या. सिंडिकेटवाले आपला कच्चा माल परदेशी व्यापाऱ्यांनां कमी किंमतीला विकतात, व त्यायोगानें परदेशांतून त्यांच्या मालाला जास्त जास्त मागणी होऊं लागली म्हणजे त्यांचा नफा होतो हें खरें; पण या त्यांच्या करण्यानें देशांतील कारखानदारांनां नुकसान सोसावें लागतें याची वाट काय ? कच्च्या मालाला त्यांनां जास्त किंमत द्यावी लागल्यानें त्यांच्या कारखान्यांत तयार झालेला माल तितक्या मानानें महाग पडूं लागतो, व त्यामुळें परदेशांत त्यांनां मिळावें तितकें गिऱ्हाईक मिळत नाहीं. इतकेंच होऊन थांबतें तर कांहीं हरकत नव्हती; पण त्यांच्या कारखान्यांत तयार होणाऱ्या मालाच्या तोडीचा माल परदेशांतून त्यांच्या देशांत येतो व तो परदेशी व्यापाऱ्यांनां त्यांच्यापेक्षां कमी किंमतीला देणें परवडतें ! याचा अर्थ असा आहे कीं, मूळ जर्मनींत तयार झालेला कच्चा

माल परदेशांत जातो, तेथें त्याचें कारखान्यांत रूपान्तर होऊन तो परत जर्मनींत येतो व तेथील कारखानदारांच्या बोकांडीं बसतो; म्हणजे आपलीं बोटें आपल्याच डोळ्यांत घालून घेण्याचा सिंडिकेटवाल्यांचा हा उद्योग आहे, असें म्हणावयास कांहीं हरकत नाहीं. "कलोन गॅझेट" नांवाच्या वर्तमानपत्रांत एक अशा मासल्याचें उदाहरण दिलें आहे, तें असें: सिंडिकेटें स्थापन करण्याची कल्पना पूर्णावस्थेप्रत येण्यापूर्वीं पक्का माल तयार करणारे कारखानदार अनेक वर्षेंपावेतों जवळजवळ दहा हजार टन तारेचे खिळे हालंडमध्यें पाठवीत असत. याशिवाय चार हजार टन कच्चा माल जर्मनींतून नेऊन हालंडचे व्यापारी आपल्या कारखान्यांत त्याचे खिळे तयार करीत असत. सिंडिकेटांच्या धंद्यांत जशी किफायत होऊं लागली, तसेतसे "रोल्ड" तारेचे, म्हणजे यंत्रांच्या साहाय्यानें गोल तार बनविण्याचे, नवे नवे कारखाने निघूं लागले. या कारखान्यांत इतका माल तयार होऊं लागला कीं, त्याची कांहीं तरी वाट लावणें अगदीं भाग पडलें. अर्थात् देशांतील मागणीला पुरून उरलेला माल हालंडला स्वस्त दरानें मिळूं लागला. याचा साहजिक परिणाम असा झाला कीं, हालंडांतील व्यापारी पूर्वीप्रमाणें तारेच्या खिळ्याचा पक्का माल जर्मनींतून मागवीनासे झाले इतकेंच नाहीं, तर कच्च्या जर्मन मालाचा पक्का माल तयार करून तो ते उलट जर्मनींतच पाठवूं लागले, व जर्मन बाजारांत जी किंमत होती त्या किंमतीपेक्षां शेंकडा २५ कमी किंमतीला विकूं लागले! या चढाओढीनें जर्मनींतील खिळ्याच्या कारखानदारांनां आपले कारखाने बंद करावे लागले व त्यांत त्यांचें अतोनात नुकसान झालें. या विषयासंबंधानें डा० मारगेनरॉथ (Morgenroth) नांवाचा ग्रंथकार पुढें लिहिल्याप्रमाणें उद्गार काढतो:—"बहुतेक सगळ्या चेंबर ऑफ कॉमर्सचे रिपोर्ट जर आपण पाहिले तर त्यांत या विषयासंबंधानें नापसंती दर्शविली असल्याचें आपणांस दिसून येईल. सिंडि-

केटवाल्यांच्या या व्यापारी धोरणानें कित्येक धंदे जर्मनींत लुप्त होऊन ते परदेशांत ऊर्जितावस्थेप्रत पोंचले. याच कारणामुळें ऱ्हाईन येथलि जहाजें बांधण्याचा धंदा बुडून तो हालंडांत उदयास आला. कारण, या धंद्याला लागणारे पत्रे खुद्द जर्मन व्यापाऱ्यांनां ज्या किंमतीला मिळतात त्यापेक्षां कमी किंमतीला हालंडवाल्यांनां मिळतात. जर्मन पोलाद स्वस्त दरानें मिळूं लागल्यानें हालंडांत लोखंडी व पोलादी कामाचे अनेक कारखाने मोठ्या जोरानें चालत आहेत, आणि बेल्जममध्यें सुद्धां जर्मनींतील कच्च्या मालाच्या जिवावर लोखंडी तारा तयार करण्याचे पुष्कळ कारखाने निघाले आहेत."

याच्या उलट डा० लीफमन (Liefmann) असें म्हणतो:—"कच्चा आणि कारखान्यांत अर्धामुर्धा तयार झालेला माल सिंडिकेटवाल्यांच्या कृतीनें परदेशीं स्वस्त रवाना होतो; पण त्यायोगानें जर्मनीचा परदेशांशीं व्यापार वाढतो. जर्मन कारखान्यांत तयार झालेल्या पक्क्या मालाला परदेशी मालाबरोबर टिकाव धरवत नाहीं, याचें कारण पुष्कळ कच्चा माल बाहेर जातो हें नसून, त्या मालाला देशांतील व्यापाऱ्यांनां अधिक किंमत द्यावी लागते, हें होय." तथापि ही गोष्ट अगदीं उघड आहे कीं, अशा रीतीनें अधिक किंमत द्यावी लागल्यानें देशांतील कारखानदारांचा दुहेरी तोटा होतो—(१) माल तयार करण्याला जास्ती खर्च येतो, शिवाय (२) परदेशी व्यापाऱ्यांनां बाजारांत चढाओढ करण्यास उत्तेजन मिळतें. परदेशी गिऱ्हाइकाला विशेष सवलत दिल्यानें पक्का माल तयार करण्याऱ्या देशी कारखानदारांचें नुकसान होतें, ही गोष्ट सिंडिकेटवाले कबूल करतात, आणि म्हणून त्यांचा पक्का माल परदेशीं रवाना होऊं लागला म्हणजे, कच्च्या मालाला जास्त किंमत द्यावी लागल्यानें झालेला तोटा भरून काढण्याकरतां, त्या मालावर "बौंटी" म्हणजे देणगी देतात. पण ही देणगी व्यापार जेव्हां अगदीं खालावला असेल तेव्हां

ते देतात, एरव्हीं देत नाहींत, व ती इतकी कमी प्रमाणांत असते कीं, तिच्या साहाय्यानें प्रथम झालेला तोटा भरून निघणें केव्हांहि शक्य नसतें.

सिंडिकेटांविरुद्ध केलेल्या तिसऱ्या आक्षेपाचा विचार करतां असें स्पष्टपणें दिसतें कीं, सिंडिकेटवाल्यांनीं अंगीकारिलेल्या धंद्यांचा बाजार पूर्वीपेक्षां हल्लीं त्यांच्या ताब्यांत अधिक चांगला आला आहे. ते जो माल तयार करतात त्यांपैकीं कांहींची परदेशांतील आयात कमी होत चालली आहे, ही गोष्ट वरील विधानाची सत्यता दाखविते; परंतु या बाबतींत देखील जो विचार करावा लागतो, तो हा कीं, हा परिणाम जो झाला आहे तो सिंडिकेटें स्थापन झाल्यापासून किती झाला व संरक्षक जकाती बसविल्यापासून किती झाला? कारण, या दोन्ही कारणांपासून वरील परिणाम होणें संभवनीय आहे; तथापि यालासुद्धां विशेष महत्त्वाचे अपवाद आहेत. या अपवादांपैकींच परदेशांतून येणाऱ्या जस्ती पत्र्याचा एक अपवाद आहे. या पत्र्यावर संरक्षक जकात आहे, सिंडिकेटवाल्यांनीं त्याची किंमतहि बरीच वाढविली आहे, असें असून शेंकडा ३० या प्रमाणांत इंग्लंडांतील जस्ती पत्रा जर्मनींत येतो, असें वर सांगितलेल्या कमिशनच्या चौकशींत निष्पन्न झालें. इंग्लिश व्यापाऱ्यांचेंहि असें करण्यांत कांहीं नुकसान होत नाहीं. कारण, जर्मनींत या मालाला सिंडिकेटांच्या कृतीनें इतकी चांगली किंमत येते कीं, जकात व इतर खर्च भागून त्यांना त्यांत चांगला नफा शिल्लक राहतो. वर सांगितलेल्या कमिशनसमोर एका साक्षीदारानें या विषयासंबंधानें पुढें लिहिल्याप्रमाणें उद्गार काढले आहेत:—"मागणीच्या मानानें मालाचा पुरवठा करण्याचें सोडून उलट इंग्लंडांत जस्ती पत्र्यांना जी किंमत पडते तिच्यापेक्षां शेंकडा पन्नास जास्त किंमत तुम्ही गिऱ्हाइकांजवळ मागतां; आणि इतकी किंमत आकारून देखील गिऱ्हाइकांच्या मागण्याला पुरेल इतका माल तुम्ही तयार करीत नाहीं."

आतां चौथ्या आक्षेपाचा तेवढा विचार राहिला. परंतु तो अतिसंक्षिप्तपणानें केला तरी चालण्याजोगें आहे. कारण, किरकोळ व्यापारी व फुटकळ माल घेणारे गिऱ्हाईक यांची सिंडिकेटवाल्यांकडे मुळींच डाळ शिजत नाहीं, हें तर उघडच आहे. घाऊक माल घेणारे जे मोठमोठे कारखानदार असतात, त्यांच्याबरोबरच परभारें यांचे करार होतात; यामुळें दलालांच्या मध्यस्थीचेंहि कारणच उरत नाहीं.

येथपर्यंत वर सांगितलेल्या चार आक्षेपांचा थोडक्यांत विचार झाला. आतां भांडवलवाले आणि मजूर यांच्या हिताशीं या विषयाचा निकट संबंध आहे, म्हणून त्यांच्या दृष्टीनें या व्यापारी संघांचा विचार करणें अवश्य आहे. तसा विचार आपण करूं लागलों म्हणजे आपल्याला हें कबूल करणें भाग आहे कीं, (१) कमिशनपुढें आलेल्या कांहीं बाबी खेरीजकरून सिंडिकेटांचा उद्योगधंद्यांवर एकंदरींत चांगला परिणाम झाला आहे; व (२) पहिल्यानें भविष्य केलें होतें त्याप्रमाणें अजून तरी मजुरांच्या हिताला धक्का पोंचेल असें सिंडिकेटांच्या हातून वर्तन झालेलें नाहीं. संघ बनविण्यांत कोणच्या प्रकारचा फायदा आहे याचें भांडवलवाले जें कारण सांगतात तें अगदीं सरळ आणि पैसेवाले लोकांनां पटण्याजोगें आहे. नफ्यातोट्याचा धनी ज्याचा तो, या तत्त्वावर मालाचा पैदास करणाऱ्या लोकांनीं आपआपसांत चढाओढ करून एकमेकांच्या बोकांडीं बसावें हें एक, किंवा ही चढाओढ थांबवून सर्वांनीं एकदिलानें वागावें, आणि अशा रीतीनें कोणाची डोकेफोड न करतां चालविलेल्या युद्धांत जो कांहीं फायदा हातांत पडेल तो नियमित प्रमाणानें आपआपसांत वाटून घ्यावा हें दुसरें. अशा रीतीनें एकमेकांच्या सलोख्यानें व्यापार होऊं लागला म्हणजे चढाओढीमुळें होणारी पूर्वीची त्यांच्यांतील मारामारी आपोआप नाहींशी होते हें उघडच आहे. व्यापार हा एक दैवाचा खेळ आहे. त्या खेळांत जय कोणाला मिळेल व हार कोणाला खावी लागेल हें अनिश्चित आहे.

हा प्रकार नाहींसा होऊन संघशक्तीमुळें व्यापाराला शास्त्राचें स्वरूप म्हणजे निश्चितपणा प्राप्त होतो इतकेंच नाहीं, तर या मार्गानें व्यापार केला असतां पुष्कळ श्रम वांचतात व मालाची विनाकारण नासधूस होत नाहीं, आणि व्यापारांत घातलेल्या भांडवलावर जवळजवळ सर्वांनां सारखा परंतु एकंदरींत जास्त नफा मिळतो. सिंडिकेटला अनुकूल असणाऱ्या लोकांची ही विचारसरणी चुकीची आहे असें म्हणतां येत नाहीं, व ती भांडवलवाल्यांनां पटावी यांतहि आश्चर्य नाहीं.

प्रस्तुत विषयाशीं मजुरांचा संबंध, त्यांनां मिळणारा रोजमुरा आणि बाजारांत मालाला द्याव्या लागणाऱ्या किंमती, या दोन बाबींपुरतांच येतो. सिंडिकेटांच्या कृतीनें किंमती जरी जास्त वाढल्या आहेत तरी त्यापासून मजुरांचें विशेष नुकसान होत नाहीं. कारण, गिऱ्हाइकांपासून जास्त किंमतीच्या रूपानें घेतलेल्या खंडणींत मजुरांचा वांटा जास्त रोजमुऱ्याच्या रूपानें असणारच. रोजमुऱ्याच्या बाबतींत देखील पूर्वींचा अनिश्चितपणा आतां राहिला नाहीं. सिंडिकेटें स्थापन होण्याच्या वेळीं मजुरांची चणचण झाली म्हणजे प्रमाणाबाहेर जास्त मजुरी मिळत असे, व ही चणचण नाहींशी झाली म्हणजे मजुरीचें मान अतिशय खालीं जात असे. सिंडिकेटें स्थापन झाल्यानें किंमतींत स्थैर्य आलें आहे, यामुळें आज कमी तर उद्यां जास्ती, असा प्रकार मजुरींत सहसा होत नाहीं. असें जरी आहे तरी सिंडिकेटवाल्यांविषयीं मजुरांच्या मनांत आरंभाआरंभाला भीति वास करीत होती. माल पैदा करणाऱ्या लोकांतील चढाओढ नाहींशी करून त्यांनां मालाच्या किंमती जर वाढवितां येतात, तर आम्हांला रोजगार देणाऱ्या लोकांमधील चढाओढ नाहींशी करून आमचा रोजमुरा ते कमी कशावरून करणार नाहींत, असा प्रश्न ते करीत असत. परंतु असा प्रश्न विचारण्यांत विशेष तात्पर्य होतें असें आम्हांला वाटत नाहीं. कारण, कारखानदारांप्रमाणें मजूरवर्गांतहि संघ-

शक्ति उत्पन्न झाली, आणि तिच्या जोरावर ते किती कार्य करूं शकतात, याचें विवेचन मागील भागांत आलेंच आहे. तें कसेंहि असो; ही गोष्ट निर्विवाद आहे कीं, सिंडिकेटांच्या हातून मजुरांच्या अनहिताची गोष्ट अजूनपर्यंत तरी झाली नाहीं. त्यांनीं स्थापन केलेल्या ट्रेडयूनियनबद्दल सिंडिकेटच्या चळवळींतील प्रमुख माणसांनीं अनेक वेळां जे प्रतिकूल उद्गार काढले आहेत त्यांवरून, प्रस्तुतची स्थिति पुढेंहि कायम राहील किंवा नाहीं असा जो मजुरांनां संशय वाटत आहे, तो अस्थानीं आहे असें मात्र म्हणतां येत नाहीं. या प्रमुख गृहस्थांपैकीं हर किरडार्फ (Herr Kirdorf) हा गृहस्थ ट्रेडयूनियनचा कट्टा शत्रु आहे व त्याचें व्यापारी लोकांत पहिल्या प्रतीचें वजन आहे. ट्रेडयूनियन्स हाणून पाडण्याचें जर त्यानें मनावर घेतलें तर त्याच्याशीं टक्कर देणें मजूरवर्गाला बरेंच जड जाण्याचा संभव आहे.

सिंडिकेटें स्थापन करण्याची ही युक्ति बहुजनसमाजाला कितपत पसंत आहे, व या बाबतींत सरकारचें धोरण कशा स्वरूपाचें आहे, याचा विचार करून हा विषय आपण संपवूं.

ही युक्ति जेव्हां प्रथम निघाली तेव्हां अनेक जर्मन विद्वानांनीं तिला माना डोलविल्या; व ती जर सिद्धीस गेली तर संपत्त्युत्पादनाचें काम विशेष प्रमाणबद्ध होईल, किंमतींत स्थैर्य येईल, आणि देशांतील उद्योगधंदे बळावतील, असा त्यांचा अभिप्राय पडला. जर्मनींतील लोखंडाचा व्यापार विशेषेंकरून सर्व जगभर पसरला पाहिजे, अशी तेथील लोकांची इच्छा होती; आणि ही इच्छा सिंडिकेटांच्या साहाय्यानें परिपूर्ण होईल असा त्यांनां भरंवसा वाटूं लागला. सिंडिकेटें स्थापन झालीं म्हणजे देशांतील व्यापार मोठ्या प्रमाणावर सुरू होऊन मजूरवर्गाला पोटाकरितां दूर देशांत जावें लागणार नाहीं, निर्गत व्यापार जोरावेल, लहान प्रमाणावर चालणारे व मोठे कारखाने यांनां सारखाच फायदा होईल, मजु-

रांनां जास्त रोजमुरा मिळूं लागेल व त्यांत वेळोवेळ चलबिचल होणार नाहीं, आणि इतक्या चांगल्या गोष्टी साध्य होऊन कोणच्याहि एखाद्या विशिष्ट वर्गाचें नुकसान होणार नाहीं; कारण, उत्पादन आणि विभागणी कमी खर्चानें होऊं लागली म्हणजे मालाच्या पूर्वीच्या किंमतींतहि फेरबद्दल करण्याचा प्रसंग येणार नाहीं, अशा प्रकारचे अनेक अनुकूल उद्गार चोहोंकडे लोकांच्या तोंडून निघूं लागले.

या भविष्यांपैकीं कांहीं भविष्यें पुढें अनुभवान्तीं निखालस खोटीं व कांहीं अंशतः खरीं ठरलीं आहेत. सिंडिकेटांनीं अंगीकारलेल्या धंद्यांपैकीं कांहीं उत्तम जोरावले आहेत; संरक्षक जकातींचा दुजोरा मिळाल्यानें स्वतःच्या देशांतील बाजार सिंडिकेटवाल्यांच्या हातांत टिकून राहिला आहे, निर्गत व्यापार सरसावला आहे, आणि मजुरांचे पगारहि वाढले आहेत. तथापि सर्व धंद्यांत सारखें यश मात्र आलेलें नाहीं. सिंडिकेटांत सामील न झालेले लहानसहान धंदे तर साफ बुडाले. निर्गत व्यापार वाढल्यानें ज्या धंद्यांत सिंडिकेटवाल्यांची चलती झाली त्याच धंद्यांत बिनसिंडिकेटवाल्यांनां उतरती कळा लागली; आणि शेवटीं ज्या मानानें कारखानदारांनां नफा होऊं लागला त्या मानानें देशांतील गिऱ्हाइकांनां चिमटा बसूं लागला. कारखानदार, व्यापारी व मजूर हे सर्वजण गिऱ्हाइकांवर कुरघोडी करूं लागले व त्यामुळें त्यांची फारच दैना उडाली.

आपण केलेलीं भविष्यें बरींच खोटीं ठरल्याचें पाहून जे ग्रंथकार पहिल्यानें सिंडिकेटांच्या वतीनें बोलत होते त्यांपैकीं कांहीं शेवटीं त्यांच्यावर अगदीं तुटून पडले; व या कामांत सरकारानें विशेष कडक नजर ठेवली पाहिजे, नाहीं तर सिंडिकेटवाले गिऱ्हाइकांच्या अंगांतून पैसा पिळून काढतील, असें प्रतिपादन करूं लागले! तथापि वास्तविक पाहिलें तर या संस्थांनीं हा वेळपावेतों कायद्याच्या विरुद्ध वर्तन केलें नाहीं हें

कोणाहि निष्पक्षपाती मनुष्याला कबूल करावें लागेल. एकदां एका सिंडिकेटाविरुद्ध "इम्पीरियल सुप्रीम कोर्टा"त एक दावा झाला. त्यांत व्यापारांतील व्यक्तिस्वातंत्र्याला सिंडिकेटसारख्या संस्थांकडून बाध येतो असें कोर्टानें ठरवावें, असें वादीनें मागणें केलें होतें. परंतु या दाव्यांत कोर्टानें वादीविरुद्ध निकाल दिला व विवाक्षित परिस्थितींत हें व्यक्तिस्वातंत्र्य मर्यादित केल्यानेंच समाजाचें कल्याण होतें, असा त्यानें आपला अभिप्राय दिला. "इंडस्ट्रियल कोडां"त धंदेस्वातंत्र्य (Freedom of occupation) असे शब्द आहेत, त्यांच्या आधारावर वरील स्वरूपाचे बरेच दावे कोर्टापुढें आले; पण त्यांचीहि वाट वरच्याप्रमाणें लागली. तथापि कायद्यानें घालून दिलेल्या कमाल मर्यादेपर्यंत सिंडिकेटवाले येऊन भिडले आहेत. याच्यापुढें ते जर एक पाऊल टाकूं म्हणतील तर कायद्यानें त्यांनां प्रतिबंध करणें जरूर आहे, असें बऱ्याच लोकांनां वाटूं लागलें आहे. पुष्कळ सिंडिकेटांनां लोकमत आपल्या विरुद्ध खवळलें आहे हें कळून चुकलें आहे. आणि खवळलेलें लोकमत शांत करण्याच्या हेतूनेंच "कोल" सिंडिकेटांच्या डायरेक्टरांनीं आपल्यांत सामील होण्याविषयीं प्रशियन सरकारास कांहीं दिवसांपूर्वीं विनंति केली होती. सरकार आमच्यांत सामील झालें म्हणजे आमच्या कामावर त्याची देखरेख राहील असें डायरेक्टराचें म्हणणें होतें; परंतु असें करण्याची वेळ अजून आली नाहीं, असें म्हणून सरकारनें डायरेक्टरांची विनंति अमान्य केली.

सिंडिकेटांच्या कामांत हात घालतां येईल अशा तऱ्हेचे कायदे अजून सार्वभौम सरकारानें किंवा संस्थानांच्या सरकारांनीं पास केले नाहींत. प्रशियन सरकाराप्रमाणेंच सार्वभौम सरकार सिंडिकेटवाले कोठपर्यंत जातात हें पहात अद्यापपावेतों स्वस्थ बसलें आहे. देशांतील मुख्य धंद्यावर सिंडिकेटांचा आतांपर्यंत काय परिणाम झाला याचा तपास करण्याकरतां त्यांनीं एक कमिशन नेमलें आहे, व त्या कमिशनचें काम

अद्यापपावेतों चालूच आहे. सिंडिकेटमधील लोक प्रमाणाबाहेर वागूं लागले तर कायद्यानें आम्ही त्यांचा तत्काळ बंदोबस्त करूं, असें तूर्त सरकारनें आश्वासन देऊन ठेविलें आहे; आणि सरकारची तशी खात्री झाली म्हणजे सिंडिकेटांनां कांटेरी लगाम घालावयाला तें मागेंपुढें पाहणार नाहीं, असा लोकांत भरंवसा उत्पन्न झाला आहे. वेस्टफालियम येथील "कोल" सिंडिकेटांविरुद्ध लोकांचा विशेष कटाक्ष आहे. कोळसा हा जिन्नस रोजच्या उपयोगांत लागणारा असल्यानें या सिंडिकेटांच्या धोरणावर गोरगरिबांचें नफानुकसान अवलंबून असतें, आणि म्हणून सिंडिकेटांविरुद्ध लोकांची जी नेहमीं ओरड चालू असते ती या सिंडिकेटाच्या कृत्यांवर बऱ्याच अंशानें अवलंबून असते. ही ओरड सार्वभौम सरकार सावधानपणें ऐकून घेत असतें व तशी वेळ आलीच तर आपला स्तिमितपणा सोडून लोकांच्या संरक्षणार्थ पुढें धाऊन जाण्याचा त्याचा पूर्ण संकेत आहे.

प्रकरण ११ वें

# सरकारनें अंगावर घेतलेलीं कामें

## आगगाड्या व कालवे

आपल्या देशाची सांपत्तिक स्थिति कोणच्या उपायांनीं सुधारतां येईल याचा विचार सुमारें तीसचाळीस वर्षांपूर्वीं जर्मन लोक विशेष मन घालून करूं लागले. सरकारनें आपल्या शिरावर कोणचीं कामें घ्यावीं आणि खाजगी लोकांनीं कोणचीं घ्यावीं, या बाबतींत ठाम विचार कोणाचाच ठरला नव्हता. म्हणजे आपापल्या सोईप्रमाणें सरकारानें व खाजगी व्यक्तींनीं वाटेल ते उद्योग हातीं घ्यावे, अशी त्या वेळेस स्थिति होती; आणि त्यापासून जर्मनीचा अतोनात फायदा झाला. जर्मन राष्ट्र पुस्तकी ज्ञानांत तयार परंतु व्यवहारज्ञानांत कमी, व इंग्लिश राष्ट्र याच्या उलट, म्हणजे व्यवहारज्ञानांत तयार पण पुस्तकी ज्ञानांत कमी, असा सर्वसाधारण समज आहे. तथापि व्यक्तिविषयक स्वार्थपरायणतेचा देव्हारा माजविणाऱ्या तत्त्वांचा जर कोणीं अंगीकार केला असेल तर तो व्यवहारकुशल इंग्लिश राष्ट्रानेंच केला. जर्मनीनें असा देव्हारा न माजवितां या तत्त्वांत जेवढा ग्राह्यांश होता तेवढाच घेतला व त्याबरोबर सहकार्याचें महत्त्व किती आहे हेंहि नीट समजावून घेऊन त्याचाहि अंगीकार केला. पण त्याचें देखील वाजवीपेक्षां जास्त स्तोम त्यानें माजविलें नाहीं. एकंदरींत, देशांतील उद्योगधंदे सरकारनें आपल्या हातांत घेऊं नयेत असें इंग्लिश लोक ज्या काळांत म्हणत होते त्याच काळांत जर्मनींत उलट क्रम सुरू होता; व सरकारनें या कामांत अवश्य पडावें, अशा तऱ्हेचें उत्तेजन लोकांकडून त्याला मिळत होतें. जर्मनींत अनेक वर्षेंपावेतों एकतंत्री राज्य होतें, व सर्व सत्ता राजाच्या हातांत होती.

यामुळें एखाद्या गोष्टीचा आरंभ करावयाचा असेल तर तो राजानेंच केला पाहिजे अशी जनतेची अपेक्षा असे. हल्लींच्या सुधारलेल्या राज्यपद्धतींत देखील जर्मनींत राजाचें महत्त्व कमी झालेलें नाहीं. जर्मन राज्यव्यवस्थेची ही बाजू नीट लक्षांत घेतली म्हणजे, प्रस्तुतच्या परिस्थितींत सुद्धां देशाची सांपत्तिक स्थिति सुधारण्याच्या कामांत सरकारनें पुढाकार घेणें किती सोपें आणि स्वाभाविक आहे, याचा वाचकांनां उलगडा पडेल.

जर्मन राष्ट्रानें राजाचें महत्त्व कायम राखल्यामुळें सांपत्तिक प्रगतीची जी जी संधि प्राप्त झाली तिचा उपयोग करून घेण्यांत त्या राष्ट्राला पराकाष्ठेची मदत मिळाली. संपत्त्युत्पादनाचा बराचसा बोजा सरकारनें व म्युनिसिपालिट्यांनीं आपल्या शिरावर घेतल्यानें खाजगी लोकांनां आपलें भांडवल दुसऱ्या कामांत घालण्याला व तेथें आपली कर्तबगारी दाखवावयाला अनायासें अवसर सांपडला. एकंदर जनसमूहाच्या हितानहिताच्या बाबी सरकारच्या देखरेखीखालीं गेल्यानें, ज्या कामांत व्यक्तिविषयक फायदा होण्याचा संभव होता त्या कामांत विशेष लक्ष्य पुरविण्याची साहजिकपणें लोकांनां संधि मिळाली. स्वतः सरकारनें किंवा सरकारच्या देखरेखीखालीं खाजगी कंपन्यांनीं चालविलेल्या रेल्वेचा विस्तार सध्यां ३१,००० मैल आहे, ही गोष्ट विशेष लक्षांत घेण्याजोगी आहे. या रेल्वेंत एकंदर साठ कोटी पौंड भांडवल गुंतलेलें आहे. त्याची व्यवस्था ठेवण्याला डायरेक्टरांचीं बोर्डें नाहींत, खाजगी भांडवलवाल्यांच्या मदतीची अपेक्षा भासत नाहीं, व शेअर-होल्डरांच्या म्हणजे भागीदारांच्या सभा बोलवाव्या लागत नाहींत; सरकारमार्फत सर्व कारभार बिनबोभाट व सुरळीतपणानें चालला आहे. भागीदार, डायरेक्टर हे सर्व प्रकार खाजगी लोकांनीं चालविलेल्या कंपन्यांत आहेत व सरकारनें आपल्या हातांत न घेतलेल्या उद्योगधंद्यांत त्या आपली करामत दाखवीत

आहेत, इतकेंच नाहीं, तर जर्मनींतील निरनिराळ्या संस्थानांचें जें उत्पन्न आहे, त्यापैकीं बराच भाग सरकारनें चालविलेल्या किफायतशीर धंद्यांपासून मिळालेला असतो. प्रजेवर किती कर बसवावयाचा या प्रश्नाचा विचार करतेवेळीं सरकार ही गोष्ट लक्षांत घेतें, आणि यामुळें कांहीं संस्थानांत दर माणशीं कराचा बोजा हलका कां आहे याचा आपल्याला सहज उलगडा होतो. १९०५ सालचें सर्व जर्मन राष्ट्राचें बजेट पाहिलें तर आपल्याला असें आढळून येईल कीं, एकंदर उत्पन्नापैकीं शेंकडा ३१·३ इतकें उत्पन्न सरकारी कारखान्यांचें आहे, आणि संयुक्त संस्थानांचें तर हें उत्पन्न शेंकडा ६८ आहे. जर्मन राष्ट्र आणि राष्ट्रान्तर्गत सर्व संस्थानें यांतील सरकारी कारखान्यांचें ठोक उत्पन्न १४५,७५०,००० पौंड आहे ! साम्राज्याच्या उत्पन्नाच्या बाबी म्हणजे पोस्ट व तारखातें, ऑलसेस–लोरेनमधील आगगाड्या, "इम्पीरियल प्रिंटिंग वर्क्स" आणि "इम्पीरियल बँक" या होत; व संस्थानांतील उत्पन्नाच्या बाबी, रेल्वे, टपाल व तारखातें, जंगली रानें व इतर जमिनी, कोळसे, लोखंड व पोटॅश यांच्या आणि इतर खाणी, तसेंच लोखंड शुद्ध करण्याचे कारखाने, या होत. १९०६ सालांत एकट्या प्रशियांत ३९ खाणी, १२ लोखंड शुद्ध करण्याचे कारखाने, पांच मिठागरें, तीन दगडाच्या खाणी, एक अंबरचा ( amber ) कारखाना, इतका सरकारचा व्याप होता.

पूर्वीच्या काळांत जमीनमहसूल हीच सरकारी उत्पन्नाची मुख्य बाब होती, व हीच स्थिति अजूनपावेतों लहान संस्थानांत चालू आहे. मोठ्या संस्थानांत जमीनमहसुलाची जागा आगगाडीच्या उत्पन्नानें पटकावली आहे. या कामांत प्रशियाचा नंबर सर्व संस्थानांत वर आहे. सरकारी खर्च रेल्वेच्या उत्पन्नांतून त्या संस्थानांत जितका भागतो, तितका दुसऱ्या कोणच्याहि संस्थानांत भागत नाहीं. सरकारनें चालविलेले कारखाने पूर्णावस्थेप्रत पोंचतात असा प्रशियांतील लोकांना

भरंवसा आहे, आणि म्हणून अशा कामाकरतां सरकारनें पैसा मागितला तर तो देण्याला पार्लमेंट (डाएट) केव्हांहि जिकीर करीत नाहीं. प्रशियाचें हें उदाहरण पाहून इतर संस्थानांतील प्रजेचें मनहि अशा बाबतींत सरकारला दिवसानुदिवस अधिक अनुकूल होईल असा रंग दिसत आहे. रेल्वे व इतर कारखाने विजेच्या साहाय्यानें चालविण्याकरतां पाण्याच्या शक्तीचा उपयोग करण्याची बव्हेरिया संस्थानांत हल्लीं कल्पना निघाली आहे व ती कृतींत उतरून दाखविण्याचा प्रयत्न बव्हेरियन सरकारनें मोठ्या ईर्षेनें चालविला आहे. संस्थानांतील नद्या व ओढे यांच्या पाण्याचा वरील कामाकरतां उपयोग करण्याचा हक्क सरकारला पूर्वींपासूनच आहे. या पाण्याच्या शक्तीनें वीज उत्पन्न करून जथ जरूर असेल तेथें तिचा पुरवठा करण्याची सरकारनें केलेली योजना फारच मोठ्या प्रमाणावर आहे व तिला खर्चहि अतोनात लागणार आहे. साक्सेन सरकारनें अशाच स्वरूपाची एक युक्ति योजिली आहे; परंतु तेथील लोकमत मात्र अद्यापि तिला व्हावें तितकें अनुकूल झालेलें नाहीं.

जंगली रान व इतर जमिनी यांपासून संस्थानांना उत्पन्न मिळतें, या गोष्टीचा वर उल्लेख केला आहेच. सरकारच्या ताब्यांत पुष्कळ जमिनी असल्यानें शेतकीच्या नफानुकसानीवर त्यांचें कल्याणअकल्याण बरेंच अवलंबून असतें. यामुळें मोठे जमीनदार व लहान जमीनदार या दोघांत तिऱ्हाईत या नात्यानें सरकार समतोलपणा ठेवूं शकतें व यापासून राष्ट्राचा बराच फायदा होतो. प्रसिद्ध मुत्सद्दी प्रिन्स बिस्मार्क याची एक आवडती योजना अशी होती कीं, प्रशियन मुत्सद्द्याला (मिनिस्टर ऑफ स्टेट) सरकारी पगार जो द्यावयाचा तो अंशतः पैशाच्या रूपानें द्यावा व बाकीच्याबद्दल त्याला कांहीं जमीन द्यावी, आणि त्या जमिनीचें त्यानें वाटेल तितकें उत्पन्न स्वतःकरतां मिळवावें. त्याचें म्हणणें

असें होतें कीं, या योजनेनें राष्ट्रांतील मुख्य उत्पन्नाची बाब जी जमीन तिची स्थिति कशी आहे यावर सरकारची नेहमीं नजर राहील, व ती सुधारण्याला काय उपाय योजिले पाहिजेत व कोणचें धोरण स्वीकारलें पाहिजे, हें त्यांनां स्वतःच्या अनुभवावरून ठरवितां येईल. प्रत्येक संस्थानांत पुष्कळशी जमीन सरकारच्या ताब्यांत आहे व त्या जमीनीचें उत्पन्न सरकाराला मिळतें. या गोष्टीपासून वर सांगितलेला प्रिन्स बिस्मार्कचा हेतु, अन्य मार्गानें कां होईना, पण साध्य होतो; व त्याला अनुसरूनच दिवसानुदिवस अधिक जमीन आपल्या ताब्यांत घेण्याची संस्थानांत विशेष प्रवृत्ति दिसून येते. सरकारी जमिनी १८ वर्षांच्या करारानें कुळांनां देण्याचा तिकडे प्रचात आहे व त्यायोगानें एखाद्या वर्षीं शेतकीची स्थिति कशी आहे हें दुसऱ्या लोकांच्या परस्परविरोधी मतांवर अवलंबून न राहतां, स्वतःच्या अनुभवानें ठरविण्याला सरकारापाशीं साधन होतें. एकोणिसाव्या शतकाच्या मध्याला जमीनलागणीचें मान शेंकडा २५ ते ३० पर्यंत कमी झालें. शेतकीला अशी ही निकृष्टावस्था कां प्राप्त झाली याची चवकशी करण्याकरतां सरकारला त्या वेळेस एखादें कमिशन नेमण्याची यातायात करावी लागली नाहीं; स्वतःच्या माहितीनेंच शेतीचें कोठें काय बिघडलें आहे, हें त्यांनां ठरवितां आलें. सरकारी शेतकीखात्यामार्फत नवे नवे प्रयोग नेहमीं चालू असतात व त्यांपासून लहानसहान शेतकऱ्यांनां फार फायदा होतो; तसेंच सरकारी जमीनींतील शेती उत्तम प्रकारची असली पाहिजे, असा शेतकीखात्याचा कटाक्ष असल्यानें आजूबाजूच्या शेतकऱ्यांनां हीं शेतें व त्यांतील पिकें नमुन्यादाखल होतात, आणि त्या नमुन्याबरहुकूम आपल्याहि शेतांत पिकें उत्पन्न करण्याची त्यांच्या मनांत ईर्ष्या उत्पन्न होते. शेतकीखात्याच्या या दक्षतेनें सरकारचा कोणच्याहि प्रकारें तोटा न होतां उलट त्यांच्या वसुलांत भरच पडते. शेतकीखातें सरकारनें जें

काढलें आहे तें केवळ लोकांच्या कल्याणाकरतां अशी भावना नसल्यानें, सरकारी मळे, बागा व जंगली रानें यांपासून जितकें उत्पन्न मिळवितां येईल तितकें मिळविण्याविषयीं सरकारी अधिकारी काळजी घेत असतात. याप्रमाणें सरकारचें उत्पन्न वाढूनच्या वाढून देशांतील शेतकीचीहि सुधारणा होते, असा यांत दुहेरी फायदा आहे. प्रशियांत जंगलांचें फार मोठें उत्पन्न होतें. त्यांची व्यवस्था करण्याकरतां तेथील सरकारनें एक स्वतंत्र खातें ठेविलें आहे, व फॉरेस्ट्रीचें शिक्षण मिळविलेल्या लोकांनांच त्या खात्यांत नोकऱ्या देण्यांत येतात. ही दक्षता बाळगल्यानें जंगलखात्याचें उत्पन्न चांगलें येतें, व तें इतकें कीं, तेथील राजाच्या खाजगी खर्चापैकीं निम्मा खर्च या उत्पन्नांतून भागतो!

रेल्वेची मालकी व त्यांची सर्व व्यवस्था सरकारच्या हातांत आहे. ही व्यवस्था इतकी सुसूत्र आहे कीं, रेल्वेखात्याइतकें जर्मनींतील दुसरें कोणचेंहि खातें किफायतशीर नाहीं असा अनुभव आहे. जर्मनींत प्रचलित असलेली रेल्वेची व्यवस्था बऱ्याच इंग्लिश लोकांनां पसंत पडत नाहीं. रेल्वेची मालकी व व्यवस्था खाजगी कंपन्यांकडे असणें जास्त सुखावह असते, असा त्यांचा अभिप्राय आहे. हा अभिप्राय बरोबर आहे किंवा चुकीचा आहे, हें पाहण्याच्या भानगडींत जर्मन लोक फारसे पडत नाहींत. अनुभवान्तीं त्यांचें असें पक्कें मत झालें आहे कीं, रेल्वेची व्यवस्था सरकारनें आपल्या हातांत घेतल्यापासून त्यांत पुष्कळ सुधारणा झाली आहे व रेल्वेखात्यांतील नोकर आपआपलीं कामें फार आस्थापूर्वक करीत असल्यानें लोकांनां सुख लागून सरकारचाहि फायदा होत आहे. सरकारचें महत्त्व वाढविण्याची संधि आली कीं ती प्रशिया फुकट जाऊं देत नाहीं. या नेहमींच्या धोरणाला अनुसरून रेल्वे सरकारच्या हातांत घेण्याच्या कामांत प्रशियानेंच मूळ पुढाकार घेतला. १८३८ सालीं ‘ प्रशियन रेल्वे लॉ ’ या नांवाचा एक कायदा प्रथम

पास झाला. इंग्लंडांतील रेल्वेपद्धतीला अनुसरून खाजगी कंपन्यांनां रेल्वे बांधण्याची त्या कायद्यांत पूर्ण मुभा ठेविली होती. परंतु अशा कंपन्यांच्या कामावर सक्त नजर ठेवतां येईल अशा तऱ्हेचे बरेच अधिकार सरकारनें आपल्या हातांत ठेवले होते, व तीस वर्षांनंतर, सरकारला योग्य वाटल्यास, या रेल्वे आपल्या ताब्यांत घेतां येतील अशीहि व्यवस्था त्या कायद्यांत करून ठेविली होती. आरंभाला ही व्यवस्था सुरू केली खरी; पण पुढें हळुहळु खाजगी रेल्वेहि विकत घेण्याचा सरकारनें सपाटा सुरू केला. कांहीं रेल्वेकंपन्यांनां मोठमोठ्या रकमा कर्जाऊ दिल्या व अशा रीतीनें त्यांच्या व्यवस्थेंत आपला हात शिरकविला. एतावता प्रशियांतील पुष्कळशा रेल्वे आतां सरकारच्या मालकीच्या झाल्या आहेत व ज्या थोड्या शिल्लक राहिल्या आहेत त्यांच्यावरहि सरकारनें आपला हात चढविला आहे. साक्सेन, बव्हेरिया, वुर्टेंबर्ग व बेडन या संस्थानांनींहि प्रशियाचाच कित्ता गिरविला. रेल्वेची व्यवस्था सरकारनें आपल्या हातीं घेणें सर्व प्रकारें हितावह आहे, हें तत्त्व गेल्या तीसपस्तीस वर्षांत इतकें सर्वमान्य झालें आहे कीं, सरकारी व्यवस्था चांगली किंवा खाजगी कंपन्यांमार्फत होणारी रेल्वेची व्यवस्था चांगली, या विषयाचा जर्मनींत आतां कोणी ऊहापोह देखील करीत नाहीं, इतका तो विषय स्वतःसिद्ध झाल्यासारखा झाला आहे.

संयुक्त संस्थानांवर जास्त हुकमत चालवितां यावी, हा राजकीय हेतु मनांत धरून जर्मन साम्राज्याची स्थापना झाल्यावर, प्रिन्स बिस्मार्क असें प्रतिपादन करूं लागला कीं, जर्मन राष्ट्रांतील सर्व रेल्वे साम्राज्याच्या मालकीच्या असाव्या. या कामांत प्रशियानें पुढें होऊन इतर संस्थानांनां उदाहरण घालून द्यावें, या हेतूनें १८७५ सालीं प्रशियन पार्लमेंटपुढें त्यानें एक भाषण केलें व त्या भाषणांत “ प्रशियानें रेल्वे-

वरील आपली मालकी व इतर सर्व हक्क जर्मन साम्राज्याला द्यावे," असें बोलून दाखविलें. या भाषणावर रॅडिकल पक्षाच्या सभासदांनीं बरीच टीका केली. परंतु तिचा कांहीं उपयोग न होतां, प्रिन्स बिस्मार्कचें म्हणणें सभेनें बहुमतानें मान्य केलें. याप्रमाणें प्रशियन पार्लमेंटानें आपल्या सर्व रेल्वे साम्राज्याच्या स्वाधीन करण्याची तयारी दाखविली. परंतु इतर संस्थानांकडून या कामांत प्रशियाला मिळावा तसा पाठिंबा मिळाला नाहीं व त्यामुळें प्रिन्स बिस्मार्कचा मूळ हेतु सिद्धीस गेला नाहीं. प्रशियाविषयीं बऱ्याच संस्थानांत मत्सरभाव आहे, आणि म्हणूनच प्रशियाच्या मताचा अंगीकार सररहा होणें तूर्त तरी अशक्य दिसतें. रेल्वेची मालकी त्या त्या संस्थानांकडे आणखी कांहीं काळपावेतों राहणार, हें प्रस्तुतच्या लोकमतावरून उघड दिसत आहे. पुष्कळ मालकांच्या पुष्कळ रेल्वे, ही स्थिति व्यापाराच्या दृष्टीनें हितावह नाहीं, ही गोष्ट लक्षांत घेऊन रेल्वेच्या व्यवस्थेपैकीं कांहीं बाबी अशा ठेवल्या आहेत कीं, त्यासंबंधाचे नियम सर्व साम्राज्यांत एकसारखे आहेत व ते सर्व संस्थानांनीं काळजीपूर्वक पाळले पाहिजेत असा निर्बंध करण्यांत आला आहे. उदाहरणार्थ, रेल्वेनें जाणाऱ्या व येणाऱ्या मालाच्या भाड्याचे दर, तत्संबंधीं नियम, टाइमटेबलें व अशा प्रकारच्या इतर गोष्टी यासंबंधाचे नियम सर्व साम्राज्यभर सारखे आहेत व या योजनेनें व्यापाराच्या कामांत एरव्हीं जो घोटाळा झाला असता तो मुळींच होत नाहीं.

१९०५ सालच्या शेवटाला जर्मन साम्राज्यांत ३४,१७५ मैल रेल्वे होती. त्यांपैकीं ३१,६११ मैल निरनिराळ्या सरकारच्या मालकीची किंवा खाजगी मालकीची—पण त्यांच्या देखरेखीखालीं चालणारी—होती. बाकी राहिलेली २,५६४ मैल रेल्वे निव्वळ खाजगी कंपन्यांच्या मालकीची होती; व त्यांपैकीं १,९८२ मैल रेल्वे तर दुय्यम प्रतीची होती.

याचा हिशोब केला तर दर औरस चौरस १०० मैलांला २६२ मैल व दर एक लाख माणसांनां ५६.७ मैल रेल्वे पडते. दर मैलाला २१,३०० पौंड म्हणजे एकंदरींत ७२७,६००,००० पौंड भांडवल रेल्वेंत गुंतलें आहे. रेल्वेचें उत्पन्न या सालीं १२१,८५०,००० पौंड झालें व खर्च ७७,०५०,००० पौंड झाला. म्हणजे निव्वळ नफा ४४,८००,००० पौंड राहिला. खर्चीं घातलेल्या भांडवलावर हा नफा वाटला असतां दरसाल दर शेंकडा ६ पौंड ५ शिलिंग व्याज पडतें. रेल्वेकडील नोकरांची संख्या ६०३,७५५ होती.

रेल्वेची व्यवस्था सरकारच्या हातांत जाण्यापासून एक मोठा तोटा असतो तो हा कीं, आपला वसूल वाढविण्याची सरकारची हाव जी सर्व बाबतींत दिसून येते ती रेल्वेच्या बाबतींतहि असते. या विषया-संबंधानें अलीकडे प्रशियांत बरीच चळवळ उत्पन्न झाली आहे. प्राशि-यन सरकारला बरेंच मोठें उत्पन्न रेल्वेपासून मिळतें. रेल्वेच्या व्यव-स्थेकरतां जास्ती पैसे खर्च करून किंवा लोकांनां भाड्याच्या विशेष सवलती देऊन आपली किफायत कमी करावी, असें सरकारला केव्हांहि वाटणार नाहीं; आणि यामुळेंच व्यापारी वर्गांत अलीकडे असंतोष उत्पन्न होऊं लागला आहे. प्रस्तुतची रेल्वेची व्यवस्था वाईट आहे असें त्यांचें म्हणणें नाहीं. त्यांची तक्रार काय ती एवढीच आहे कीं, होतां होईल तितका जास्त वसूल गोळा करण्याकडे हल्लीं सरकारची जशी प्रवृत्ति आहे तशी ती सार्वजनिक कल्याणाच्या दृष्टीनें असतां कामा नये! एसेन येथील चेंबर ऑफ कॉमर्सनें १९०६ सालीं या विषयावर आपलें मत प्रकट केलें होतें तें असें आहे."......सरकारी वसूल रेल्वेच्या उ-त्पन्नावर अवलंबून असला म्हणजे त्यापासून सार्वजनिक हिताला बराच धक्का पोंचतो. सरकारचा वसूल वाढावा अशी अधिकाऱ्यांची इच्छा असल्यानें सांपत्तिक प्रगतीकडे त्यांचें पोंचावें तितकें लक्ष्य पोंचत नाहीं.

आणि यामुळें मालाची ने-आण करण्याचे रेल्वेचे भाव वाजवीपेक्षां जास्त कडक असतात. लोकांनीं त्या संबंधांत सरकाराकडे तक्रारी केल्या असतां तिकडे जितकें लक्ष्य द्यावयास पाहिजे तितकें देण्यांत येत नाहीं; व भाड्याचे दर अगदीं कायमचे होऊन बसतात." १९०६ सालापासून प्रशियन पार्लमेंट रेल्वेखात्याच्या व्यवस्थेकडे बारकाईनें पाहूं लागलें आहे. शेती आणि उद्योगधंदे यांची वाढ चांगल्या रीतीनें व्हावी एतदर्थ रेल्वेचें भाडें जितकें कमी करणें शक्य असेल तितकें करावें, अशा अर्थाचा एक ठरावहि पार्लमेंटांत पास झाला. परंतु जागच्या जागीं पडून राहण्यापलीकडे त्या ठरावाचा उपयोग होणें संभवनीय नाहीं. कारण, सरकारचें उलट म्हणणें असें पडतें कीं, रेल्वेचें उत्पन्न आम्हांला पुष्कळसें होतें हें खरें; परंतु त्या मानानें रयतेवर करांचें ओझें आम्ही कमी ठेवतों. हें उत्पन्न जर कमी झालें तर शिक्षण व तदनुषंगिक इतर बाबींवर आम्हांला आतांच्या इतका पैसा खर्च करावयास वाव राहणार नाहीं. सरकारचें हें म्हणणें खरें आहे आणि म्हणून आतांपर्यंत चालत आलेल्या रेल्वेच्या व्यवस्थेंत फेरबदल करण्याला सरकार तयार होईल असें वाटत नाहीं.

सर्व राष्ट्रभर रेल्वेचें जाळें पसरल्यानें देशांतल्या देशांत दळणवळणाचे मार्ग जसे सुगम झाले आहेत तसेच मोठमोठ्या नद्यांचे कालवे काढल्यानें ती सोय द्विगुणित झाली आहे. एक खेरीजकरून जर्मनींतील इतर मोठ्या नद्या—उदाहरणार्थ, ऱ्हाईन, एल्ब, ओडर, वेसर दक्षिणेकडून उत्तरेकडे वहात जातात व त्यामुळें पश्चिमेकडील व्यापाराचा माल पूर्वेकडे नेण्याला या नद्यांचा कांहीं उपयोग होत नाहीं; अल्मपासून व्हाएन्नापर्यंत अगदीं पूर्वेकडे वहात जाणारी अशी नदी कायती एक व ती डान्यूब, पण तिचा देखील दक्षिण जर्मनींपैकीं थोड्याच मुलुखाला उपयोग होतो. ही स्थिति पुष्कळ वर्षांपूर्वींच संस्थानांच्या

नजरेस आली होती; आणि कालव्यापासून व्यापाराला फार उपयोग होतो हें लक्षांत घेऊन अगोदर त्यांनीं बरेच कालवे बांधले होते. प्रस्तुत काळाला योग्य अशी सुधारणा मात्र या कालव्यांत हल्लीं केली आहे. ऱ्हाइन, एल्ब, एम्स, ओडर आणि व्हिस्चूला या नद्या व त्यांच्या शाखा यांचे एकमेकांशीं संलग्न झालेले कालवे हे मुख्य आहेत. आतां सांगितलेल्या नद्या फार मोठ्या आहेत, त्यांचें पाणीहि पुष्कळ खोल आहे व यामुळें व्यापारी गलबतें या नद्यांत चालू शकतात. अशा गलबतांनां सोईस्कर जेथें पाण्याची खोली नसेल तेथें ती वाढविण्याचे उद्योग चालू आहेत. या नद्यांचे कांहीं कालवे देखील इतके रुंद आहेत कीं, लहान-लहान आगबोटींतून त्यांच्या पाण्यावर मालाची ने-आण करणें सोपें झालें आहे. देशांत जलमार्गांचा विस्तार फार झपाट्यानें होत असल्यानें दूरदूरचे प्रांत एकमेकांनां जवळ आल्यासारखे झाले आहेत.

कालव्यांचा जास्त प्रसार करण्याकडे अलीकडे प्रशियन सरकारचें तर विशेष लक्ष्य लागलें आहे. एक कालवा ऱ्हाइन नदीपासून डार्टमंड—एम्स कालव्यापर्यंत, दुसरा तेथून वेसर नदीपर्यंत, तिसरा वेसरपासून हॅनोव्हरपर्यंत आणि चवथा बराच खोल असा बर्लिनपासून स्टेटिनपर्यंत, व यांशिवाय इतर किरकोळ कालवे काढण्याची सरकारनें १९०५ च्या "कनाल लॉ" अन्वयें मंजुरी मिळविली आहे. या सर्व कामाला एक कोट साठ लक्ष पौंड खर्च येईल असा अदमास आहे. दक्षिण प्रांतांत कालव्यांचें जाळें असेंच पसरलें व एकमेकांशीं ते कालवे जोडले म्हणजे उत्तर प्रांत आणि बाल्टिक समुद्र व व्हाएन्ना आणि डॅन्यूब नदीवरील इतर शहरें यांच्यामध्यें पाण्यावरून अप्रतिहत दळणवळण सुरू होईल. ऱ्हाइन अथवा एल्ब या दोन नद्यांवरील कोणच्याहि बंदरापेक्षां बर्लिन बंदराचा नदीवरील व्यापार फार मोठा आहे. बर्लिन राजधानी स्प्री नदीच्या कांठीं आहे. १९०४ सालांत २४,३०० बोटींतून ४० लक्ष

टन माल स्प्री नदीवरून बर्लिनच्या बंदरांत उतरला, असा सरकारी रिपोर्टांत दाखला सांपडतो. त्या बंदरांतून स्प्री नदीच्या प्रवाहानें खालीं जाणाऱ्या मालाचें प्रमाणहि बरेंच आहे असें सदर रिपोर्टावरून दिसतें. दोनशें फुटांपेक्षां जास्त लांब व २६ फूट रुंद व ६०० टन माल नेणाऱ्या जहाजांचा या नदीवर संचार होऊं शकतो. यावरून नद्या व कालवे यांचा व्यापारी दळणवळण वाढविण्याच्या कामांत किती उपयोग होतो याची वाचकांनां चांगली कल्पना होईल.

जर्मनींतील जलसाहाय्यानें देशांतल्या देशांत चालणाऱ्या व्यापाराचा इतिहास पाहिला तर त्याची गति आतांपर्यंत कोणच्याहि तऱ्हेनें कुंठित झाल्याचें दिसत नाहीं; परंतु सृष्टिनिर्मित जलमार्गानें संचार करण्याचा वाटेल त्याला हक्क प्राप्त होत नाहीं, असा प्रशियन सरकारनें अलीकडे बूट काढला आहे. त्याला अनुसरून साम्राज्यांतील सर्व नद्यांवर कर बसविणें जरूर आहे, अशी साम्राज्यान्तर्गत सर्व संस्थानांनां प्रशियानें सूचना केली आहे. ही सूचना निरनिराळ्या संस्थानांकडे योग्य मार्गानें आली आहे; व तिचा विचार संस्थानांनीं केलाच पाहिजे अशी जरी आजला स्थिति नाहीं, तरी पुढेंमागें या सूचनेचा विचार करणें त्यांनां भाग पडेल यांत शंका नाहीं. प्रशियांतील कृषिप्रधान प्रांतांतर्फे पार्लमेंटांत येणारे सभासद प्रथम सरकारनें कालवे बांधण्याच्या उलट होते; परंतु मागाहून मारून मुटकून ते या गोष्टीला कबूल झाले. आपल्या कबुलीची किंमत म्हणून सरकारकडून त्यांनीं असें आश्वासन घेऊन ठेवलें कीं, जलमार्गानें होणाऱ्या व्यापाराच्या सोईकरतां म्हणून नद्या व कालवे यांजवर आम्ही कर बसवूं. प्रशियन सरकार तरी असें वचन एकदम देऊन कसें बसलें हें मोठें आश्चर्य आहे. या विषयाशीं जर्मनींतील इतर संस्थानांचा निकट संबंध तर आहेच; परंतु जर्मनीच्या शेजारला असणाऱ्या इतर राष्ट्रांचाहि तसाच संबंध आहे. यामुळें

वरील वचन देण्यापूर्वीं इतर राष्ट्रांचें व संस्थानांचें काय मत आहे हें प्रशियन सरकारनें अगोदर समजून घेणें अवश्य होतें. परंतु तसें कांहीं न करतां तें वचन तर देऊन बसलें. आम्हांला दिलेल्या वचनाप्रमाणें तुम्ही कर केव्हां बसविणार अशी शेतकऱ्यांच्या तर्फेच्या सभासदांनीं सारखी ओरड सुरू केली. ही ओरड लक्ष्यांत घेऊन जर्मन संस्थानें व इतर राष्ट्रें यांजबरोबर प्रशियन सरकारनें आतां पत्रव्यवहार सुरू केला आहे. त्याचा शेवटीं काय निकाल होतो हें अद्यापि ठरावयाचें आहे.

कर बसवावयास प्रशियन सरकार एकदम जें तयार झालें तें विशेष कारणाशिवाय झालें नसेल असा जर आपण तर्क केला तर तो अगदीं खोटा ठरेल असें आम्हांस वाटत नाहीं. जलमार्ग ( नद्या ) व लोहमार्ग ( आगगाड्या ) या दोहोंत चढाओढ सुरू झाल्यानें रेल्वेचें उत्पन्न कमी होण्याची त्यांनां भीति असावी, हें एक. दुसरें असें कीं, जर्मनीच्या अंतःप्रदेशांत जलमार्गानें परदेशांतील जें धान्य येतें तें येऊं नये ही इच्छा याच्या मुळाशीं असेल. शेतकरी लोकांनीं देखील हें एक कारण वादविवादाच्या वेळीं पुढें केलें होतेंच. प्रशियाच्या " अपर हाउस " म्हणजे वरिष्ठ सभेंत शेतकऱ्यांच्या वतीनें भांडणाऱ्या सभासदानें पुढें लिहिल्याप्रमाणें स्पष्ट उद्गार काढले होते:—" हे कर बसविल्यानें परदेशांतील धान्य येण्याचें बंद होईल, आणि तें तसें व्हावयास पाहिजेहि हें मी स्पष्ट शब्दांनीं बोलून दाखवितों. जकातीचे दरांत योग्य तो फरक ठेवला म्हणजे आमच्यासारख्या पूर्व प्रशियांत धान्य पिकविणाऱ्या लोकांनां ऱ्हाइन नदीवर परदेशी धान्यवाल्या लोकांशीं चढाओढ करणें सोपें जाईल." या सभासदाच्या म्हणण्याप्रमाणें कर बसविले म्हणजे पहिल्यानें जर कोणाचा तोटा होण्याचा संभव असेल तर तो धान्य पिकविणाऱ्यांचाच आहे हें यांच्या लक्ष्यांत कसें येत नाहीं कोण जाणे! नद्यांवर चालणाऱ्या जहाजांचे मालक नवीन कर जितका

बसेल त्या मानानें आपलें भाडें वाढवावयास कमी करणार नाहींत. शिवाय पश्चिम जर्मनीला समुद्रकिनारा लगत असल्यामुळें परदेशी व्यापाऱ्यांनां त्या भागांत धान्य आणणें अगोदरच सोपें आहे व नवीन कर द्यावा लागला तरी तो त्यांनां डोईजड वाटणार नाहीं. जर्मनीच्या पूर्व भागांतून येणाऱ्या धान्यावर ऱ्हाईन व एल्ब या नद्यांवर जास्ती भाडें द्यावें लागलें तर तो बोजा स्वदेशी धान्यवाल्यांनां असह्य झाल्याशिवाय राहणार नाहीं. सारांश, नवीन कर बसविल्यानें परदेशी धान्याच्या व्यापाऱ्यांची जर्मन बाजारांतून हाकलपट्टी होईल अशी जी बऱ्याच शेतकऱ्यांची समजूत आहे ती भ्रामक आहे, असें आम्हांला वाटतें.

प्रशियन सरकारनें योजिलेले कर बसवितां येतील किंवा नाहीं, हा प्रश्न प्रथमतः साम्राज्यव्यवस्थेच्या नियमांच्या आधारानें सोडविला पाहिजे, आणि नंतर राष्ट्राराष्ट्रांत ठरलेल्या करारास अनुसरून तो कितपत साध्य आहे हेंहि पाहिलें पाहिजे. राज्यव्यवस्थेच्या नियमांत जरूर तो फेरबदल करण्याकरतां जर्मनींतील सर्व संस्थानांची संमति प्रशियानें मिळविली पाहिजे हें तर उघडच आहे; पण त्याशिवाय फ्रान्स, हालंड, आणि आस्ट्रिया-हंगारी यांचीहि मान्यता मिळविणें जरूर आहे. कारण, ता० १७ आक्टोबर १८६८ रोजीं "ऱ्हाइन नॅव्हिगेशन ॲक्ट" नांवाचा जो कायदा पास झाला त्या कायद्यावर प्रशिया, बेडन, बव्हेरिया आणि हेसी यांच्या तर्फे अधिकाऱ्यांच्या सह्या असून त्यांच्या जोडीला फ्रान्स आणि हालंड यांच्याहि तर्फेच्या आहेत. शिवाय 'एल्ब नॅव्हिगेशन ॲक्ट' नांवाचा जो कायदा आहे व ज्या कायद्याच्या आधारानें एल्ब नदीवर वाटेल त्याला जहाजें हाकारण्याची मोकळीक आहे, त्या कायद्याला आस्ट्रियाची संमति आहे.

साम्राज्यव्यवस्थेच्या नियमांअन्वयें कर बसवितां येतील किंवा नाहीं, याबद्दल कायदेपंडितांत मतभेद आहे. जर्मनींतील कांहीं संस्थानें अनु-

कूल असलीं तरी बाकीचीं सर्व तशीं होतील असें आजला कांहीं चिन्ह दिसत नाहीं; आणि फ्रान्स, हालंड व आस्ट्रिया हे देश अनुकूल होण्याचा तर मुळींच संभव नाहीं. या सर्व कारणांवरून प्रशियाचा हेतु सिद्धीस जाण्याच्या मार्गांत अनेक अडचणी आहेत हें उघड आहे. त्या सर्व अडचणी बाजूला सारून प्रशियन सरकार आपला हेतु साध्य करून घेईल किंवा नाहीं, यासंबंधानें काथ्याकूट करण्यांत आजमितीला कांहीं तात्पर्य नाहीं. प्रशियानें उपस्थित केलेला प्रश्न कोणच्या स्वरूपाचा आहे येवढें आपण तूर्त लक्ष्यांत घेतलें म्हणजे पुरें आहे.

प्रकरण १२ वें

# शेती आणि उद्योगधंदे

देशांतल्या देशांतच महत्त्वाचे म्हणजे एक प्रकारें घरगुती असे कित्येक महत्त्वाचे विषय जर्मन राष्ट्रापुढें आहेत, त्यांतच शेती आणि उद्योगधंदे यांच्यांत कशा प्रकारचा संबंध असावा, हा विषय अतिशय बिकट आहे यांत शंका नाहीं; आणि या दोहोंतून एक दुसऱ्याला म्हणजे शेती उद्योगधंद्यांनां किंवा उद्योगधंदे शेतीला मारक होणार नाहींत, अशी व्यवस्था ठेवणें सरकारला भाग आहे; आणि हें काम घरगुती जरी असलें, तरी फार नाजूक आहे, हेंहि उघड आहे. कारण; उद्योग-धंद्याची वाढ झाली म्हणजे शेती निःसंशय खालीं बसणार, तसेंच शेतीच्या संरक्षणाकरतां एकतर्फी कायदे पास करावे म्हटलें, तर त्यांपासून उद्योगधंद्यांनां उतरती कळा लागणार. नुसत्या शेतीचा किंवा नुसत्या उद्योगधंद्यांचा एकदेशीय विचार जर कोणी करूं लागेल तर दोनहि विषयांचें सांगोपांग विवेचन होणें दुरापास्त आहे; आणि असें सर्व बाजूंनीं विवेचन होणें तर फार अगत्याचें आहे. कारण, त्याशिवाय या दोहोंवर अवलंबून असणाऱ्या व राष्ट्रीय हितानहिताच्या ज्या दुसऱ्या बाबी आहेत त्यांच्याकडे दुर्लक्ष्य होण्याचा बराच संभव आहे.

जर्मनीचा सांपत्तिक भविष्यत्काळ उज्ज्वल व्हावयाचा असेल तर तो आमच्या हातूनच होईल असें शेतीचे अभिमानी म्हणतात. उद्योग-धंद्यांच्या अभिमान्यांचें म्हणणें याच्या उलट आहे. याप्रमाणें या दोघांत अहमहमिका सुरू आहे. हीं दोन पारडीं समतोल रहावीं या उद्देशानें साम्राज्यसरकारनें योजिलेले उपाय कितपत यशस्वी झाले आहेत या-संबंधानें लोकांत मतभेद असेल; तथापि शेतीची भरभराट व्हावी या हेतूनें सरकारनें उद्योग चालू ठेवणें अवश्य व शहाणपणाचें आहे या-

विषयीं मात्र कोणाचा मतभेद असूं शकणार नाहीं. कारण, मनुष्याच्या जीवनाला साहाय्यभूत अशी जी शेती तिची हेळसांड जर्मनींत आज-पावेतों कधीं झाली नाहीं; व राष्ट्राचा अभ्युदय आणि त्याचें स्थैर्य वृद्धिंगत होण्याला दुसरीं अनेक कारणें आहेत; पण त्यांत शेती हें एक प्रमुख कारण आहे, असें तत्पक्षपाती लोकांनीं हल्लींच्या काळांत देखील अभिमानपूर्वक सांगितलें तरी त्याला शोभण्याजोगी प्रस्तुत शेतीची स्थिति आहे यांत वाद नाहीं. ग्रेटब्रिटनच्या संयुक्त राज्यांत १८८१ सालीं दर दहा हजार माणसांत शेतीचा धंदा करणारीं ७११ माणसें होतीं, तीं १९०१ सालांत ४९५ झालीं, म्हणजे शेंकडा तिसांनीं ही संख्या कमी झाली. जर्मनींत १८८२ सालीं दर दहा हजारांत अशा रीतीनें निर्वाह करणारीं १७८३ माणसें होतीं; तीं १८९५ सालीं १५५४ झालीं, म्हणजे शेंकडा १३ या प्रमाणांत ही संख्या कमी झाली. १८९५ सालीं धंदेवार जी खानेसुमारी केली तिच्यांत असें आढळून आलें कीं, पांच कोटी वीस लक्षांच्या एकंदर लोकसंख्येपैकीं एक कोट ऐंशीं लक्ष लोक शेती व बागाइतावर उदरनिर्वाह करीत होते, व यांत जंगली रानें जर विचारांत घेतलीं तरी ही संख्या आणखी पांच लक्षांनीं वाढवावीच लागेल.

अलीकडच्या कांहीं सालांत शेतीविषयीं कमी सहानुभूति दिसून येते, याचा दोष कदाचित् शेतकरीपक्षाच्या माथींच मारावा लागेल. आपल्या गरजा काय आहेत व त्या कोणच्या मार्गानें भागवितां येतील, यासंबंधानें लोकमत जागृत करण्याची खटपट धंदेवाले एकसारखी करीत असतात. उलट राष्ट्रीय ( Imperial ) व संस्थानांच्या पार्लमेंटांत असणारे शेतकऱ्यांचे सभासद पहावे तों ते प्रिन्स बिस्मार्कनें घालून दिलेली राज्य-व्यवस्था अमलांत आणावी असा आग्रह धरून बसतात. प्रिन्स बिस्मार्कच्या अमदानींत उद्योगयुगाला आरंभ झाला नव्हता. यामुळें शेतीचीच

जितकी भरभराट होईल तितकी करावी असें त्याचें मत होतें. गेल्या तीस वर्षांत अदृष्टपूर्व अशी सांपत्तिक सुधारणा झाली, या गोष्टीचें महत्त्व या सभासदांच्या चांगलेंसें ध्यानांत येत नाहीं, आणि म्हणून हल्लींच्या काळांत देखील जुन्याला चिकटून राहण्याचा त्यांचा आग्रह अज्ञानमूलक आहे यांत शंका नाहीं.

जर्मनींत हल्लीं जी परिस्थिति दिसून येते तिचें विशिष्ट लक्षण काय आहे व तें कोणत्या गोष्टींवर अवलंबून आहे, याचें योग्य आकलन झाल्याशिवाय एकमेकांशीं प्रतिस्पर्धा करणाऱ्या या दोन पक्षांच्या भांडणांचा यथान्याय निकाल आपल्याला लावतां येणार नाहीं, म्हणून आपण जरा त्या विषयाकडे वळूं.

शेतकीवर उदरनिर्वाह करणाऱ्या लोकांची संख्या दिवसानुदिवस कमी होत चालली आहे व हा क्रम गेलीं बरींच वर्षें सुरू आहे. अशा स्थितींत शेतीची सुधारणा करण्याचा सर्व संस्थानांचा जो प्रयत्न चालू आहे तो आसन्नमरण झालेल्या माणसाला औषधोपचार करण्यासारखा वेडगळपणाचा आहे अशी बऱ्याच लोकांची कल्पना आहे; परंतु ती अगदीं चुकीची आहे. कारण, जर्मनींतील शेतीची स्थिति इतकी निकृष्ट खाचित झालेली नाहीं. आमचा धंदा बुडाला, आमच्या जीवितावर देखील गदा आली आहे, असा ओरडा मोठे मोठे जमीनदार वरचेवर करीत असतात. या त्यांच्या ओरडींत सत्यापेक्षां कांगावखोरपणाच जास्त दिसून येतो. कारण, उत्तर व पूर्व जर्मनींत धान्य पिकविणाऱ्या मोठ्या प्रांतांत देखील सुधारलेली शेती करून जास्त पैका कमावण्याचें मोटमोठ्या जमीनदारांनीं जर मनांत आणलें तर तसें करण्याला त्यांनां अजून पुष्कळ वाव आहे. लहान प्रमाणावर शेती करणारे जे लोक आहेत ते तर सर्व देशभर सुस्थितींत आहेतच.

शेतकरीवर्गाच्या कच्छपीं कांहीं माणसें अशीं आहेत कीं, त्यांचें

शेतीवर निर्व्याज प्रेम आहे. शेतकरीवर्गाच्या हितानहिताशीं किंवा त्यांनीं आपल्या नजरेसमोर ठेवलेल्या ध्येयाशीं यांचा कांहीं संबंध आहे म्हणावें तर तसेंहि नाहीं. परंतु ही मंडळी आपल्या तत्त्वज्ञानाच्या भरांत असें प्रतिपादन करतात कीं, शहरांत लोकवस्ती अतिशय दाट असल्यानें शहरवासी लोकांच्या शक्तीचा ऱ्हास होतो, त्यांचें मन नेहमीं ज्वराच्या रोग्याप्रमाणें अस्वस्थ असतें. खेडेगांवच्या मोकळ्या हवेंत राहणाऱ्या लोकांची स्थिति याच्या अगदीं उलट असल्यानें राष्ट्राचें सामर्थ्य शहरवासी लोकांपेक्षां या लोकांवरच अधिक अवलंबून असते. या लोकांची गोष्ट बाजूला राहो; सर्वसाधारणपणें जर्मन लोकांच्या स्वभावाचें जरी आपण परीक्षण केलें, तरी त्यांच्या अंगांत देखील एक प्रकारचा गांवरानीपणा बराच मुरलेला आहे, असें आपल्याला दिसून येतें. या स्वभावाला अनुसरून नाटकें, काव्यें, कादंबऱ्या यांत शेतकरी व शेतांतील त्यांचा जीवनक्रम यांचें स्तुतिस्तोत्र ह्या तत्त्वज्ञानी कवींनीं गाइलेलें आपणांस अनेक स्थळीं व वेळीं पहावयास सांपडतें. शेतांत व मळ्यांत राहिल्यानें सृष्टिसुखें मनुष्याला यथेच्छ अनुभवावयास सांपडतात, यामुळें असा माणूस शरीरानें राकट, प्रकृतीनें निकोप, व्यवहारांत सच्चा, राष्ट्रहिताला तत्पर, नीतिमत्तेंत श्रेष्ठ आणि धर्मावर श्रद्धा ठेवणारा असा असतो, अशा तऱ्हेचीं वर्णनें करणारे कवि व ग्रंथकार जर्मनींत आपल्याला किती तरी सांपडतील.

ज्या लोकांच्या मनाची भावना वर वर्णन केल्याप्रमाणें आहे त्यांच्याशीं वाद घालण्याची कोणाची इच्छा नाहीं; किंवा त्यांचे विचार व त्या विचारानुरूप त्यांच्या हातून होणारी कृति यांवरहि टीका करण्याचें कोणाला प्रयोजन नाहीं. प्रकृत स्थळीं उलट बाजूनें इतका इषारा दिला असतां पुरें होईल कीं, शहरांत राहणारे लोक, हे ग्रंथकार वर्णन करतात त्याप्रमाणें, हीन दशेप्रत पोंचले नाहींत, किंवा कित्येक

समाजसुधारक, कांहीं आधार नसतां, केवळ कळकळ दाखविण्याच्या बुद्धीनें, ओरडा करतात त्याप्रमाणें, शहरवासी लोकांची सामाजिक अवनतिहि अजूनपर्यंत जर्मनींत झालेली नाहीं. प्रोफेसर सेरिंग हा शेतीचा मोठा अभिमानी; त्यानें एक असा सिद्धान्त कांहीं वर्षांपूर्वी ठोकून दिला होता कीं, सैन्याच्या भरतीला शेतीच्या भागांतून, तेथील लोकसंख्येच्या मानानें, जितके लोक मिळतात त्याच्या तिसऱ्या हिश्शानें देखील उद्योगधंद्यांत पुढें सरसावलेल्या शहरांतून मिळत नाहींत. हा सिद्धान्त खरा कां खोटा याची अनेक वर्षेंपावेतों कोणीं चवकशीच केली नाहीं, तो खरा आहे असेंच धरून सर्व लोक चालले होते. सरतेशेवटीं १८९५ सालीं बव्हेरियन सरकारनें निरनिराळ्या ठिकाणीं गोळा केलेल्या आंकड्यांच्या आधारानें प्रोफेसर मजकूर याचें वरील मत वस्तुस्थितीला कसें सोडून आहे हें सप्रमाण सिद्ध करून दाखविलें व तेव्हांपासून या मताचा फोलपणा सर्वांच्या निदर्शनास आला.

शेतकरी लोक लष्करी कामांत कदाचित् प्रवीण होत नसतील; तथापि ही गोष्ट बाजूला ठेवून, शेतीची स्थिति सुधारण्यासाठीं आणि विशेषेंकरून स्वतंत्र बाण्यानें राहणाऱ्या लाखों शेतकऱ्यांचें संरक्षण करून अल्प प्रमाणावर शेतकी करण्याकडे त्यांचें मन वळविण्यासाठीं, सरकारनें मनापासून यत्न करणें विहित आहे व तसें करण्याला सबळ कारणेंहि अनेक आहेत. शेतीची सुधारणा करावयाची म्हणजे शहरांत कारखान्यांवर काम करण्याकरितां गेलेल्या ज्या लोकांनां पुरता धंदा मिळत नाहीं, किंवा ज्यांनां शहरच्या वस्तींत रहावयास सोईचीं घरें मिळत नाहींत, अशा भणंग लोकांनां जमिनींत काम करावयाला लावावयाचें, असा अर्थ नाहीं. तर, जे लोक खेडेगांवांतील वस्ती सोडून नुक्तेच गेले आहेत, व ज्यांना शहरांतील ऐषआरामाची व चैनीची अजून चटक लागली नाहीं, अशा लोकांनीं आपापल्या गांवीं परत जाऊन जमिनींत

मेहनत करावी, अशाबद्दल त्यांचें मन वळविणें आणि याप्रमाणें ते पुनः जमिनींत मेहनत करूं लागले म्हणजे तेथेंच त्यांचें मन रिझेल, अशा प्रकारची व्यवस्था अमलांत आणणें, यांतच शेतीच्या सुधारणेचें बीज आहे. त्याचप्रमाणें जमीन वाहण्याची व जमिनींत लागवड करण्याची हल्लींची जी पद्धति आहे तिच्यांत पुष्कळच सुधारणा केली पाहिजे. त्याशिवाय शेतीपासून राष्ट्रांतील लोकांचा उपयोग होण्याचा संभव नाहीं. ही सुधारणा कांहीं कालानें झाली तरी चालेल; पण आजला मुख्य अडचण जी पदोपदीं नडते ती ही कीं, शेतांत काम करावयाला हुषार माणसें मिळत नाहींत. ही अडचण दूर करण्याचा प्रयत्न प्रथम झाला पाहिजे. कारण, असें पहा कीं, प्रत्येक उन्हाळ्यांत ( Summer ) सुगीचे दिवस आले म्हणजे धान्य मळण्याकरतां पूर्वसरहद्दीवरील लाखों परदेशी माणसें जर्मनींत येतात व रोजगार मिळवितात. परंतु खुद्द देशांतील माणसें पहावीं तर तीं शेतीचा मुलूख सोडून ज्या प्रांतांत उद्योगधंदे चालू असतील व जिकडे आपली सोय होऊन अधिक फायदा होण्याचा संभव असेल तिकडे आपलीं घरेंदारें सोडून बेलाशक चालते होतात. या त्यांच्या कृतीनें शेतीचें किती नुकसान होतें याची कल्पना करतां येण्याजोगी आहे.

१८८३ पासून १९०० अखेर शेतकीखात्यामार्फत जे आंकडे प्रसिद्ध झाले आहेत ते पाहिले असतां, वरील प्रकारचें नुकसान सोसून देखील, जिराईत व बागाईत जमिनी, द्राक्षाचे व भाजीपाल्याचे मळे, चराऊ रानें व जंगलें, यांचें उत्पन्न, अल्प प्रमाणानें कां होईना, पण वाढतें आहे असें दिसून येतें; व त्यावरून देशांतल्या देशांतच लोकांचा शेतीपासून निरनिराळ्या स्वरूपाचा किती फायदा होतो हें स्पष्टपणें नजरेस येतें.

देशांत उत्पन्न होणाऱ्या धान्यापासून जर्मनींत अन्नाचा जितका पुर-

वठा व्हावा तितका होत नाहीं. लोकसंख्या दिवसानुदिवस वाढत्या प्रमाणावर आहे, व लोकांची रहाणीहि पूर्वीपेक्षां अधिक चांगली झाली आहे. यामुळें उत्तम जातीचा परदेशांतील गहू अलीकडे देशांत जास्त येऊं लागला आहे. गेल्या आठदहा वर्षांत तर ही आयात फारच वाढली. तरी पण गोरगरीबांचा निर्वाह ज्या धान्यांवर होतो त्या धान्यांची पैदास अलीकडे जास्त होऊं लागली आहे. गोरगरीबांचें जर्मनींतील मुख्य धान्य म्हणजे 'राय' (Rye) नांवाचें धान्य व हलक्या प्रतीचा गहू हें होय, व त्यांचा पुरवठा मुबलक होतो. धान्याची वाढ ज्या मानानें होऊं लागली त्या मानानें चराऊ रानांचा उपयोग शेतीच्या कामाकडे अधिकाधिक होऊं लागला. ज्या मालकाच्या पुष्कळ जमिनी आहेत तो नवीन शास्त्रीय पद्धतीनें जमीन पिकवितो; परंतु या बाबतींत त्याला अजून कितीतरी नवीन नवीन गोष्टी शिकावयाच्या आहेत. शेतकामांत तयार असणाऱ्या मजुरांची टंचाई वाढत चालल्यानें हातांनीं करण्याचीं कामें यंत्रांच्या साहाय्यानें बऱ्याच ठिकाणीं होऊं लागलीं आहेत. वाफेच्या जोरावर चालणारे दोनदोन एंजिनांचे नांगर पुष्कळ शेतकऱ्यांनीं घेतले आहेत. या नांगरांच्या साहाय्यानें रोज साडे बारा एकर जमीन नांगरतां येते. पोटॅश नांवाच्या द्रव्याचाहि खत तयार करण्याच्या कामांत पुष्कळ उपयोग होऊं लागला आहे. या सर्व कारणांमुळें वर सांगितल्याप्रमाणें शेतीचें उत्पन्न अल्पांशानें हल्लीं वाढतच आहे.

शेतीच्या प्रगतीचें वर्णन एवढ्यानेंच पुरें होत नाहीं. द्राक्षाच्या व इतर फळांच्या बागा, बीर दारू ज्या फुलांपासून गाळतात त्या फुलांचे 'हॉप' (Hop) नांवाचे वेल, बटाटे व इतर धान्यांपासून दारू गाळण्याचे कारखाने आणि 'बीट' नांवाच्या मुळ्यांची साखर करण्याचे कारखाने यांकडे पाहिलें तरी त्यांचें उत्पन्न देखील वाढत्या प्रमाणावर

आहे असेंच आपणांस दिसून येईल यांत शंका नाहीं.

आतांपर्यंत केलेल्या वर्णनावरून शेतकऱ्यांचे उद्योग किती बहुविध आहेत व त्या उद्योगांची मजल कोठपर्यंत गेली आहे हें ध्यानांत येतें; आणि त्याबरोबरच संरक्षक जकाती हल्लीं ज्या आहेत त्या तशाच चालू ठेवाव्या असें जें या लोकांचें मागणें आहे तें काय हेतूकरतां आहे याचेंहि दिग्दर्शन होतें.

तथापि, आयात मालावरील जकातींचें धोरण ठरवितांना, एकोणिसाव्या शतकाच्या शेवटच्या तीस वर्षांतच काय तो शेतीच्या उत्पन्नाचा विशेष विचार होऊं लागला. १८५० सालापर्यंत व पुढें कांहीं काळ शेतीची इतकी भरभराट होती कीं, शेतकऱ्यांच्या हिताकरतां संरक्षक जकाती जरी ठेवल्या होत्या तरी त्या नांवालाच होत्या. या जकातींची देखील अवश्यकता नाहीं असें १८६५ सालीं दिसून आलें, आणि त्याबरोबर त्या माफ करण्यांत आल्या. आपल्या देशांत आपल्याला कोणी प्रतिस्पर्धी नसावा हा विचार धान्य पिकविणाऱ्या लोकांच्या मनांत त्या वेळेला मुळीं देखील येत नव्हता. कारण, जरूर वाटेल तेव्हां परठिकाणीं आपला माल नेऊन तो योग्य किंमतीला त्यांनां विकतां येत असे. देशांत पीक चांगलें आलें नसलें तरी देखील गहू व राय धान्य खंडोगणती इंग्लंडांत रवाना होत असे. अवर्षणाच्या काळांत जर्मनींतील लोकांनां हीं धान्यें घेणें परवडत नसल्यानें ते आपला उदरनिर्वाह मक्यावर करीत. यामुळें देशांत पडून राहिलेलें धान्य इंग्लंडांत जास्त किंमतीला विकण्याची सवड होई; असो.

आतां यावर असा प्रश्न साहजिकच उत्पन्न होतो कीं, फ्रान्सबरोबर केलेल्या युद्धाचा शेवट झाल्यावर उद्योगधंद्यांनां जशी वैभवाची भरती आली तशी ती शेतीला आली नाहीं किंवा काय ? याचें उत्तर हें कीं, " होय; कांहीं काळपावेतों अशी भरती आली होती." पण ती कोठ-

वर टिकली ? तर धान्याच्या किंमती चढाच्या होत्या तोंपर्यंत. या किंमती कांहीं फार वेळ टिकल्या नाहींत. पण तेवढ्या अल्पकाळांतच भारी किंमतीला जमिनी विकून आपल्या हातांत भांडवल वाढवावें अशी प्रवृत्ति लोकांत दिसूं लागली. धान्याचे भाव असेच कायम राहतील या समजुतीवर गिन्हाइकांचीहि कमतरता नव्हती. कित्येकांनीं लोकांचे पैसे उसने काढून भराभर जमिनी विकत घेतल्या. पुढें लवकरच जमिनीच्या किंमती हळूहळू उतरूं लागल्या; शेवटीं त्या इतक्या उतरल्या कीं, आपण काढलेलें कर्ज आतां कसें फेडावें अशा विवंचनेंत कांहीं लोक पडले; व ज्यांनीं पुष्कळशा जमिनी घेतल्या होत्या, त्या जमिनींचें उद्योगधंद्यांच्या मान्यापुढें काय करावें, अशी कित्येकांनां काळजी पडली ! त्यांतल्या त्यांत एक नवीन विघ्न उपस्थित झालें तें हें कीं, शेतकाम करणारे मजूर जास्त पगार मागूं लागले. कारण, जो तो कामकरी शेतीचा मुलूख सोडून शहरांतील कारखान्यांकडे धाव घेत सुटला. शिवाय नवीन परिस्थितीमुळें त्यांनां पोटालाहि जास्त पैसे लागूं लागले व जे कोणी शेतांत मजूरी करण्याकरतां आपल्या जन्मभूमीला धरून राहिले, त्यांच्यांत एक प्रकारचा असंतुष्टपणा माजून राहिला. धान्य पिकाविणारांचें नष्टचर्य एवढ्यानेंच संपलें नाहीं. इतके दिवस रशियांतून माल येत होता तो आतां अमेरिका व अरजेंटिनांतून येऊं लागला, व तो देखील इतका कीं, मुख्य धान्य जें ' राय ' त्याची किंमतहि फारच कमी येऊं लागली. आणि त्या सर्वांचा अर्थातच असा परिणाम झाला कीं, जमिनींत राय पिकाविण्यापासून कोणालाहि फायदा होईनासा झाला. तेव्हां १८७५ च्या सुमाराला संरक्षक जकातीबद्दल ओरड सुरू झाली. प्रिन्स बिस्मार्कनें प्रथम तिकडे दुर्लक्ष्य केलें. शेवटीं १८७९ सालीं लोकांच्या ओरडीपुढें त्याला मान वांकवावी लागली आणि त्यानें गहू व राय या धान्यावर एक हंड्रेड्वेटाला ६ पेन्स याप्रमाणें संरक्षक जकात बसविली.

ह्या वेळपावेतों देशांत उत्पन्न झालेल्या धान्यावर जर्मन लोकांचें पोट भागत होतें इतकेंच नाहीं, तर देशांतील मागणी भागवून परदेशांत धान्य रवाना करण्याइतकी कूस शेतकऱ्यांजवळ रहात होती. परंतु हें पारडें लवकरच फिरलें. सत्तर सालाच्या आरंभाला उद्योगधंद्यांनां सुरुवात होऊन लवकरच त्यांनां परिणत स्वरूप प्राप्त झालें व सर्व राष्ट्रभर त्यांचें जाळें पसरलें. उद्योगधंद्यांच्या वाढीबरोबर शहरांतील कामकरी लोकांची संख्या बेसुमार वाढली, या लोकांनां जास्ती धान्य लागूं लागलें व आपली गरज भागवून घेण्यापुरते पैसेहि त्यांच्या खिशांत खुळखुळूं लागले. शेतीच्या मुलखांतून जो तो शहराकडे धांव घेऊं लागला, व त्यामुळें शेतांतील मजुरीचा भाव ज्या प्रांतांत मूळापासून हलका होता तेथेंहि तो वाढूं लागला.

सत्तर सालापावेतों, जर्मन लोक युनायटेड स्टेट्स, ब्रेझिल, आस्ट्रेलिया व दक्षिणआफ्रिका वगैरे मुलखांत, स्वदेशांत काम न मिळाल्यामुळें, पोटाकरतां जात होते. परंतु त्या सालानंतर आपला देश सोडून परदेशांत जाण्याची अवश्यकता त्यांनां वाटेनाशी झाली. निरनिराळ्या खाणी, कारखाने, कलागृहें यांमधून वाटेल तिकके मजूर खपूं लागले. पण एवढ्यानें मालकांची तृप्ति होईना. " आणखी मजूर असले तर पाहिजेत " अशी त्यांची हकाटी सुरू होतीच. नव्वद सालाच्या आरंभाला तर इतकी स्थिति येऊन पोंचली कीं, आपला देश सोडून परदेशांत जाण्याचें कोणाच्याहि मनांत फारसें येईनासें झालें. कांहीं माणसें जात येत होतीं; पण त्यांची संख्या दिवसानुदिवस खालावत जाऊन आजला ती फारच अल्प प्रमाणांत आहे.

इतकें होऊन देखील, पंचवीस–पंचवीस कशाला–वीस वर्षांपूर्वींपावेतों शेती व उद्योगधंदे यांच्यांत पुढें होणाऱ्या विरोधाचें एकहि चिन्ह दिसत नव्हतें. मागें सांगितलेली लहानशी जकात बसविण्यापासून धान्या-

च्या किंमतींत फारसा फरक पडला नाहीं. कारखान्याच्या मालकांनां पूर्वींप्रमाणेंच वाटेल तितके मजूर मिळत होते. त्यांनां मजूरी जास्ती द्यावी लागत असे हें खरें; परंतु हल्लीं जी मजूरी द्यावी लागते त्या मानानें ती किती तरी कमी होती. देशांतील राज्यकारभाराचें धोरण ज्या तत्त्वांवर चाललें होतें त्यांतहि कांहीं फरक झाला नव्हता. कारण, या तत्त्वांपैकीं मुख्य तत्त्व म्हटलें म्हणजे हें कीं, जर्मनीचा जो मुख्य उद्योग धान्य पिकाविण्याचा, तो पूर्वींच्या काळापासून जसा अबाधितपणानें चालत आला आहे तसा तो पुढें नेहमीं चालू राहिला पाहिजे, व तसाच चालू राहून जमीनीचे मालक आणि शेतकरी सुसंपन्न होतील अशी व्यवस्था राहिली पाहिजे. मंत्री आणि पार्लमेंट हेंच आपलें आद्य-कर्तव्य असें समजत असत. १८९५ सालीं धंदेवारीनें जी खानेसुमारी झाली तिच्यावरून असें दिसून आलें कीं, १८८२ सालीं शेतीवर काम-धंदा मिळून जितक्या लोकांचा चरितार्थ चालत होता, तितक्या लो-कांचा ९५ सालीं चालेनासा झाला. तथापि हा उणेपणा विशेष लक्ष्यांत येण्याजोगा नव्हता; उलट या मुदतींत मेंढपाळांचा धंदा बराच जोरा-वला होता व यावरून असें अनुमान काढण्यांत आलें कीं, राष्ट्रांतील अंतर्व्यवस्थेचा मूळ पाया जी शेती तिच्या सुस्थितीला कोणच्याहि प्रकारें धक्का लागलेला नाहीं. तथापि उद्योगधंद्यांनां आलेली भरती खूप जोरांत होती, व तिचा मारा शेतीवर दोन बाजूंनीं होऊं लागला. शहरांतील कारखानदारांच्या चढाओढीमुळें मजुरांचा तुटवडा पडून धान्य उत्पन्न करण्याचा खर्च वाढूं लागला, हा एका बाजूचा मारा झाला; व दुसऱ्या बाजूचा मारा असा कीं, धान्याच्या किंमती एकदां ज्या घसरल्या त्या अधिकाधिकच घसरत चालल्या. उदाहरणार्थ, १८८० ते १८८९ या दरम्यानच्या काळांतील गहूं व 'राय' यांच्या किंमती जर आपण पाहिल्या तर त्या फारच कमी झाल्याचें आपल्याला दिसून येईल.

शेतकऱ्यांचें दैवदुर्विलसित एवढ्यावरच थांबलें नाहीं. जर्मन कारखान्यांत तयार झालेला माल फार जारीनें परदेशांत रवाना होऊं लागला. या मालाच्या मोबदल्याकरतां परदेशचें धान्य जर्मनींत पुष्कळसें येऊं लागलें. याचें तात्पर्य हें कीं, कारखान्याच्या भरभराटीबरोबर मजुरांची संख्या वाढल्यानें शहरांत धान्याला जी जास्ती मागणी होऊं लागली, ती परभारेंच भागूं लागली. शेतीचा अभिमानी प्रिन्स बिस्मार्क जाऊन त्याच्या जागीं कौंट व्हॉन कॅप्रिव्ही नांवाचा मंत्री अधिकारारूढ झाला. त्यानें कायद्यांचें धोरण एकदम बदलून टाकलें, व यामुळें शेतकऱ्यांचीं डोकीं फुटण्याचाच प्रसंग येऊन गुदरला. शेतकरीवर्ग सुस्थितींत असला म्हणजे राष्ट्राला आपोआप सुस्थिति प्राप्त होते, असा प्रिन्स बिस्मार्क याचा दृढ समज होता आणि त्या समजाला अनुसरून तो देशांतील कायदेकानू करीत असे. काउंट व्हॉन कॅप्रिव्ही चॅन्सेलरच्या जागेवर आल्याबरोबर हा सगळा रंग पालटला. जर्मनी हा देश कृषिप्रधान आहे असें गृहीत धरून केवळ शेतीच्या कल्याणाचे कायदे करणें चुकीचें आहे; संपत्त्युत्पादनाचे नवेनवे मार्ग आस्तित्वांत येत आहेत, शेतीचा परिपोष करणें हें जितकें अगत्याचें आहे तितकेंच या नवीन मार्गांच्या आड जीं विघ्नें येत असतील तीं दूर करणेंहि अगत्याचें आहे, असा या मुत्सद्द्याचा अभिप्राय पडला. या अभिप्रायानुरूप कायदेकानूंचें स्वरूप जेव्हां पालटूं लागलें, तेव्हां उद्योगधंदे आणि शेती या उभयतांत तीव्र विरोध उत्पन्न झाला व तो सर्वांच्या नजरेस येऊं लागला.

शेतीच्या सुधारणेकरतां संरक्षक जकाती कशा रीतीनें बसवाव्या लागल्या, याचा इतिहास प्रस्तुत पुस्तकांत देण्याचें आम्हांला प्रयोजन दिसत नाहीं. त्याचप्रमाणें जकातीच्या बाबतींत जे अनेक भानगडीचे व वादग्रस्त प्रश्न आहेत, त्यांतहि शिरण्याची आपल्याला अवश्यकता नाहीं. कारण, सांपत्तिकदृष्ट्या जर्मन राष्ट्र हल्लीं संक्रमणावस्थेंत कसें

आहे याचाच काय तो स्थूल दृष्टीनें विचार करावयाचा आहे. तथापि या विषयासंबंधानेंच दोन प्रश्न असे आहेत कीं, त्यांचें उत्तर देण्याचा थोडासा तरी प्रयत्न करणें अवश्य आहे. हे प्रश्न दिसावयाला मात्र भिन्न आहेत; पण वस्तुतः त्यांचें स्वरूप एकच आहे. ते प्रश्न असे:—(१) जर्मन लोकांनां पुरेल इतकें धान्य जर्मनींत पिकवितां येईल किंवा नाहीं, (२) आणि हा हेतु हल्लीं अमलांत असणाऱ्या कायद्यांनीं कितपत साध्य होतो ? जर्मनींतील शेती अलीकडे नवीन पद्धतीनें जरी सुधारूं लागली आहे, तरी लोकसंख्या वाढल्यानें व लोकांची रहाणी जरा वरच्या दर्जाची झाल्यानें, लोकांनां जें धान्य जितकें पाहिजे आहे तें धान्य तितकें कांहीं त्यांनां मिळत नाहीं, ही गोष्ट निर्विवाद आहे. तेव्हां ही स्थिति कशी सुधारतां येईल हा जर्मन राष्ट्रापुढें सध्यां महत्त्वाचा प्रश्न आहे. या प्रश्नाचा विचार करणाऱ्या लोकांत 'नाना मतांचा गलबला' चालू आहे; परंतु या भानगडींत वाचकांनां पाडण्याचा आमचा इरादा नाहीं. फक्त त्यांच्या म्हणण्याचा निष्कर्ष काय निघतो तोच येथें द्यावयाचा आमचा हेतु आहे.

शेतीची भरभराट होऊन ती टिकेल कशी, या विषयाला जर्मनीच्या घरगुती राजकारणांत बराच काळपावेतों अग्रस्थान दिलें पाहिजे, ही गोष्ट गृहीत धरून चालण्यास हरकत नाहीं. हा हेतु साध्य करण्याचे उत्तम उपाय कोणचे, या कामांत सरकारची मदत कोठपर्यंत व कशी घेतली पाहिजे, यासंबंधानें लोकांत बराच मतभेद आहे, व त्यांत एकवाक्यता होणेंहि बरेंच मुष्किलीचें आहे. शेतीचे अभिमानी लोक म्हणतात, जर्मनींतील धान्याचा बाजार जर्मनांच्याच ताब्यांत राहील अशी सरकारनें व्यवस्था करावी; रॅडिकल पक्षाचे लोक म्हणतात, सर्व जमिनींचे तुकडे पाडून लहानलहान शेतें जितकीं करतां येतील तितकीं सरकारनें करावीं. मतभेदाचा हा एक नमुना आम्हीं दाखविला. परंतु हीं व अशाच तऱ्हेचीं

इतर मतें विशेषशीं लक्ष्यांत न घेतलीं तरी चालेल. कारण, शेतीच्या धंद्याचा मनुष्याच्या जीवनाशीं निकट संबंध असल्यानें त्या धंद्याकडे सरकारनें नीट लक्ष्य पुरविलें पाहिजे; वाटेल त्यानें तो धंदा करावा किंवा करूं नये, आम्ही त्याच्या आड येणार नाहीं, अशी पूर्वींप्रमाणें उदासीन वृत्ति स्वीकारून चालावयाचें नाहीं, या मुख्य तत्त्वाबद्दल मात्र कोणाचा वाद नाहीं. वाद काय तो वर सांगितल्याप्रमाणें उपाययोजनेबद्दलचा आहे. केवळ राजकीयदृष्ट्या विचार केला तर असें म्हणणें भाग आहे कीं, परदेशच्या धान्यावर जर्मनीनें अवलंबून राहणें फार धोक्याचें आहे, ही गोष्ट प्रत्येक जबाबदार मुत्सद्द्यानें ध्यानांत घेतली पाहिजे. ग्रेटब्रिटनच्या संयुक्त राज्यांत शेतीचा ऱ्हास होऊं दिला ही फार खेदाची गोष्ट आहे; तथापि समुद्रावरील व्यापाराचे मार्ग खुले ठेवण्याचें सामर्थ्य आपल्या बलिष्ठ आरमाराच्या जीवावर त्या राज्यांत असल्यानें, तेथील लोकांना धान्याचा पुरवठा मुबलक होतो. जर्मनीच्या अंगांत अशा प्रकारचें सामर्थ्य नाहीं, आणि म्हणून धान्याचीं अंबारें, म्हणजे उत्तर आणि पूर्वेकडील धान्य पिकविणाऱ्या जमिनी, उत्तम प्रकारच्या सुपीक होतील इकडे देशकल्याणाच्या बाजूनें सरकारनें विशेष लक्ष्य पुरविलें पाहिजे हें निर्विवाद आहे. ही गोष्ट कट्ट्या संरक्षणवाल्यांना जितकी मान्य आहे, तितकीच कौंट व्हॉन कॅप्रिव्हीला देखील मान्य आहे. हा मुत्सद्दी उद्योगधंद्यांचा पूर्ण अभिमानी असून उद्योगधंदे हेंच राष्ट्राचें मुख्य जीवन, असें त्याचें ठाम मत होतें; तरी पण मजुरांना धान्य स्वस्त मिळालें पाहिजे हें म्हणणें त्याला कबूल होतें, आणि त्यामुळेंच त्याचें वरीलप्रमाणें मत झालें हें उघड आहे. १८९१ सालीं राइश्टागमध्यें त्यानें एकदां पुढें लिहिल्याप्रमाणें बोलून दाखविलें. "......दुसऱ्या राष्ट्रांबरोबर युद्ध करण्याचा प्रसंग जर्मनीवर आला तर त्या वेळेस धान्याकरतां लोकांच्या तोंडाकडे पाहण्याचा प्रसंग न यावा म्हणून स्वदेशां

तील शेती जितकी सुधारतां येईल तितकी सुधारणें जरूर आहे. भविष्यत्काळीं होणाऱ्या युद्धांत सैन्याला व इतर लोकांनां पुरेल इतकें धान्य देशांत पिकतें किंवा नाहीं, या गोष्टीवर युद्धांतील जयापजय अवलंबून राहील, अशी माझी पक्की खात्री झाली आहे....''

प्रस्तुत विषयाच्या या बाजूवरच संरक्षणवाल्यांचा विशेष रोख आहे. ते असें प्रदिपादन करतात कीं, उद्योगधंद्यांच्या वाढीबरोबर देशांतील धान्याचा संग्रहहि वाढला पाहिजे. धान्याकरतां परावलंबी होणें घातुक आहे. एका देशांतून दुसऱ्या देशांत जाणाऱ्या मालाचा मोबदला पैशांत न मिळतां मालाच्या रूपानेंच मिळतो, आणि जर्मनीसारख्या देशांत हा मोबदला विशेषेंकरून कच्चा माल आणि धान्य या रूपानेंच यावा हें अपरिहार्य आहे. अशा पद्धतीनें जर्मनीच्या मालाचा क्रयविक्रय जोंपर्यंत चालू आहे, जोंपर्यंत समुद्रावरील मार्ग सर्व राष्ट्रांनां व्यापाराकरतां खुले आहेत, –सारांश, जोंपर्यंत लढाईचा प्रसंग आलेला नाहीं,–तोंपर्यंत जर्मनीचें गाडें सुरळीत चालेल; अन्य प्रसंगीं चालणार नाहीं. संरक्षणवाल्यांची या विचाराच्या पुढची पायरी अशी आहे कीं, देशी कारखानदारांनां देशी बाजारांत प्रतिस्पर्धी येतां कामा नये; त्याबरोबरच देशांत धान्याचा इतका पुरवठा झाला पाहिजे कीं, परदेशांतून धान्य येण्याऐवजीं त्या देशांत आपलें धान्य पाठविण्याची जर्मनींत पात्रता आली पाहिजे; व राष्ट्रांमधील मोबदल्याकरतां जेवढा माल परदेशांत पाठवावा लागेल तेवढाच पाठवावा, जास्ती मुळींच पाठवूं नये. संरक्षणवाल्यांचें हें म्हणणें व्यवहारदृष्ट्या निरुपयोगी आहे इतकेंच नाहीं, तर तें शेतकऱ्यांनां सुद्धां कबूल नाहीं. स्वतःच्या संरक्षणाकरतां परदेशी धान्यावर जकात असावी इतकी गोष्ट त्यांनां कबूल आहे; परंतु परदेशांत धान्य पाठवून तेथें चांगली किंमत येत असली तरी तें तेथें विकूं नये अशी आडकाठी काय म्हणून असावी, असें ते साहजिक म्हणतील.

हल्लींचा इम्पीरियल चॅन्सेलर व्हॉन ब्यूलो याला हें म्हणणें पसंत आहे. त्यानें १९०६ सालापासून परदेशांतून येणाऱ्या धान्यावर जास्त संरक्षक जकात बसविली; एरवीं परदेशांत धान्य पाठविण्याच्या बाबतींत त्यानें कोणचीहि आडकाठी ठेविली नाहीं. शेतीच्या जोपासनेकरतां त्यानें जशा संरक्षक जकाती बसविल्या, तशाच उद्योगधंद्यांवर संरक्षक जकाती त्यानें कायम ठेवल्या आहेत; व याप्रमाणें दोघांचेंहि हित साधण्याकडे त्यानें आपली नजर ठेवली आहे. आणि पुष्कळ अंशानें हेंच करणें योग्य आहे. कारण, उद्योगधंद्यांचें जर संरक्षण करावयाचें तर शेतीचेंहि तसेंच केलें पाहिजे, उद्योगधंद्यांचें करावयाचें नसलें तर शेतीचेंहि करतां कामा नये, याप्रमाणें या दोन गोष्टी अन्योन्यावलंबी असावयाच्या, हें उघड आहे. धान्याची किंमत संरक्षक जकातीसारख्या कृत्रिम उपायांनीं वाढविली म्हणजे धान्य विकत घेणाऱ्या लोकांवर किंमतीच्या रूपानें बोजा वाढतो व हा बोजा शेवटीं कारखानदारांवर पडतो. कारण, त्यांनां मजूरी जास्त द्यावी लागते. आतां कांहीं उद्योगधंदे असे आहेत कीं, धान्यावरील संरक्षक जकाती उठवून परदेशांतील धान्य जरी वाटेल तितकें जर्मनींत येऊं दिलें तरी, त्यांच्याकरतां संरक्षक जकातींची अवश्यकता भासणार नाहीं. पण हें व्हावें कसें ? हल्लींच्या परिस्थितींत तरी धान्याला अनियंत्रित व्यापाराचें तत्त्व लावणें बरेंच धाडसाचें आहे, असें सर्वांच्या मतानें ठरलें आहे; आणि म्हणून त्या दिशेनें उद्योग करण्याचें कोणाच्याहि मनांत येण्याचा संभव नाहीं. याचबरोबर उद्योगधंदेवाल्यांची शेतकऱ्यांविरुद्ध नेहमींची तक्रार ही आहे कीं, "कांहीं तुला, कांहीं मला" या तत्त्वावर वागण्यास जमीनदार लोक केव्हांहि तयार नसतात. सरकार जे कायदेकानू करील ते प्रथम आपल्या फायद्याचे जितके असतील तितके चांगले, म्हणजे अगोदर आपल्या पोळीवर तूप घेऊन शिल्लक राहिलें तर तें दुसऱ्यांनीं घ्यावें, अशी त्यांची सदोदित

खटपट चालू आहे. 'ॲग्रेरियन लीग'सारख्या संस्थेचें काम कसें चालतें हें जर आपण पाहिलें तर वरील तक्रारींत बरेंच तथ्य आहे, असें आपल्याला दिसून येईल. त्या संस्थेचा हा हेतु स्पष्ट दिसतो कीं, शेतीपासून उद्योगधंद्यांकडे जर्मनचें जें संक्रमण चाललें आहे त्यांत वाटेल त्या उपायांनीं प्रत्येक ठिकाणीं कोणचा ना कोणचा तरी विक्षेप उत्पन्न करावयाचा! या कामांत 'कन्सरवेटिव' पक्ष अनुकूल असल्यानें राजकीयदृष्ट्या देखील 'लीग'ला फार महत्त्व आलें आहे. या सर्व कारणांमुळें लाडक्या लेंकराचा हट्ट बाप जसा पुरवितो तसें सरकार देखील या लोकांचा हट्ट पुरवूं लागलें आहे.

प्रकरण १३ वें

# अल्प प्रमाणाच्या शेतीचा उपक्रम

शेतकऱ्याचें जीवित जास्त सुखावह व्हावें, आणि दुसऱ्यांच्या जमिनी लागणीनें पतकरून शेतीवर उदरनिर्वाह करणाऱ्या लोकांचा योगक्षेम नीट चालावा, अशी सदिच्छा बाळगणाऱ्या लोकांत, कित्येकांच्या मतें, जर्मनींत पुष्कळ शेतांचे नंबर असे आहेत कीं, त्यांच्या विस्तृत-पणाला मर्यादा कशी ती नाहीं, व त्यामुळें देशाचें फार नुकसान होत आहे. हें नुकसान भरून काढण्याकरतां, तसेंच शेतीच्या मुलखांतून शहरांकडे माणसांचा जो ओघ चालला आहे तो थांबविण्याकरतां, आणि शेतांत काम करणाऱ्या मजुरांचा तुटवडा पडूं लागल्यानें उत्पन्न झालेली अडचण दूर करण्याकरतां, शेतांचा विस्तार मर्यादित करून तीं शेत-कऱ्यांच्या किंवा शेतीवरील मजुरांच्या ताब्यांत दिलीं असतां फार उपयोग होईल, असें त्यांचें मत आहे.

आंतांपावतों साधारणपणें असा समज होता कीं, प्रशियाच्या उत्तर व पूर्व भागांतील मोठ्या इस्टेटी नाहींशा करून त्यांच्या जागीं लहान इस्टेटी जर उत्पन्न केल्या, तर शेतीची दुर्दशा होईल; शेजारला मोठमोठे जमीनदार असल्यानें लहानलहान जमीनवाल्यांवर जो एक प्रकारचा नैतिक दाब असतो तो नाहींसा होईल. किंबहुना, शेतीचा धंदा अजीबात बुडेल, आणि स्थानिक स्वराज्याला मोठा धक्का पोंचेल. हा समज प्रायः बड्या बड्या जमीनदारांत विशेष दृढ असे. त्यांत सुदैव एवढेंच कीं, खुद्द सरकाराला हे विचार फारसे मान्य नव्हते. तथापि पूर्वीची ही स्थिति आतां पालटली आहे. मोठ्या इस्टेटी बाळगण्याला विशेष उत्तेजन दिल्यानें त्या इस्टेटींच्या मालकांचा सांपत्तिक फायदा होतो व राजकीय-दृष्ट्या त्यांचें वजन वाढून त्यांच्या हातांत अधिक सत्ता येते, ही गोष्ट

देशाच्या सर्वस्वीं फायद्याची नाहीं, तिच्यांत थोडासा तोटाहि आहे, हें आतां लोकांनां कळूं लागलें आहे. शेतीवर एखादें संकट आलें असतां लहान शेतकरी फारसे डगमगत नाहींत; कारण, त्यांचा पसारा विशेष मोठा नसल्यानें स्वतःच्या मेहनतीनें ते आपला बचाव कसा तरी करूं शकतात. मोठ्या शेतकऱ्यांची स्थिति परावलंबी असल्यानें ते संकटसमयीं बरेच डबघाईला येतात. याकरतां लहान इस्टेटवाल्यांची संख्या वाढवावी अशी सरकारला इच्छा झाली आहे. असें केल्यानें मोठ्या इस्टेटवाल्यांचें एकच पारडें जें हल्लीं फार जड आहे त्याच्या बरोबरीला दुसरें पारडेंहि तितकेंच जड करणें अवश्य आहे, असें सरकारला प्रामाणिकपणानें वाटत आहे. तथापि जुन्या आणि प्रमाणाबाहेर वाढलेल्या इस्टेटींनां धक्का न लावतां, आतिशय लहान प्रमाणावर देखील नवीन इस्टेटी कशा निर्माण करतां येतील, ही सरकारला अडचण येऊन पडली आहे. हल्लीं मजुरांची जी अडचण उत्पन्न झाली आहे ती अंशतः दूर करण्याकरतां हलक्या जमीनदारांची संख्या जितकी जास्त वाढेल तितकी चांगली असें बऱ्याच भारी जमीनदारांनां देखील वाटूं लागलें आहे.

अलीकडे या विषयाकडे लोकांचें लक्ष्य गेलें आहे यावरून असा कोणीं तर्क करूं नये कीं, जर्मनींत आतांपर्यंत लहान शेतें मुळींच नाहींत. थोड्याशा जमिनीवर आपला चरितार्थ चालवून टुमटुमितपणानें राहणारे पूर्वीपासूनच पुष्कळ शेतकरी आहेत. अशा शेतकऱ्यांची संख्या पश्चिम व मध्य भागांत, तसेंच बव्हेरिया आणि उत्तर समुद्राच्या लगतच्या प्रांतांत विपुल आहे. हे शेतकरी आपल्या जमिनींत धान्य न पेरतां जनावरांनां लागणारा सर्व प्रकारचा चारा तयार करतात. हें काम घरांतील बायका व मुलें यांच्या साहाय्यानें ते करून घेतात, मजूर लावीत नाहींत. असें करण्यांत त्यांचा फार फायदा होतो आणि त्यामुळें संख्या व विस्तार या मानानें अल्प प्रमाणाची शेती अलीकडे बरीच वाढली

आहे, असें सरकारी माहितीवरून दिसतें.

शेतीच्या विषयावर ज्यांच्या मतांनां विशेष मान मिळतो अशा लोकांचा असा ठाम अभिप्राय आहे कीं, स्वल्प विस्ताराचीं शेतें होतां होईल तितकीं जास्त वाढविल्यानें जर्मन शेतीचा भविष्यत्काळीं जसा उत्कर्ष होईल तसा तो अन्य उपायांनीं होणार नाहीं. प्रशियाच्या ज्या भागांत बडे जमीनदार आहेत त्या भागांतच आपत्काळीं शेतकऱ्यांची अगदीं त्रेधा उडून जाते; परंतु लहान शेतकरी—त्यांतूनहि विशेषें-करून जे आपल्या लहान जमीनींत गुरांनां उपयोगीं पडणारा हरतऱ्हेचा चाराच तयार करतात ते—संकटसमयीं असे डगमगत नाहींत, ही गोष्ट सर्वप्रसिद्ध आहे. ऱ्हाइनलंड आणि वेस्टफालियासारख्या पश्चिमेकडील प्रांतांत हा प्रकार फार पहावयास सांपडतो. कारण, स्वतःच्या मालकी-च्या किंवा दुसऱ्यांकडून कबुलायतीनें घेतलेल्या लहान जमिनी कर-णारे शेतकरी त्या प्रांतांत जितके आहेत तितके अन्यत्र नाहींत. ऱ्हाइन-लंड प्रांताच्या कांहीं भागांत तर अशी स्थिति आहे कीं, तेथील एकंदर जमिनींपैकीं निदान $\frac{1}{3}$ जमिनी कबुलायतीनें कुळांस लागण केलेल्या आहेत. हीं कुळें जमिनीच्या मालकांनां मोठ्या खुषीनें जास्त खंड देतात. मोठ्या शहराशेजारीं ज्या जमिनी असतात त्या जमिनींचीं कुळें या कामांत कधींहि तक्रार करीत नाहींत. कारण, शहरांत खपणारी फळ-फळावळ व गुरांचा चारा जमिनींत केला म्हणजे त्यांनां चांगलाच फायदा मिळतो. वेस्टफालिया प्रांताच्या आजूबाजूच्या भागांत पूर्वे-कडील जमीनदारांप्रमाणें बडे जमीनदार आहेत; परंतु त्यांची संख्या थोडी आहे. तसेंच छोटे जमीनदारहि पुष्कळ आहेत. जमीन कस-ण्याच्या चोहोंकडे प्रचलित असलेल्या सर्व पद्धती येथें दृष्टीस पडतात व सर्व प्रकारचें पीकहि या जमीनींत केलें जातें. उद्योगधंद्यांचीं किती-हि वाढ झाली असली तरी त्यापासून जमीनदारांचा व शेतकऱ्यांचा

कोणच्याहि प्रकारें तोटा झालेला नाहीं. यावरून असें एक अनुमान काढण्यास हरकत नाहीं कीं, मोठी व लहान शेती एका जागीं व एका काळीं भरभराटीस येऊं शकते, एकीपासून दुसरीचा अगदीं नाश होतोच असें कांहीं नाहीं.

पूर्वप्रशियांतील 'पोलिश' प्रांतांत जमीनीचें 'सेटलमेंट' करण्याकरतां गेलीं वीस वर्षें लँड कमिशन बसलें आहे. त्या कमिशनच्या अलीकडील एका रिपोर्टांत पुढील मजकूर आहेः—

"मजुरांचा पुरवठा निश्चितपणानें होत नसल्यानें मोठ्या इस्टेटीवर मोठें संकट येऊन गुदरलें आहे. आजला खात्रीची शेती लहान व मध्यम प्रमाणाच्या—म्हणजे २५ पासून ५० एकरांपर्यंतच्या—शेतांत साध्य होते. शेतकाम करणाऱ्या मजुरांचा तुटवटा पडला तरी अशा शेताच्या मालकाला अडचण वाटत नाहीं. त्याच्या जमिनींत पैदा होणारें धान्य बहुतेक त्याच्या गुराढोरांनां लागतें. यामुळें धान्याची किंमत कितीहि उतरली तरी त्यापासून त्याचें प्रत्यक्ष नुकसान फारसें होत नाहीं. गुरें पाळण्यानें व त्यांची जोपासना केल्यानें शेतीच्या कामांत त्याला बरीच काटकसर करतां येते. तसेंच शेणमुताचें खत किंवा दूधदुभतें आपल्याला जरूर तितकें ठेवून, बाकीचें लोकांनां विकतां येतें व त्यांत त्याला विशेष प्राप्ति होते. जनावरें प्रत्यक्ष त्याच्या देखरेखीखालीं असल्यानें त्यांची आबाळ होत नाहीं. बड्या जमीनदारांनां गुराढोरांपासून असा फायदा करून घेतां येत नाहीं. कारण, त्यांची जमीन मर्यादित नसल्यानें तिच्यावर त्यांनां स्वतः देखरेख करतां येत नाहीं, नोकरांमार्फत करावी लागते, व अशानें त्यांचा खर्च वाढतो. बड्या जमीनदारानें आपल्या जमीनींत ज्या सुधारणा केल्या आहेत त्या छोट्या जमीनदारानेंहि केल्या आहेत; तो जीं सुधारलेलीं यंत्रें (नांगर, आउतें वगैरे) वापरतो तीं हा सुद्धां वापरतो व स्वतःच्या जनावरांचें जें खत हा वापरतो तें गुणाला यत्कि-

चित् देखील कमी असत नाहीं. परस्परसाहाय्यकारी मंडळ्यांकडून छोट्या जमीनदाराला हलक्या व्याजावर कर्जाऊ पैसे मिळण्याला अड-चण पडत नाहीं. त्याचप्रमाणें शेतांतील व इतर माल विकण्याला व शेतीकरतां जो माल पाहिजे असेल तो विकत घेण्याला, या मंडळ्यां-कडून त्याला फार मदत होते. या सर्व कारणांमुळें मोठ्या जमीन-दारापेक्षां त्याला आपल्या जमिनीकरतां जास्त किंमत देणें विशेषसें अवघड वाटत नाहीं."

तथापि, मर्यादित विस्ताराचीं शेतें नवीन निर्माण करावयाचीं म्हणजे तीं, हल्लीं जीं मोठीं शेतें आहेत त्यांची छाटाछाट करूनच केलीं पाहिजेत; आणि असें करावयाला कोणीं लागलाच तर त्याला लोकांचा पूर्वग्रह आड येतो. पूर्वप्रशियांतील बडे जमीनदार आपल्या दारि-द्र्याची कहाणी नेहमीं सांगत असतात. तथापि वाजवीपेक्षां जास्त वि-स्तृत असल्यानें ज्यांच्यावर चांगली मेहनत होत नाहीं, ज्या अगदीं हीन स्थितीप्रत पोंचल्या आहेत, अशा जमिनींचे तुकडे पाडले असतां त्यापासून समाजाचें हित होईल, असें जर या जमीनदारांनां म्हटलें, तर ते प्राण गेला तरी ही गोष्ट कबूल करणार नाहींत; व अशा रीतीनें तुकडे पाडण्याची जर एखादी योजना कोणीं सुचविली तर ती हाणून पाड-ण्याचा शक्य तो प्रयत्न करण्याला ते कमी करीत नाहींत. मागील भागाच्या शेवटीं सांगितलेल्या ॲग्रेरियन लीगचें १९०७ सालांत पुढें लिहिल्याप्रमाणें मागणें होतें:—"सरकारच्या परवानगीशिवाय खाजगी रीतीनें कोणालाही आपल्या इस्टेटीची वांटणी करतां येऊं नये—किंवा हेंच निराळ्या शब्दांत सांगावयाचें झालें तर—एकाच्या कबजांतील ज-मीन दुसऱ्याच्या कबजांत जावयाची झाली तर त्याला स्थानिक अथवा प्रांतिक कोर्टाची, आणि "मिनिस्टर ऑफ् ॲग्रिकल्चर"च्या देख-रेखीखालीं असणाऱ्या "स्टेट बोर्ड ऑफ् कल्टिव्हेशन"ची मंजुरी

असावी. सरकारचें नुकसान व्हावें अशी आमची इच्छा नाहीं. तथापि शेतीच्या फायद्याकरतां सरकार लक्षावधि रुपये खर्चावयाला जर तयार होईल तरच त्याच्या हातून बरेंच राष्ट्रकार्य साधेल.''

वंशपरंपरेनें आलेल्या व दानविक्रयातीत अशा इस्टेटीला ''एन्टेल'' ( Entail ) अशी संज्ञा आहे. एन्टेलच्या कडक कायद्यांपासून मोठ्या इस्टेटींच्या मालकांचें संरक्षण अगोदरच होत आहे. आतां ही गोष्ट खरी आहे कीं, या कायद्यांचा फायदा पुष्कळ जमीनदारांनां अलीकडेच मिळूं लागला आहे. तथापि एवढ्यावरून लीगच्या म्हणण्याप्रमाणें विशेष व्यवस्था करण्याचें प्रयोजन दिसत नाहीं. प्रशियांत हें एन्टेलचें बंड फार आहे. पंचवीस हजार एकरांपासून तों दहा लाख एकरांपर्यंत जमीन असणारे प्रचंड जमीनदार त्या प्रांतांत बरेच आहेत, व त्या सर्वांनां या कायद्यांचा फायदा मिळतो. पुष्कळ लोकांचें मत असें आहे कीं, लहान जमीनदारांनां सुद्धां अशा प्रकारचे कायदे लागू करावे, म्हणजे एकाला जो फायदा मिळतो तो दुसऱ्यालाहि मिळूं लागेल. बव्हेरियांत असा कायदा पूर्वीं एकदां केला होता; परंतु तो फारसा उपयोगांत आणल्याचें दिसत नाहीं.

१८९०।९१ सालीं प्रशियांत कांहीं कायदे पास झाले आणि त्यांच्या आधारानें लहान विस्ताराचीं नवीन शेतें तयार करून तीं शेतकऱ्यांनां देण्याचा क्रम सुरू झाला. या कायद्यांन्वयें मोठ्या जमिनी सरकारला विकत घेतां येतात. सरकार मग त्या जमिनीचे निरनिराळ्या आकारांचे लहान तुकडे करतें आणि शेतकऱ्यांनां देऊन टाकतें. या शेतांबद्दल शेतकऱ्यांनां सरकारांत पैशाच्या रूपानें खंड द्यावा लागतो. या खंडापैकीं कांहीं भाग शेतसारा म्हणून असतो व तो कधींहि माफ होत नाहीं, व कांहीं भाग जमीनीच्या किंमतीच्या फेडीकरतां घेतला जातो. किंमतीची फेड या रीतीनें साडेछप्पन्न वर्षांत करावी लागते. या व्यवस्थेनें शेत-

करीवर्ग नेहमीं सरकारच्या नजरेखालीं राहतो व जमिनीशीं त्यांचा हित-संबंध बराच काळपावेतों टिकतो. सरकाराकडून घेतलेल्या जमिनी अवि-भाज्य असतात व त्यांच्यावर गहाणाचें व इतर बोजे मालकाला लादतां येत नाहींत. ही सर्व व्यवस्था पाहण्याचें काम सरकारनें 'जनरल कमि-शन्स' आणि 'रेंट बँक्स' यांजवर सोंपाविलें आहे. शेतांत घर बांधा-वयाचें झालें तर शेतकऱ्यांनां या बँकांकडून उसनवार पैसे मिळतात. याप्रमाणें शेतकरी व सरकार यांमध्यें देणेदार व सावकार यांचा संबंध उत्पन्न होतो व तो शेतकऱ्यांच्या बराच सुखाला लागतो. खाजगी साव-काराकडे जमिनी गहाण टाकल्या म्हणजे त्यांच्या हातून सरकाराइतक्या सवलती गहाण टाकणाराला मिळत नाहींत.

१९०५ सालअखेर प्रशियन राज्यांतील ११ प्रांतांत सरकारनें एकं-दर १,३१५ इस्टेटी खरेदी केल्या व त्या सर्वांचा मिळून ६७२,६८२ एकर विस्तार होता. सव्वासहा एकरांपासून तों साडेबासष्ट एकरांपर्यंत या जमीनींचे नंतर त्यांनीं तुकडे केले व ते निरनिराळ्या शेतकऱ्यांस वांटून दिले. या इस्टेटी मालकांनां फरोक्त करतां येऊं नयेत अशी सर-कारनें तजवीज करून ठेवली आहे. यामुळें जमिनी गहाण टाकून मन मानेल तसें कर्ज काढण्याचा मार्ग कुंठित झाला आहे. यायोगानें माल-काच्या मरणानंतर त्याच्या विधवेला आपल्या नातेवाइकाला जमिनीचा कांहीं भाग विकावयाचा झाला अथवा अन्य तऱ्हेनें द्यावयाचा झाला तर त्याला जनरल कमिशनची परवानगी घ्यावी लागते.

शेतीचा अभिमान बाळगणारे लोक, सरकारनें योग्य खबरदारी घेतली असतां, अल्प प्रमाणावरील शेतीच्या उलट नाहींत; परंतु मजु-रांनांहि याच पद्धतीवर लहान शेतें सरकारनें घेऊन द्यावीं, या गोष्टीला त्यांची असावी तितकी संमति नाहीं. तथापि या बाबतींत प्रशियन सर-कारनें हल्लीं चांगलें लक्ष्य घातलें आहे व सध्यांचा शेतकीखात्याचा मंत्री तर

या योजनेला सर्वस्वीं अनुकूल आहे. १९०७ सालच्या जानेवारी महिन्यांत या मंत्र्यानें एक हुकूम ( Order ) काढला आहे, व त्या हुकमाअवन्यें ज्या शर्तींवर शेतकऱ्यांनां लहान शेतें देण्यांत येतात त्याच शर्तींवर शेतांत व कारखान्यांत काम करणाऱ्या मजुरांनांहि देण्याची व्यवस्था केली आहे. याप्रमाणें पुष्कळशा मजुरांनां सरकारनें आपल्या खर्चानें लहान शेतें घेऊन दिलीं म्हणजे मजुरांची वाण सध्यां जी चोहोंकडे भासते ती, मजूरदार जमिनीला चिकटून राहिले म्हणजे, भासणार नाहीं असा त्यांचा अजमास आहे. जमिनींत मजुराला स्वत्व वाटावें म्हणून सरकारनें जमिनीला जी किंमत दिली असेल त्या किंमतीचा बोजा बारापासून पंधरा वर्षांपावेतों त्या जमिनीवर राहतो. ठरलेली मुदत पुरी झाली म्हणजे ही रक्कम हलक्या हप्त्यांनीं वसूल करण्यांत येते. शिवाय जमिनीवर जो सारा बसविलेला असतो, तो बिनसूट बिनतक्रार देत जाईन अशाविषयीं कुळाला जामीन द्यावा लागतो. याप्रमाणें मजूरदार करारानें बांधले गेले म्हणजे जमीन सोडून दुसरीकडे त्यांनां पळून जातां येत नाहीं. या जमिनी फार अल्प प्रमाणांत देण्यांत येतात, सर्वांत लहान तुकडा म्हणजे एक तृतीयांश एकराचा देखिल असतो. हें प्रमाण इतकें अल्प ठेवण्याचें कारण असें आहे कीं, आपल्या व बायकामुलांच्या पोषणाकरतां ( दुसऱ्यांच्या ) शेतांत मजूरीनें काम करणें मालकाला भाग पडावें. पोटाला पुरून उरेल इतकी जमीन जर त्याला दिली तर तो स्वतःच शेतकरी बनेल, दुसऱ्यांच्या शेतांत मजुरीनें काम करण्याची त्याला गरज राहणार नाहीं; व जी अडचण नाहींशी करण्याकरतां ही युक्ति योजावयाची ती अडचण तशीच्या तशीच कायम राहील. कारखान्यांत काम करणाऱ्या मजुरांनां जमिनी द्यावयाच्या झाल्या म्हणजे जी मुख्य गोष्ट पहावयाची असते ती ही कीं, कारखान्यांत त्यांनां बारा महिने रोजगार मिळू शकेल किंवा नाहीं. तसें असेल तरच ते

एका जागेला चिकटून राहतील व फावल्या वेळांत स्वतः किंवा एरवीं आपल्या बायकामुलांकडून आपल्या शेताची व्यवस्था करतील.

वर सांगितलेला हा उद्योग आरंभीं सरकारलाच करावा लागला. अलीकडे त्यांनीं आपले अंग काढतें घेण्यास सुरुवात केली आहे. लँड-बँक्स, को-आपरेटिव सोसायटीज् आणि यूनियन्स यांच्यावर हें काम आतां बरेंच सोपविलें आहे व कायद्यानें येणारे सर्व अधिकार सरकारनें या संस्थांनां दिले आहेत. अडीअडचणीच्या वेळीं पैशाची मदत लागली तर तीहि त्यांनां देण्यास सरकार तयार असतें.

सरकाराकडून मिळालेल्या जमिनींत शेतकऱ्यांनां घरेंदारें बांधण्याची सवड ठेवली आहे. त्या कामांत शर्त अशी असते कीं, शेंकडा ८५ ते ९० जमीन शेतीकरतां मोकळी राखली पाहिजे; बाकीच्या जमिनींत एक-मजली किंवा दुमजली राहण्याची इमारत व शेतीच्या उपयोगाकरतां निराळे सोपे किंवा पडव्या वाटल्यास लोकांनीं बांधाव्या.

या योजनेविरुद्ध शेतीच्या मजुरांची तक्रार अशी आहे कीं, अशा लहान जमिनी दिल्यानें फार तर भाजीपाला व शेळीचें दूध आम्हांला खावयाला मिळेल. शिवाय शेतांत जी मेहनत करावयाची ती तरी केव्हां? तर लोकांच्या शेतांत खपून जो वेळ मिळेल त्या वेळांत. या मजुरांची त्यांतून आणखी अशी ओरड आहे कीं, शेतांत नाना तऱ्हेचीं कामें नेहमीं करावीं लागत असल्यानें फुरसतीचा वेळ आपल्याला कसा तो मिळतच नाहीं. अशा स्थितींत सरकाराकडून एकतृतीयांश एकराचे तुकडें घेतलें तर स्वतःला मरेमरेपर्यंत काम करावें लागणार, अथवा मुलांबाळांनां तरी या जमीनींत खपावें लागणार. एतावता दुसऱ्यांच्या जमीनींत पोटा-करतां काम करण्यावांचून आमचा तरणोपाय नाहीं.

प्रकरण १४ वें

# शेतांतील मजुरांचा प्रश्न

१९०० सालीं सर्व जर्मन साम्राज्याची खानेसुमारी झाली, त्यावरून असें दिसतें कीं, ५६,३६७,१७८ लोकसंख्येंत ८२३,५९७ लोक परदेशांतील होते; म्हणजे शेंकडा १.४ असें त्यांचें प्रमाण होतें. आणि त्याच्या पूर्वींच्या १८९० च्या खानेसुमारीला ४९,४२८,००० लोकसंख्येंत ४३३,२५४ परदेशचे लोक होते; म्हणजे शेंकडा फक्त ०.८७ असें प्रमाण होतें. कृषिप्रधान प्रांतांत उन्हाळयाच्या दिवसांत शेतावर काम करण्याकरतां निदान तीन लक्ष मजूर परदेशांतून येतात, असा अजमास आहे. हे लोक एका ठिकाणाला चिकटून न राहतां इतस्ततः भ्रमण करणारे असतात. एकट्या प्रशियांत १९०५ च्या डिसेंबर महिन्यांत ५२४,८७४ परदेशचीं माणसें घरें करून राहिलीं होतीं. प्रशियाच्या एकंदर लोकसंख्येशीं (३६,७६७,२०२) या माणसांचें शेंकडा १.४ असें प्रमाण निघतें. यांपैकीं जवळजवळ तीन लाख माणसें आस्ट्रिया, हंगारी व राशिया या देशांतून आलेलीं होतीं व त्यांच्यांत शेंकडा साठ पुरुष होते. प्रशियांत १८९५ सालीं फक्त २०५,८१८ आणि १८८५ सालीं १५६,९७० परदेशी माणसें होतीं. यावरून ८५ सालापासून १९०५ च्या दरम्यानच्या वीस वर्षांत दरहजारीं ५.५ पासून १४.१ पर्यंत प्रशियांत परदेशी लोकांची वाढ झाली आहे असें स्पष्ट दिसून येतें.

देशी मजुरांचा, व अलीकडील कांहीं वर्षांत तर, हरएक प्रकारच्या मजुरांचा पुष्कळच तुटवडा पडूं लागला आहे; आणि त्यामुळें एकंदर देशांतील, व त्यांतहि विशेषेंकरून प्रशियांतील, शेतीला किती अडचण उत्पन्न झाली आहे हें वर दिलेल्या आंकड्यावरून स्पष्टपणें कळण्याजोगें

आहे. मजुरांचा पळपुटेपणा हा विषय सध्यां ज्याच्या त्याच्या तोंडांत आहे. प्रशियन पार्लमेंटांत देखील या विषयाचा नेहमीं खल चालू असतो. अलीकडच्या दहापंधरा वर्षांत शेतीच्या मुलखांतून बाहेर जाणाऱ्या लोकांचा जो विलक्षण ओघ चालू आहे तो तसा कां आहे याचें विवेचन आपण करूं लागलों म्हणजे, प्रशियांतील शेतीची अंत:स्थिति आपल्या डोळ्यांसमोर उभी राहते; आणि थोडासा विचार केला म्हणजे ही स्थिति लोकांनां गोत्यांत आणल्याशिवाय राहणार नाहीं असें वाटतें, व त्यामुळें शेतीची सुधारणा करूं पाहणाऱ्या लोकांच्या मनांत निराशेचें काहूर माजतें.

वस्तुत: आपल्या नजरेस असें येतें कीं, पुरातन काळापासून ज्यांच्या जिवावर आजपर्यंत शेती चालत आली, असे लोक सररहा आपला मुलुख सोडून दुसरीकडे जात आहेत. पोलिश प्रांत आणि प्रशियाचा मागसलेला उत्तरेकडील भाग या दोहोंतून शहरांकडे धांव घेणाऱ्या लोकांची संख्या मोठी आहे. यायोगानें मोठ्या जमीनदारांनां व एक-दोन मजूर सारा वर्षभर आपल्याजवळ बाळगणाऱ्या छोट्या शेतकऱ्यांनां सारखीच अडचण भासूं लागली आहे. पोलिश प्रांतांतून बर्लिन, ऱ्हाइनप्रांत व वेस्ट फालिया या बाजूला हजारों लोक गेल्याचा दाखला सरकारी कागदोपत्रीं सांपडतो. देशान्तर करणाऱ्या बहुतेक लोकांचा मूळचा व्यवसाय म्हटला म्हणजे शेतीचा. परंतु ते लोक शेतीकडे आतां ढुंकूनहि पहात नाहींत, त्यांचा सर्व ओढा उद्योगधंद्यांकडे आहे; कांहीं थोडे लोक मात्र खाजगी नोकरी पतकरतात.

प्राथमिक शाळांतील शिक्षकांच्या मदतीनें पूर्वप्रशिया प्रांतासंबंधानें सरकारनें जे आंकडे मिळविले आहेत, त्यांवरून असें स्पष्ट होतें कीं, जवळजवळ २४०० कुटुंबें १९०५।०६ सालीं तो प्रांत सोडून बाहेर गेलीं. यांपैकीं कांहीं थोडीं जर्मनी देश सोडून दुसऱ्या देशांत

गेलीं व बाकीचीं सगळीं जर्मनीच्या पश्चिम भागांत जाऊन राहिलीं. पर-ठिकाणीं जाण्याचा हा हव्यास तरुण पुरुषांत जसा दिसतो तसा तो मुलींत देखील दिसतो. या मुली कारखान्यांत मजुरीनें काम करतात किंवा खाजगी नोकरी करतात. कित्येक विणकाम व परटाचें काम करतात व कित्येक दुकानांत विक्रीच्या कामावर राहतात. समुद्र ओलांडून परदेशांत जाणाऱ्या लोकांत देखील शेतीच्या प्रांतांतून जाणाऱ्या लोकांचें प्रमाण औद्योगिक प्रांतांतून जाणाऱ्या लोकांपेक्षां फार मोठें आहे.

खेडेगांवांतील व शेतीवरील लोकवस्ती अशी कां मोडत चालली आहे, यासंबंधानें निरनिराळे लोक निरनिराळीं कारणें देत असतात. जमीनदार व त्यांचे कित्येक पुरस्कर्ते असें प्रतिपादितात कीं, अलीकडे मजूर लोक फार फाजील झाले आहेत, व त्यांचें डोकें अगदीं बिघडून गेलें आहे. या विषयाचा जरा खोलपणानें विचार करणारे लोक म्हण-तात कीं, जमिनीच्या मालकाच्या जशा अडचणी असतात तशाच मजु-रांच्याहि असतील आणि म्हणून ते शेतकाम सोडून जातात. पूर्वोक्त लोकांच्या म्हणण्याचा एक मासला म्हणून सायलीशियांतील एका जमीन-दाराचे उद्गार आम्हीं पुढें दिले आहेत. जमीनदारांची एकदां एक कांग्रेस (सभा) भरली होती, त्या सभेंत तो जमीनदार म्हणाला:— "अलीकडे मुलांनां शिक्षण फार मिळूं लागलें आहे; आणि त्याचा पारि-णाम असा होत आहे कीं, आम्हांला मजूर कसे ते मिळत नाहींत." जमीनदारांचे हे व अशा प्रकारचे इतर उद्गार वस्तुस्थितिदर्शक आहेत, असें बऱ्याच लोकांनां वाटण्याचा संभव आहे; व त्यांत काडीइतका देखील सत्याचा अंश नाहीं, असें आमचेंहि म्हणणें नाहीं. आम्ही म्हणतों तें इतकेंच कीं, मजुरांनां वाटेल तितकीं दूषणें दिलीं तरी त्यांपासून, शेतकऱ्यांनां जी अडचण भासते ती कां भासावी, या प्रश्नाचा उलगडा होत नाहीं.

यासंबंधांत सर्वांत महत्त्वाची गोष्ट म्हटली म्हणजे ही आहे कीं, शेतांत करावीं लागणारीं बहुतेक कामें अलीकडे यंत्रांच्या साहाय्यानें अल्पकाळांत होऊं लागल्यानें, पूर्वीं सबंध वर्षभर शेतांत काम करणारे कायमचे मजूर नाहींसे होऊन त्यांच्या जागीं तेवढ्या वेळेपुरतें काम करणारे हंगामी मजूर उत्पन्न झाले आहेत. शेतांतील हातकाम कमी झाल्यानें वर्षांतील बरेच महिने थोड्या मजुरांवर निभावून घेतां येतात. यामुळें हिंवाळ्याच्या दिवसांत जेवढे मजूर अवश्य लागतील तेवढेच शेतकरी आपल्याजवळ बाळगतो व कामाचा मोसम सुरू झाला म्हणजे हंगामी मजुरांवर आपलें काम भागवितो. कामाला मोताद झालेल्या कायमच्या मजुरांनीं कांहीं काळपावेतों हंगामी मजुरांप्रमाणें " वाहत्या गंगेंत हात धुवून घेण्याचा " उपक्रम केला. परंतु अशानें त्यांचा चारितार्थ नीट चालेना व आज या शेतावर तर उद्यां त्या शेतावर, या मधुकरवृत्तीचा शेवटीं त्यांना कंटाळा आला. सारांश, शेतकामांत यांत्रिक शक्तीचा जों जों जास्त उपयोग होऊं लागला तों तों अधिकाधिक मजूर शहरांकडे धाव घेऊं लागले. जमिनींचा विस्तार मोठा असला म्हणजे यंत्रांच्या साहाय्यानें शेती करणें विशेष फायद्याचें असतें; आणि म्हणून देशांतील मजुरांच्या पळपुटेपणानें ऐन हंगामाच्या वेळीं जर कोणाचें विशेष नुकसान होत असेल तर तें मोठ्या जमीनदारांचें होतें.

पूर्वप्रशियांतील जमीनदारांची स्थिति हर एव्हर्ट ( Herr Evert ) नांवाच्या गृहस्थानें पुढील शब्दांत वर्णिली आहे:—

" पश्चिमभागांतील हवेपेक्षां पूर्वभागांतील हवा शेतकामाला कमी अनुकूल असल्यानें तेथील काम लवकर आटोपून घ्यावें लागतें; पश्चिमेकडे हेंच काम साऱ्या वर्षभर चालू ठेवलें तरी त्यांत गैरसोय होत नाहीं. उन्हाळ्याच्या अल्प काळांत शेतकाम रगडून असतें. यामुळें हिंवाळ्यापेक्षां उन्हाळ्यांत शेतकऱ्याला मजूर, घोडीं आणि इतर जनावरें यांची जरूर

अधिक असते. ओझीं वाहणाऱ्या घोड्यांची जेव्हां त्याला जरूर नसते तेव्हां तो तीं त्यांच्या दाणावैरणींत शक्य तों काटकसर करून वर्षभर आपल्याजवळच बाळगतो. परंतु मजुरांच्या बाबतींत त्याला अशी कटकसर कशी करतां येईल? शेतकरी काय किंवा कारखानदार काय, त्यानें आपला धंदा काटकसरीनें चालविला तरच त्याचा तरणोपाय आहे. परंतु कांहीं कामधंदा नसतांनां एखादा शेतकरी विनाकारण जास्त मजूर जर जवळ बाळगूं लागला तर त्याच्या हातून काटकसर होते असें कसें म्हणावें? दाणे मळण्याचें वाफेचें यंत्र जोंपर्यंत निघालें नव्हतें तोंपर्यंत सारा हिंवाळाभर खळ्यावरील काम व घरांत लागणारे कपडे विणण्याचें काम मजुराला भरपूर असे. परंतु जिकडे तिकडे यंत्रांचा सुळसुळाट झाल्यानें समाजांतील हातकाम करणाऱ्या लोकांची फारच त्रेधा उडून गेली आहे. आपल्याजवळच्या मजुरांनां भरपूर काम देण्याकरतां दाणे मळणाऱ्या यंत्रांचा शेतकऱ्यानें उपयोगच करूं नये असें म्हटलें तर कसें चालेल? हिंवाळ्यांत आपल्याला जितके मजूर लागतील तितकेच वर्षाच्या बोलीनें ठेवावे व उन्हाळ्यांतील सुगीच्या दिवसांत हंगामी मजूर लावून काम करून घ्यावें, असें जर त्यानें केलें तरच तो काटकसरीनें वागतो असें कोणीहि म्हणेल. यावरून असें दिसून येतें कीं, शहरांत राहिल्यानें आयुष्याचे दिवस जरा जास्त सुखांत व चैनींत घालवावयास सांपडतात, म्हणूनच पूर्वभागांतील लोक आपली जन्मभूमि सोडून परक्या ठिकाणीं जाऊन राहतात असें नाहीं; तर बदललेल्या परिस्थितीमुळें त्यांनां तसें करणें भागच पडतें. यंत्रांचा विशेष उपयोग होऊं लागल्यानें जमिनींतून पिकें काढण्याचा पूर्वींचा व हल्लींचा प्रकार यांत जमीनअस्मानचें अंतर पडलें आहे. हिंवाळ्याच्या वाईट हवेंत जंगलकाम, रस्तेदुरस्ती व इतर जमीनसुधराईचीं कामें मजुरांच्या हातून करून घेतां येत नाहींत. अशा स्थितींत कायमच्या मजुरांनां काम तरी काय सांगावें या विवंचनेंत शेतकरी पडतो

आणि म्हणून कायमच्या बोलीनें मजूर ठेवण्याच्या भानगडींत तो पडत नाहीं. अशी परिस्थिति प्राप्त झाल्यानें कायमच्या बोलीनें हा काळपावेतों राहिलेले मजूर शहराकडे धांव घेतात यांत आश्चर्य कसचें ? इंगामी मजुरांकडून सुगीच्या दिवसांत काम करून घेण्यानें परंपरागत चालत आलेली समाजाची व्यवस्था बिघडते हें शेतकरी जाणून आहे; परंतु खर्चाच्या कामांत काटकसरीनें वागावें लागत असल्यानें तो कायमच्या मजुरांनां फाटा देतो यांत तो गैर तें काय करतो ? "

पण येवढ्यानें या विषयाचा पुरता विचार झाला असें नाहीं. शेती करण्याच्या नवीन पद्धती निघाल्यानें पूर्वींप्रमाणें मोठ्या इस्टेटींत मजुरांचा समावेश कां होऊं शकत नाहीं, तसेंच इंगामी मजुरांनां जमिनीचा आश्रय धरून राहणें कां सोईचें वाटत नाहीं, याचा वरील विवेचनावरून चांगला खुलासा होतो यांत शंका नाहीं. परंतु वर्षांतून बाराहि महिने मजुरांची वाण कां पडते याचा खुलासा मात्र त्यांत झालेला नाहीं. इंगामाच्या वेळीं मजुरांचा तुटवडा पडला तर तो रशिया, ऑस्ट्रिया आणि गॅलीशिया येथून मजूर मागवून भरून काढतां येतो, म्हणून ह्या प्रश्नाची ही बाजू इतकी महत्त्वाची नाहीं. आम्हीं वर सुचविलेला व वरील अवतरणांत समाविष्ट न झालेला प्रश्नच विशेष महत्त्वाचा आहे; व त्यांत दर्शविलेली स्थिति प्राप्त होण्याचीं कारणें काय असावीं, याची मीमांसा करणें अगत्याचें आहे. हीं कारणें एका वाक्यांत सांगावयाचीं झालीं तर असें म्हटलें पाहिजे कीं, उत्तर आणि पूर्व भागांतील शेतांत काम करणाऱ्या मजुरांनां हल्लीं ज्या स्थितींत समाजानें ठेवलें आहे त्या स्थितींत सुखानें आयुष्य कंठणें त्यांनां जवळजवळ अशक्य होतें. हलके पगार, भिकार घरें, समाजांत त्यांजवर असलेला बहिष्कार, मालकांचा करडा अम्मल, शहरांतील मजुरांनां मिळत असलेल्या नागरिक हक्कांचा त्यांचे ठिकाणीं अभाव, या सर्व गोष्टींमुळें मनुष्य

आणि नागरिक या नात्यानें आपण फार हीनदशेप्रत पोंचलों आहोंत, असें त्यांनां वाटतें आणि ती स्थिति सुधारण्याच्या उद्देशानें हजारों लोक आपलीं घरेंदारें सोडून पूर्वेकडून पश्चिमेकडील उद्योगधंद्यांत सरसावलेल्या शहरांचा आश्रय करीत आहेत. वेस्ट फालियामधील कोळशांच्या खाणींत काम करण्याकरतां पूर्वप्रांतांतील हजारों पोल्स घराणीं गेल्या थोड्या वर्षांत आपल्या जन्मभूमीला शेवटचा रामराम ठोकून चालतीं झालीं आहेत. डॉर्टमंड येथील खाणींत पोल्स आणि पूर्वप्रशियांतील लोकांचा भरणा बराच मोठा आहे. ऱ्हाइनलंडमध्यें देखील हीच स्थिति आहे. "मजुरांच्या अडचणीचें बीज मजुरांच्या अडचणींत आहे." हें वाक्य तिकडे बऱ्याच लोकांच्या तोंडून ऐकूं येतें आणि त्यांत पुष्कळ सत्य भरलें आहे. एल्ब नदीच्या पूर्वेकडील जमीनदारांच्या मोठ्या इस्टेटीवर राहून काम करणाऱ्या मजुरांनां प्रस्तुतच्या परिस्थितीमुळें आपला जीव नकोसा वाटूं लागला आहे. मजूर म्हटला कीं त्याला कोठें प्रतिष्ठा नाहीं, स्वतःचा अभिमान नाहीं, व पुढेंमागें आपली सुधारणा होण्याची आशाहि त्याला नाहीं, अशी त्याची दीनवाणी स्थिति झाली आहे. आणि त्या स्थितीकडे जर्मन समाज डोळे उघडून पहात देखील नाहीं.

शेतीच्या प्रांतांत राहणाऱ्या मजुरांनां घरांचे फार हाल सोसावे लागतात, याबद्दल पुरावा गोळा करण्याचें कारण नाहीं. एका प्रसिद्ध जमीनदारानें सरकारला अशी सूचना केली होती कीं, शेतमजूर आपलें घर सोडून शहरांत जाऊं लागला म्हणजे तेथें आपल्याला रहावयास चांगलें घर मिळेल असें त्यानें दाखविलें पाहिजे, व त्याला तसें दाखवितां आलें नाहीं, तर आपलें घर सोडून जाण्याचा त्याला प्रतिबंध करावा. ही सूचना योग्य असो अथवा अयोग्य असो, ती करणाऱ्यानें असें गृहीत धरलेलें दिसतें कीं, खेडेगांवांतील घरें शहरांतील घरांपेक्षां जास्त चांगलीं असतात. परंतु वस्तुस्थिति अशी नाहीं. निदान मोठ्या शहरांतील

मजुरांचीं घरें आरोग्यदृष्ट्या विशेष सोईचीं असतात. आतां त्यांनां भाडें जास्त द्यावें लागतें ही गोष्ट निराळी. प्रशियांतील सार्वजनिक आरोग्यखात्याकडून सरकारी रीतीनें जी माहिती प्रसिद्ध केली जाते, तीवरूनच मजुरांच्या घरांत पुरेशी जागा नसते, इमारतींची पडझड झालेली असते, जिकडे तिकडे अंधार आणि ओल, पुरेसें पाणी नाहीं, सांडपाण्याचा निकाल होण्याची व्यवस्था नाहीं, जनावरांचे गोठे राहण्याच्या जागेस अगदीं लागून, अशी कष्टमय स्थिति असल्याचें सिद्ध होतें. मजुरांनां मिळणाऱ्या पगारांतूनच घरांची सोय त्यांनां करावी लागते, ही गोष्ट या हालांच्या मुळाशीं मुख्यत्वेंकरून आहे यांत शंका नाहीं. मजुरीचे दर अलीकडे बरेच वाढले आहेत हें खरें; परंतु दिवसानुदिवस रहाणी जास्त महाग होत चालल्यानें जो जास्ती पगार मिळतो तो पोटापाण्यालाच खर्च होतो; इतर गोष्टींची सुधारणा करण्याला त्यांत वाव रहात नाहीं.

खेडेगांवची वस्ती सोडून मजूर शहरांकडे जे जातात ते मुख्यत्वेंकरून दारिद्र्यामुळें जातात, याबद्दल कोणाचा फारसा वाद नाहीं. ज्या प्रांतांत प्राप्तीच्या कराचें उत्पन्न जास्त तो प्रांत सधन आणि ज्या प्रांतांत हें उत्पन्न कमी तो प्रांत निर्धन अथवा बेताचा सधन, हें तत्त्व गृहीत धरून चालण्यास हरकत नाहीं. या तत्त्वाच्या अनुरोधानें प्रस्तुत विषयाचा जर आपण विचार केला, तर आपल्याला असें आढळून येईल कीं, ज्या प्रांतांत प्राप्तीवरील कराचें उत्पन्न जास्त त्या प्रांतांत दुसरीकडचे लोक आपल्याकडे आकर्षण करून घेण्याची शक्ति जास्त, व ज्या प्रांतांत हें उत्पन्न कमी त्या प्रांतांत आपले लोक आपल्याजवळच ठेवून घेण्याचें सामर्थ्य कमी. या म्हणण्याची सत्यता सरकारी कागदपत्रांवरून दिसून येते व या पॅरिग्राफच्या आरंभीं आम्हीं केलेला सिद्धान्त खरा ठरतो.

प्रशियाचा पश्चिमभाग पूर्वभागापेक्षां प्राप्तीच्या मानानें फार पुढें

असल्यानें तेथें मजुरांनां जितकी चांगली मजुरी मिळूं शकते, तितकी पूर्व किंवा उत्तर भागांत केव्हांहि मिळूं शकत नाहीं. उत्तरभागाचा वरील वाक्यांत आम्हीं समावेश केला, याचें कारण हें कीं, या बाबतींत ह्या दोन प्रांतांची स्थिति समसमान आहे. मात्र तेथील मजुरांच्या जाती काय त्या भिन्न आहेत. पूर्वेकडील मजूर प्राय: पोल्स आहेत आणि उत्तेरकडील "लो जर्मन" बुडख्यापैकीं आहेत व ते फार सोशीक व बुद्धिमंद आणि संकट आलें असतां न डगमगणारे आहेत.

शेतमजुरांनां पगार व पगाराच्या भरतीला कांहीं माल देण्याची प्रशियांत वहिवाट होती; पण अलीकडे ती बंद पडत चालली आहे. हा माल अमुक प्रकारचाच असावा असा नियम नाहीं. धान्य, बटाटे, इतर भाजीपाला, दूध, जनावरांनां व शेळ्यांनां चारा, यांपैकीं ज्याला जें सोईचें वाटेल तें तो मजुरांनां देत असे. या सर्व गोष्टी विचारांत घेऊन अंदाज केला तर सालाला पंचवीसपासून चाळीस पौंडांपर्यंत पूर्वीं माल व नक्त मिळून, व अलीकडे फक्त नक्त पगार मजुराला मिळतो असें दिसतें. उद्योगधंद्यांत गुंतलेल्या मजुरांनां सुधारलेल्या जीवनक्रमाचा जसा फायदा घेतां येतो, तसा फायदा घेण्याची कायद्यानें शेतमजुरांनां जर मोकळीक ठेविली असती तर पगार कमी मिळतो या गोष्टीला दाद न देतां ते घरच्याघरीं सुखानें राहिले असते. परंतु जर्मनींतील कायदे या कामांत त्यांनां बरेच नडतात. आपली सांपत्तिक स्थिति सुधारण्याकरतां संघशक्तीचा अवलंब करूं म्हटलें तर तें जर्मनींतील बहुतेक सर्व शेतमजुरांनां व खाजगी नोकरांनां कायद्यांच्या जाचामुळें शक्य नाहीं. प्राशियांत या कायद्याचें स्वरूप काय आहे हें मासल्याकरितां सांगितलें म्हणजे त्यावरून साऱ्या जर्मनींत प्रचलित असलेल्या कायद्यांची कल्पना होण्याजोगी आहे; आणि त्याकरतां त्या संस्थानांतील पूर्वींची थोडीशी हकीकत सांगितली पाहिजे.

खाजगी नोकरांनां अठराव्या शतकाच्या शेवटापावेतों प्रशियांतील मालक गुलामाप्रमाणें वागवीत असत. एकोणिसाव्या शतकाच्या आरंभीं किंग फ्रेडरिक तिसरा वुइल्यम यानें ही व इतर प्रकारची गुलामगिरी ( Serfdom ) बंद करण्याबद्दल एक फर्मान ( Ordinance ) काढला. या फर्मानाच्या योगानें प्रजेला व्यक्तिस्वातंत्र्य प्राप्त होऊन गुलामगिरी पार नाहींशी झाली. हें फर्मान पाहून मोठमोठ्या जमीनदारांचें धाबें गडाडून गेलें. आपल्या हाताखालचे लोक स्वतंत्र झाले म्हणजे ते फार शेफारतील, आपला हुकूम मानीत नाहींसे होतील, आणि त्यांजवरील आपला दरारा नाहींसा होईल, अशी त्यांनां भीति उत्पन्न झाली. त्यांनीं बादशहाला अशी विनंति केली कीं, "देशांतील इतर गुलामगिरी आपण नाहींशी केली तर त्याला आमची हरकत नाहीं; पण कसेंहि करून आम्ही आपल्या नोकराचाकरांवर जी सत्ता चालवितों ती कायम ठेवा." त्यांच्या भिडेला पडून बादशहानें हें म्हणणें मान्य केलें. "गुलामगिरी आम्हीं नाहींशी केली तरी धनी व चाकर यांच्यामध्यें आजपर्यंत जे संबंध चालत आले आहेत ते तसेच अबाधित राहतील" असें त्यानें फिरून जाहीर केलें. या जाहिरनाम्यांत आणखी असे कांहीं शब्द होते कीं, त्यांच्या आधारावर खाजगी नोकरांप्रमाणेंच शेतमजुरांवरहि त्यांचे मालक अनियंत्रित सत्ता चालवूं लागले. या फेर-जाहिरनाम्याचा अम्मल १८१० सालापासून आतांपर्यंत पूर्वेकडील प्रांतांत व उत्तर आणि पश्चिम या भागांतील कांहीं प्रांतांत सध्यां चालत आहे. या जाहिरनाम्याला १८१० चा "प्रशियन सरव्हंट्स ऑरडिनन्स" अशी संज्ञा आहे. या ऑरडिनन्सचा अम्मल खाजगी नोकरांवर, तसेंच आपल्या मालकांशीं कायमचा करार करून किंवा कोणच्याहि तऱ्हेनें त्याच्या घराचा किंवा जमिनीचा आश्रय धरून राहणाऱ्या मजुरांवर चालतो, व त्याचा परिणाम असा होतो कीं, मजुरांनां आपल्या धन्यांनीं

वाटेल ती आज्ञा केली तरी ती निमुटपणें पाळणें भाग पडतें. अशा स्थितींत या लोकांनां गुलामगिरींतच आपला काळ कंठावा लागतो. "गुलामगिरी" हे शब्द मात्र तोंडानें उच्चारावयाचे नाहींत इतकेंच! मालकाबरोबर केलेला नोकरीचा करार रद्द करण्याचें त्यांनीं मनांत आणलें तर, कायद्यानें इतक्या कांहीं अडचणी घालून ठेवल्या आहेत कीं, हा मार्ग स्वीकारणें जवळजवळ अशक्यच झालें आहे. कारखान्यांतील मजुरांनां ट्रेड यूनियनसारख्या संस्था स्थापन करून आपल्या मालकांविरुद्ध संप वगैरे करतां येतात, त्यांनां कायद्यांचा प्रतिबंध नाहीं; परंतु शेतकाम करणाऱ्या मजुरांची स्थिति याहून फार भिन्न आहे. १८५४ सालीं त्यांच्याकरतां एक कायदा पास केला आहे व त्या कायद्याअन्वयें त्यांनीं कधीं काळीं संप केला तर ते गुन्हेगार ठरतात आणि त्यांनां कैदेची शिक्षा भोगावी लागते. सारांश, आम्हीं वर सांगितलें आहे तेंच खरें कीं, या लोकांच्या स्थितींत व गुलामांच्या स्थितींत कांहीं अंतर नाहीं; 'गुलाम' हा शब्द मात्र तोंडानें उच्चारावयाचा नाहीं.

आतांपर्यंत प्रशियांतील स्थितीचें आम्हीं विशेषेंकरून वर्णन केलें खरें; परंतु त्या नमुन्याबरहुकुम इतर जर्मन संस्थानांत देखील "सरव्हंट्स ऑरडिनन्सीज" आहेत, व सर्व ठिकाणीं नोकरांनां व शेतमजुरांनां सारखाच त्रास सोसावा लागतो. नाहीं म्हणावयास साक्सेन संस्थानांत मात्र या बाबतींत बरीच सुधारणा झाली आहे.

"प्रशियन सरव्हंट्स ऑरडिनन्स"ला १८५४ सालच्या कायद्याची पुस्ती कशी जोडली आहे याचा उल्लेख वर आलाच आहे. हा कायदा फक्त शेतमजुरांनां व खाजगी नोकरांनां लागू आहे. त्या कायद्याच्या पहिल्या कलमाखालीं "जो कोणी नोकर आपल्या मालकाचा हुकूम हट्टानें पाळणार नाहीं किंवा कांहीं कायदेशीर सबबीशिवाय नोकरी सोडून जाईल त्याला, मालकानें फिर्याद केली तर, १५ शिलिंग दंड

अथवा तीन दिवसांपर्यंत कैद भोगावी लागते.''

जर्मनींत अपराध्यांनां शिक्षा करण्याच्या कायद्यांचें जें धोरण आहे त्या धोरणाशीं अगदीं विसंगत असें वरील कलम आहे. करार मोडला असतां इतर कोणच्याहि नागरिकाला दंड किंवा शिक्षा होत नाहीं; झालेलें नुकसान भरून देण्याची काय ती जबाबदारी कायद्यानें त्याच्या-वर येते. एखादे वेळेस संप झाला म्हणजे कारखान्यांतील मजूर मालकाला नोटीस न देतां काम सोडून चालते होतात. अशा वेळेस त्यांच्याकडून कोर्टमार्फत मालकाला नुकसान भरून मागतां येतें. कारखानदारांनां समाधान मानून घेण्याला ही जागा कायद्यानें राखली आहे; पण व्यवहारांत त्यांनां यापासून फारसा फायदा होत नाहीं. कारण, कोर्टाची पायरी चढण्याचा त्यांनीं विचार केलाच तर काळ व द्रव्य या दोहोंचा अपव्यय होतो. इतकेंहि करून कोर्ट काय निकाल देतें हें अनिश्चित असतें; व जो निकाल होईल तो असमाधानकारक असण्याचा बराच संभव असतो. यामुळें कारखानदार कोर्टांत फिर्यादी लावण्याच्या भानगडींत फारसे पडत नाहींत. असो. शेतमजुरांचा व खाजगी नोकरांचा प्रकार याहून फार भिन्न आहे. त्यांच्याकरतां केलेला कायदा अगोदरच कडक, व त्याचा अम्मलहि मन मानेल तसा होत असल्यानें त्याखालीं त्यांचा छळहि फार होतो. एखादा करार मोडला म्हणजे करार करणाऱ्या दोन पक्षांपैकीं कोणच्याहि एका पक्षाकडून तो मोडला जाण्याचा संभव असतो. या न्यायानें मालक व शेतमजूर यांजमधील करार मजुरांकडून जसे मोडले जातात तसे ते मालकांकडूनहि मोडले जात असले पाहिजेत. परंतु याबद्दल मालकांनां कधींहि शिक्षा होत नाहीं. शिक्षेचा सगळा मारा मजुरांच्या डोक्यावरच होतो. नोकराला चाकरी सोडावयाची झाली तर त्यानें मालकाला आगाऊ नोटीस दिली पाहिजे, अशी कायद्याची सक्ती. मालकानें मात्र नोकराला मध्य-

रात्रीं नोकरी सोडून जा म्हणून सांगितलें तरी कायदा त्याला कांहीं शासन करीत नाहीं. बरें, घटकाभर आपण अशी कल्पना करूं कीं, एखादा नोकर एकदम नोकरी सोडून चालता झाला. अशा नोकराला सक्तीनें पुनः कामावर आणतां यावयाचें नाहीं याबद्दल तर कोणाचा वाद नाहींना ? पण जर्मनींत वस्तुस्थिति मात्र अशी आहे कीं, अशा नोकराला सक्तीनें कामावर आणण्याचा प्रघात किती तरी चालू आहे. नोकराला कमी करावयाला मालकानें वाटेल ती सबब पुढें केली तरी ती मान्य होते; पण नोकराला नोकरी सोडण्याला किती जरी खरीं कारणें असलीं तरी तीं कोर्टांत मान्य होत नाहींत. कारण, जूरीची पद्धत चालू असणारीं सर्व स्थानिक कोर्टें जमीनदारांचीं पक्षपाती असतात.

शेतांतील मजुरांनां अनिष्टकारक आणखी अशी एक गोष्ट आहे कीं, अलीकडील पन्नाससाठ वर्षांत कायद्यांत ज्या कांहीं सुधारणा झाल्या आहेत, त्या सुधारणांतून हे मजूर अगदीं खड्यासारखे वगळले आहेत. एकोणिसाव्या शतकाच्या आरंभीं गुलामगिरी बंद करण्यांत आली, तेव्हांपासून जमीनदारांच्या कुळांची स्थिति चांगली सुधारली. ( त्यापूर्वीं जमीनदार या लोकांवर देखील नाना प्रकारचे जुलूम करीत होते. ) पण मजुरांची स्थिति सुधारण्याकडे कोणीच लक्ष्य पुरवीत नाहीं ! राजाच्या जाहीरनाम्याचा त्यांनां फायदा मिळेल या भीतीनें जमीनदार कसे आडवे पडले हें मागें आपण पाहिलें आहेच; असो. कुळांची वर सांगितल्याप्रमाणें स्थिति सुधारल्यानंतर कांहीं काळपावेतों जर्मनींतील शेतीची स्थिति चांगली होती. एकोणिसाव्या शतकाच्या पहिल्या पन्नास वर्षांत तर खरोखर अशी मौज झाली कीं, शेतीच्या मुलखांतच शहराच्या मुलुखापेक्षां लोकसंख्या जास्त झाली. तो वेळपावेतों जर्मनी हा कृषिप्रधान देश आहे असें म्हणण्यास मुळींच हरकत नव्हती.

पुढें मग उद्योगयुगाला आरंभ झाला. त्याबरोबर शहरें भरभरा-

टीस येऊं लागलीं; कारखान्यांत काम करणाऱ्या मजुरांचे संघ होऊं लागले; आम्हांला अमूक हक्क पाहिजेत, असें ते जोरानें म्हणूं लागले व हें त्यांचें म्हणणें कायदे करणाऱ्या मंडळींच्या कानावर जोरानें आदळूं लागलें. कित्येक लोक असें म्हणतात कीं, शेतकाम करणाऱ्या मजुरांचा हल्लीं जो प्रश्न उपस्थित झाला आहे त्याचा विनाकारण मोठा बाऊ करण्यांत येत आहे. परंतु या लोकांच्या लक्ष्यांत असें येत नाहीं कीं, गेल्या चाळीसपंचेचाळीस वर्षांत जे जे सुधारणेचे कायदे झाले, ते ते सर्व कारखान्यांतील मजुरांच्या हिताचेच झाले. १८६९ सालचा "लेबर कोड" नांवाचा प्रसिद्ध कायदा, व त्या कायद्यांत वेळोवेळ झालेली दुरुस्ती, यांत शेतमजुरांच्या नांवाचा नुस्ता उल्लेख देखील नाहीं. कारखाने व कलागृहें यांजवर देखरेख करण्याबद्दलचे जे रेग्युलेशन्स म्हणजे नियम आहेत त्यांत त्यांच्याकडे मुळींच लक्ष्य पुरविलेलें नाहीं. आजार, अपघात, अशक्तता यांचा विमा उतरण्याची तजवीज गेलीं २५ वर्षें कारखान्यांतील मजुरांकरतां चालू आहे. शेतमजुरांच्या बाबतींत ही तजवीज अलीकडे पण तीहि फार बेतानें व हळूहळू होऊं लागली आहे. अजूनपावेतों देखील शेतांत व जंगलांत काम करणाऱ्या मजुरांपैकीं पुष्कळांनां आजाराचा विमा उतरण्याचा फायदा मिळत नाहीं. आजारांत हातानें काम होईनासें झालें म्हणजे त्यांनां "पुअर लॉ" वर किंवा लोकांच्या तब्येतीप्रमाणें मिळणाऱ्या दानधर्मावर अवलंबून रहावें लागतें. कारखान्यांतील मजुरांप्रमाणें संघशक्तीच्या जोरावर आपल्या मालकांनां प्रसंगविशेषीं नडविण्याचा मार्ग कायद्यानें या लोकांनां मोकळा ठेवलेला नाहीं हें मागें सांगितलेंच आहे. आत्मसंरक्षणाचें हत्यार त्यांच्यापाशीं जर कोणचें असेल तर तें देशत्यागाचेंच होय. सरकार आपल्याकरतां जर काळजी वहात नाहीं तर जेथील मजुरांविषयीं तें काळजी वाहतें अशा शहरांत वस्ती करण्याचे व त्या मजुरांच्या पंक्तीला जाऊन बसण्याचें त्यांनीं जर

मनांत आणलें तर त्याबद्दल त्यांनां दोष कसा देतां येईल बरें ?

थोडे दिवसांपूर्वी एका जमीनदारानें मोठ्या दूरदर्शीपणानें पुढील उद्गार काढले होते:—" शेतमजुरांचे पगार आज आम्हीं जितके वाढविले आहेत तितके जर पंचवीस वर्षांपूर्वी वाढविले असते तर सध्यां जो आम्हांला मजुरांचा तुटवडा पडतो तो पडताना; शिवाय कमी पैशांत हल्लींच्यापेक्षां अधिक चांगले मजूरहि आम्हांला मिळाले असते. " हें म्हणणें खरें असो वा नसो; एक गोष्ट मात्र बरीच संभवनीय दिसते कीं, मजुरांची स्थिति सुधारण्याकरतां जे कायदे अमलांत आले त्यांचा फायदा शेतमजुरांनाहि मिळाला पाहिजे हें जसें अलीकडे थोडेंसें कळूं लागलें आहे तसें तें यापूर्वीच कळूं लागलें असतें; व उद्योगधंद्यांच्या प्रसारामुळें उत्पन्न झालेल्या नवीन परिस्थित्यनुरूप नवीन कायदे करण्याची १८८१ सालीं सरकारला जशी अवश्यकता वाटली, तशी या लोकांसंबंधानेंहि जर वाटली असती, तर आजला शेतमजुरांचा प्रश्न जितका बिकट होऊन बसला आहे तितका बसला नसता. बडे जमीनदार व लहान शेतकरी या दोघांची एकच चूक झाली; आणि ती ही कीं, जोंपर्यंत मजुरांच्या मनांत जमिनीच्या मालकांनां चिकटून राहण्याची बुद्धि पूर्वसंस्कारानुरूप जागृत होती, तोंपर्यंत त्यांच्या कल्याणाचा मार्ग त्यांनीं शोधून काढावयास पाहिजे होता; परंतु तसें कांहींएक न करतां उलट दडपशाहीचाच मार्ग त्यांनीं स्वीकारला व त्यामुळें आतां हें प्रकरण फारच विकोपाला गेलें आहे.

सर्वांच्या उपयोगाकरतां म्हणून पूर्वी ज्या जमिनी खुल्या असत त्या आतां बंदिस्त केल्या आहेत. त्याचप्रमाणें नक्त पगाराच्या जोडीला कांहीं माल देण्याची पूर्वी जी चाल होती तीहि मोडून टाकण्यांत आली आहे, व या दोन कारणांमुळें मजूर बरेच वैतागून गेले आहेत. जमिनी बंदिस्त झाल्यानें त्यांच्या जनावरांनां रानांत तोंड फिरवायला

जागा राहिली नाहीं. पगाराबरोबर धान्य, जळण, बटाटे लावण्याकरतां जमीन, जवस, आळशी वगैरे जिन्नस पूर्वी मिळत असत. ही चाल जरी सर्वथैव चांगली नाहीं, तरी तिच्यायोगानें मालकाच्या जमिनीविषयीं मजुरांच्या मनांत प्रेम राही. परंतु हा माल मिळावयाचें बंद झाल्यापासून त्यांनीं जमिनींत टाकभाड्यानें मेहनत करावी आणि त्या मेहनतीचें सर्व फळ मालकानें उपभोगावें, जमिनींत उत्पन्न झालेल्या भाजीचें एक डेंखहि त्यांच्या दृष्टीस पडूं नये, अशी स्थिति प्राप्त झाली. अर्थात् मजुरांचें जमिनीवरील व त्याबरोबरच मालकावरीलहि प्रेम नाहींसें झालें!

सर्वच जमीनदार आणि शेतकरी आपल्या हाताखालच्या लोकांच्या कल्याणाविषयीं बेफिकीर आहेत असा वरील विवेचनावरून जर कोणाचा समज झाला तर तो चुकीचा होईल. कारण, कांहीं माणसें या नियमाला अपवादादाखल आहेत. हीं माणसें हाताखालच्या मजुरांनां फार प्रेमानें वागवितात, व मजूरहि उलट त्यांच्यांशीं प्रेमानें वागतात. जेथें याच्या उलट प्रकार असतो तेथें देखील मालक जाणूनबुजून त्यांचा मुद्दाम दुष्टावा करतात असें नाहीं; तर मालक म्हणजे एक श्रेष्ठ प्राणी व मजूर म्हणजे क्षुद्र प्राणी, अशी पुरातन काळापासून जी एक समजूत चालत आली आहे ती या मालकांच्या मनांत अजूनपावेतों अगदीं खिळून बसली आहे व त्यामुळें ते मजुरांनां हलके लेखतात. साक्सेनमधल्या एका लेखकानें जमिनीच्या मालकांनां पुढें लिहिल्याप्रमाणें उपदेश केला आहे:—

"आपल्याला पुढें चांगले दिवस येतील अशी मजुराच्या मनांत आशा उत्पन्न करण्याचा मनापासून यत्न करा; मनुष्याच्या वस्तीला योग्य असें घर त्याला रहावयास द्या; आजारांत त्याची व त्याच्या कुटुंबांतील माणसांची अधिक काळजी घ्या; तो कामावर असतांना त्याच्या जीवाला व शरीरप्रकृतीला नीट जपत जा; आणि सर्वांत जास्ती हें कीं, कारखान्यांत काम करणारा मजूर आपणाहून श्रेष्ठ, आपण त्याच्या मानानें हलक्या

दर्जाचे आहों, ही त्याच्या मनांतील भावना काढून टाका. मजुरांच्या अडचणी काय आहेत त्या ज्या मानानें तुम्ही लक्ष्यांत घ्याल त्या मानानें मजुरांच्या बाबतींतील तुमची अडचण नाहींशी होईल. मजुरांच्या जशा सांपत्तिक अडचणी आहेत तशा सामाजिकहि आहेत व या सामाजिक अडचणींखालींच ते विशेष दबून गेले आहेत.''

ज्या जमिनींत काम करावयाचें त्या जमिनीविषयीं मजुरांच्या मनांत प्रेम उत्पन्न व्हावें आणि त्यांनीं ती सोडून जाऊं नये, अशाबद्दल सांप्रत बऱ्याच ठिकाणीं यत्न चालू आहेत आणि ह्या यत्नांनां यश यावें अशी कांहीं उदार अंत:करणाच्या लोकांची मनापासून इच्छा आहे. आणि वास्तविक पाहिलें तर मजुरांच्या अडचणी दूर करण्याचा, त्यांचें जीवित सुखावह करण्याचा व त्यांच्याविषयीं मालकांच्या मनांत प्रेम उत्पन्न करण्याचा उद्योग अशा उदारवृत्तींच्या माणसांकडूनच व्हावयास पाहिजे. परंतु अशीं माणसें अद्यापि थोडीं आहेत, ही खेदाची गोष्ट आहे. पुष्कळ जमीनदार आपल्या जुन्या कल्पना अजून उराशीं बाळगून आहेत. हाताखालचा मजूर म्हणजे पायाखालीं तुडविण्याचा प्राणी हा विचार त्यांच्या डोक्यांतून अजून जात नाहीं. नोकरीचा जाच कमी करून मजुरांनीं आपण होऊन आपल्याकडे नोकरी मागावयाला यावें, अशी कांहींतरी योजना करावयाची सोडून हे लोक उलट मजुरांनीं जास्ती पगार मिळणाऱ्या ठिकाणाला जाऊं नये व आपल्या मनाजोगें काम मिळवूं नये, या हेतूनें त्यांच्या मार्गांत नव्या नव्या अडचणी व हरकती उत्पन्न करीत आहेत. १९०७ सालीं प्रशियन पार्लमेंटांत एका बड्या जमीनदारानें असें स्पष्ट सांगितलें कीं, "प्रत्येक वयांत आलेला मजूर म्हणजे आम्हीं त्याच्यावर खर्च केलेलें मूर्तिमंत भांडवल होय ! पण मजूर वयांत आला रे आला कीं, तो कारखान्याकडे धांव घेतो व कारखानदाराला मात्र पदरची एक पैहि खर्च न होतां आयता फायदा मिळतो.''

## शेतांतील मजुरांचा प्रश्न

कित्येक वर्षांपूर्वी प्रशियन पार्लमेंटांतील कन्सरवेटिव पक्षाच्या सभासदांनीं शेतमजुरांची स्थिति सुधारण्याचे अनेक उपाय सुचविले होते. त्यांपैकीं सरकारनें कांहीं थोडे मान्य केले. मजूर व मालक यांच्यांत मध्यस्थी करणारे दलाल प्रशियांत फार आहेत व त्यांचें प्रस्थहि बरेंच माजलें होतें. "इंडस्ट्रियल कोड"मध्यें सरकारनें सुधारणा करून दलालांचें बंड मोडलें आहे. तेव्हांपासून मालकाच्या हातून सुटलेला पैसा सबंधच्या सबंध मजुरांच्या हातांत जाऊं लागला आहे व दलालांचें कमिशन नाहींसें झालें आहे. सुगीच्या दिवसांत शेतात काम करण्याकरतां लष्करांतील सोजीर दरवर्षी पाठविण्याचा क्रम सुरू झाला आहे, व अशा सोजिरांची संख्या दिवसानुदिवस वाढत्या प्रमाणावर आहे. उदाहरणार्थ, १९०७ च्या उन्हाळ्यांत सुगीच्या दिवसांत "फर्स्ट आर्मीकोअर"मधील सात हजार लोक पूर्वप्रशियांतील मोठमोठ्या शेतांत काम करण्याकरतां पाठविले होते. राजदरबारांत प्रवेश असणाऱ्या आपल्या स्नेह्यांच्या मार्फत बड्या जमीनदारांनीं ही पद्धति पहिल्यानें सुरू केली. आतां छोट्या जमीनदारांनां देखील अशा प्रकारची मदत बिनतक्रार मिळते. दक्षिणेकडील प्रांतांत सुद्धां अलीकडे सोजिरांची मदत मिळूं लागली आहे.

जमीनदारांच्या वर्गांत बरेच लोक असें म्हणणारे आहेत कीं, लष्करी नोकरी दोन वर्षें केलीच पाहिजे असा जो नियम आहे, तो रद्द करून त्याच्या ऐवजीं एक वर्षाची मुदत केली म्हणजे शेतकामाला बरेच लोक मोकळे होतील. जमीनदार आपल्या फायद्याकडे नजर पुरवून सरकारला वरीलप्रमाणें अनेक युक्त्या सुचावितात. त्यांत सोय कोणची, गैरसोय कोणची, याचा विचार ते मुळींच करीत नाहींत; आणि म्हणून सरकारांत त्यांच्या सूचना प्रायः मान्य होत नाहींत. मजुरांनीं करार मोडला असतां कायद्यानें त्यांस हल्लींच्यापेक्षां कडक शिक्षा करावी, अशाबद्दलची त्यांची

खटपट मात्र जोरानें चालू आहे. राजकीय विचारांचे ओघ अगदीं उलट दिशेनें कसे वहात असतात याचें ही चळवळ प्र हरण आहे. करार मोडला म्हणजे मजुरांनां शिक्षा करण्या कलम आहे तें रद्द करून दिवाणी कोर्टामार्फत झालेलें नुकसा घेण्याचा कायदा इतरांप्रमाणें त्यांनांहि लागू करावा, अशी पक्षाची खटपट चालू आहे. उलट बाजूनें जमीनदार असा प्र आहेत कीं, शिक्षा किंवा दंड अशी जी कायद्यानें सवलत ठे ती नाहींशी करून तिच्या ऐवजीं फक्त कैदेचीच शिक्षा ठेविल तसेंच करार मोडून गेलेल्या मजुराला जो कोणी दुसरा मालक वर ठेवील त्याला, जो दलाल नवीन मालक गांठून देईल त्या करार मोडण्याबद्दल ज्या दुसऱ्यांनीं फूस दिली असेल त्यांनां, असावे, असेंहि त्यांचें मागणें आहे.

मजुरांची अडचण केव्हां नाहींशी होईल ती होवो, सध्यां पुरते दुसऱ्या देशांतील मजूर आणून काम भागवून घेण्याचा आहे. प्रशियाच्या पूर्व आणि उत्तर भागांत सर्व ठिकाणीं, राष्ट्राच्या इतर सर्व भागांत, थोड्याबहुत प्रमाणानें उन्हाळ्या वातीपासून पावसाळा संपेपर्यंत परदेशचे मजूर शेतकामावर सररहा वहिवाट चालू आहे. मोठे जमीनदार तर सर्वस्वीं या वर अवलंबून राहतात. पूर्वीं रशियांतून बरेच मजूर येत हो आतां गॅलीशियामधून फार येतात. हंगाम पुरा झाला म्हण परत आपल्या देशांत जातात; जर्मनींत त्यांनां कोणी राहूं देत

परदेशी मजुरांनां पगार थोडा असतो; पण धान्य व राहण्य ( दोन्हीहि अगदीं कनिष्ठ प्रतीचीं ) त्यांनां बहुतकरून देण्य यामुळें कांहीं थोडे पौंडांची माया परत जातेवेळीं त्यांचेपाशीं राहते. या मजुरांनां वागविण्यांत मालक दयामाया मुळींच

नाहींत. उलट ते त्यांचा द्वेषच करीत असतात व अगदीं निरुपाय म्हणून त्यांनां पदरीं बाळगतात. आणि याबरोबरच हेंहि कबूल करावयास पाहिजे कीं, मजूर देखील मालकांचा सोशीकपणा पुरता कसाला लावून पाहतात, आणि आपले करार मोडून चालते होतात!

प्रचलित कायद्यांमुळें शेतमजूर राजकीय विषयांत मन घालीत नाहींत, आणि अगदीं अल्प प्रमाणांत देखील, त्यांच्यांत संघशक्ति उत्पन्न झालेली नाहीं. या कामांत त्यांचें दारिद्य त्यांनां फार नडतें, व एकजुटीनें काम करण्याचा त्यांनां जर कोणीं मार्ग दाखविला तर ते त्याच्याकडे साशंक दृष्टीनें पाहतात; व आपण जर या नादाला लागलों तर आपल्या पदराला खार लागल्याशिवाय राहणार नाहीं, असा त्यांचा अजमास असतो. शेतीच्या मुलखांत वरिष्ठ प्रतीच्या लोकांच्या हातांत सर्व सत्ता, मन मोकळें करून मजुरांनां बोलण्याचीसुद्धां चोरी, अशा स्थितींत त्यांनां एखादा स्थानिक पुढारी देखील मिळत नाहीं. त्यांच्यांत चैतन्य उत्पन्न व्हावें अशी प्रजासत्तावादी (Social Democrats) कांहीं खटपट करतात, पण ती फक्त निवडणुकीच्या धामधुमींत; व त्या वेळीं सुद्धां त्यांच्या प्रयत्नांनां यावें तसें यश येत नाहीं.

या विषयाचा ज्यांनीं अगदीं त्रयस्थपणानें विचार केला आहे, आणि शेतमजुरांच्या मनाची खरी स्थिति काय आहे, हें समजून घेण्याचा सरळपणानें यत्न केला आहे, त्यांनां असें कळून येतें कीं, मंडळ्या अथवा समाज स्थापन करण्याबद्दलचे व कराराचे प्रस्तुतचे कायदे फार पक्षपातीपणाचे व हल्लींच्या सुधारणेच्या काळाशीं विसंगत आहेत. मजुरांचे पगार हलके असतात, आयुष्य सुखांत घालविता येईल अशा साधनांची त्यांनां अनुकूलता नसते, यामुळें शेतीच्या कामाला पुरेसे मजूर मिळत नाहींत हें तर खरेंच; परंतु ही अडचण उत्पन्न होण्याला विशेष बलवत्तर जर कोणचें कारण असेल

तर आम्हीं वर सांगितलेली कायद्यांतील विषमताच होय. या कायद्यांत सुधारणा करण्याचे आजवर यत्न झाले; पण ते फार अपुरे आहेत. या कायद्यांत माणुसकीला शोभेल अशी दुरुस्ती झाली पाहिजे. ती दुरुस्ती होईपर्यंत, किंबहुना ती झाल्यावर पुढें कांहीं वर्षेंपावेतों देखील, शहरांकडे जाणारी मजुरांची यात्रा अशीच चालू राहील.

प्रकरण १५ वें

# को-ऑपरेशन अथवा परस्परसाहाय्य

एकमेकांच्या फायद्याकरतां जुटीनें वागण्याचा जर्मन लोकांचा स्वभावच आहे, किंबहुना परमेश्वरानें ही उपजत बुद्धि त्यांनां दिलेली असते, असें म्हणण्यास हरकत नाहीं; आणि ही त्यांची बुद्धि फार पुरातन काळापासून जगाच्या अनुभवास येत आहे. या बुद्धीला अलीकडच्या काळांत परिणत स्वरूप प्राप्त होऊन को-ऑपरेशनची चळवळ निघाली आहे व तिचा परिणाम हरएक बाबतींत दृग्गोचर होऊं लागला आहे. अगदीं कमींत कमी म्हटलें तर पंधरा जर्मनांत एक जर्मन कोणत्याना कोणत्या तरी को-ऑपरेटिव मंडळीचा सभासद असतो. संयुक्त ब्रिटिश राज्य म्हणजे को-ऑपरेशनचें माहेरघर, पण तेथें विसांत एक असें देखील प्रमाण पडत नाहीं.

जर्मन को-ऑपरेटिव मंडळ्यांचे चार मुख्य वर्ग आहेत व प्रत्येक वर्गांत अनेक मंडळ्यांचा समावेश केला आहे. हे चार वर्ग असे आहेत: (१) जनरल यूनियन, (२) सेंट्रल यूनियन, (३) रेफसननें—(Raiffeisen) घालून दिलेल्या नियमांअन्वयें चालणाऱ्या शेतकऱ्यांच्या मंडळ्या आणि (४) इम्पीरियल यूनियन. १९०५ सालापासून नंबर तीन व चारच्या मंडळ्या एकत्र झाल्या आहेत व त्यांचा संबंध विशेषेंकरून शेती व शेतकरी यांच्याशीं असतो.

या मंडळ्यांचे हेतु मुख्यत्वेंकरून सहा आहेत:—पत पाहून रकमा कर्जाऊ देणें, मग कर्ज मागणारा शेतकरी असो वा इतर उद्योगधंदा करणारा असो; कच्चा माल विकत घेऊन त्याचा पुरवठा करणें; निरनिराळा माल उत्पन्न करणें; कारखान्यांत तयार झालेल्या मालाचा व्यापार करणें; धान्य सांठविणें आणि घरेंदारें बांधणें. या मंडळ्यांपैकीं

कांहींनां सरकारचा आश्रय आहे व कांहीं सरकारी मदतीची अपेक्षा मुळींच बाळगीत नाहींत.

१९०७ च्या आरंभाला सर्व जातींच्या मंडळ्यांची संख्या २५,७१४ होती व त्यांतील सभासदांची संख्या ३,८६०,१४३ होती. यांत क्रेडिट(पत) सोसायट्यांची संख्या १५,६०२ व को-ऑपरेटिव स्टोअर्सची संख्या २,००६ होती व त्यांतील सभासदांची संख्या अनुक्रमें २,११३,६५३ आणि १,०३७,६१३ होती. शेतीवर उदरनिर्वाह करणारे व विशेषतः लहान शेतकरी यांचा जर्मनींत को-ऑपरेटिव मंडळ्यांकडे फार ओढा आहे.

एकट्या प्रशियांत रजिस्टर झालेल्या को-ऑपरेटिव मंडळ्या १८९० त २,९१२;१८९५ त ५,१३५; १९०० त ९,४२९ आणि १९०५ त १३,३३१ होत्या, आणि १९०४ सालाला दर मंडळींत सभासदांची संख्या सरासरीनें १४७ होती. प्रशियांत देखील पुष्कळशा क्रेडिट सोसायट्याच आहेत.

क्रेडिट सोसायट्यांपैकीं बऱ्याचशा खेडेगांवाकरतां व शेतकीसंबंधाच्या म्हणजे "रूरल" आहेत. त्यांपैकीं कांहीं "लिमिटेड" कंपन्यांच्या तत्त्वावर चालतात. रेफेसन मंडळ्या मात्र याच्या उलट तत्त्वावर चालतात. कच्चा माल उत्पन्न करणाऱ्या मंडळ्यांत चांभार, शिंपी, रोट्या व मेवामिठाई करणारे, धातूचे कारागीर, जिल्हई देणारे, हजाम, सांधकाम करणारे आणि रंगवारनिसाचें काम करणारे, या लोकांनीं स्थापन केलेल्या मंडळ्या प्रमुख आहेत. औद्योगिक कामाच्या मंडळ्या धान्याच्या गिरण्या, वीज व गॅस तयार करण्याचे कारखाने, सुतारकाम आणि खाटकांचीं दुकानें चालवितात; शेतकामाच्या मंडळ्यांपैकीं बऱ्याच मंडळ्या मळणीचें काम करतात व बाकीच्या वाफेनें चालणारे नांगर व इतर शेतीचीं यंत्रें खरेदी घेऊन तीं चालवितात. वेअरहाउस

सोसायट्या टेबलें, खुर्च्या, कपाटें, विटा, कातडीं, जनावरें, कोंबडीं, बदकें अंडीं, धान्य, स्पिरिट आणि तंबाखू–सिगारेट्स वगैरे–यांचा व्यापार करतात. उद्योगधंद्यांनां लागणाऱ्या कच्च्या मालाच्या मंडळ्यांत, टोपल्या करणारे, शिंपी, लांकुडकाम करणारे, चांभार, यंत्रें जुळविणारे, लोहार आणि डाखकाम करणारे व अशाच प्रकारच्या इतर कारागिरांचा समावेश केलेला असतो; कारखान्यांत माल उत्पन्न करणाऱ्या मंडळ्यांत रोटीवाले, छपाईचें काम करणारे, दारू गाळणारे, सामानसुमान व विटा करणारे, सूत काढणारे व विणणारे यांचा समावेश केलेला असतो; शेतीचा माल उत्पन्न करणाऱ्या मंडळ्या दूधदुभत्याचे कारखाने, स्पिरिट गाळण्याचे कारखाने, द्राक्षांचे मळे, धान्याच्या गिरण्या, फळबागा, मुरांब्यासारख्या पदार्थांचे कारखाने, व खाण्याचे पदार्थ पुष्कळ दिवस टिकतील अशी व्यवस्था करण्याचे कारखाने चालवितात. हरकामाच्या (Miscellaneous) सोसायट्या पाण्याचा पुरवठा करणें, विमे उतरणें, जमिनी विकत घेऊन त्यांची वाटणी करणें, ग्रंथ छापणें, हवा खाण्याकरतां जाणाऱ्या लोकांची घरादाराची व इतर व्यवस्था ठेवणें, हीं कामें करतात.

जर्मनींत शेतीसंबंधीं मंडळ्यांची व त्यांतील सभासदांची संख्या अलीकडे फार वाढली आहे. १९०६ अखेर या मंडळ्यांची एकंदर संख्या २०,४३२ होती आणि त्यांच्या हातून लहान शेतकऱ्यांचें जितकें कल्याण झालें आहे तितकें कायद्यांनीं किंवा संरक्षक जकातींनींहि केलें नाहीं.

जुन्याला चिकटून राहण्याची जर्मन शेतकऱ्याची संवय पुष्कळ गोष्टींत दिसून येते. परंतु समाज व मंडळ्या स्थापन करण्याची नवी पद्धति मात्र त्यानें चट्‌कन अंगीकारली. त्यामुळें त्याला खाजगी पेढ्या आणि सावकार यांच्याकडून ज्या अटींवर कर्ज मिळत होतें त्यापेक्षां सौम्य अटींवर मिळूं लागलें, व एकंदरींत त्याची पत वाढली; मधल्या दला-

लाला चिरीमिरी दिल्याशिवाय परस्पर कारखानदारांकडून खत आणि इतर कच्चा माल मिळूं लागला; स्वतःपाशीं पैशाचें त्राण नसल्यानें शेतीचीं यंत्रें त्याला उपलब्ध नव्हतीं तीं झालीं, व वाफेनें चालणारा नांगर व मळणीचें यंत्र यांच्या साहाय्यानें तो शेतकाम करूं लागला; जमिनींतील उत्पन्न म्हणजे धान्य, बटाटे, फळफळावळ, दूध, अंडीं वगैरे विकण्याचे स्वतःला आयास करावे न लागतां हें सर्व काम परभारें होऊं लागलें व पहिल्यापेक्षां त्याला किंमतहि चांगली येऊं लागली; दूधदुभतें करण्याची जुनी पद्धति किफायतशीर नव्हती व लोणी, खवा वगैरे जिन्नस चांगले तयार होत नव्हते; तेच जिन्नस यंत्रांच्या द्वारें गिऱ्हाइकांनां पसंत पडण्यासारखे लोकांकडून आयते तयार होऊं लागले, पण त्याचा फायदा मात्र याला मिळूं लागला. सारांश, फक्त मोठ्या जमीनदारांनां जीं जीं साधनें पूर्वी अनुकूल होतीं, तीं सर्व नवीन संस्थांच्या जीवावर लहान शेतकऱ्यांनां देखील मिळूं लागलीं. कृषिप्रधान संस्थानांत वरील सर्व हेतु साध्य करणाऱ्या अनेक मंडळ्या निघाल्या आहेत आणि दिवसानुदिवस महत्त्वाचीं कामें त्यांच्या हातून होत आहेत. याप्रमाणें शेतांतील माल विकणारी हॅनोवर प्रांतांत जी को-ऑपरेटिव सोसायटी आहे, तिनें १९०६ सालांत ४२८,००० पौंड किमतीच्या मालाची उलाढाल केली. स्वतःकरतां शेतकरी काय करूं शकतात याचें एक उदाहरण असें आहे कीं, प्रशियांत खाणींतून पोटॅश काढण्याची एक कंपनी निघाली, तेव्हां त्या कंपनीचे पुष्कळसे भाग शेतकऱ्यांच्या मंडळीनें घेतले व त्यायोगानें त्यांच्या धंद्याचें महत्त्व अधिक वाढलें.

तथापि, शेतकऱ्यांचा खरा फायदा जर कोणाकडून झाला असेल तर तो पतपेढ्या व मंडळ्या यांच्याकडून झाला आहे. "को-ऑपरेशनमुळें शेतकऱ्याची पत वाढली व त्याचा नाश होण्याचा भयंकर प्रसंग टळला,"

असें एका बड्या जमीनदारानें एका प्रसंगीं म्हटलें आहे. या सोसाय-ट्यांनीं इतकी महत्त्वाची कामगिरी यापूर्वी केली आहे व अजूनपर्यंत त्यांचें काम इतकें उत्साहानें व नेटानें चालून यशस्वी होत आहे कीं, रेफेसननें अगदीं आरंभाला स्थापन केलेल्या पतपेढ्यांची हकीकत विशेष विस्तारानें सांगणें अवश्य आहे. इंग्लंड देशांत शेतीसंबंधानें प्रस्तुत जी मोठी अडचण उत्पन्न झाली आहे ती ही कीं, शेतकऱ्यांनां पैशाची जरूर लागली म्हणजे सोप्या रीतीनें कमी व्याजावर पैसे मिळण्याला असावीं तशीं साधनें नाहींत. वरील पतपेढ्यांचा इतिहास सांगितला असतां इंग्लंडांत भासत असलेली अडचण कशी दूर करतां येईल हें समजण्याजोगें आहे. इंग्लंडांत ब्यांका आहेत, कर्जाऊ पैसे देणाऱ्या मंडळ्याहि आहेत; परंतु यांच्याकडून कर्ज घ्यावयाचें झालें म्हणजे शेत-कऱ्यांनां जबर व्याज भरावें लागतें, आणि ब्यांका मागतील तें तारण देण्याची जर त्यांनां ऐपत नसेल तर त्यांची कितीहि अडचण असली तरी त्यांनां कर्ज मुळीं मिळतच नाहीं. म्हणून ही परिस्थिति लक्ष्यांत आणतां हें फार चमत्कारिक दिसतें कीं, इंग्लंडांतील शेतकरीवर्गांत को-ऑपरेशनच्या तत्त्वावर चालणाऱ्या ब्यांका किंवा कर्जाऊ पैसे देणाऱ्या मंडळ्यांची प्रगति जितकी झपाट्यानें व्हावी तितकी होत नाहीं. ब्यांका स्थापन करण्याला इंग्लंडांत किंवा इतरत्र पैशाची वाण पडेल हें संभ-वत नाहीं. कारण, तसें जर असतें तर रेफेसनच्या नांवानें चालणाऱ्या जर्मनींतील ब्यांका व आस्ट्रियांत याच नमुन्यावर असणाऱ्या अनेक ब्यांका इतक्या भरभराटीस आल्या नसत्या.

फ्रेडरिक विल्हेल्म रेफेसन हा परोपकारी पुरुष मूळचा ऱ्हाइनलंडचा रहिवासी, व तो त्या प्रांतांतच १८१८ पासून १८८८ पर्यंत रहात होता. तेथील म्युनिसिपालिट्यांच्या अंमलाखालील प्रांतांत तो मेयरचें (लोकनियुक्त नगराध्यक्षाचें) काम करीत असे. निरनिराळ्या शेतीच्या

मुलखांत हें काम करीत असतां शेतकऱ्यांनां पैसे मिळविण्याला किती अडचणी पडतात याचा त्यानें प्रत्यक्ष अनुभव घेतला. अनुभवान्तीं त्याला असें आढळून आलें कीं, लहानसहान शेतकऱ्यांचे मागें पैशाची अडचण नेहमींचीच आहे; आणि ही अडचण भागविण्याकरतां ते निर्घृण सावकाराच्या कचाटींत चांगले सांपडतात. या सावकारांत ज्यू सावकाराला तर दयामाया हा पदार्थच माहीत नाहीं. रेफेसननें कित्येक उदाहरणें अशीं पाहिलीं कीं, कर्जाची रकम वेळेवर परत करतां आली नाहीं, किंवा खंडाचे पैसे भागविण्याकरतां थोड्या पैशाची मदत लागली तर, शेतकऱ्यांनीं ज्यू सावकाराला आपलीं गुरेंढोरें व नांगर-आऊतें वगैरे खुशाल देऊन टाकावीं! सावकार म्हणजे पक्का कावेबाज, त्यानें कायदा उल्लंघन न करतां कापल्या तडाक्यांत सांपडलेल्या कुळांनां चोहोंकडून लुबाडावें; हे त्याचे डांवपेच ओळखण्याची अक्कल त्या बिचाऱ्यांनां कोठून असणार? हा पाजीपणा बंद करण्याच्या हेतूनें शेतकरी व त्याचे खोडसाळ सावकार यांच्यामध्यें एखादा व्यवहार होऊं लागला म्हणजे हा परोपकारी गृहस्थ आपण होऊन पुढें जाई व सावकार कुळांवर भलत्या अटी न लादील अशी व्यवस्था करी. मेयर या नात्यानें त्याच्या हातांत सत्ता होती व अंगांत धूर्तपणाहि चांगला होता. या दोहोंच्या जोरावर सावकारांची मात्रा आपल्यापुढें तो फारशी चालूं देत नव्हता. शेतकऱ्यांचीं गुरें किंवा बकरीं विकावयाचीं झालीं म्हणजे तो स्वतः बाजारांत जाई आणि त्यांची किंमत ठरवून देई. ह्या माणसाची ब्याद आपल्या मागें कोठून लागली आहे असें ज्यू सावकारांनां झालें. त्याचें कोणीं नांव काढलें कीं त्यांच्या कपाळाला आंठ्या पडत; पण शेतकऱ्यांच्या मनांत मात्र त्याच्याविषयीं प्रेम आणि आदर वाढूं लागला. शेतकऱ्यांच्या अडचणी काय आहेत, त्यांच्यांत दोष कोणचे आहेत, याचें स्वतःच्या अनुभवानें पूर्ण ज्ञान करून घेतल्यानंतर " को-ऑपरेटिव क्रेडिट असो-

सिएशन्स " स्थापन करण्याची कल्पना त्याला सुचली. आरंभाला थोडेसे प्रयोग त्यानें करून पाहिले व त्यांत यश आल्यावर ऱ्हाइन नदीवरील अनेक ठिकाणीं अल्प प्रमाणावर त्यानें असोसिएशन्स स्थापन केल्या. पुढें हळूहळू या संस्थांचें महत्त्व आणि कीर्ति इतकी वाढली कीं, जर्मनींत शेतकऱ्यांची एक मोठी को-ऑपरेटिव संस्था स्थापन करण्याच्या उद्योगाला लागून आपला सर्व वेळ या कामांत खर्च करणें त्याला भाग पडलें. त्याच्या दीर्घ उद्योगानें या मुख्य संस्थेच्या पोटशाखा साऱ्या जर्मनीभर पसरल्या आणि त्यांच्या द्वारें फार महत्त्वाची कामगिरी होऊं लागली.

या संस्थांची " सेंट्रल इन्स्टिटयूट " ही प्रमुख संस्था आहे व ती न्यूवीड ( Neuwied ) येथें आहे. अलीकडे तिच्या आश्रयाखालीं चालणाऱ्या कर्ज देणाऱ्या अनेक असोसिएशन्स स्थापन झाल्या आहेत. तसेंच शेतकऱ्यांचे अनेक को-ऑपरेटिव स्टोअर्स तिच्या विद्यमानें उघडण्यांत आले आहेत; व शेतकामाला लागणाऱ्या हरएक प्रकारचे जिनसांचीं मोठमोठीं दुकानें न्यूवीड येथें सर्वांच्या सोईकरतां स्थापन केलीं आहेत. उदाहरणार्थ, फ्रँकफोर्ट येथें यंत्रसामग्रीचा मोठा डेपो आहे; निरानिराळया शाखांना मालाचा पुरवठा करण्याकरतां कलोन येथें एक मध्यवर्ती " वेअर हाउस " आहे व येथें मालाची घाऊक खरेदी करण्यांत येते. इतर ठिकाणीं कृत्रिम खत तयार करण्याचे व तंबाखू उत्पन्न करण्याचे देखील कारखाने असून ते सर्व को-ऑपरेटिव तत्त्वावर चालतात. या सर्व संस्थांचा कारभार सुरळीतपणानें चालण्याकरतां तीनशेंपेक्षां जास्त निरानिराळया दर्जाचे अम्मलदार ठेवावे लागतात, यावरून यांचा व्याप किती मोठा आहे याची वाचकांना कल्पना करता येईल !

सहकारी पेढ्या कोणत्या तत्त्वावर चालतात याचें विवेचन स्थलसंकोचास्तव या भागांत स्थूल दृष्टीनेंच करणें अवश्य आहे. क्रेडिट

असोसिएशनला लागणारें भांडवल शेअर्सच्या रूपानें मिळविलें जातें; प्रत्येक भागाची सर्वांत जास्त म्हणजे १० शिलिंग किंमत असते. कोणत्याहि इसमाला एकापेक्षां जास्त भाग मिळत नाहींत, व लोकांकडून कर्जाऊ घेतलेल्या पैशावर असोसिएशनला जितकें व्याज द्यावें लागतें त्यापेक्षां जास्त "डिव्हिडंड" भाग धारण करणाराला मिळत नाहीं. असोसिएशनच्या मेंबराची सर्व मिळकत तारण म्हणून समजण्याची जी कोऑपरेशनची पद्धति ( Co-operation with unlimited liability ) आहे तिला अनुसरून या असोसिएशन्सचें काम चालतें. ही पद्धति बरोबर नाहीं असे आक्षेप वरचेवर घेण्यांत येतात. परंतु व्यवहारांत तिच्यापासून तोटा झाल्याचा तर नाहींच, उलट फायदा झाल्याचा अनुभव आहे. रेफेसन मंडळ्या आज पन्नास वर्षे चालत आहेत; परंतु तितक्या मुदतींत हें तत्त्व अंगीकारण्यापासून मेंबरांचा तोटा झाल्याचें आढळून आलें नाहीं, आणि असें होणें मुळींच असंभवनीय नाहीं. कारण, त्यामुळेंच हुषार, प्रामाणिक, आणि शक्य असेल तेव्हां ऐपतदार, अशा माणसांच्या हातांत असोसिएशनच्या कामाची सर्व व्यवस्था येते व ती ते काळजीपूर्वक पहातात.

चांगले शेतकरी, म्हणजे ज्यांनां आपल्या धंद्यांत प्रेम वाटतें, ज्यांनां शेतकामाची चांगली माहिती आहे, आणि जे अडचणींत किंवा दुर्दैवाच्या फेऱ्यांत सांपडले तर त्यांतून स्वतःच्या हिंमतीनें पार पडतात, अशा शेतकऱ्यांकडे या संस्था मोठ्या आस्थेनें विशेष लक्ष्य पुरवितात. उलटपक्षीं निष्काळजी, उधळ्या आणि अव्यवस्थितपणानें वागणाऱ्या लोकांनीं मदत मागितली असतां त्यांनां साफ वाटाण्याच्या अक्षता देण्यांत येतात. तथापि कारागीर व उद्योगधंद्यांतील मजूर यांचा जमिनीशीं व्यवहारांत जरी फार थोडा संबंध येतो, तरी त्यांनां हत्यारें विकत घेण्याकरतां किंवा घर बांधण्याला अथवा दुरुस्त करण्याला पैशाची कांहीं

गरज लागली तर त्यांच्या अर्जाचा योग्य विचार केला जातो.

कर्ज मागण्याचा अर्ज आला म्हणजे भावी रिणकोची स्थिति कशी आहे याची काळजीपूर्वक प्रथम चवकशी होते, व त्या चवकशींत उलट पुरावा तेवढा शोधून काढावयाचा अशी कोणाची प्रवृत्ति नसते. अर्जदारापाशीं द्रव्यबळ कोणच्या प्रकारचें आहे, त्याची पत किती आहे, तो जें तारण देत असेल तें किती किंमतीचें आहे, व ज्या कामाकरतां कर्ज पाहिजे असेल तें काम शेतीच्या फायद्याचें कितपत आहे, या मुद्द्यांवर चवकशी करणारांचा मुख्य कटाक्ष असतो. शेतकऱ्यांच्या दृष्टीनें ही चवकशी होणें जितकें अवश्य आहे, तितकेंच असोसिएशनच्या दृष्टीनेंहि अवश्य आहे. कारण, असोसिएशनच्या आश्रयाखालीं येण्याची ज्या लोकांची इच्छा असते त्यांनां योग्य सल्ला देऊन शक्य त्या उपायांनीं मदत करावयाची हें वागणुकीचें मुख्य तत्त्व असतें. रिणकोकडून तारण घ्यावयाचें तें बहुतकरून गहाणाच्या रूपानेंच असतें व गहाण मिळकतीची किंमत कर्जाऊ रकमेच्या जवळजवळ दुप्पट असावी, असें कायद्यानें ठरविलें आहे. परंतु व्यवहारांत हा नियम अक्षरशः पाळला जातो असें मात्र नाहीं.

घेतलेलें कर्ज किती दिवसांनीं परत करावयाचें या बाबतींत तीन मुदती ठरविलेल्या असतात. कमी मुदतीचें कर्ज असेल तें तीन महिन्यांनीं परत करावें लागतें. जास्ती मुदतीचें कर्ज दोन वर्षांपावेतों असतें व पहिल्या वर्षाच्या अखेरीस त्यापैकीं कांहीं रकम परत करावी लागते. कांहीं रकमांनां मुदत ठरविलेली नसतेच; तथापि रिणकोनें आपल्या सवडीप्रमाणें वाटेल तेव्हां रकम परत केली तरी ती घेतली जाते. रकम परत करण्याबद्दल ज्या शर्ती ठरल्या असतील त्यांत अणुरेणूइतका फरक व्हावयाचा नाहीं अशी दक्षता बाळगण्यांत येते, आणि या गोष्टीवरच बँकेचें यश किंवा अपयश अवलंबून असतें. एक महिन्याची

नोटीस देऊन नेलेली रक्कम परत मागण्याचा असोसिएशनला अधिकार दिलेला असतो.

एकमेकांनां निरनिराळ्या मार्गांनीं मदत देतां यावी, हें कामाचें धोरण विशेष रीतीनें पाळलें जातें. असोशिएशनला जो नफा होईल तो सर्व रिझर्व फंड म्हणून बाजूला ठेवावा लागतो, तरी मेंबरांनां कर्ज द्याव-याचें तें विशेष सवलतीनें देतां यावें अशी योजना केलेली असते. अॅक्चुअरीखेरीजकरून बाकीचे सर्व अधिकारी कांहीं पगार न घेतां फुकट काम करीत असतात. आपल्याला पगार मिळाला पाहिजे असें त्यांच्या मनांत देखील येत नाहीं. त्यांनां किरकोळ खर्च करावा लागला तर तो मात्र असोसिएशनकडून मिळतो. असोसिएशनमध्यें समाविष्ट झालेल्या शेतकऱ्यांत परस्परांनां मदत करण्याची बुद्धि उत्पन्न व्हावी व तदनुरूप काम करण्याचें वळण त्यांनां लागावें, हा प्रयत्न खरोखर नेहमीं चालू असतो, व आपमतलबीपणा करण्याला यत्किंचितहि वाव कोणाला मिळूं नये, अशा हेतूनें असोसिएशनचे नियम केलेले असतात. खेडे-गांवच्या सोसायट्यांत शाळामास्तरांकडे प्रमुखपणा बराच असतो व तो जी समाजाची कामगिरी करतो ती फारच महत्त्वाची असते. शाळा-मास्तराचा पेशा आपण लक्ष्यांत घेतला म्हणजे तो लोकांच्या इतका उपयोगीं पडतो यांत आश्चर्य करण्याचें कारण नाहीं. त्याला सार्वजनिक काम करण्याची हौस असते व आपली सांपत्तिक स्थिति कशी सुधारतां येईल याचा मार्ग तो खेडेगांवांतील लोकांनां दाखवून देतो. रेफेसन बँकेचा तो सेक्रेटरी असतो व लहान शेतकऱ्यांनां कर्ज वगैरे देतो. या-शिवाय शेतांत मेहनत कशी करावी, आपला माल कसा विकावा, हें त्यांनां शिकवितो, खर्चांत काटकसर करण्याला त्यांनां उत्तेजन देतो व आठवड्याच्या शेवटीं शेतकऱ्यानें आपला जो पैसा सांठविला असेल तो आपल्या ताब्यांत घेतो. सारांश, गरीब शेतकऱ्यांचा शाळामास्तर

म्हणजे मार्गदर्शक, युक्तीच्या चार गोष्टी सांगणारा सल्लागार आणि स्नेही असतो. आणि हें सर्व काम तो एक तनूसडीचाहि अभिलाष मनांत न बाळगतां, ज्या गरीब व अडाणी लोकांत तो येऊन पडलेला असतो त्यांचें केवळ कल्याण करण्याच्या बुद्धीनें, करीत असतो.

सर्व ठिकाणच्या पतपेढ्यांनीं न्यूवीड येथील सेंट्रल बँकेला येऊन मिळावें अशी व्यवस्थापकांची अपेक्षा असते आणि त्याप्रमाणें खरोखर घडूनहि येतें. रेफेसन संस्थांनां चालना देण्याचें काम या मुख्य संस्थेकडे आहे. या संस्थेचा मुख्यपणा कबूल करण्यांत लहान संस्थांनां फार फायदा असतो. अशा एखाद्या मोठ्या संस्थेचा त्यांनां आधार असला म्हणजे जरूरीपुरती रक्कम आपल्याजवळ ठेवून बाकीची रक्कम मुख्य संस्थेच्या स्वाधीन करतां येते. तसेंच एखाद्या वेळेस त्यांनां पैशाची विशेष जरूर लागली तर त्या संस्थेकडे मागणी करतां येते. सेंट्रल बँकेची स्थापना १८७६ सालीं झाली. तिचें भांडवल २५०,००० पौंडांचें आहे आणि प्रत्येक भागाची किंमत पन्नास पौंड आहे. तिचे नियम असे आहेत कीं, त्या नियमांप्रमाणें काम चाललें म्हणजे बँकेचा पैसा, केवळ जास्ती फायदा मिळविण्याकरतां, संशयित कामांत खर्च होण्याची मुळींच भीति नाहीं. बहुतेक सर्व भाग स्थानिक असोसिएशन्सनीं घेतले आहेत. ते परवानगीशिवाय इतरांनां वर्ग करून देतां येत नाहींत, व बँकेच्या देण्याची हमी भागीदारांवर त्यांच्या भागांच्या रकमेपेक्षां जास्त असत नाहीं. सेंट्रल बँकेविषयीं लोकांच्या मनांत इतका भरंवसा उत्पन्न झाला आहे कीं, आजमित्तीला ४,१४७ स्थानिक असोसिएशन्सची तिच्याशीं देवघेव चालू आहे. तीन कोटी सत्तर लक्ष पौंडांची रक्कम तिनें व्यापारांत गुंतविली आहे. १९०६ सालीं "इम्पीरियल बँके-"चा दरसाल दरशेंकडा सात आणि आठ असा व्याजाचा दर होता, आणि थोड्या दिवसांकरतां रक्कम पाहिजे असली म्हणजे खाजगी बँका

शेंकडा दहापर्यंत देखील व्याज घेत असत; परंतु रेफेसन सेंट्रल बँक आपल्या मेंबरांनां फक्त साडेतीन ते चारपर्यंत व्याज आकारते. यावरून या बँकेची ऐपत केवढी मोठी आहे, व बाजारांत तिची पत किती आहे, याची कोणालाहि सहज कल्पना होण्याजोगी आहे.

बँकेचा जनरल डायरेक्टर दरवर्षीं जे रिपोर्ट छापून प्रसिद्ध करतो ते आपण पाहिले असतां नमुन्यादाखल घेतलेल्या कांहीं शेतीच्या खेडे-गांवांत असोसिएशन्स कोणच्या प्रकारची कामागिरी बजावीत आहेत, हें आपल्या ध्यानांत येईल. त्या रिपोर्टांतून मासल्याकरतां कांहीं उतारे पुढें दिले आहेत.

"बेसवीलर ( Baesweiler ) येथील सेविंग्स बँकेला फार चांगलें यश आलें आहे. ती स्थापन झाल्यापासून कारंजगार व खाणवाले यांच्या-करतां १५ घरें विकत घेतलीं, व एकंदर गांवाची सांपत्तिक स्थिति बरीच सुधारली. मेंबरांनीं ३,००० पौंडांची ठेव ठेवली आहे. यावरून ते किती काटकसरीनें वागतात हें समजतें. कर्जाऊ रकमेवर शेंकडा ४ टक्के व्याज बँक घेते व २५ पौंडांपर्यंतच्या ठेवीवर ३॥ टक्के व्याज देते. या बँकेपासून या गांवच्या लोकांचें फार कल्याण झालें आहे."

"को-ऑपरेटिव स्टोअर्सचें काम अगदीं आश्चर्य वाटण्याजोगें वाढत आहे व त्यापासून मेंबरांचा फारच फायदा होत आहे. शेतकऱ्यांनां शेतीचीं निरनिराळीं नवीं यंत्रें असोसिएशननें पुरविलीं आहेत. अलीकडे शोधून काढलेलीं यंत्रें बिचाऱ्या शेतकऱ्यांनां कोठून मिळणार? पण तीं आतां त्यांनां उपलब्ध झालीं आहेत, व त्यामुळें त्यांची शेती उत्कृष्ट तऱ्हेनें चालली आहे."

दुसऱ्या एका गांवचा रिपोर्ट पुढें लिहिल्याप्रमाणें आहे:—"येथें नांगरणीकरतां वगैरे दुसऱ्यापासून भाड्यानें बैल घेण्याची चाल होती, भाड्यानें बैल देणाऱ्याचा यापासून फायदा होत होता. परंतु शेतकऱ्या-

चा तोटा होऊन कामहि मनाजोगें होत नव्हतें. शेतकऱ्यांनां स्वतःचे बैल खरेदी करतां यावे म्हणून असोसिएशननें त्यांनां पैसे देण्यास जेव्हां सुरुवात केली तेव्हांपासून ही चाल बंद पडली. कृत्रिम खत मिळूं लागल्यापासून आजपर्यंत ज्या जमिनी पड पडल्या होत्या त्यांची लागवड होऊं लागली व त्यांत पीकहि चांगलें येऊं लागलें.''

लोरेन येथील असोसिएशन्सच्या सरकारी इन्स्पेक्टरानें केलेल्या एका जनरल रिपोर्टांतून खालील उतारा देऊन उतारे देण्याचें हें काम आम्ही पुरें करतों. तो इन्स्पेक्टर म्हणतो:—'' कर्जाऊ रक्कम देण्याची जी पद्धति आहे ती रिणकोंच्या फार फायद्याची आहे. विशेषेंकरून रक्कम परत करण्याच्या कामांत फार सवलती ठेवल्या असल्यानें, दर आठवड्याच्या शेवटीं, अथवा पैसा हातांत शिल्लक राहिला तर त्याच्याहिपूर्वीं, पैसे परत करतां येतात, व त्यामुळें शेतकरी फार खूष असतात. को-ऑपरेटिव तत्त्वावर जे जिन्नस विक्रीकरतां दुकानांत मांडलेले असतात, ते लोकांनां नेहमीं लागणारे असे असतात. ज्या प्रांतांत रेफेसन असोसिएशन्स नाहींत त्या प्रांतांत कृत्रिम खताची किंमत पूर्वीं जास्त असे; परंतु या संस्थांची स्थापना झाल्यापासून या किंमती पुष्कळ उतरल्या, पुष्कळ लोक त्या खताचा उपयोग करूं लागले व त्यापासून जमिनीचा कस वाढला. तो इतका कीं, ज्या जमिनींत पूर्वीं शेतकऱ्याला फक्त तीन महिने पुरेल इतका गहूं पिकत होता त्याच जमिनींत वर्षभर पुरेल इतका गहूं पिकूं लागला....वाजवीपेक्षां जास्त व्याज कोणाला द्यावें लागतें किंवा काय, याकडे विशेष लक्ष्य पुरविण्यांत येतें आणि असोसिएशन्सचे जे कामगार असतात ते मेंबरांनां प्रसंगविशेषीं व्यवहारांत उपयोगीं पडेल असा सल्ला देत असतात.''

सध्यां ४,१५९ '' रूरल को-ऑपरेटिव लोन असोसिएशन्स '' न्यूवीड येथील सेंट्रल म्हणजे मध्यवर्ती संस्थेच्या आश्रयाखालीं चालत आहेत.

शेतकामाचीं यंत्रें आणि इतर जिन्नस विकणाऱ्या को-ऑपरेटिव स्टोअर्सची ६५२ संख्या यांत मिळविली म्हणजे मध्यवर्ती संस्थेच्या आश्रयानें चालणाऱ्या सर्व प्रकारच्या एकंदर असोसिएशन्स ४,८११ आहेत, असें आपल्याला दिसून येईल. १९०५ सालीं मध्यवर्ती व स्थानिक असोसिएशन्सनीं व्यापाराची जितकी घडामोड केली, त्यापेक्षां १९०६ सालीं पांच कोटी पौंडांनीं अधिक झाली. आरंभाला रेफेसननें स्थापन केलेली संस्था अगदीं अल्प प्रमाणावर होती; पण आतां तिचा पसारा एकट्या जर्मनींतच नव्हे, तर आस्ट्रिया, इटली, स्वित्झर्लंड व अलीकडे अलीकडे इंग्लंड आणि आयर्लंड या देशांत देखील झाला आहे. या संस्थेपासून शेतकऱ्यांचा सांपत्तिक फायदा अतोनात झाला आहे ही गोष्ट निर्विवादच आहे; परंतु नीतिदृष्ट्या देखील त्यांचा फार फायदा झाला आहे. कारण, रेफेसननें आपल्या डोळ्यांसमोर जें ध्येय ठेवलें होतें तें हें कीं, आपल्या असोसिएशन्सच्या आश्रयाखालीं येणाऱ्या शेतकऱ्यांची कायमची नैतिक उन्नति झाली पाहिजे, आणि ती होण्याला अवश्य लागणारें द्रव्यसाहाय्य त्यांनां मिळालें पाहिजे. रेफेसनच्या संस्था आतां इतक्या दृढमूल झाल्या आहेत कीं, को-ऑपरेशनच्या मूळाशीं कोणचीं तत्त्वें आहेत, त्यांचा व्यवहारांत कसा उपयोग करावा, याचें भावी कामगारांनां पद्धतशीर शिक्षण देण्याकरतां एक "ट्रेनिंग स्कूल" होतां होईल तितकें लवकर स्थापन करावें असें ह्या संस्थांच्या चालकांनीं अगदीं निश्चित केलें आहे.

रेफेसन सेंट्रल असोसिएशन्सचें एक निराळें खातें असें आहे कीं, त्या खात्याकडून समाज या दृष्टीनें शेतकऱ्यांनां सुस्थिति प्राप्त होण्याच्या निरनिराळ्या योजना स्थानिक असोसिएशन्सच्या मार्फत अमलांत येत असतात. तरुण मुलें व मुली यांच्याकरतां मागें एका भागांत सांगितलेल्या प्रकारच्या "कन्टिन्युएशन" शाळा, स्वयंपाक शिकविण्याच्या

शाळा, स्नानगृहें, कपडे धुण्याच्या भट्ट्या, पुस्तकालयें, "रीडिंग-रूम्स" आजाऱ्यांनां मदत देण्याकरतां व अनाथ प्रेतें पुरण्याकरतां कायमचे फंड, लहान मुलांची जोपासना करण्याचीं गृहें, इत्यादि गोष्टींची या खात्याकडून व्यवस्था होते. शहरांच्या औद्योगिक प्रगतीला आळा घालण्याकरतां शेतकऱ्यांनां घरीं बसल्या बसल्या कोणचे धंदे करतां येतील या विषयाकडेहि लक्ष्य घालण्याची या संस्थेनें अलीकडे सुरुवात केली आहे.

प्रशियांतील को-ऑपरेटिव क्रेडिट सोसायट्यांनां मदत करणारी "सेंट्रल को-ऑपरेटिव बँक" या नांवाची पेढी तेथील सरकारानें स्थापन केली आहे. ज्या को-ऑपरेटिव क्रेडिट सोसायट्यांनां पैशाची गरज लागेल त्यांनां तो या बँकेकडून पुरविण्यांत येतो व त्याकरतां बँकेपाशीं द्रव्याचा मोठा निधि ठेविला आहे. खेडगांवांतील "सेविंग्स आणि लोन सोसायट्या" आणि लहान "क्रेडिट सोसायट्या" यांनां पैशाची जरूर उत्पन्न झाली म्हणजे कमी व्याजानें पैसे मिळत नसत, व जों जों त्यांचें कार्यक्षेत्र वाढत गेलें तों तों ही अडचण त्यांनां फारच नडूं लागली, असें बऱ्याच वर्षांपूर्वी अनुभवास आलें होतें. लहान शेतकऱ्यांशीं ज्या सोसायट्यांचा पुष्कळसा व्यवहार चालत असे त्यांनां तर भांडवलाची अडचण वरचेवर उत्पन्न होई, व ही अडचण स्थानिक सावकारांकडून पैसे आणून दूर करणेंहि शक्य नव्हतें. ही अडचण दूर करण्याचा पहिल्यांदा सहकारि तत्त्वावर जो प्रयत्न झाला तो असा:— प्रांतोप्रांतीं असणाऱ्या सोसायट्यांनीं एकत्र जमून "लिमिटेड" कंपन्या काढल्या. त्या कंपन्यांनीं आपआपल्या पोटसोसायट्यांकडे शिल्लक असलेल्या द्रव्याची समसमान वांटणी करून, ज्या सोसायट्या चांगल्या स्थितींत होत्या त्यांच्या द्रव्याचा फायदा नवीन व जेमतेम चालणाऱ्या सोसायट्यांनां मिळावा अशी व्यवस्था केली.

यानंतर पुढें १८९४ सालीं हॅनोव्हर येथें "जर्मन ॲग्रिकल्चरल को-ऑपरेटिव सोसायट्यांची दहावी कांग्रेस" भरली व तींत असें ठरलें कीं, वरील हेतु साध्य करण्यासाठीं सर्व साम्राज्याकरतां म्हणून एक "सेंट्रल बँक" स्थापन करावी. ही कल्पना फारच चांगली आहे असे जिकडे तिकडे उद्गार निघूं लागले. प्रशियन सरकारला तर ती इतकी पसंत पडली कीं, तिला प्रशियापुरतें मूर्त स्वरूप देण्याची त्यानें तत्काळ योजना केली. ही योजना १८९५ सालीं फलद्रूप होऊन "स्टेट सेंट्रल को-ऑपरेटिव बँक" नांवाची पेढी स्थापन झाली. "इम्पीरियल बँक" ज्याप्रमाणें व्यापाऱ्यांनां पैशाची मदत करते त्याप्रमाणें लहान शेतकऱ्यांनां मदत करण्याचा या पेढीचा मूळचा हेतु होता व अद्यापिहि तोच हेतु कायम आहे. या बँकेचें भांडवल आरंभाला २५०,००० पौंड होतें, आणि या भांडवलावर फार झालें तर तीन टक्के व्याज देण्याचें ठरविलें होतें. हें भांडवल पुढें पंचवीस लक्ष पौंडांपर्यंत वाढविलें; परंतु व्याजाच्या दरांत म्हणण्याजोगा फेरबदल केला नाहीं. कमी व्याजानें बँकेपाशीं पुष्कळ रोकड असल्यानें खाजगी सावकारापेक्षां कमी व्याजानें वाटेल तितकी रकम शेतकऱ्यांनां मिळूं शकते. कर्ज जें द्यावयाचें तें व्यक्तिशः शेतकऱ्यांनां किंवा को-ऑपरेटिव सोसायट्यांनां न देतां अशा सोसायट्यांच्या असोसिएशन्सनां द्यावयाचें, असा अजूनपर्यंत निर्बंध पाळण्यांत येतो. याप्रमाणें बँकेकडून सुटणारा पैसा असोसिएशन्समार्फत जरी शेतकऱ्यांच्या पदरांत पडला तरी त्यांनां चार टक्क्यांपेक्षां जास्त व्याज द्यावें लागत नाहीं. सारांश, ही बँक स्थापन झाल्यापासून आपली पत कमी म्हणून आपल्याला कर्ज कोणी देणार नाहीं, ही शेतकऱ्यांची किंवा मजुरांची दीनवाणी स्थिति नाहींशी होऊन ते सुस्थितीप्रत येऊन पोंचले आहेत. शेतकऱ्यांची ही स्थिति लक्ष्यांत आणून कुशल कारागिरांनींहि आपल्या को-ऑपरेटिव, सेविंग्स आणि

लोन सोसायटीज स्थापन केल्या, व त्यांनांहि या सरकारी बँकेकडून प्रसंगानुसार पैशाची मदत मिळते.

प्रस्तुत प्रकरणाच्या आरंभीं सांगितलेल्या "जनरल यूनियन-"च्या आश्रयाखालीं चालणाऱ्या ज्या संस्था आहेत त्यांचें स्वावलंबन हें मुख्य तत्त्व असल्यानें को-ऑपरेटिव बँकिंगच्या भानगडींत सरकारनें पडावें ही गोष्ट त्यांनां पसंत नव्हती; आणि म्हणून त्यांच्या वतीनें "प्रशियन लोअर हाउस-" मध्यें असलेल्या सभासदांनीं सरकारची योजना हाणून पाडण्याचा शक्य तो प्रयत्न केला; पण त्यांनां यश आलें नाहीं. उलट सरकारी बँकेची उपयुक्तता विशेष रीतीनें लोकांच्या नजरेस आल्या-वरून बव्हेरिया, साक्सेन, मॅक्लेन्बर्ग या संस्थानांनीं आपआपल्या हद्दींत प्रशियन सरकारच्या धर्तीवर को-ऑपरेटिव बँका सुरू केल्या.

को-ऑपरेशनच्या चळवळीचा आरंभापासूनचा इतिहास जर आपण पाहिला तर आपल्याला असें दिसून येईल कीं, हल्लींची ही चळवळ जि-तकी जोरानें सुरू आहे तितकी यापूर्वीं कधींहि नव्हती; व तिच्या उप-युक्ततेविषयीं शेतकऱ्यांच्या मनांत हल्लीं जितका दृढ विश्वास उत्पन्न झाला आहे तितका पूर्वीं कधींहि झाला नव्हता. असा विश्वास बाळगणें हें चुकीचें आहे असें आम्ही म्हणत नाहीं; परंतु कदाचित् त्याचा अति-रेक जर कां झाला तर शेवटीं निराश होण्याची पाळी या लोकांवर ये-ईल अशी आम्हांला भीति आहे. कारण, अति विश्वासाचा असा परि-णाम होईल कीं, जेथें को-ऑपरेशनचा वास्तविक कांहीं उपयोग होणार नाहीं असें अनुभवान्तीं ठरलेलें आहे, तेथें देखील त्याचा अंगीकार करावा असें लोकांच्या मनांत वागूं लागेल. आणि त्याप्रमाणें झालें नाहीं म्हणजे निराशेचा पगडा बसला म्हणून समजावेंच! शेतकऱ्यांतर्फेंच्या एका सभासदानें प्रशियन पार्लमेंटांत नुक्तेंच असें बोलून दाखविलें कीं, "गरीब लोकांनां मदत करावी असें खिस्तीधर्म सांगतो. म्हणून या धर्माज्ञेप्रमाणें

सरकारनें शेतकऱ्यांनां हल्लींपेक्षां जास्त मदत करावी." दुसऱ्या एका इसमानें असें प्रदिपादिलें कीं, "प्रत्येक शेतकीच्या कॉलेजांत को-ऑपरेशनचा एक प्रोफेसर नेमावा." या दोनहि गृहस्थांचे वरील उद्गार को-ऑपरेशनवर फाजील विश्वास ठेवल्याचे दर्शक होत, असें कोणीहि म्हणेल. याप्रमाणें योग्य मर्यादेच्या बाहेर को-ऑपरेशनपासून फायदा करून घेऊं इच्छिणाऱ्या लोकांच्या मनाप्रमाणें जरी फायदा होत नसला तरी व्यवहारदृष्ट्या शेतकऱ्यांचा अपरिमित फायदा त्यापासून झाला आहे यांत शंका नाहीं.

साम्राज्यसरकार व संस्थानांतील सरकारें को-ऑपरेटिव चळवळीला जी सहानुभूति दाखवितात व व्यवहारांत जी मदत करतात ती किरकोळ व्यापाऱ्यांनां पाहवत नाहीं; व को-ऑपरेशनचें कार्यक्षेत्र कायद्यानें मर्यादित करावें अशा मजकुराचे अर्ज पार्लमेंटाकडे ते वरचेवर पाठवितात. हें त्यांचें करणें अगदीं साहजिक आहे. कारण, को-ऑपरेटिव सोसायट्या स्थापन झाल्यामुळें यांच्या हातचें शेतकऱ्यांचें गिऱ्हाईक अजीबात नाहींसें झालें. दलालीचा धंदा करणारे लोकहि असेच रडत बसले आहेत. या तक्रारींत मुळींच तात्पर्य नाहीं असें नाहीं; परंतु गरीब शेतकऱ्यांच्या कल्याणापुढें या लोकांच्या नुकसानीची मातब्बरी मुळींच नाहीं अशी सरकारची खात्री असल्यानें या तक्रारी लोकांची सरकारांत दाद लागत नाहीं हें उघड आहे.

प्रकरण १६ वें

# प्रजासंवर्धन व शिशुसंरक्षण

"राष्ट्रीय सामर्थ्य" (National efficiency) हे जाडे शब्द जर्मनींत जरी फारसे वापरण्यांत येत नाहींत तरी देशांतील संतति विशेष बळकट व उत्साही व्हावी याबद्दल सारासारविचारपूर्वक व शास्त्रीय पद्धतीला अनुसरून अनेक प्रकारचे उद्योग तेथें चालू आहेत. हा उद्योग मूल पाळण्यांत आहे तेव्हांपासून सुरू करण्याचा शहाणपणाचा मार्ग जर्मनीनें स्वीकारला आहे. लहानपणीं मुलाच्या शरीरप्रकृतीची चांगली काळजी घेतली नाहीं, तर मोठेपणीं त्याला निरनिराळे रोग जडतात. असे रोग जडल्यानंतर मग धांवाधांव करण्यापेक्षां अगोदरच काळजी घेतलेली किती तरी चांगली ! हें तत्त्व लक्ष्यांत घेऊन लहान मुलांची मृत्युसंख्या कमी करण्याची मोहीम त्या देशांत गेल्या दहा वर्षांपासून विशेष जोरांत चालू झाली आहे. या प्रश्नाचें महत्त्व जर्मनीला अलीकडे कळूं लागलें हें खरें; तथापि फार वर्षें स्वस्थ बसल्यानें जें नुकसान झालें आहे तें भरून काढण्याचा हुरूप प्रस्तुतकाळीं लोकांत दिसून येत आहे, ही मोठी आनंदाची गोष्ट आहे.

प्रजासंवर्धनाच्या प्रश्नाचा विचार करीत असतां कांहीं वर्षांपूर्वीं तेथील लोकांच्या नजरेस असें आलें कीं, मुलें जन्मास आल्याचा आंकडा कैक वर्षेंपावेतों बहुतेक कायमचाच होऊन बसला आहे; व एकंदर मृत्यूचें प्रमाण जरी कमी कमी होत चाललें आहे तरी लहान मुलांची मृत्युसंख्या त्या मानानें कमी होत नाहीं; आणि तेव्हांपासून मुलें लहानपणीं कां मरतात याची चवकशी विशेष काळजीपूर्वक ते करूं लागले. गेल्या दहा वर्षांपूर्वींचे आंकडे जर आपण पाहिले तर असें दिसून येईल कीं, साट लक्ष मुलें जर जन्माला आलीं तर त्यांपैकीं चार लक्षांपेक्षां जास्त

मुलें बारा महिन्यांच्या आंतच मृत्युमुखीं पडलीं! म्हणजे शेंकडा वीस या प्रमाणांत मनुष्यहानि झाली. त्याच्या पूर्वीच्या शंभर वर्षांत हें प्रमाण शेंकडा पंधरा होतें. राष्ट्राचें संरक्षण राष्ट्रांतील लोकांच्या हातूनच झालें पाहिजे, बाह्य मदतीवर अवलंबून राहणें धोक्याचें आहे, अशी काळजी बाळगणाऱ्या जर्मन लोकांनां ही स्थिति भीतिप्रद वाटली असली तर त्यांत नवल तें काय?

लहान मुलांची मृत्युसंख्या कमी करण्याच्या मोहिमेला जरी नुक्ताच आरंभ झाला आहे, तरी प्रत्यक्ष प्रयोगावरून थोड्या अवकाशांतच असा अनुभव आला आहे कीं, गेलीं अनेक वर्षे जी भयंकर मनुष्यहानि होत होती ती योग्य उपायांनीं टाळतां आली असती. विवक्षित प्रांतांत योग्य खबदारी घेतली म्हणजे मृत्यूचें प्रमाण खाडकन् कमी होतें, असा प्रस्तुत अनुभव येतो; व त्यावरून असें सिद्ध होतें कीं, आजपर्यंत दर पांच मुलांपैकीं एक मूल बारा महिन्यांच्या आंतच जें मरत होतें तें केवळ निष्काळजीपणानें, अज्ञानानें आणि दैवावर हवाला ठेवण्याच्या घातुक संवयीनें मरत होतें. लहान मुलांनां अल्प काळांत मृत्यु यावा ही ईश्वरी योजना आहे, भूतलावर वाजवीपेक्षां जास्त मनुष्यें होतां कामा नयेत अशी त्याची इच्छा आहे, आणि त्या इच्छेला अनुसरून निरुपयोगी (Unfit) मुलांचा तोच संहार करतो, अशी जर्मनींतील लोकांची जुनी समजूत होती; परंतु सुदैवानें ती आतां अगदीं नाहींशी झाली आहे. ईश्वर एखाद्या प्राण्याला जो जन्मास घालतो तो त्याचा अल्पकाळांतच संहार व्हावा याकरतां खचित घालीत नाहीं. जन्मल्यापासून बारा महिन्यांच्या आंत मूल मरतें तें मातापितरांच्या निष्काळजीपणानें, त्या मुलाला शुद्ध व ताजें अन्न, स्वच्छ हवा व निरोगी पाणी न मिळाल्यानें मरतें. उपरिनिर्दिष्ट ईश्वरी योजनेचा या गोष्टीशीं मुळींच संबंध नाहीं, हें तत्त्व आतां सर्व लोकांनां कळूं लागलें आहे.

ही राष्ट्रीय आपत्ति दूर करण्याकरतां जर्मनींत निरनिराळ्या संस्था स्थापन झाल्या आहेत व अनेक दिशांनीं त्यांचे प्रयत्न अनवरत चालू आहेत. या प्रयत्नांच्या दिशा जरी वेगळ्या असल्या तरी सर्व संस्थांचें ध्येय एकच आहे आणि तें ध्येय साध्य व्हावें म्हणून जर्मन बादशहा व बादशाहीण या दोघांनीं स्वतः या कामांत पुढाकार घेतला आहे. बार्लीन येथील "वुइमेन्स पेट्रिऑटिक असोसिएशन-"च्या (Women's Patriotic Association) कार्यकारी मंडळीला ता० १५ नोवेंबर १९०४ रोजीं बादशहानें पुढील मजकुराचें पत्र पाठविलें होतें:—"अल्पवयी मुलांच्या आरोग्याबद्दल पुष्कळ लोकांनां घोर काळजी लागते, ही स्थिति फार शोचनीय आहे. ती सुधारण्याकरतां सरकारी कामगार व तुमच्या संस्थेसारख्या परोपकार करणाऱ्या संस्था जे प्रयत्न करीत आहेत ते पूर्णपणें यशस्वी व्हावे अशी माझी मनापासून इच्छा आहे. तुमच्या असोसिएशनची व्यवस्था फार चांगली आहे व या कामावर सरकारनें जे अधिकारी व नोकरचाकर नेमले आहेत त्यांच्याशीं सहकारित्वानें तुम्ही जर काम करूं लागाल तर हें राष्ट्रकार्य सिद्धीस जाईल, असा मला पूर्ण भरंवसा आहे." वरील उद्गारांवरून या विषयासंबंधानें बादशहाला किती कळकळ वाटत आहे हें सहज ध्यानांत येण्याजोगें आहे.

१९०४ सालीं बादशहानें लिहिलेल्या या पत्राचा किती हितकारक परिणाम झाला हें सध्यां आपल्याला पहावयास सांपडतें. या कामावर नेमलेले सरकारी अधिकारी, डॉक्टर व म्युनिसिपालिट्या आणि लोकांनीं चालविलेल्या खाजगी संस्था एकदिलानें काम करीत असतात व परस्परांनां साहाय्य करण्याच्या कामांत कोणाकडूनहि यत्किंचित् टाळाटाळी होत नाहीं. लहान मुलांकरतां दवाखाने व शुद्ध दूध मिळण्याचे डेपो जागोजाग स्थापन झाले असून लहान मुलांची जोपासना कशी

करावी याची माहिती लोकांनां व्याख्यानांच्या द्वारानें करून देण्याचीहि व्यवस्था झाली आहे. सारांश, जेणेंकरून लहान मुलाचें संगोपन चांगल्या तऱ्हेनें होईल अशा प्रकारचे उपाय योजण्यांत सरकारी व बिनसरकारी लोक शक्य तो प्रयत्न करीत आहेत.

वर सांगितलेल्या प्रकारचे बाह्य उपचार कितीहि चांगले असले तरी तेवढ्यानेंच या विषयाचा समाधानकारक निकाल लागणार नाहीं. शिशुसंवर्धनाचें खरें खरें काम जर कोठें व्हावयाचें असेल तर तें घरचे घरीं आईकडूनच झालें पाहिजे. मुलाच्या शरीरप्रकृतीकडे आई-नेंच जर दुर्लक्ष्य केलें तर लोकांनीं योजलेले उपाय विफल झाल्याशिवाय राहणार नाहींत. यशाची गुरुकिल्ली जर कोणाच्या हातांत असेल तर ती आईच्या हातांत आहे, ही गोष्ट लक्ष्यांत घेऊन निरनिराळ्या म्युनि-सिपालट्यांनीं व खाजगी संस्थांनीं अलीकडे या विषयावर विशेष परि-श्रम घेण्याचें योजिलें आहे. लहान मूल जन्माला आल्यापासून बारा महिने त्याची चांगल्या रीतीनें जोपासना केली म्हणजे पुढें तें दगा-वण्याची भीति बरीच कमी होते. आयुष्यांतील पहिले बारा महिने हीच परीक्षेची खरी वेळ असते. वरून दूध पिणाऱ्या मुलांची मृत्युसंख्या अंगावर पिणाऱ्या मुलांच्या मृत्युसंख्येपेक्षां पांचसहा पटीनें जास्त असते. आणि म्हणून आयांनीं आपलीं मुलें आपल्या अंगावर पाजावीं, अशा-विषयीं जोराची खटपट चालू आहे. होतां होईल तो अंगावर मूल पाजावयाचें नाहीं अशी अलीकडे 'फॅशन' पडत चालली आहे, व दक्षिण जर्मनींत तर ती फारच बोकळली आहे. निरनिराळ्या वेळीं झालेल्या खानेसुमाऱ्यांवरून बर्लिन येथें या विषयासंबंधानें सरकारनें फार काळ-जीपूर्वक चवकशी केली आहे. तीवरून असें दिसतें कीं, १८८५ सालीं हजारीं ५५२ मुलें अंगावर पिणारीं होतीं व ३३९ गाईचें दूध वरून पिणारीं होतीं; १८९५ सालीं हें प्रमाण अनुक्रमें ४३१ आणि ४५२ असें होतें आणि

१९०० सालीं हेंच प्रमाण अनुक्रमें ३३५ आणि ५१७ झालें ! याप्रमाणें या पंधरा वर्षांत अंगावर पिणाऱ्या मुलांचें प्रमाण ½ वरून ⅓ वर आलें ! खालीं दिलेल्या कोष्टकांत मुलांनां दूध पाजण्याच्या ज्या निरनिराळ्या तऱ्हा आहेत त्यांचा मृत्युसंख्येवर दरहजारीं काय परिणाम होतो हें दाखविलें आहे.

| वर्ष. | अंगावर पिणारीं | | वर दूध पिणारीं. | | दोन्ही तऱ्हेनें पिणारीं | |
|---|---|---|---|---|---|---|
| | १ महिना | २ महिने | १ महिना | २महिने | १ महिना | २ महिने |
| १८९०......... | २२.९ | ९.२६ | १४७.९ | ७७.४ | ११५.० | ८८.२ |
| १८९१......... | २०.४५ | ७.५७ | १७०.७ | ८९.४ | १२८.० | ५४.१५ |
| १८९५......... | २५.१६ | ७.३० | ११२.८ | ६२.९ | ८८.२ | ५०.९ |
| १८९६......... | १९.४ | ७.४० | १११.० | ५४.५ | ५४.२ | ३८.५ |

वरील कोष्टकांत दिलेल्या माहितीचें प्रत्यंतर कलोन (Cologne) शहरांत चांगलें पहावयास सांपडतें. त्या शहरांतील मुलांची मृत्युसंख्या फार मोठी आहे. तेथें हजारीं ३९८ बायका काय त्या आपलीं मुलें अंगावर पाजतात. याच्या उलट प्रकार सोलिंजेन (solingen) या शहरांत आहे. तेथील मृत्युसंख्या फार कमी आहे. कारण, तेथें हजारीं ७०४ बायका मुलें अंगावर पाजणाऱ्या आहेत.

पुष्कळ मोठ्या शहरांतील म्युनिसिपालिट्यांनीं कांहीं स्वतः आणि कांहीं खाजगी संस्थांच्या मदतीनें लहान मुलांकरतां दवाखाने बांधले आहेत, व त्या दवाखान्यांत लहान मुलांच्या पोषणाची विशेष खबरदारी घेतली जाते. बर्लिन येथें अशा प्रकारचे सात दवाखाने आहेत व ते मुख्यत्वेंकरून मजूर लोकांच्या वस्तींत आहेत. प्रत्येक दवाखान्या-

वर लहान मुलांच्या रोगांचा विशेष अभ्यास केलेला एक मुख्य डाक्टर असतो व त्याच्या हाताखालीं इतर डाक्टर व दाया असतात. चार्लोटेन-बुर्ग शहरांत पांच दवाखाने आहेत; व प्रत्येक शहरांत, तेथील उद्योग-धंद्यांच्या मानानें, कमीजास्ती दवाखाने स्थापन झाले आहेत. या दवाखान्यांचा लोकांनां खरोखर उपयोग व्हावा हा हेतु असल्यानें तेथील व्यवस्था मोठ्या सढळ मनानें केलेली असते. तेथील कामाचें मुख्य धोरण असें असतें कीं, ज्यांनां द्रव्याची अनुकूलता नाहीं, व ज्यांनां लोकांच्या दानधर्मावर अवलंबून रहावें लागतें असे लोक, दुसऱ्यांचीं मुलें पोसणारे आईबाप ( Foster parents ), पोरक्या मुलांचे पालनकर्ते आणि व्यभिचारापासून झालेलीं मुलें, अशांनां फुकट सल्ला आणि मदत मिळावी. प्रत्येक दवाखान्यांत पुढें लिहिल्याप्रमाणें एक नियम असतो:— " आपल्या आजारी व अशक्त मुलाचें पालनपोषण कसें करावें हें ज्या आईला नीट समजत नाहीं व जिच्यापाशीं द्रव्यसाधन नाहीं तिला या कामांत येथें मोफत सल्ला मिळेल. अंगावर मूल पाजणाऱ्या आईला जरूर तर द्रव्यसाहाय्य मिळेल व इतर आयांनां शास्त्रीयरीत्या शुद्ध केलेलें दूध फुकट किंवा कमी किंमतीला मिळेल." मदत मागणाऱ्या बाईचा अर्ज आला म्हणजे प्रथमतः जी चवकशी होते तींत, मूल नवऱ्याच्या पोटचें किंवा व्यभिचारापासून झालें आहे, बाप असला तर त्याचा धंदा काय, आईबापांची प्राप्ति किती, राहण्याचें घर लहान आहे किंवा मोठें आहे, त्याला भाडें काय द्यावें लागतें, व आरोग्याच्या दृष्टीनें त्या घराची स्थिति कशी आहे वगैरे गोष्टींचा समावेश होतो. चौकशीअंतीं अर्जदारीण मदत करण्याला योग्य आहे असें दिसून आलें तर तिला मदत मिळते. नुकत्याच प्रसिद्ध झालेल्या एका रिपोर्टावरून असें दिसून येतें कीं, या दवाखान्यांत मदत मागण्याकरतां जाणारे लोक बहुशः मजूरवर्गापैकीं असतात. त्यांतहि विशेषेंकरून केवळ काबाडकष्टाचीं कामें करणारे,

म्हणजे ज्यांची एका आठवड्याची प्राप्ति वीसपासून तेवीस शिलिंगां-पर्यंत असते, अशा मजुरांचा भरणा फार. दवाखान्यांची हकीगत बाप वर्तमानपत्रांत वाचतो व मूल आजारी पडलें म्हणजे तो आपल्या बाय-कोला तिकडे पाठवितो. ती बाई दुसऱ्या बाईपाशीं बोलते. शिवाय लेडी सुपरिंटेंडंट्स असतात त्या पोलिसांच्या मदतीनें गरजू लोकांनां दवाखा-न्यांत जाण्याला उत्तेजन देत फिरत असतात. याप्रमाणें दवाखान्यांची माहिती मजूरवर्गाला होते. लहान मुलांनां लागणारें दूध दवाखान्यांतून मोफत किंवा कमी किंमतीला मिळतें, व अंगावर मुलें पाजणाऱ्या बायकांनां दूध किंवा दूध विकत घेण्याकरतां पैसे मिळतात. यामुळें या संस्थांवर लोकांचें प्रेम फार जडलें आहे व डाक्टरांनीं दिलेला सल्ला शब्दशः पाळण्याकडे त्यांची प्रवृत्ति असते. तथापि हा सल्ला नीटपणें पाळला जातो किंवा नाहीं हें पाहण्याकरतां दवाखान्यांतील सेविका (Sisters) घरो-घरीं हिंडत असतात व घरांतील स्थिति आरोग्याला अनुकूल आहे किंवा नाहीं याची चौकशी करतात. डाक्टरांच्या सांगण्याप्रमाणें मुलांची व्यवस्था होत नाहीं असें त्यांनां दिसून आलें तर त्याचा त्या तत्काळ बंदोबस्त करतात. सेविका जरी येऊन गेली असली तरी, जर डाक्टरनें तसें सांगितलें असलें तर, आईला दरआठवड्याला मूल दवा-खान्यांत नेऊन दाखवावेंच लागतें. बर्लिन येथील मुख्य दवाखान्याचे डाक्टर न्यूमन (Neumann) हे महिन्यांतून एकदां मजुरांच्या बाय-कांनां शिशुसंगोपनावर सप्रयोग व्याख्यानें देत असतात.

बर्लिन येथील दवाखान्यांत रोगी ठेवून घेत नाहींत. हॅम्बुर्ग येथील दवाखान्यांत मात्र ही व्यवस्था गेलीं दहा वर्षें चालू आहे. दरवर्षी तेथील दवाखान्यांत तीन हजार रोगी औषधोपचाराकरतां येऊन राहतात. चार्लोटेनबुर्ग येथें आसन्नप्रसव स्त्रियांनां चार आठवडे राहतां येईल अशा सोईचीं घरें बांधलीं आहेत. या चार आठवड्यांत गृहांत येणाऱ्या

बायकांनां दूध व रोजचें जेवण फुकट मिळतें. म्यूनिच येथें एक अन्नाचा डेपो आहे. तेथें आपलें तान्हें मूल बरोबर घेऊन एखादी बाई गेली, व उदरनिर्वाहाचें आपल्यापाशीं कांहीं साधन नाहीं असें योग्य अधिकाऱ्याचें सर्टिफिकीट तिच्यापाशीं असलें, म्हणजे दुपारचें जेवण तिला फुकट मिळतें. अशा प्रकारचीं परोपकाराचीं कृत्यें करणाऱ्या सरकारी, निमसरकारी, म्युनिसिपल व खाजगी संस्था सर्व जर्मनीभर इतक्या आहेत कीं, त्यांचें वर्णन आम्ही करूं लागलों तर ग्रंथाचा विस्तार फार होईल.

आयांनां व त्यांच्या तान्ह्या मुलांनां चांगलें दूध मिळणें अत्यंत अवश्य आहे असें एकदां ठरलें, म्हणजे दूध चांगलें कसें मिळेल याची योजना करणें ओघानेंच प्राप्त होतें; आणि त्याप्रमाणें जर्मनींतील पुष्कळ म्युनिसिपालिट्यांनीं या कामाकडे लक्ष्य पुरविलें आहे. हें काम पूर्वीं पोलीस*-

* हें काम पोलिसखात्यामार्फत व्हावें हें चमत्कारिक दिसतें. परंतु जर्मनींतील पोलिसखात्याची व्यवस्था फार विलक्षण आहे. तेथील लोकांच्या खाजगी व्यवहारांत देखील पोलिसांचा वारंवार संबंध येतो. खालीं दिलेला उतारा येथें अप्रस्तुत आहे असें वाटेल; परंतु तो ओघाओघानें प्राप्त झाला म्हणून दिला आहे: —

"As might be expected from their antecedents and exclusively military training, the German police is autocratic, puffed up with a sense of its extreme importance, and efficient only in routine work, but utterly lacking initiative tact or higher brain power. They are nearly always honest, truthful and well-meaning and corruption and venality are not conspicuous characteristics of the force. ...... They don't consider themselves as the servants of the public, but distinctively as the organs of the public's master, the Government. It is this mental attitude, no

खात्यामार्फत होत असे व ही वहिवाट जर्मनींत अनेक वर्षेपावेतों चालू होती. परंतु पोलिसांकडून हें काम समाधानकारक होत नव्हतें व खात्रीचें दूध गरीब लोकांनां मिळण्याची पंचाईत पडे. तेव्हां लोकांनीं अशी मागणी केली कीं, पोलिसांकडून हें काम काढून तें म्युनिसिपालिट्यांकडे द्यावें, म्हणजे डाक्टरलोकांकडून दुधाची चांगली तपासणी होईल व शुद्ध आणि निर्मळ दूध लोकांनां मिळूं लागेल. लोकांच्या मागणीला मान देऊन म्युनिलिपालिट्यांनीं हें काम आतां आपल्या हातांत घेतलें आहे व त्यामुळें वाईट दुधाची तक्रार बहुतेक नाहींशी होत चालली आहे. कित्येक म्युनिसिपालिट्यांनीं दुधाचे डेपो स्थापन केले आहेत व तेथें योग्य किंमतीला शास्त्रीयरीत्या शुद्ध केलेलें दूध लेंकुरवाळ्या मजुरांच्या बायकांनां मिळतें. म्युनिसिपालिट्यांचें अनुकरण बऱ्याच मोठमोठ्या कारखानदारांनीं सुद्धां करून आपल्या कारखान्याला लागून दुधाचे डेपो उघडले आहेत. या डेपोंत मिळणारें दूध देखील शुद्ध केलेलें असतें व मजूरवर्गांत त्याचा खपहि चांगला होतो.

दवाखान्यांत किंवा इतर संस्थांत येणारीं मुलें औरस असोत वा अनौरस असोत, सर्वांच्याच शरीरप्रकृतीविषयीं योग्य काळजी तेथें

---

doubt, which accounts for the unpopularity of the police in Germany. It is exceedingly rare that the public will side with, or assist, policemen in the discharge of their duties, in cases of arrest, or in the maintenanance of public order. *But that does not alter the fact that every body almost is forced to come in daily contact with the police.*
—Germany P. 274.

यानंतर खाजगी व्यवहारांत पोलिसाचा संबंध कसा येतो याचीं उदाहरणें ग्रंथकारानें दिलीं आहेत. पोलिसांनीं चांगलें दूध पुरविणें हें त्यांपैकींच एक उदाहरण आहे.

घेतली जाते; पण त्यांतल्या त्यांत अनौरस मुलांकडेच विशेष लक्ष्य पुरवावें लागतें. कारण, औरस मुलांपैकीं जितकीं मुलें बारा महिन्यांच्या आंत मरतात त्यांच्या दुपटीनें अनौरस मरतात असा अनुभव आहे. जर्मनींत दरवर्षीं सुमारें १७५,००० अनौरस मुलें जन्माला येतात. ही संख्या एकंदर जन्मसंख्येच्या एक अकरांशाबरोबर आहे ! अनौरस मुलाचा बाप आपण होऊन पुढें आला तर आपल्या पापकर्मानें जन्मास आलेल्या मुलाच्या रक्षणाचा बोजा त्याच्यावर टाकण्यांत येतो. तो तसा नच आला तर त्याचा पत्ता काढून त्याला खेंचून पुढें आणण्याचा शक्य तो प्रयत्न करण्यांत येतो. तो सांपडला तर मूल त्याच्या स्वाधीन करतात नाहीं तर तें मोठें होईपर्यंत त्याचें पालनपोषण केलें जातें.

या प्रकरणाच्या आरंभीं सांगितलेली मोहीम आतांपर्यंत वर्णन केलेल्या प्रयत्नांनीं पुरी झाली असें वाचकांनीं समजूं नये. मूल निरोगी व्हावयाला पाहिजे असेल तर त्याची आई निरोगी असली पाहिजे, हा सिद्धान्त सर्वमान्य आहे. लहान मूल जन्मास आल्यानंतर त्याचें पालनपोषण चांगल्या रीतीनें केलें म्हणजे त्याचें अकालीं मरण बऱ्याच अंशानें टळतें. परंतु एवढ्यानेंच सर्व काम भागतें असें नाहीं. मूल आपल्या उदरांत असतांना मातेनें जर योग्य खबरदारी घेतली नसेल तर त्याचा अनिष्ट परिणाम मुलावर होतो, आणि पुढें त्याच्या शरीरप्रकृतीची कितीहि काळजी घेतली तरी त्यापासून कांहीं उपयोग होत नाहीं. याकरतां गर्भिणी स्त्रियांना कारखान्यांत हलकें काम देण्याची व्यवस्था होणें इष्ट आहे. बाळंतपणाचे दिवस जवळ आले म्हणजे व बाळंतीण झाल्यावर पुढें कांहीं दिवस बायकांना विश्रांति दिली पाहिजे असें इंडस्ट्रियल कोडमध्यें ठरविलें आहे. परंतु कायद्यानें घालून दिलेल्या मर्यादा संकुचित असल्यानें त्यांचें व्हावें तसें संरक्षण होत नाहीं अशी लोकांची तक्रार आहे. सदरहू कोडांतील १३७ कलमाअन्वयें असें ठरविलें

आहे कीं, ज्या कारखान्यांची व कलागृहांची सरकाराकडून पाहणी (Inspection) होते तेथील एखादी बाई प्रसूत झाली तर पुढें चार आठवडे कोणतेंहि काम तिनें करूं नये, त्याच्या पुढच्या दोन आठवड्यांत देखील डाक्टरचें तसें सर्टिफिकीट असेल तर तिला काम द्यावें, व सर्व मजुरांचा जो "सिकफंड" असेल त्यांतून सहा महिनेपावेतों तिला पैशाची मदत मिळावी. तशाच प्रकारची मदत तिला प्रसूतीपूर्वी सहा आठवडे मिळावी, मात्र ती काम करण्याला असमर्थ आहे असें डाक्टरनें ठरविलें पाहिजे, असेंहि त्या कलमांत सांगितलें आहे. वरील कलमाचा अंमल प्रस्तुत विवक्षित स्थळींच होत असतो. ही स्थिति नाहींशी होऊन त्याचा अंमल सररहा चोहोंकडे चालू करावा असा विचार सरकारांत चालू आहे. तरी पण त्यापासून गर्भिणी स्त्रियांचा व्हावा तितका बचाव होत नाहीं व होणारहि नाहीं, ही लोकांची जी तक्रार आहे ती योग्य आहे, असें वरील कलम पाहून कोणीहि म्हणेल. या कामांत इष्ट ती सुधारणा करण्याच्या हेतूनें "मदरहुड प्रोटेक्शन लीग" नांवाची संस्था अस्तित्वांत आली आहे, व तिच्यामार्फत या दिशेनें अनेक प्रकारचे उद्योग चालू आहेत. लीगनें सुचविलेले सर्व मार्ग सरकारला मान्य होतील असा आजला रंग दिसत नाहीं, हें खरें; पण यावरून प्रस्तुत विषयाकडे लोकांचें किती लक्ष्य लागलें आहे व आपली संतति सुधारण्याचा जर्मन लोक कसा आटोकाट प्रयत्न करीत आहेत हें दिसून येतें. कायद्यांत इष्ट ती सुधारणा होण्याचा अजून रंग दिसत नाहीं, म्हणून लोक हातपाय जोडून जागच्याजागीं स्वस्थ बसले आहेत, असें मात्र नाहीं. खाजगी रीतीनें गर्भिणी स्त्रियांची बरदास्त राखण्याची तजवीज मोठमोठे कारखानदार आपण होऊन करीत आहेत.

खाजगी रीतीनें चालविलेल्या संस्थांत चार्लोटेनबुर्ग येथील "कैसारिन आगस्टा व्हिक्टोरिया हौस" नांवाच्या गृहाचें वर्णन प्रमुखपणानें करणें

अगदीं जरूर आहे. ह्या संस्थेचा पाया घालण्याचा समारंभ ता. ३ डिसेंबर १९०७ रोजीं खुद्द बादशाहिणीच्या हस्तें झाला, व त्यामुळें वरील नांव संस्थेला देण्यांत आलें. हें गृह आतां सुरू झालें असून तेथें इंद्रियविज्ञानशास्त्रविषयक नवीन शोध (रिसर्च) लावण्याचें काम चालू असतें. शिवाय, मुलांच्या पालनपोषणाच्या शास्त्रशुद्ध रीती कोणच्या त्या ठरविणें, मुलांचे रोग जाणणारे डाक्टर आणि दाया तयार करणें, शिशूंच्या आरोग्यशास्त्राची त्यांनां विशेष माहिती करून देणें व लोकांत त्या माहितीचा प्रसार करणें, आणि या विषयांत जे जे नवीन शास्त्रीय शोध लागले असतील त्यांचा व्यवहारांत कसा उपयोग करून घ्यावा हें निरनिराळ्या संस्थानां समजून देणें, हीं कामें या गृहाच्या व्यवस्थापकांकडून होतात. शिशुसंवर्धनाच्या व रक्षणाच्या जेवढ्या म्हणून जर्मन साम्राज्यांत संस्था आहेत त्या सर्वांनां बादशाहिणीनें स्थापन केलेल्या या गृहाचा अतिशय उपयोग होतो; व त्यांनां ह्या गृहाकडून शास्त्रीय माहिती अनायासें मिळते. या इमारतीचा पाया बसवितेवेळीं कैसर बादशहानें पुढील संदेश पाठविला होता:—" शिशुसंवर्धनाच्या कामांत आजपर्यंत होत असलेली हेळसांड या संस्थेच्या द्वारें नाहींशी होऊन लहान मुलांची होत असलेली हानि आटोक्यांत आणतां येईल इतकेंच नाहीं, तर नवीन नवीन शास्त्रीय शोध लावून मुलांच्या पोषणाला योग्य असे स्वाभाविक व मनुष्यानें निर्माण करण्याचे उपाय कोणचे हेंहि ठरवितां येईल, आणि त्यायोगें अकालीं मरण पावणाऱ्या बालकांचे प्राण आपल्याला वांचवितां येतील. " बादशहाच्या प्रोत्साहनानें स्थापन झालेल्या या संस्थेची उपयुक्तता आपण लक्ष्यांत घेतली म्हणजे मानवी सुधारणेकरतां इंद्रियविज्ञान व इतर शास्त्रें मनुष्यानें आपल्या अगदीं कह्यांत ठेविलीं पाहिजेत, हा जर्मन लोकांचा समज किती दृढ आहे याची खात्री आपल्याला पटते.

जर्मनींतील मोठ्या शहरांतील श्रीमंतांच्या बायका आपला फुरसतीचा वेळ या परोपकाराच्या व राष्ट्रीय कामाकडे लावीत असतात, याबद्दल त्यांची स्तुति करावी तितकी थोडी आहे. देवानें आपल्याला जेवढी बुद्धि दिली असेल तेवढ्यावरच त्या संतुष्ट न राहतां, आपल्या हातून खरी खरी लोकसेवा घडावी या हेतूनें त्यांनीं 'प्रेपेरेटरी क्लासेस' काढले आहेत व तेथें या कामाला लागणारें जरूर तितकें शास्त्रीय व वैद्यकी ज्ञान त्या संपादन करतात! याशिवाय 'वुइमेन्स पेट्रिऑटिक सोसायटी-'चे स्त्रीसभासद मजुरांच्या लेंकुरवाळ्या बायांनां मुलांचें संगोपन कसें करावें, व्यवस्थितपणानें संसार कसा करावा, या विषयांवर वरचेवर व्याख्यानें देत असतात.

जर्मनींतील जन्ममृत्यूचे अलीकडचे आंकडे पाहिले म्हणजे जन्मसंख्या व मृत्युसंख्या कमी कमी होत चालल्या आहेत असें दिसतें. जन्मसंख्या यापुढें अशीच कमी होत चालली असें आपण गृहीत धरून चाललों तरी त्यापासून राष्ट्रांतील लोकसंख्या कमी पडणार नाहीं; कारण, मृत्युसंख्याहि त्याबरोबरच कमी होत आहे. अशा स्थितींत एकंदर मृत्युसंख्येंत असलेली लहान मुलांची मृत्युसंख्या जर कमी झाली तर ती फायद्याचीच बाजू आहे. इंग्लंडच्या संयुक्त राज्यांत दर शंभर मुलांत बारा महिन्यांच्या आंत जितकीं मुलें मरतात त्यापेक्षां आठनऊ मुलें सध्यां जर्मनींत अधिक मरतात. ही एवढी हानिच जरी प्रस्तुतच्या मोहिमेनें बंद झाली तरी लोकसंख्येच्या दृष्टीनें जर्मनीचें बरेंच मोठें कार्य होईल असें वाटतें.

परंतु भावी पिढीच्या शरीरसामर्थ्याची व कल्याणाची जी काळजी घेतली जाते ती शैशवावस्थेपावेतोंच घेतली जाते, असें यावरून कोणीं समजूं नये. मुलाच्या वाढीबरोबर त्या त्या अवस्थेंत त्याच्या शरीरप्रकृतीची काळजी घेण्याकरतां निरनिराळ्या 'एजन्सीज्' स्थापन झाल्या

आहेत. व त्यांच्यामार्फत शाळेंत जाण्याच्या अगोदर मुलांना मोकळ्या हवेंत खेळण्याची व खेळतां खेळतां बालोद्यान-शिक्षणपद्धतीनें शिक्षण देण्याची व्यवस्था होत आहे. मुलगा शाळेंत जाऊं लागला म्हणजे त्याच्या शरीरप्रकृतीची जबाबदारी शाळेच्या अधिकाऱ्यांवर येते व सदरचे अधिकारी ती जबाबदारी ओळखून अपालें काम मोठ्या आस्थेनें आणि काळजीपूर्वक करतात. सहासात वर्षांचीं मुलें अंगांत मळके कपडे घालून कधीं अनवाणी तर कधीं फाटकेतुटके बूट पायांत घालून वर्तमानपत्रें किंवा लहान मुलांचीं खेळणीं रस्त्यावर विकतांनां लंडन शहरांत दिसतात; परंतु हा प्रकार जर्मनींत कोठेंहि दृष्टीस पडावयाचा नाहीं.* लहान वयांत असे धंदे करण्याचा कायद्यानें मुलांना प्रतिबंध केलेला आहे व लोकमतहि अशा गोष्टीला प्रतिकूल आहे. स्वतः आईबाप देखील आपल्या किंवा मुलाच्या पोटाकरतां असलें काम मुलांकडून कधीं करवून घेत नाहींत. मुलगा सहा वर्षांचा झाला कीं त्यानें शाळेंत गेलेंच पाहिजे, असा जर्मनींत निर्बंध आहे व तो निर्बंध अक्षरशः पाळला

* लहान मुलांचा जो प्रकार वर सांगितला तोच मोठ्या माणसांतहि दृष्टीस पडतो. मजूर किंवा अशाच दर्जाचे इतर लोक, फार तर काय भिकारी देखील घाणेरडे असत नाहींत व अंगावर फाटके कपडे घालीत नाहींत.

"Exquisite taste is a gift denied to the German race and hence you will not see in the streets of German cities women and men dressed with that elegance & *chic* other cities like Paris, New york or Vienna show. But you will see something even better, namely, an utter absence of raggedly slovenly attired persons. The poorest even wear clothis that, though mended perhaps, are clean & whole, and the mendicant does not ply his vocation except his face be washed & his hands devoid of grime & dust." —Germany P. 285.

जातो. इंग्लंडांत या कामांत बरीच हयगय दिसून येते, आणि त्यामुळें वर सांगितल्या प्रकारचीं मुलें शाळा सोडून भलतीं कामें करीत असल्याचें दृष्टोत्पत्तीस येतें; असो. मुलगा शाळेंत आला कीं, प्रथम शाळेच्या डाक्टराकडून त्याची तपासणी होते, व तो निरोगी व सुदृढ असला तर शाळेच्या पटांत त्याचें नांव दाखल होतें. शाळेंत असेपर्यंत डाक्टरची त्याच्यावर सारखी नजर असते. कित्येक शहरें तर याच्याहि पुढें गेलीं आहेत. तेथील प्राथमिक शिक्षणाच्या शाळांवर दंतवैद्य * व डोळयाच्या व कानाच्या रोगाची चिकित्सा करणारे डाक्टर लोक नेमलेले असतात.

क्षयाचा आजार मुलांनां होऊं नये याबद्दल अलीकडे विशेष खबरदारी घेतली जाते. मोठ्या मांणसांनां हा रोग न जडेल अशी व्यवस्था फार वर्षांपूर्वीपासून चालू होती व त्यामुळें रोगाचा प्रतिकारहि चांगल्या तऱ्हेनें होऊं लागला आहे. परंतु त्या काळांत मुलांकडे मात्र कोणीं लक्ष्य दिलें नव्हतें. या हयगयीपासून त्यांच्यांत या रोगाचा प्रसार जास्त जास्त होत आहे असें दिसून आलें; आणि तेव्हांपासून म्युनिसिपालिट्यांचें व खाजगी संस्थांचें या विषयाकडे लक्ष्य वेधलें, आणि ही शोचनीय स्थिति

* मांसभक्षण करणाऱ्या लोकांचे दांत प्रायः किडलेले असतात. शिवाय रोज सकाळीं दांत घासण्याची दक्षता न घेतल्यानें युरोपियन लोकांत दांतासंबंधीं तक्रारी फार असतात. या कामांत जर्मनींतील माहिती उपलब्ध नसली तरी इंग्लंडांतील आहे. "ग्रेटब्रिटनमध्यें प्रस्तुत काळीं सुमारें ५०,००,००,००० किडके दांत आहेत. एका दांताची किंमत एक पौंड जर धरली तर या किडक्या दांतांपासून राष्ट्राचा किती तरी तोटा होतो! दांत किडले म्हणजे तेथें विष उत्पन्न होतें व त्या विषामुळें नाना प्रकारच्या व्याधी मनुष्याला जडतात." (Daily Mail Year Book-1915). या माहितीवरून जर्मनींत काय स्थिति असेल याची वाचकांनां कल्पना करतां येईल. लहान मुलांच्या दांतांची काळजी घेण्याचा जर्मनीनें उपक्रम केला आहे हें स्तुत्य आहे.

नाहींशी करण्याचे त्यांनीं जारीचे प्रयत्न सुरू केले. क्षयी रोग्यांकरतां जे निराळे दवाखाने काढले आहेत, त्यांतच मुलांकरतां अलीकडे विशेष प्रकारची सोय झाली आहे. एखादा शाळामास्तर क्षयानें पीडित आहे असें आढळून आलें तर त्याचा संसर्ग शिष्यांनां बाधूं नये म्हणून त्याला लागलीच शाळेंतून काढतात व समुद्रकाठीं या रोग्यांकरतां मुद्दाम बांधलेल्या हवाशीर जागेंत नेऊन ठेवतात. जर्मनींत मुलांनां दारूसारखीं मादक द्रव्यें सेवन करण्याची संवय असते. ही त्यांची संवय घालविण्याकरतां हल्लीं अतिशय कडक उपाय योजले आहेत. मुलाचें नांव शाळेच्या पटांत दाखल झाल्याबरोबर मादक द्रव्याचें सेवन मुलांच्या कोंवळ्या शरीरप्रकृतीला किती हानिकारक आहे हें दाखविणारीं छापील पत्रकें मुलांच्या आईबापांनां देण्याचा व तदनुसार त्यांच्याकडून वर्तन करविण्याचा उद्योग बर्लिन शहरांत सुरू झाला आहे.

लहान वयांत व मोठेपणीं उघड्या हवेंतील खेळ खेळण्याची इंग्लंडांत जशी प्रवृत्ति आहे तशी जर्मनींत नाहीं. शाळेंत जाणारीं तसेंच कारखान्यांत काम करणारीं मुलें व मुली अभ्यासांत व कामांत सदा जखडून टाकलेल्या असतात. मुलामुलींनीं मोकळ्या हवेंत रोज नानाप्रकारचे खेळ खेळावेत, या हेतूनें हल्लीं जागोजाग व्यायामशाळा व "प्लेग्राउंड्स" स्थापन झाल्या आहेत. मजुरांच्या वस्तीजवळ मोकळीं पटांगणें या कामाकरतां राखून ठेवण्याची म्युनिसिपालिट्यांनीं व्यवस्था केली आहे.

लहान मुलांची शरीरप्रकृति व सामर्थ्य वाढविण्याच्या आतांपर्यंत वर्णन केलेल्या कामांत, समाजांतील कोणच्या लोकांकडून मोठ्या शहाणपणानें व उत्साहपूर्वक जर मदत होत असेल तर ती सोशियालिस्टांकडून होते, ही मोठी मौजेची गोष्ट आहे. सामाजिक व राजकीय बाबतींत सुधारणा घडवून आणण्याच्या कांहीं तरी कल्पनिक योजना काढाव्या, सदा त्यांचाच काथ्याकूट करीत बसावें व व्यवहारांत समाजाच्या उपयोगीं पडूं

नये, असा या लोकांचा नित्याचा क्रम आहे, अशी पुष्कळ लोकांची समजूत आहे; व ती कांहीं अंशानें खरीहि आहे. या मानानें पाहिलें असतां, शिशुसंवर्धनाच्या बाबतींत त्यांनीं जर औदासीन्य स्वीकारलें असतें तर कोणालाहि आश्चर्य वाटतेंना. परंतु चमत्कार हा कीं, या विषयांत त्यांचें लक्ष्य तर आहेच आहे; पण याशिवाय म्युनिसिपालिटयांच्या कामांत, व समाजहिताच्या जेवढ्या म्हणून बाबी आहेत त्या सर्वांत, त्यांचें पूर्ण लक्ष्य असतें; तसेंच व्यवहारोपयोगी योजना जर कोणाच्या डोक्यांतून निघत असतील तर त्या त्यांच्याच डोक्यांतून निघतात असा सर्वत्र अनुभव आहे. राष्ट्राचें शरीरसामर्थ्य सर्व बाजूंनीं वाढविण्याच्या उद्योगाला सोशियालिस्ट पक्षांतील पुढाऱ्यांनीं अंगमेहनतीनें व वर्तमानपत्रांच्या साहाय्यानें जितकें उत्तेजन दिलें आहे, तितकें इतरांकडून मिळत नाहीं, आणि याबद्दल त्यांचा धन्यवाद गावा तितका थोडा आहे. येथें, त्यांचीं प्रतिपाद्य मतें व त्यांच्या हातून प्रत्यक्ष जें काम घडतें तें, या दोहोंत विलक्षण विरोध दिसतो; परंतु त्या विरोधामुळें त्यांच्या हातून होणाऱ्या देशसेवेची किंमत अणुमात्रदेखील कमी नाहीं हें कोणीहि कबूल करील.

मजुरांचें शरीरसामर्थ्य वाढवून त्यांच्या अंगांत विशेष कार्यक्षमता उत्पन्न करण्याच्या हेतूनें विमा उतरण्याचे वगैरे कायदे पास करून जर्मनींतील निरनिराळीं संस्थानें व सार्वजनिक हिताच्या खाजगी संस्था कशी उत्कृष्ठ कामगिरी बजावीत आहेत हें प्रसंगानुसार मागें एका प्रकरणांत सांगितलेंच आहे. या प्रकरणांत मुलांच्या शरीरप्रकृतीची कशी काळजी घेतली जाते हें सांगितलें. याप्रमाणें दोनहि दिशांनीं एकसारखे प्रयत्न सुरू असल्यानें केवढें मोठें राष्ट्रकार्य जर्मनींतील लोक सध्यां करीत आहेत, बरें! उद्योगयुगाच्या आरंभाआरंभाला मजूरवर्गाकडून कसून काम करून घेण्याची प्रवृत्ति कारखानदारांत व व्यापाऱ्यांत दिसून येत होती. वाजवीपेक्षां जास्त वेळ करावें लागणारें काम, बेताची मजुरी,

घाणेरड्या जागेंत असणारे कारखाने व कलागृहें, बायका व मुलें यांच्याकडून त्यांच्या ताकदीपेक्षां करून घेण्यांत येणारें जास्त काम, मजुरांची वाईट हवेंतील घरें, हे अनिष्ट प्रकार इतर औद्योगिक देशांत जसे असतात तसे आरंभीं जर्मनींत देखील होते. परंतु त्यांचा प्रतिकार करण्याचें काम जर्मन लोकांनीं जसें मनावर घेतलें आहे तसें कोणीं घेतलेलें नाहीं. १८८१ सालापासून, म्हणजे समाजसुधारणेच्या युगाला आरंभ झाल्यापासून, या दिशेनें त्यांनीं आपले प्रयत्न विशेष नेटानें सुरू केले व त्यामुळें आजला उद्योगधंद्यांतील मजुरांची स्थिति किती तरी सुधारली आहे. विमा उतरण्याच्या कायद्याबद्दल १९०६ सालीं एका अधिकारी मुत्सद्द्यानें पुढें लिहिलेले उद्गार काढले होते, व ते विशेष ध्यानांत ठेवण्याजोगे आहेत. ते उद्गार असे:—"विमा उतरण्याच्या कायद्यांनीं विशेष प्रगति केली ती ही कीं, 'पुअर-रिलीफ-'वर अवलंबून न राहतां, विमाफंडाला स्वत: पैसे दिल्यानें, मजुरांनां आपत्काळीं पैशाची मदत मागण्याचा हक्क उत्पन्न झाला आहे. जर्मनींत ही जी व्यवस्था आम्हीं सुरू केली आहे ती कधींहि बंद पडणार नाहीं, असा मला भरंवसा आहे. मजूरवर्ग केलेले उपकार स्मरणारा नाहीं, असें म्हणून सामाजिक स्वरूपाच्या सरकारी कायद्यांनां (Social-political legislation) हासणारे पुष्कळ लोक आहेत. परंतु त्यांनां माझें उत्तर एवढेंच आहे कीं, कोणचेंहि सरकार केवळ लोकांची कृतज्ञता संपादन करण्याकरतां राज्यांत कायदे करीत नाहीं. शिवाय, या लोकांनां आणखी असें विचारलें पाहिजे कीं, १८८१ चा बादशहाचा जाहिरनामा (Imperial Riscript) प्रसिद्ध झाल्यापासून मजुरांची स्थिति सुधारण्याचा मुळींच जर प्रयत्न झाला नसता, तर उद्योगधंद्यांची वाढ होऊन देखील मजूरवर्ग संतुष्ट राहिला असता काय?"

इंग्लंडांतील गिरण्या व कारखाने यांच्या कायद्यांपेक्षां जर्मनींतील हे

कायदे विशेष सवलतीचे आहेत. त्यांच्यायोगानें लहान मुलांनीं काम करण्याचे तास कमी झाले आहेत इतकेंच नाहीं, तर त्यांची शरीरप्रकृति चांगली रहावी, काम करतांनां त्यांच्या जीवाला त्रास होऊं नये व जीवावरचें संकट त्यांच्यावर येऊं नये, या बाबतींत हे कायदे जर्मनींतील एकंदर परिस्थितीच्या मानानें फाजिल सवलतीचे आहेत, असा देखील त्यांच्यावर कित्येकांचा आक्षेप आहे. हा आक्षेप घेणारे विशेषें-करून कारखानदार लोक आहेत; व मजुरांनां विशेष सवलती दिल्यानें आमच्यावर वाजवीपेक्षां जास्त पैशाचा बोजा लादला जातो, अशी त्यांची नेहमीं तक्रार चाललेली असते. तथापि केवळ आपल्यापुरताच विचार न करतां दूरवर दृष्टि देऊन या विषयाचा विचार करणारे जे थोडे कारखानदार आहेत ते असें कबूल करतात कीं, जे मजुरांचें हित तेंच कारखानदारांचें व भांडवलवाल्यांचेंहि हित होय. आणि अशी दूरदृष्टि ठेवूनच मजुरांच्या संरक्षणाचे कायदे सरकारनें केले आहेत, आणि प्रसंग पडल्यास पुढें त्यांत आणखी सुधारणा करण्यालाहि तें मागेंपुढें पाहणार नाहीं.

प्रकरण १७ वें

# राष्ट्राचा विस्तार

फ्रेंचांबरोबर केलेलें युद्ध संपल्यानंतर आणि जर्मन राष्ट्राची पश्चिम हद्द कायम केल्यानंतर प्रिन्स बिस्मार्कच्या मतानें असें ठरलें कीं, जर्मनीला जितका जास्ती मुलुख हवा होता, तितका या युद्धांत मिळाला; आतां जास्ती मुलुख मिळविण्याची कोणीं हाव धरूं नये, व जर्मनीनें यापुढें पूर्ण समाधानवृत्ति ठेवावी. आणि या आपल्या वृत्तीला अनुसरूनच 'फॉरिन-मिनिस्टर' या नात्यानें परदेशांशीं त्यानें आपली वागणूक ठेवली. जर्मन राष्ट्र नवीन उदयाला आल्यामुळें त्याच्याविषयीं इतर राष्ट्रांच्या मनांत जो संशय व जी भीति उत्पन्न झाली ती अस्थानीं आहे, असें दाखविण्याकरतां प्रिन्स बिस्मार्कनें वरपांगीं संतुष्टवृत्ति स्वीकारली, असें म्हणतां येत नाहीं. कारण, देशांत स्वस्थता राखून व आपल्या सरहद्दी बळकट करून जर्मन राष्ट्र वैभवसंपन्न करण्याच्या कामांत इतर राष्ट्रांनीं व्यत्यय आणूं नये, एवढेंच जर्मन लोकांचें त्यांनां मागणें आहे, याव्यतिरिक्त दुसरें एखादें मागणें मागावयाचें आतां राहिलें नाहीं, अशी त्याची पक्की समजूत झाली होती; आणि यावत्कालपावेतों त्याच्या हातांत सत्ता होती व तो जबाबदारीनें सर्व कामें करीत होता, तावत्कालपावेतों जर्मनीचें परराष्ट्रांबरोबरचें राजकारण अगदीं याच धोरणानें चालू होतें.

"सर्व जगाचें आक्रमण करणारी राजनीति" ( World-policy ) हे शब्द बिस्मार्कच्या तोंडांतून क्वचितच ऐकूं येत होते, ही गोष्ट लक्ष्यांत ठेवण्याजोगी आहे. परराष्ट्रीय राजकारणांत नव्या स्नेहभावाच्या गांठी मारण्यांत व जुनें गुंतागुंतीचे प्रश्न उकलण्यांतच त्याची अर्धीअधिक कारकीर्द खर्च झाली. परंतु त्या काळचें हें राजकारण म्हणजे युरोपांतील पांचसहा

राष्ट्रांचे परस्परांमधील संबंध कायम करणें इतक्यापुरतेंच होतें. कारण, युरोपखंडाच्या बाहेर युरोपियन राष्ट्रसंघ विशेषसें लक्ष्य देत नव्हता. जर्मनीच्या वसाहती असाव्या अशी बिस्मार्कची इच्छा नव्हती; परंतु १८८० च्या आरंभाला लोकांच्या आग्रहावरून त्यानें या विषयांत मन घातलें, व समुद्रावर आपली दृष्टि दूरवर फेंकली आणि वसाहती स्थापन करण्याचा उद्योग त्यानें आरंभिला. परंतु त्याच्या कारकीर्दीत या उद्योगाला आरंभीं सांगितलेल्या 'वर्ल्ड पॉलिसी-'चें* स्वरूप आलें नाहीं; आणि तें स्वरूप जेव्हां त्याला प्राप्त झालें, तेव्हां जर्मन राष्ट्रानें बिस्मार्कची राजनीति एका बाजूला गुंडाळूनच ठेविली म्हणण्यास हरकत नाहीं.

आजच्या परराष्ट्रीय राजकारणाच्या कल्पना अगदीं निराळ्या स्वरूपाच्या आहेत. युरोपांतील जुन्या कल्पनांचें आपण जर एक वर्तुळ कल्पिलें, तर असें म्हणणें शोभेल कीं, बिस्मार्कच्या काळांत युरोपखंड या

---

* "World-Policy" या इंग्रजी शब्दाचा मथितार्थ वर दिला आहे. यालाच जर्मनींत वेल्ट-पॉलिटिक (Welt-Politik) असें म्हणतात. याचा अर्थ काय हें खालील इंग्रजी उताऱ्यावरून वाचकांचे ध्यानांत येईल:—

It was the Kaiser who was the first in Germany to speak of his nation as a world power.......What he meant was that Germany, transformed into one of the three leading exporting and naval powers, expanding as a shipping and colonial nation, and rapidly growing as an industrial and manufacturing centre, must needs enlarge her mental horizon, and reckon not only with her Continental neighbours, not only with Europe, but with the whole globe as a competitor, customer, friend or foe. She must extend her political and commercial influence all over the world, and must have ships on every sea as well as merchants in every port. As the Kaiser expressed the same idea, on a later occasion, in graphic though somewhat boastful language: "Nothing must be done any where on the globe without the sanction of Germany's ruler."

—Germany.

वर्तुळाच्या केंद्रस्थानीं जें होतें तें आतां त्याच्या पृष्ठभागावर येऊन बसलें आहे. प्रगतिपर युरोपियन राष्ट्रांत विशेष महत्त्वाचे प्रश्न जे सध्यां उपस्थित झाले आहेत ते पौर्वात्य राष्ट्रें व तेथील लोक यांचा भविष्यत्काळ कशा स्वरूपाचा असावा यासंबंधाचें आहेत. पश्चिम युरोपांतील लोकसंख्या यापूर्वीच भूगोलीय व सांपत्तिक मर्यादेच्या बाहेर गेली आहे. आणि जगाच्या इतर भागांत आपल्या कारखान्यांत तयार झालेला पक्का माल पाठवून त्याच्या मोबदला तेथील शेतांत तयार होणारें धान्य आपल्या इकडे आणावयाचें, अशा तऱ्हेचा क्रयविक्रय मोठ्या प्रमाणावर करणाऱ्या नव्या नव्या बाजारपेठा इतरत्र ज्या मानानें हस्तगत करतां येतील, त्या मानानें तेथील लोकसंख्या वाढण्याला वाव मिळेल हें उघड दिसूं लागलें आहे. या व अशा तऱ्हेच्या अन्य विचारांमुळें जुन्या राजकीय सिद्धान्तांनां प्रस्तुत बरेंच विस्तृत स्वरूप प्राप्त झालें आहे, व युरोपीयन राजनीतीचा व्याप सर्व जगावर पसरला आहे; आणि नवीन तऱ्हेच्या कल्पनांचा जर्मनीनें जो अंगीकार केला आहे तो देखील अपरिहार्य दैवबलानुसारच केला आहे, असें म्हटलें पाहिजे.

अलीकडे जगाला व्यापणारी राजनीति—जिला जर्मन भाषेंत "वेल्ट-पॉलिटिक" ( Welt-politik ) अशी संज्ञा आहे—जर्मनीनें जी स्वीकारली आहे ती केवळ राजकीय हेतूनें स्वीकारली आहे, असें इतर देशांतील राजनीतिनिपुण माणसांनां वाटावें, हेंहि अगदीं स्वाभाविकच आहे. युरोपांतील निरनिराळ्या राष्ट्रांच्या शक्तींत सध्यां जो एक प्रकारचा समतोलपणा आहे, तो ढासळून पाडण्याचा जर्मनीचा अंतस्थ हेतु आहे, व तो हेतु साध्य झाला म्हणजे जास्ती मुलुख मिळविण्याच्या उद्योगाला जर्मन राष्ट्र लागेल, असें या लोकांनां वाटतें; आणि आपला हा तर्क खरा आहे असें गृहीत धरून ते असें प्रतिपादन करतात

हल्लींची व्यवस्था जर्मन लोकांनां न्याय्य वाटत नसल्यानें

तिच्यांत योग्य तो फेरबदल करण्याचा आपला विचार त्यांनीं कायम केला आहे. ह्या व अशाच प्रकारच्या इतर तर्कांचा विशेष खल करण्याचा आमचा उद्देश नाहीं; अथवा हे तर्क व्यवहारदृष्ट्या कितपत जमेस धरतां येतील, तसेंच ते कितपत सयुक्तिक आहेत, याची चौकशी करण्याचें देखील आम्हांला प्रयोजन वाटत नाहीं. राष्ट्रीय राजनीतीचे हे केवळ कल्पनेनें रेखाटलेले हेतू बाजूला सारून, जर्मनीची खरी स्थिति काय आहे याचा सरळ मनानें विचार करणाऱ्या गृहस्थाला त्या देशाची सांपत्तिक स्थिति डोळ्यांपुढें दिसूं लागते; व तिचें खरें स्वरूप त्याच्या लक्ष्यांत आलें म्हणजे त्याची अशी खात्री पटते कीं, आपलें वर्चस्व जगाच्या इतर भागांत अवश्य वाढविलें पाहिजे, असें जर्मनीला अलीकडे जास्त जास्त जें वाटूं लागलें आहे, त्याच्या मूळाशीं ही सांपत्तिक स्थितिच आहे. खालीं दिलेल्या आंकड्यांकडे नजर फेंकली म्हणजे १८७१ पासून जर्मनीची लोकसंख्या कशी वाढत गेली आहे हें दिसून येतें.

| वर्ष | लोकसंख्या | वाढ | |
|---|---|---|---|
| | | ऐन वाढ | शेंकडा प्रमाण |
| १८७० | ४०,८१८,००० | ...... | ...... |
| १८७५ | ४२,७२९,००० | १,९११,००० | ४.७ |
| १८८० | ४५,२३६,००० | २,५०७,००० | ५.९ |
| १८८५ | ४६,५५८,००० | १,६२२,००० | ३.६ |
| १८९० | ४९,४२८,००० | २,५७०,००० | ५.५ |
| १८९५ | ५२,२८०,००० | २,८५२,००० | ५.८ |
| १९०० | ५६,३६७,००० | ४,०८७,००० | ७.८ |
| १९०५ | ६०,६४१,००० | ४,२७४,००० | ७.६ |
| १९०७ जून १२ * | ६१,६९७,००० (अदमासें) | १,०५६,००० | ... |

* १९१४ सालच्या जर्मन इयर बुकामध्यें तेथील लोकसंख्या सहा कोटि ऐशीं लक्ष दिलेली आहे.

या आंकड्यांवरून वाढत्या लोकसंख्येचा जबरदस्त काळजी उत्पन्न करणारा प्रश्न जर्मनीला कसा दटावूं पहात आहे, हें स्पष्टपणें शाबीत होतें. जर्मनीनें समाधानवृत्ति स्वीकारावी असा बिस्मार्कनें उपदेश केल्यापासून व त्या धोरणानें दुसऱ्या देशांकडे न पाहतां स्वतःच्या देशांतील अंतःस्थिति सुधारण्याकडे त्यानें आपलें सर्व लक्ष्य दिल्यापासून, राज्यांतील लोकसंख्या दोन अधिक कोटींनीं वाढली आहे. प्रस्तुत दरवर्षी लोकसंख्येची वाढ आठ लाखांपेक्षां जास्त आहे; मृत्युसंख्या, व विशेषेंकरून अल्पवयी मुलांची मृत्युसंख्या, हळुहळू कमी होत गेली म्हणजे ही वाढ दरवर्षी दहा लाखांवर येऊन बसेल; आणि एका जर्मन अधिकाऱ्यानें असें जें ठरविलें आहे कीं, १९२५ सालाला जर्मनीची लोकसंख्या आठ कोटि, म्हणजे जर्मनीला आतां राज्यविस्तार नको असें बिस्मार्कनें ठरविलें त्या वेळच्या लोकसंख्येपेक्षां दुपटीनें जास्त होईल. हें भविष्य तरी त्यानें भीत भीत बरेंच कमी ठरविलें आहे, असें अलीकडचे आंकडे पाहतां आम्हांस वाटतें.

वरील हकीकत ध्यानांत घेतली म्हणजे जे प्रश्न उपस्थित होतात ते भौतिक आणि सांपत्तिक स्वरूपाचे आहेत. इतक्या पुष्कळ लोकांना रहावयाला जागा कोठें द्यावी ? त्यांना उद्योगधंदा काय द्यावा ? आणि त्यांच्या पोटापाण्याची व्यवस्था कशी करावी ?

जर्मनीची लोकसंख्या दरवर्षी अतोनात वाढत आहे, ही मुख्य गोष्ट जो कोणी दूरदर्शीपणानें नीट ध्यानांत घेईल, त्याला असें खचित वाटेल कीं, जर्मनीच्या वाढत्या उद्योगधंद्यांवर कांहीं ठिकाणचे लोक प्रस्तुत प्रसंगीं देखील जी कुत्सित टीका करतात, ती अप्रयोजकपणाची आहे; व त्यांनीं यापुढें तरी ती करण्याचें सोडून द्यावें. ही वार्षिक वाढ इंग्लंडचें संयुक्त राज्य, आस्ट्रिया-हंगेरी आणि इटली, व त्यांतच भरतीला घातलेला फ्रान्स, या सर्व देशांतील लोकसंख्येच्या वाढीजवळजवळ आहे. इतके लोक

जीवंत राहिले पाहिजेत व त्यांचा चरितार्थ शारीरिक श्रमावर चालावयास पाहिजे. जन्मल्याबरोबर मुलांच्या गळ्याला फांस लावून तीं मारावयाची तर नाहींत; तेव्हां, लोकांची संख्या हल्लीं जशी झपाट्यानें वाढत आहे तशीच ती पुढें वाढत राहिली तर जर्मनीला त्यांची व्यवस्था लावण्याचे दोन मार्गच काय ते खुले आहेत: उद्योगधंदे सपाटून वाढवावे हा एक; किंवा लोकांनां देशत्याग करावयास सांगावें हा दुसरा. एकंदर परिस्थितीचा विचार करून व्यवहारदृष्ट्या हाच विषय लोकांपुढें मांडावयाचा झाला, तर असें स्पष्टपणें म्हणावें लागतें कीं, जर्मन राष्ट्राच्या आयुष्यक्रमांत पुढें लिहिलेल्या निरुत्तर अडचणी उपस्थित झाल्या आहेत:—वाढती संतति, मर्यादित मुलूख, नैसर्गिक सामग्रीची टंचाई, भिन्नभिन्न तऱ्हेचें हवापाणी, व मजुरीवर निर्वाह करणाऱ्या लाखों लोकांच्या पोटापाण्याची व्यवस्था करण्याची अपात्रता. या अडचणींतून बाहेर पडावयाचे मार्ग दोन आहेत. (१) शेजारचे प्रांत अथवा सरहद्दीवरील समुद्र ओलांडून नवा जर्मनी स्थापन करावयाचा, व ज्यांनां जुन्या जर्मनींत पोटाला पुरेसें खावयाला मिळत नाहीं त्यांची तेथें सोय करून द्यावयाची, हा एक; आणि (२) हें जर साध्य न होईल व लोकांनां देशांतल्या देशांतच सध्यां राहणें भाग पडून उद्योगधंद्यांवर निर्वाह करावा लागेल, तर जर्मन कारखान्यांत तयार झालेला माल घेऊन त्याच्या मोबदला धान्य देणाऱ्या बाजारपेठांचा आश्रय करावयाचा, हा दुसरा. एखाद्या देशांत प्रजोत्पत्ति विपुल असून भौतिक मर्यादेच्या बाहेर तिची वाढ होऊं लागली म्हणजे त्या देशाला जशी कठिण अवस्था प्राप्त होते, तशी अवस्था प्रस्तुतकालीं जर्मनीला प्राप्त झाली आहे.

देशांतील जमिनींत लोकांच्या पोटाला लागणारें धान्य हल्लींपेक्षां जास्त उत्पन्न करतां यावयाचेंच नाहीं असें नाहीं; परंतु आणखी कितीहि

जास्त धान्य जरी पिकवितां आलें, तरी तेवढयावर सर्व लोकांचा उदर-निर्वाह होणें अगदीं अशक्य आहे, याविषयीं वाद नाहीं. सरकार शेती-च्या उत्कर्षाकरतां कायदे करील, संरक्षक जकातीसारख्या कृत्रिम उपा-यांनीं इतर देशांपेक्षां जर्मनींतील धान्याची किंमत वाढवील, या सर्व गोष्टी आपण गृहीत धरून चाललों, तरी तेवढ्यानें धान्याची उत्तरोत्तर जास्त वाढत जाणारी अडचण दूर होईल असें संभवत नाहीं. मागील प्रकरणांत वर्णन केलेल्या शेतकऱ्यांच्या अडचणी जोंपर्यंत कायम आहेत व जोंपर्यंत थोडक्या खर्चांत शेतीचा धंदा जर्मनींत साध्य नाहीं, तोंपर्यंत रशिया किंवा आरजेंटिना येथील कमी खर्चांत शेती करणारे शेतकरी यांच्यापुढें जर्मन शेतकऱ्यांचा टिकाव लागणार नाहीं. सारांश, फारफार झालें तर आणखी कांहीं दिवस, देशांतल्या देशांत आम्ही धान्याचा पुर-वठा करूं शकूं, अशी जर्मन शेतकऱ्यांनां आशा धरतां येईल. परंतु कसेंहि झालें तरी शेवटीं त्यांनां हात टेकावे हे लागणारच. परदेशांतून धान्य आणल्याशिवाय भागणार नाहीं, आणि त्या धान्याला संरक्षक जकाती-मुळें जबर किंमत द्यावी लागल्यानें लोक अगदीं जेरीस येतील. बरें, या संरक्षक जकाती अजीबात बंद कराव्या म्हटलें, तर तेंहि शक्य नाहीं. कारण, तसें केलें आणि मग परदेशचें धान्य जर्मनीच्या बाजारांत स्वस्त विकूं लागलें म्हणजे जर्मनींत कोणीहि धान्य पिकवीनासा होईल; जमि-नींत कोणचें तरी एखादें दुसरें पीक तो करील, किंवा उद्योगधंद्यांकडे आपला मोर्चा वळवील.

दरवर्षी वाढत्या लोकसंख्येला जमिनीच्या आश्रयानें जर राहतां येत नसलें तर व्यापार आणि उद्योगधंदे जास्त वाढवून स्वतःच्या श्रमानें पोट भरण्याचे मार्ग लोकांनां खुले करून दिले पाहिजेत, त्याशिवाय उपाय नाहीं. म्हणजे असें कीं, जर्मनींतील शेती उत्कृष्ट तऱ्हेची करावयाची हें ध्येय सोडून दिलें पाहिजे. या कल्पनेप्रमाणें पाहिलें तर सध्यां देशांत

असलेल्या लोकांचाच नव्हे, तर दरवर्षी दहा लाख या प्रमाणानें (हें प्रमाण अस्तित्वांत यावयाला फार दिवस वाट पहावयास नको) वाढत जाणाऱ्या लोकांचा, जर्मनींत बराच काळपावेतों समावेश होण्याजोगा आहे. प्रस्तुत जर्मन साम्राज्यांतलि प्रत्येक चौरस मैलाला सरासरी तीनशें माणसें पडतात ( १८७५ सालीं दोनशें पडत होतीं. ); तर उद्योग-धंद्यांत फार पुढें गेलेले युरोपांतील देश जे इंग्लंड आणि बेल्जम या देशांत सहाशें पडतात. खुद्द जर्मनींतील देखील कांहीं संस्थानांत तीनशेंपेक्षां जास्ती लोक वर सांगितलेल्या जागेंत राहतात, व असें असून तेथें दाटी झाली आहे असें वाटत नाहीं. सॉक्सेन, ऱ्हाइनलंड व वेस्ट-फालियाचे प्रांत यांत अनुक्रमें दर चौरस मैलास ७८०, ६२०, ४६२, इतकी दाट लोकवस्ती आहे. हें प्रमाण फार मोठें आणि तें सर्व जर्म-नींत लागू करता येईल असें वाटत नाहीं. तरी पण औद्योगिक प्रगती-बरोबर दरमैली हें प्रमाण सरासरीनें तीनशेंपेक्षां बरेंच जास्त झालें तरी चालण्याजोगें आहे.

उद्योगधंद्यांची जास्त प्रगति झाली म्हणजे परदेशांतील जास्त बाजार हस्तगत झाले पाहिजेत हें ओघानेंच प्राप्त होतें; आणि ज्या मानानें तेथें धान्य खरेदी करावें लागेल त्या मानानें स्वदेशांत तयार झालेला माल तेथें विकावा लागेल.

उद्योगधंद्यांत फार दिवस मुरलेल्या इतर राष्ट्रांनां असें वाटूं लागलें आहे कीं, चोहोंकडून एकसमयावच्छेदेंकरून आपल्यावर मारा होऊं लागला आहे. या माऱ्यापुढें 'गण्डस्योपरि पीटिका' या न्यायानें औद्योगिक प्रगतिपर जर्मनीची भावी उन्नति त्यांनां दुःसह होईल यांत शंका नाहीं; कारण, जगाच्या बाजारांत जर्मनीची यांच्याबरोबर विलक्षण चढाओढ सुरू झाल्याशिवाय राहणार नाहीं. एखादा व्या-पारी स्वतःच्या फायद्याकरतां आपला व्यापाराचा मोर्चा लांबपर्यंत नेऊन

भिडवितो, व स्वतःचा शक्य तितका फायदा करून घेतो. परंतु सर्व राष्ट्राचा फायदा करावयाचा झाला तर हजारों लोकांनीं दूरदूरच्या अनेक बाजारांत आपलें ठाणें बसविलें पाहिजे, व तसें केलें तरच राष्ट्र जीवंत राहील. आतां जर्मनराष्ट्रांत अशी उचल झाली म्हणजे ती प्रतिस्पर्धी राष्ट्रांनां भयावह वाटावी हें साहजिक आहे.

आतां दुसरा मार्ग राहिला तो देशत्यागाचा; आणि तो मार्ग विशेष श्रेयस्कर आहे हें जर्मनी जाणून आहे. तथापि या मार्गांत जर्मनीला फार अडथळे येत आहेत. कारण, वसाहतीच्या शर्यतींत *जर्मन राष्ट्र फार उशिरानें सामील झालें; आणि त्याच्या संरक्षणाखालीं आलेल्या मुलखांपैकीं पुष्कळसा मुलूख युरोपियन लोकांनीं वसाहत करण्याला योग्य नाहीं. ब्रिटिश राज्याच्या कॅनडा, आस्ट्रेलिया यांसारख्या वसाहतींशीं तुलना करून पाहिलें, तर जर्मनीच्या वसाहतीच नाहींत असें म्हणावें लागतें. जर्मन वसाहती म्हणजे जर्मन बादशहाच्या संरक्षणाखालचा किंवा ताब्यांतील मुलूख ( Protectorates and dependencis ) होय. तेथील सर्व सत्ता राजानें नेमलेल्या अधिकाऱ्यांच्या हातांत स्वतंत्रपणें आहे. जर्मन लोकांनीं तेथें कायमचें जाऊन रहावें म्हटलें तर तेंहि शक्य नाहीं. कारण, तेथील हवा-उष्ण म्हणजे त्यांनां न मानवणारी आहे; व तद्देशीय मजूर कामावर लावून बागाईत करण्यापुरताच तेथील जमिनींचा मगदूर आहे. नाहीं म्हणायला नैऋत्य-आफ्रिकेंत खरी खरी वसाहत होण्याचा बराच संभव आहे. कारण, तेथील डामारालंड आणि नामालंड ( Damaraland and Namaland ) या प्रांतांतील पुष्कळशी जमीन फार सुपीक आहे इतकेंच नाहीं, तर तेथील हवा समशीतोष्ण असल्यानें, प्रस्तुतची स्थिति बऱ्याच अंशानें सुधारली म्हणजे, तेथें शेतीच्या

* शिलर कवीनें आपल्या एका पोवाड्यांत असें वर्णन केलें आहे:—

"The earth had already been otherwise disposed of"

वसाहती बऱ्याच मोठ्या प्रमाणावर करतां येतील. दक्षिणेकडील केप-कालोनींत जितक्या माणसांचा समावेश झाला तितका नैर्ऋत्य-आफ्रिकेंत होऊं शकेल, असें म्हणणारे कांहीं लोक जर्मनींत आहेत. उदाहरणार्थ, जर्मन कोलोनियल सेक्रेटरीनें या गोष्टीला आपल्या रिपोर्टांत अनुकूल मत प्रकट केलें आहे. परंतु तेथील खानिज संपत्ति कोणच्या प्रकारची आहे, ती किती आहे व ती पूर्णतेप्रत आणणें कितपत शक्य आहे, याचा विचार कायम झाल्यावांचून वरील मत व्यवहारदृष्ट्या बरोबर किंवा चुकीचें आहे हें ठरवितां येत नाहीं.

तथापि, साधारण मानानें पाहिलें म्हणजे जर्मनीच्या ताब्यांतील परदेशीय प्रांतांत मोठ्या प्रमाणावर वसाहती करणें गैरसोईचें आहे; आणि त्याचा परिणाम असा होतो कीं, स्वदेश सोडून जर्मनीचा जेथें कांहीं संबंध नाहीं अशा परमुलखांत जितके लोक जातात तितके जर्मनीला बहुतेक शेवटचा रामराम करूनच जातात; आणि या दृष्टीनें जर्मनीचा अखेरीस तोटाच होतो. १८७६ पासून १९०६ अखेरच्या तीस वर्षांत थोडेथोडके नव्हेत, तर बावीस लक्ष पन्नास हजार जर्मन लोक मातृभूमि सोडून गेले; आणि यांपैकीं पुष्कळांनीं परराज्यांत व विशेषेंकरून अमेरिकेंतील संयुक्त संस्थानांत आपलीं घरेंदारेंसुद्धां केलीं आहेत. कांहीं लोक याला अपवादादाखल आहेत; पण त्यांची संख्या इतकी अल्प आहे कीं ती विचारांत न घेतली तरी चालण्याजोगें आहे. १८८७ पासून १९०६ अखेर जर्मनींतून निघून गेलेल्या १,०८५,१२४ लोकांचा पत्ता पुढें लिहिल्याप्रमाणें आहेः—

| | |
|---|---|
| अमेरिकेंतील संयुक्त संस्थानें ... | १,००७,५४७ |
| ब्रेझील ... ... ... ... | २४,०७२ |
| अमेरिकेंतील इतर संस्थानें ... | ३६,१८४ |
| आस्ट्रेलिया ... ... ... | ५,३९० |

| | |
|---|---|
| आफ्रिका ... ... ... ... ... | १,६१८ |
| आशिया ... ... ... ... ... | २,२३३ |

इतके लोक देशत्याग करून गेल्यानें राष्ट्राचा जो तोटा झाला आहे, तो सर्व देशाभिमानी जर्मनांनां दुःसह वाटत आहे. ही दुःखद स्थिति नाहींशी करण्याकरतां वसाहतींचा विस्तार वाढविला पाहिजे, असें जर्मन लोक जर प्रतिपादन करूं लागले, तर इतर देशच्या लोकांनीं या म्हणण्याचा सहानुभूतिपूर्वक विचार मनापासून करावयास हवा; आतां हें खरें आहे कीं, प्रस्तुतच्या काळांत देशत्याग करणाऱ्या लोकांची संख्या बरीच कमी आहे. उदाहरणार्थ, गेल्या सहा वर्षांत ( १९०८ च्या पूर्वींच्या ) सरासरी तीस हजार लोक काय ते परदेशीं गेले. पण वीस वर्षांपूर्वीं ही संख्या प्रतिवर्षीं एक लाखापेक्षां जास्त, आणि त्याच्या पूर्वींच्या कांहीं थोड्या वर्षांत तर दोन लाखांपेक्षांहि जास्त होती. तथापि तशी लाट यापुढें पुनः उसळणार नाहीं असें भाविष्य कोणाला करतां येईल ?

केवळ युरोपांतील जर्मन राष्ट्राच्या सरहद्दी लांबविण्यानें जर्मनीची वर सांगितलेल्या अडचणींतून सुटका होणार नाहीं हें उघड आहे. पॅन-जॅर्मनिक* ( सर्व जगभर पसरलेले जर्मन लोक बादशहाच्या सत्तेखालीं आणण्याची भावना मनांत धरणें ) चळवळीचें ध्येय पुढें ठेवून त्या दिशेनें जर्मनीनें चालविलेल्या प्रयत्नांत काय तथ्य असेल तें असो; ही गोष्ट मात्र उघड उघड दिसत आहे कीं, वाढत्या लोकसंख्येची जी अडचण उपस्थित झाली आहे, ती या चळवळीपासून नाहींशी होणार नाहीं. आतां

---

* That sentiment may be briefly defined as consisting in the wish of uniting under the aegis or the direct sway of the Imperial crown of Germany all those populations of Teutonic blood which, due to a variety of causes, had strayed away from the national fold, so to speak.

इतकी कल्पना करतां येते कीं, आस्ट्रो-हंगेरियन राज्यांत जर्मन भाषा बोलणारे जे लोक आहेत, ते त्या राज्यापेक्षां अधिक सुधारलेल्या उत्तरेकडील राज्यांत (जर्मनींत) सामील होतील; परंतु अमेरिकेंतील स्वतंत्र संस्थानांत किंवा–इतकें दूर कशाला ?–जवळच्या स्वित्झर्लंड देशांत घरेंदारें करून राहिलेले जर्मन लोक तरी पुनः परत आपल्या देशांत येतील किंवा नाहीं ही शंका आहे. शिवाय या रीतीनें राज्याचा विस्तार वाढविल्यानें लोकसंख्येचा प्रश्न, जो हात धुवून मागें लागला आहे, त्यांतून सुटवणूक कशी होईल व जी सांपत्तिक अडचण तूर्त भासूं लागली आहे तिचा तरी उपशम कसा होईल ?

दक्षिण ब्रेझिलमध्यें जशा 'जर्मन सेटलमेंट्स' आहेत त्या नमुन्यावर समशीतोष्ण हवेच्या विस्तृत व सुधारणेच्या कामांत मागें असलेल्या आफ्रिकेंतील जर्मन प्रांतांत नवीन 'सेटलमेंट्स' स्थापन कराव्या, ही कल्पना जर्मनींत हल्लीं विशेष रूढ होऊं लागली आहे; व ही कल्पना अमलांत आली म्हणजे त्याच्या मागोमाग जर्मनीचा प्रभाव, कर्तृत्वशक्ति आणि व्यापार यांचा तेथें फैलाव होईल, असा लोकांचा अदमास आहे. एक जर्मन ग्रंथकार म्हणतो:–" समुद्राच्या पलीकडे कांहीं मुलुख एखाद्या राष्ट्राच्या ताब्यांत असला व त्या मुलुखांत आपल्याइकडे जास्ती झालेल्या लोकांनां आश्रय मिळूं लागला म्हणजे काम आटोपलें, असें मानणें अगदीं चुकीचें आहे; कारण, असा मुलुख नुस्ता ताब्यांत असण्यानें मूळ राष्ट्राचें सामर्थ्य वाढत नाहीं. आस्ट्रेलिया, कॅनडा व दक्षिण आफ्रिका हे प्रांत इंग्रजांच्या ताब्यांत आहेत, एवढ्यानें, किंवा इंग्लंडांतून तिकडे गेलेले हजारों लोक आपल्या मुलांबाळांसह तेथें कायमची वस्ती करून राहिले आहेत एवढ्यानें, इंग्लंडचें सामर्थ्य कांहीं वाढलें नाहीं. इंग्लंडचें सामर्थ्य जें वाढलें आहे तें कशानें ? तर त्या देशांशीं व्यापार करून इंग्लंडनें संपत्ति मिळविली, व त्या संप-

त्तीच्या जोरावर शत्रूपासून बचाव करण्याचें सामर्थ्य आपल्या अंगीं आणलें, या गोष्टीनें त्याचें सामर्थ्य वाढलें आहे. ज्या वसाहतींपासून हा परिणाम घडून येत नाहीं त्या वसाहती फार कमी दर्जाच्या होत; आणि ज्या मुलखामुळें मुख्य राष्ट्राला अशा प्रकारचें महत्त्व प्राप्त होतें त्या मुलखाला वाटेल तर 'वसाहती' ही संज्ञा न देतां दुसरी कांहीं द्या; पण त्यापासून होणारें कार्य, खऱ्या खऱ्या वसाहतींकडून होणाऱ्या कार्याच्या बरोबरीचें असतें, हें नेहमीं ध्यानांत ठेवलें पाहिजे."

सध्यां जर्मनीनें आपले डोळे तीन दिशांकडे, म्हणजे ब्रेझील, आरजेंटिना आणि एशियामायनर या तीन देशांकडे, वळविले आहेत असें दिसतें. वरील अवतरणांत दर्शविलेला हेतु, या तीन देशांत जर्मनीनें आपलें व्यापाराचें बस्तान बसविलें तर कितपत साध्य होईल, हें भविष्यत्काळावर अवलंबून आहे; आणि म्हणून त्यासंबंधानें आतांच तर्कवितर्क करीत बसण्यांत हांशिल नाहीं. व्यापाराला नवीं ठिकाणें कशीं खुलीं होतील, ही सध्यांची खरी अडचण आहे; आणि ती, पुढें अमुक होईल, पुढें तमुक होईल, असा नुस्ता अदमास करीत बसल्यानें आजला दूर होणार नाहीं. बगदाद रेल्वे तयार झाली म्हणजे नवीन मार्केटांची किल्लीच आपल्या हातांत येईल, व मग तेथें व्यापारांत आपणच अग्रस्थान मिळवूं, आणि जर्मन उद्योगधंद्यांचा सपाटून विस्तार करूं, अशी जर्मन लोकांनां बरीच आशा आहे; व ही गोष्ट ते उघडपणानें बोलून देखील दाखवितात. पूर्वीचाच ग्रंथकार म्हणतो:—

"टर्किश एशियांत जर्मनीचा भावी काळ वैभवसंपन्न होईल हें संभवनीय दिसतें. इतर युरोपियन राष्ट्रांप्रमाणें तुर्कस्थानाच्या युरोप, एशिया व आफ्रिका येथील राज्याचे तुकडे तोडण्याचा जर्मनीचा इरादा नाहीं. तुर्की राज्याची एक हातभर देखील जागा आम्हांला मनापासून नको आहे. तुर्कस्थानाला युरोपांत व आफ्रिकेंत पायबंद लागून एशियांतील

तेवढें राज्य घेऊन स्वस्थ बसण्याची पाळी येवो अथवा न येवो, तुर्कस्थानानें एशियामायनरमधील आपला बाजार आम्हांला खुला करावा, व आमच्या उद्योगधंद्यांनां लागेल तो कच्चा माल आम्हांला पुरवावा, इतकेंच आमचें त्या देशापाशीं मागणें आहे; व हें मागणें मागतांनां, इतर राष्ट्रांनां तुम्ही मज्जाव करावा, असें आमचें मुळींच म्हणणें नाहीं; उलट आम्ही तर असें म्हणतों कीं, सर्व राष्ट्रांनां आमच्याप्रमाणेंच बिनशर्त व्यापाराची मोकळीक असावी.'' या बाबतींत जर्मन व्यापारी-जग काय म्हणतें तें 'कलोन गॅझेट-'च्या पुढील उताऱ्यांत नमूद केलें आहे:—'' बगदाद रेल्वे याचा अर्थ तुर्की राज्याच्या दृष्टीनें, नवीन प्रांत ( व्यापाराकरतां ) दुसऱ्या राष्ट्रांनां खुले करून देणें, व जर्मनीच्या दृष्टीनें, जर्मन भांडवलाला व व्यापाराला नवीन क्षेत्र मिळविणें आणि तेथें आपल्या अंगची करामत दाखविणें, असा आहे. जर्मनींतील भांडवलवाल्यांनीं बगदाद रेल्वे बांधण्याला इंग्लिश व फ्रेंच भांडवलवाल्यांनीं आपल्याला मदत करावी अशी पुष्कळ खटपट केली; परंतु त्यांनां यश आलें नाहीं, यांत जर्मनीकडे काय बोल आहे ? दुसऱ्या देशाच्या हितसंबंधाला धक्का पोहोंचेल अशा रीतीनें एशियामायनरमध्यें आपला हात शिरकवावा असा नस्ता हेतु जर्मनीवर लादून त्याला दूषण द्यावें हें हास्यास्पद आहे. जर्मनींतील माल बाहेर पाठवितां येईल असे नवे बाजार शोधून काढणें व भांडवल गुंतवून टाकण्याकरतां नवीन प्रांत हुडकणें, हींच कामें जगाच्या इतर भागांत जर्मनी आजपर्यंत करीत आला आहे; व तुर्कस्थानांत तरी त्याला करावयाचें आहे तें इतकेंच.'' यानंतर बरेंच अलीकडे म्हणजे ता. २४।३।०८ रोजीं स्टेटसेक्रेटरी व्हॉन शूननें ( Schöön ) राइशॅटगमध्यें पुढें लिहिल्याप्रमाणें उद्गार काढले:— '' जर्मन लोकांनीं बगदाद रेल्वे बांधण्याचा उपक्रम केला व त्या कामांत पुष्कळसा पैसा खर्च केला. यामुळें ज्या प्रांतां-

तून ती रेल्वे जाईल त्या प्रांतांत जर्मन व्यापार जोरावेल, असा मला भरंवसा आहे. परंतु रेल्वेची सबब पुढें करून त्या त्या प्रांतांत राजकीय कारस्थानें सुरू करावयाचीं, व पुढेंमागें तेथें आपल्या वसाहती स्थापन करावयाच्या, असा जर्मनीवर आक्षेप घेणारे लोक कांहीं तरी मनच्या कल्पना लढवीत असतात, असें माझें स्पष्ट मत आहे."

वरील उताऱ्यांवरून बगदाद रेल्वेसंबंधानें वादाचें स्वरूप काय आहे, हें आमच्या वाचकांच्या जितकें लक्ष्यांत येईल तितकेंच प्रस्तुत विषयाला पुरें आहे. तथापि या वादांत एक प्रश्न, आमच्या मतें, असा आहे कीं, त्याकडे जर्मन मुत्सद्द्यांनीं जितकें पाहिजे तितकें लक्ष्य अजूनपावेतों दिलें नाहीं, असें आम्हांला वाटतें. तो प्रश्न असाः एका जर्मन गृहस्थानेंच अंदाज केल्याप्रमाणें, सुबत्तेच्या सालांत या नवीन रेल्वेनें दर टनाला चार पौंड पांच शिलिंग या भावानें पुष्कळसें धान्य जर्मन सरहद्दीवर जर येऊन पडूं लागलें, तर धान्य पिकाविणाऱ्या शेतकऱ्यांच्या धंद्यांवर त्याचा परिणाम काय होईल? उद्योगधंदे आणि शेतकी या व्यवहारांत प्रस्तुत जो विरोध उत्पन्न झाला आहे तो अधिक तीव्र होणार नाहीं काय? आमच्या दृष्टीनें हा प्रश्न विशेष महत्त्वाचा आहे. परंतु तो कसा सोडवावयाचा, हें जर्मन मुत्सद्द्यांनीं पाहिलें पाहिजे, आम्ही त्या पंचाइतींत विनाकारण पडूं नये हेंच बरें.

एशियामायनरमध्यें किंवा जगाच्या इतर भागांत या पद्धतीनें केवळ व्यापार वाढविण्याचा जर्मनीनें जर प्रयत्न केला, तर त्याचा दुसऱ्या देशांशीं विरोध किंवा गैरसमज उत्पन्न होण्याला कारणच राहणार नाहीं. जी कांहीं चढाओढ होईल ती परस्परांच्या बुद्धिबलांत, व्यापारांतील उत्साहांत आणि साधनांच्या अनुकूलतेंत. पृथ्वीच्या प्रत्येक भागांत व्यापाराच्या बाबतींत इतर सर्व राष्ट्रांनां "मुक्तद्वार" (Open door) ठेवण्याचें इंग्लंडनें धोरण स्वीकारल्यानें राष्ट्राराष्ट्रांतील व्यापाराचा अतो-

नात फायदा झाला आहे; व इंग्लंडप्रमाणेंच व्यापारांत पैसे मिळविण्याची इतर राष्ट्रांनां संधि मिळाली आहे. जर्मनीनेंहि इंग्लंडचें हेंच धोरण स्वीकारलें तर वर सांगितलेल्या चढाओढीपासून परस्परांत वितुष्ट वाढण्याची विशेष भीति बाळगण्याचें प्रयोजन रहाणार नाहीं. १९०७ सालीं इंग्लंडांतील वर्तमानपत्रकर्ते बर्लिन येथें गेले होते. त्यांच्या सभेंत ब्रिटिश सरकार व ब्रिटिश लोक यांनां उद्देशून परदेशच्या अंडरसेक्रेटरीनें जें भाषण केलें त्यावरून इतर राष्ट्रांनां "मुक्तद्वार" ठेवण्याची योजना जर्मन दरबाराला पूर्णपणें पसंत आहे, असें इतर राष्ट्रांनीं निश्चितपणें समजण्यास कांहीं हरकत नाहीं, असें आम्हांला वाटतें. अशा प्रकारची योजना अमलांत आली म्हणजे परस्परांमधील व्यापारविषयक अहमहमिका कमी होईल असें नाहीं, ती चालू राहीलच; पण तिच्यांतील तेढ बरीच कमी होईल अशी आशा आहे.

मागें सांगितलेल्या 'वेल्ट पॉलिटिक-'चा आणखी एक परिणाम होणार आहे, त्याचा विचार होण्याचा आतांपर्यंत राहिला, तो आतां आपण करूं; कारण, त्यांतच इंग्लंड देशाचा विशेष हितसंबंध आहे. जर्मनीच्या वाढत्या लोकसंख्येला नवीन बाजार जर अवश्य आहेत, तर त्याबरोबरच त्या देशाची समुद्रावरील सत्ता वाढविणें अपरिहार्य आहे. कारण, या वाढत्या सत्तेच्याच जीवावर समुद्रावरील व्यापार बिनधोक चालावयाचा इतकेंच नाहीं, तर परदेशांतील धान्यावर जों जों जास्त अवलंबून राहण्याची पाळी जर्मनीवर येईल तों तों या सत्तेच्या जीवावरच लोकांनां पोटभर भाकरी खावयाला मिळावयाची आहे. 'वेल्ट पॉलिटिक-'ची जी बाजू सध्यां जर्मन लोकांच्या विचारांत आहे, ती हीच. जर्मनींत निरनिराळे राजकीय पक्ष आहेत व त्यांच्यांत लठ्ठालठ्ठीहि बरीच चालते; परंतु समुद्रावरील जर्मन राष्ट्राची सत्ता वाढविली पाहिजे, याबद्दल मात्र सर्व पक्षांतील लोकांची व एकंदर राष्ट्राची एकवा-

क्यता आहे ही गोष्ट विशेष लक्ष्यांत घेण्याजोगी आहे.

समुद्रावरील सत्ता वाढविण्यांत जर्मन राष्ट्राचे दोन हेतू आहेत; पहिला व्यापाराविषयक व दुसरा राजकीय. पहिल्या हेतूचें आविष्करण डॉ० पौलसेन ( Paulsen ) नांवाच्या गृहस्थानें पुढील शब्दांत केलें आहेः—"युरोपखंडाच्या बाहेर युरोपियन राष्ट्रांचा विस्तार करण्याच्या कामांत आरंभीं बेतानें, परंतु अलीकडे विशेष जोरानें, जर्मन राष्ट्रानें पुढाकार घेतला आहे. तेथील कारखान्यांत अतोनात माल उत्पन्न होऊं लागल्यानें व परराष्ट्रांशीं त्याचा व्यापार वाढत गेल्यानें, समुद्रावरील आपली सत्ता वाढविणें, व इतरांकडून तिचा उपमर्द न होईल अशी खबरदारी घेणें, त्या राष्ट्राला भाग पडलें आहे. व्यापारांत व उद्योगधंद्यांत थोड्या वर्षांच्या अवधींतच साऱ्या युरोपांत दुसरा नंबर जर्मनीनें पटकावला. इंग्लंडचाच्च काय तो त्याच्यावर आतां नंबर राहिला आहे. तथापि पहिल्या व दुसऱ्या नंबरामध्यें फारसें अंतर नाहीं; व जें थोडें आहे, तेंहि हळुहळू तुटत चाललें आहे. ही स्थिति कायम राखण्याकरतां समुद्रावरील लष्करी सामर्थ्य वाढविण्याच्या उद्योगाला विशेष महत्त्व आलें आहे व सर्व राष्ट्राचें लक्ष्य त्याकडे आज कांहीं वर्षें पूर्णपणें वेधून गेलें आहे."

दुसरा जो राजकीय हेतु सांगितला त्याचें स्पष्टीकरण एका ग्रंथकारानें पुढें लिहिल्याप्रमाणें केलें आहेः—"जीं राष्ट्रें आमच्यापुढें गेलेलीं आहेत त्यांच्याबरोबरीची जागा पटकावण्याकरतां—अथवा आम्हीं होऊन गमावलेली आमची जागा पुनः मिळविण्याकरतां हेंच म्हणणें जास्त खरें आहे—सर्व राष्ट्रानें आपली शक्ति एकवटून प्रयत्न करावयाचा किंवा नाहीं? तसेंच जीं राष्ट्रें विसाव्या शतकांत आणि त्यानंतर जगाचा इतिहास घडवून आणतील, त्यांच्यांत योग्य स्थान आपण मिळवावयाचें कां जगाच्या एकंदर घडामोडींत दुय्यम प्रतीची जागा मिळ-

वून स्वस्थ बसावयाचें ? हे प्रश्न तूर्त आमच्यापुढें आहेत."

"इम्पीरियल कॉन्स्टिट्यूशन" (साम्राज्याच्या व्यवस्थेसंबंधाचे नियम) यामधील त्रेपन्नाव्या आर्टिकलप्रमाणें जर्मन आरमार प्रत्यक्ष बादशहाच्या हुकमतीखालीं असावें असें ठरलें आहे. यामुळें आरमाराच्या बाबतींत काय व्यवस्था करावयाची हें स्वतः बादशहाच ठरवितो. या कामांत कोणचें धोरण स्वीकारलें पाहिजे, हें त्यानें अगोदरच आपल्या मनाशीं पुरतेपणीं ठरवून ठेवलें आहे; आणि जो वेळपावतों गादीवर बसून तो आपला बादशाही अंमल गाजवूं शकेल तो वेळपावेतों आपलें धोरण तो कधींहि बदलणार नाहीं. जर्मनीचे समुद्रावरील हितसंबंध, परदेशीय व्यापार, वसाहतींचें राज्य, परदेशांत गेलेले जर्मन नागरिक, स्वदेशाच्या किनाऱ्याचें रक्षण, या गोष्टींचें महत्त्व बादशहा पूर्णपणें ओळखून आहे, आणि त्यांकरतां तो आरमाराची जय्यत तयारी ठेवण्यांत केव्हांहि कसूर करणार नाहीं.

१८९६ च्या जानेवारी महिन्याच्या १८ व्या तारखेस, म्हणजे जर्मन साम्राज्याची स्थापना झाल्यापासून २५ व्या वाढदिवसाच्या समारंभांत जर्मन बादशहानें पुढील उद्गार काढले होते:—"जर्मन साम्राज्याचा व्याप जगभर पसरला आहे. भूगोलाच्या सर्व भागांत आपले हजारों देशबंधु जाऊन राहिले आहेत. जर्मनीचा माल, जर्मनीचें ज्ञान, व जर्मनीचें धाडस समुद्र ओलांडून दूर गेलें आहे. लाखों किंवा कोट्यवधी रुपयांच्या किंमतीचा माल जर्मनी समुद्रावरून वाहून नेतो. हा मोठा जर्मनी मूळच्या लहान जर्मनीशीं एकजीव करणें हें लोकांचें पवित्र कर्तव्य आहे." १८९७ सालीं तो पुनः असें बोलला:—"सार्वभौम सत्ता म्हणजे समुद्रावरील सत्ता. या दोनहि सत्ता परस्परावलंबी आहेत, एकीच्या आश्रयावांचून दुसरी टिकणारी नाहीं."

जर्मनीच्या परदेशांशीं चालणाऱ्या व्यापाराकरतां व वसाहतींच्या

राज्याकरतां आरमाराचें सामर्थ्य वाढविणें जरूर आहे, हें तर बादशहा पहिल्यापासून म्हणतोच आहे; परंतु याशिवाय त्याचें दूरवरचें पाहणें असें आहे कीं, जगांतील प्रमुख राष्ट्रांत विशेष प्रकारचा मान जर्मनीला जर मिळवावयाचा असेल तर आरमारी सामर्थ्य वाढविल्यावांचून अन्य मार्ग नाहीं. १९०० च्या जुलै महिन्यांत त्याचे उद्गार असे होते:- " आपल्या राष्ट्राच्या दरवाजावर समुद्राच्या लाटा जोरानें येऊन धडकत आहेत, व जगांतील राष्ट्रांत आपल्याला प्राप्त झालेलें उच्च स्थान आपण सोडतां कामा नये,—म्हणजे अन्य भाषेंत बोलावयाचें झालें तर, सर्व जगाला आक्रमण करणाऱ्या राजनीतीचा अंगीकार आपण केला पाहिजे—हें त्या लाटा आपल्याला सुचवीत आहेत. जर्मनीच्या वैभवाला समुद्राचें साहाय्य अवश्य आहे. परंतु तो समुद्र सुद्धां आम्हांला अशी आठवण करून देतो कीं, 'माझ्या पृष्ठभागावर किंवा माझी मर्यादा जेथें संपते अशा मुलखांत एखादें मोठें राजकारण व्हावयाचें झालें तर तें जर्मनी किंवा जर्मन बादशहा यांच्या पश्चात् होतां कामा नये.' राजघराण्यांतील पुरुषांच्या हाताखालीं तीस वर्षांपूर्वी जर्मन लोकांनीं आपले जीव खर्ची घालून युद्धांत यश जें संपादन केलें, तें परदेशीय महत्त्वाचीं कारस्थानें चालू असतां लोकांनीं आम्हांला बाजूला ढकलावें एवढ्याकरतांच केलें, असें मला वाटत नाहीं. अशा कामांत इतर लोक जर आम्हांला बाजूला सारूं लागले तर आमच्या जगद्व्यापी सत्तेचा कायमचाच शेवट झाला असें म्हटलें पाहिजे; आणि असा शेवट मी तर कधींहि होऊं देणार नाहीं. हा शेवट टाळण्याकरतां सर्व प्रकारें योग्य, व तशी जरूरच पडली तर, अतिशय कडक उपाय योजणें हें माझें कर्तव्य आहे इतकेंच नाहीं, तर तो बादशहा या नात्याचा माझा एक श्रेष्ठतम हक्क आहे असें मी समजतों."

या व अशाच तऱ्हेच्या भराऱ्या मारणाऱ्या उद्गारांत कोणचा अर्थ

भरला आहे हें ठरविण्यास त्यांत फारसें खोल शिरण्याची आवश्यकता नाहीं. कारण, जर्मन राष्ट्र जमिनीवर व पाण्यावर बलाढ्य करण्याची जर्मन बादशहाची जी महत्त्वाकांक्षा आहे ती तो इतर लोकांपासून कधींहि छपवून ठेवीत नाहीं. १९०५ च्या मार्च महिन्यांत ब्रेमेन येथें बादशहा म्हणाला:—"एका मोठ्या युद्धांत जर्मनीनें यश जरी संपादन केलें होतें तरी लहानाचा मोठा पुरुष होण्याच्या माझ्या आयुष्याच्या अवधींत दर्यावर संचार करणाऱ्या जर्मनांनां कोणच्याहि प्रकारचा मोठेपणा किंवा वैभव प्राप्त झालें नाहीं. या बाबतींत देखील माझ्या पूर्वजांनीं ज्या गोष्टी सिद्धीस नेल्या, त्यांपासून तर्कशास्त्राला अनुसरून जीं अनुमानें काढतां येतील, तींच मी काढीत आहें. त्यांनीं जरूरीपुरतें सैन्य देशांत तयार केलें होतें. लष्करी आरमाराची वेळ आतां माझ्या कारकीर्दींत आली आहे. आजला कांहीं लष्करी जहाजें तयार होऊन समुद्रांत संचार करूं लागलीं आहेत व आणखीं नवीं बांधण्याचें काम चालू आहे. समुद्रांत ढकललेलें प्रत्येक जर्मन लढाऊ जहाज म्हणजे पृथ्वीवर शांतता राखण्याच्या कामांत नवीन हमी होय! शिवाय हें जहाज पाहून आमचे शत्रु आमच्याशीं कुरापत काढावयाला त्या मानानें कमी प्रवृत्त होतील इतकेंच नाहीं, तर उलट आमच्याशीं स्नेहसंपादन करणें इतरांनां अधिक फायद्याचें वाटूं लागेल."

खुद्द बादशहापुरताच जर विचार केला तर लढाऊ जहाजें वाढविण्याचा त्याचा संकल्प आजकालचा नसून तो बराच जुना आहे, असें म्हणावें लागतें. तो संकल्प सिद्धीस नेण्याची पुष्कळ दिवस त्यानें खटपट चालविली होती पण ती यशस्वी* झाली नाहीं, अलीकडे मात्र फार

* कायसरला याबद्दल मनांतून फार वाईट वाटत होतें. १८९७ सालीं राणी व्हिक्टोरिया इच्या जुबिलीला प्रिन्स हेन्रीला जेव्हां त्यानें इंग्लंडला पाठविलें, तेव्हां त्याला नेण्याकरतां चांगलें जहाज जर्मनीपाशीं नव्हतें. हें पाहून

दिवसांची मनीषा तृप्त करण्याची भरपूर संधि त्याला मिळाली आहे. दीर्घ काळपावेतों आपण लावलेल्या सुरावर आपल्या श्रोत्यांनीं नाचावयाला लागावें असा त्यानें यत्न केला, परंतु तो फुकट गेला. शेवटीं १९०० सालाच्या सुमारास राइश्‌टॅगनें नवीन आरमारखात्याला बरेचसे पैसे दिले व आरमाराची सुधारणा होण्याला तेव्हांपासून त्याच्या इच्छेप्रमाणें आरंभ झाला. आरंभीं ही सुधारणा आस्ते आस्ते होऊं लागली; परंतु १९०६ सालापासून ती फारच जोरांत सुरू झाली. जर्मन आरमाराचा किती विस्तार झाला आहे हें पुढें दिलेल्या खर्चाच्या आंकड्यावरून वाचकांचे ध्यानांत येईल. १८८८ सालीं आरमारावर पस्तीस लाख पौंड खर्च झाले; त्यानंतर दहा वर्षांनीं पन्नास लाख खर्च झाले; त्यानंतर पुढें दर-साल दोन कोट दहा लाख पौंड खर्च होऊं लागले, व त्यापैकीं निम्मी रक्कम नवीन जहाजें बांधण्याकरितां निराळी काढून ठेवीत जावी असें ठरलें. १८८८ मध्यें जहाजांवरील अधिकारी व खलाशी मिळून पंधरा हजार लोक होते; १८९८ सालीं ही संख्या तेवीस हजारांवर आली, व १९०८ सालीं ती पन्नास हजारांच्याहि वर गेली.

लष्करी जहाजांची संख्या वाढविली पाहिजे, या बाबतींत सध्यां निर-निराळ्या राजकीय पक्षांतील लोकांची एकवाक्यता आहे; रॅडिकल

---

खालीं लिहिलेले जोराचे उद्गार त्यानें काढले:—

"I regret not to be able to send Prince Henry on a better ship to the Jubilee of Queen Victoria when all other countries will shine with their proud cruisers. It is the sad result of the proceedings of the anti-patriots who have been able to prevent the building of the necessary ships. But I shall have no rest till I have put my fleet on the level of the army.

G. H. Perris PP. 406, 407.

पक्षाचे लोक खर्चांत काटकसर केली पाहिजे असें नेहमीं प्रतिपादन करतात; फार तर काय, वसाहती राखण्याचा खर्च राष्ट्राला झेंपत नाहीं, म्हणून त्या सोडून द्याव्या असें म्हणावयाला देखील ते कमी करणारे नाहींत! असें असून आरमाराचा खर्च वाढविण्याला मात्र ते अनुकूल आहेत हें विशेष ध्यानांत घेतलें पाहिजे.

या चळवळींत किती जोर आहे, हें नीट समजून घेणें विशेष महत्त्वाचें आहे. लष्करी सामर्थ्यावर भिस्त ठेवणारे कांहीं आततायी लोक जर आपण वगळले, तर इतर लोकांच्या तोंडून या चळवळीसंबंधानें बढाईचे किंवा इतर राष्ट्रांच्या मनांत भीति अथवा दहशत उत्पन्न करण्याजोगे शब्द कधींहि ऐकू येत नाहींत. तरी पण राष्ट्रांतील सर्व लोक एकमनानें व दृढनिश्चयानें या चळवळीशीं एकजीव झालेले आहेत हीच गोष्ट फार महत्त्वाची आहे. आरामारी सामर्थ्य हें सार्वभौम* सत्तेचें

* आरमारी सामर्थ्य वाढविण्याकडे अलीकडे प्रत्येक बलाढ्य राष्ट्राची प्रवृत्ति झाली आहे. यासंबंधानें पुढील मार्मिक लेख वाचण्याजोगा आहे:—

It is sea power which nearly all great nations simultaneously strive for. It is a very singular and significant symptom, one which thoroughly characterizes the epoch in which we live, this suddenly awakened but steady and powerful current of sentiment. And in its leading features it is identical in all those countries. The motives are the same, and the aims are very similar. It had led to a race between the great powers, and the attainment of the object—namely, the creation of so great and efficient a navy as to vouchsafe perfect security on the seas to an expanding export trade, and to give emphasis to political demands abroad, is largly bound up in the winning of this race. At no time since the world began has there been such a unanimous endeavour to achieve

कारण आहे, किंवा सार्वभौम सत्तेच्या वाढीबरोबर आरमारी सामर्थ्य वाढतें; सारांश, या दोनहि सत्ता अन्योन्याश्रयी आहेत हें उघड आहे. आणि म्हणूनच जर्मनींतील सर्व युनिव्हर्सिट्या आपलें वजन ही चळवळ यशस्वी करण्याच्या कामांत खर्च करीत आहेत. नेव्हीपार्टीला ( आरमार वाढविलें पाहिजे असें म्हणणाऱ्या लोकांनां ) मोठमोठ्या कारखानदारांचें व व्यापाऱ्यांचें चांगलें पाठबळ आहे. वर्तमानपत्रकर्ते या विषयावर जोराचे लेख लिहून लोकमत तयार करण्याला नेहमीं तत्पर असतात, व राइशूटॅगमध्यें वरचेवर हा विषय सभेपुढें मांडणारे सभासदहि बरेच आहेत. फार तर काय, पण सदोदित भांडण उपस्थित करणारे सोशियालिस्ट सुद्धां आरमारी सामर्थ्य वाढविलें पाहिजे असेंच प्रतिपादन करतात.

नाविक सामर्थ्य वाढविण्याच्या प्रस्तुतच्या राजकीय धोरणाची राष्ट्रांतील लोकांच्या कल्पनेवर किती छाप बसली आहे याचें विलक्षण प्रत्यंतर पाहिजे असेल, तर "नेव्हीलीग" नांवाची संस्था थोड्या काळांत किती उदयास आली व तेथें प्रतिपादलेलीं तत्त्वें लोकांनां कशीं मान्य

---

sea power, and at no time has the interest called out by this endeavour been so general or so intense.

The instinct, however, which has impelled the broad strata of each nation to seek these new paths is, like most powerful instincts of the masses, perfectly justified by the circumstances. The transition, first, from a continental to a colonial power, then from a continental to a world policy, and from supplying the home market to catering to the markets of the world, necessitated its correlative, a powerful navy. England's development in the past furnished the object lesson, and pointed the way for all her lately arisen competitors.

—Germany P. 235.

होत चालली आहेत हें आपण पहावें, म्हणजे आपली खात्री होईल. या लीगची स्थापना १८९८ च्या सुमारास झाली. तेव्हांपासून पुढील दहा वर्षांत सभासदांची संख्या दहा लाखांपर्यंत आली. या दहा लाखांत व्यक्तिशः जसे कांहीं सभासद आहेत, तशा रजिष्टर झालेल्या निरनिराळ्या संस्थाहि आहेत. समुद्रकांठावर असलेलीं जर्मन संस्थानेंच तेवढीं लीगमध्यें सामील झालीं आहेत असें नाहीं; तर समुद्रापासून आंत दूर असलेल्या साक्सेनसारख्या संस्थानांतील देखील पुष्कळ लोक त्यांत सभासद झालेले आहेत. प्रत्येक शहरांत, फार तर काय, बहुतेक प्रत्येक खेड्यांत त्याच्या शाखा पसरल्या आहेत; राजघराण्यांतील पुरुष लीगचें पडेल तें कठिण काम करावयास तयार आहेत; इंग्लंडचें आणि जर्मनीचें नाविक सामर्थ्य किती आहे याचें तुलनापद्धतीनें ज्ञान करून देण्याकरतां निरनिराळे नकाशे व समुद्रपट तयार करून ते प्रत्येक शाळेंत, पुस्तकालयांत व ऑफिसांत देण्यांत आले आहेत; व लष्करी जहाजें बांधण्याला लोकमत अनुकूल व्हावें या हेतूनें छापलेलीं हस्तपत्रकें आणि चोपडीं यांचा लीगमार्फत देशांत तर नुस्ता पाऊस पडत असतो. लीगची महत्त्वाकांक्षा फार अनावर असल्यानें त्यानें ठरविलेला कार्यक्रम अनुसरणें सरकारला कठिण जातें. तरी पण लीगच्या उद्योगानें पुष्कळसें अनुकूल लोकमत आगाऊ तयार झाल्यानें एखादी योजना अमलांत आणावयास सरकारला मुळींच आयास पडत नाहींत व सरकार देखील लीगनें केलेल्या सूचना जेवढ्या मान्य करण्याजोग्या असतील तेवढ्या मान्य करतेंच !

एका वजनदार जर्मन वर्तमानपत्रानें नुकतेंच असें म्हटलें होतें कीं, " जर्मनीचें आरमार केव्हां तरी इंग्लिश आरमाराच्या बरोबरीला येईल अशी जर आजला एकाहि जर्मनाची कल्पना नाहीं, तर तें त्याच्यापेक्षां वरचढ होईल अशी आशा करण्याला जागा कोठें आहे ?"

हें म्हणणें आजलाहि कदाचित् खरें असेल; परंतु कांहीं वर्षांनीं पुढें काय स्थिति प्राप्त होईल याची हमी आज कोण बरें देईल? जर्मनींत हल्लीं सुरू असलेला क्रम मध्येंच बंद पडेल असें संभवत नाहीं. जोंवर द्रव्याची अनुकूलता आहे तोंवर आपलें नाविक सामर्थ्य वाढविण्यास जर्मन राष्ट्र मागें घेणार नाहीं हें उघडउघड दिसत आहे. अशा स्थितींत "आम्हीं समुद्रावरील आपलें सामर्थ्य जरी वाढविलें तरी त्यापासून इतर राष्ट्रांच्या शांततेचा भंग होण्याचा यत्किंचितहि संभव नाहीं." या कोरड्या आशीर्वादानें इतर लोकांचें समाधान कसें व्हावें? इंग्लिश लोकांचें या आशीर्वादानें समाधान होत नाहीं, हें तर उघडच आहे; आणि यामुळें जर्मन लोकांच्या या अशा उच्छृंखल वृत्तीला आळा कसा घालतां येईल याचा ब्रिटिश राज्यांत बराच खल होऊं लागला आहे. इंग्लंडांत उडालेली ही धांदल पाहून जर्मनींतील एक पत्र म्हणतें:–" आरमारासंबंधाचा प्रश्न इंग्लंडांत वादविवादाकरतां निघाला म्हणजे जेव्हां तेव्हां जर्मनीचें नांव पुढें कां निघतें? जर्मन सरकारचें म्हणणें काय आहे हें सर्व लोकांनां कळेल अशा रीतीनें प्रसिद्ध केलें आहे, आणि राइश्टॅगनें त्याला आपली संमति दिली आहे. नवीन जर्मन नेव्ही बिलानें ठरविलेली योजना अमलांत आणूं नये अशी आपली इच्छा इंग्लंडला बर्लिन येथें प्रकट करतां येणार नाहीं. फ्रान्स व जपान यांचा स्नेह संपादन करून व रशियाशीं आपला समेट करून देखील जर्मनीनें एक लढाऊ जहाज बांधलें कीं, त्याच जातीचीं दोन लढाऊ जहाजें आपण बांधावयाचीं, असें जर इंग्लंडनें ठरविलें असेल आणि त्यामुळें आरमारावर जर जास्त खर्च होत असेल तर त्याचें अपयश जर्मनीच्या माथ्यावर कां?"

मोठें आरमार बाळगण्याची कल्पना जर्मनींत हळुहळू कशी स्थिर होत चालली आहे हें ज्यानें लक्षपूर्वक पाहिलें आहे, तसेंच लोकसंख्या आणि परदेशीय व्यापार या दोन अडचणींत सांपडल्यामुळें जर्मन

लोकांच्या मनांत भीति उत्पन्न होणें किती साहजिक आहे हें जो जाणत असेल, तो गृहस्थ, आरमाराचें पूर्वींचेंच धोरण तुम्ही कायम ठेवा, असें जर्मन राष्ट्राला कधींहि सांगणार नाहीं, असें आम्हांस वाटतें. पुष्कळ इंग्रज लोक अशी टीका करतील कीं, भविष्यत्काळीं उत्पन्न होणाऱ्या अडचणींबद्दल जर्मन राष्ट्र आज विनाकारण घोर काळजींत पडलें आहे. परंतु दूरदर्शीपणा हें तर मुत्सद्देगिरीचें प्रथमलक्षण आहे, आणि राज्य-कारभारांत दरक्षणाला नवीन अडचणी व नवीन संकटें जशीं उद्भवतील त्या मानानें रोज नवा नवा राजनीतीचा मार्ग सुधारावा, म्हणजे "प्रोद्दीप्ते भवने तु कूपखननं" हा उद्यम जर्मन लोकांनां जर पसंत नसला तर त्याबद्दल त्यांनां कोणत्या तोंडानें दोष द्यावा! १८७१ सालीं जर्मनीनें जो विजय संपादन केला तो, त्याच्यापूर्वीं अनेक वर्षांमागें, वयांत आलेल्या प्रत्येक मनुष्यानें कांहीं दिवस लष्करांत नोकरी केली पाहिजे असा जेव्हां प्रशियानें नियम केला, तेव्हांच वास्तविक संपादन केला; आजला औद्योगिक बाबतींत जर्मनीचा उत्कर्ष जो झाला आहे त्याचा पाया, अठराव्या शतकांत, म्हणजे प्रशिया व साक्सेन या दोन संस्थानांनीं सक्तीचें शिक्षण जेव्हां सुरू केलें तेव्हांच, खरोखर रचला; व जर्मनींतील शहरांची जी व्यवस्था आपण प्रस्तुत पहातों, त्या व्यवस्थेचें बीज शंभर वर्षांपूर्वीं पेरलें होतें. हीं उदाहरणें आपण लक्ष्यांत घेतलीं म्हणजे भावी संकटें टाळण्याचे उपाय जर्मन मुत्सद्दी आज योजीत आहेत हें युक्तच आहे. जर्मन लोकांचें या बाबतींतील स्पष्ट मत "कलोन गॅझट-"नें पुढील शब्दांत सांगितलें आहे:—"लढाऊ जहाजें बांधण्याचा तुमचा जो कार्यक्रम आहे तो जरा आखडता घ्या, असें जर इंग्लिश लोकांनां आम्हीं सांगितलें तर ते रागानें उसळूं लागतील. त्याचप्रमाणें जर्मनीनें आपला नाविक कार्यक्रम अमुक प्रकारचा ठेवावा असें आढ्यतेनें सांगण्याचा ग्रेटब्रिटनला कोठून हक्क प्राप्त झाला आहे हें आम्हांला

कळत नाहीं; त्यांनींच तें कृपा करून सांगावें."

जर्मनीची बाजू यापेक्षां अधिक स्पष्ट शब्दांनीं सांगतां येण्याजोगी नाहीं; आणि ती बाजू खरी असून तिच्याबद्दल उगीच तक्रार करण्यांत हांशिल नाहीं. समुद्रावर जर्मनीचें सामर्थ्य वाढलें असतां इंग्लंडच्या हितसंबंधाला विशेष धक्का पोंचण्याचा संभव आहे हें जरी खरें आहे, तरी इंग्लंडनें शांतपणानें आणि निर्विकार बुद्धीनें हें ओळखलें पाहिजे कीं, आपल्याला हितावह आणि परिस्थितीच्या मानानें अवश्य अशी राजनीति स्वीकारण्याचा जर्मनीला पूर्ण हक्क आहे. ही ओळख एकदां पटली म्हणजे त्यांत इंग्लंडचा सुरक्षितपणा आहे व दोनहि देशांचा त्यांत फायदा आहे. जर्मनीला योग्य दिसेल तसें जर्मनीनें वागावें, इंग्लंडला योग्य दिसेल तसें इंग्लंडनें वागावें. आतां या तत्त्वावर वागणूक ठेवली म्हणजे ब्रिटिश आरमाराचा वाढता खर्च भागविण्याकरतां प्रसंगविशेषीं लोकांवर जास्त कर बसवावे लागतील; तथापि याला कोणाचा उपाय आहे ? कोणच्या हेतूनें ब्रिटिश मुत्सद्दी आपलें आरमार वाढवीत आहेत हें लोकांच्या नजरेस आलें, म्हणजे देशकल्याणाकरतां करांचें जास्ती ओझें डोक्यावर घेण्याला ब्रिटिश लोक कधींहि कचरणार नाहींत.

प्रकरण १८ वें

# वसाहती

वसाहती स्थापन करण्याचा उद्योग जर्मनींत फार प्राचीन काळापासून सुरू आहे, असें कित्येक जर्मन इतिहासकार म्हणतात; परंतु या म्हणण्यांत कांहीं अर्थ नाहीं. वस्तुतः पाहूं गेलें तर असें दिसतें कीं, हा उद्योग त्या देशांत सुरू झाल्याला आज काय तीं २५।३० वर्षें झालीं आहेत. हल्लींच्या वसाहतींपैकीं सर्वांत जुनीं वसाहत स्थापन करण्याचा मान ब्रेमेन येथील हर ल्युडेरिट्झ (Herr Lüderitz) नांवाच्या व्यापाऱ्याला दिला पाहिजे. १८८२ सालीं या व्यापाऱ्यानें तद्देशीय राजांबरोबर तह करून आफ्रिकेच्या नैर्ऋत्य किनाऱ्यावर अंग्रा पेक्वेना (Angra Pequena) नांवाच्या आखाताजवळचा कांहीं प्रांत मिळविला आणि या कामांत सरकारनें आपल्याला साहाय्य करावें अशी त्यांनां विनंति केली. त्याच्या म्हणण्याची सरकारांत कांहीं काळपावेतों दाद लागली नाहीं. शेवटीं ब्रिटिश सरकारच्या एजंटांनीं हर ल्युडेरिटच्या या कृत्याला हरकत घेतली. अशा तऱ्हेची हरकत त्या वेळेला जर पुढें आली नसती, तर वसाहती स्थापन करण्याची जर्मनीची खटपट पुढें बरेच दिवस थंड पडली असती इतकेंच नाहीं, तर या कामांत उकरून कुरापती काढण्याची पुढें जी प्रवृत्ति दिसून येते तीहि दिसून येतीना. एका जर्मन नागरिकानें सरकारापाशीं साहाय्य मागितलें एवढ्यावरूनच प्रिन्स बिस्मार्कनें त्या गोष्टींत लक्ष्य घातलें; आणि इंग्लंडनें उत्पन्न केलेला लढा लवकर मिटत नाहीं असें जेव्हां त्यानें पाहिलें, तेव्हां ल्युडेरिटनें मिळविलेला मुलुख सरकारांत खालसा केल्याचें एकदम जाहीर केलें, आणि इंग्लंडनें घातलेला घोळ जागच्या जागीं थांबविला. या त्याच्या धडाडीनें ऑरेंज नदीपासून केप-फ्रायो (Frio) पर्यंतचा—वॉलफिश् आखात

खेरीजकरून—समुद्र किनाऱ्यालगतचा प्रांत जर्मनीला मिळाला. यानंतर पुढें दोन वर्षांच्या आंतच आफ्रिकाखंड आणि पॅसिफिक महासागरांतील मिळून जर्मन वसाहतींचा विस्तार ३७७,००० चौरस मैल, म्हणजे जवळ जवळ जर्मनीच्या दुप्पट झाला, व या क्षेत्रांतील १,७५०,००० लोक जर्मनीच्या आश्रयच्छत्राखालीं आले.

याप्रमाणें वरील दोनअडीच वर्षांच्या अवधींत वसाहतींचें राज्य स्थापन करण्याचे यत्न झाले व त्यांत बरीच धडाडी दिसून आली खरी; परंतु हे यत्न केवळ तात्पुरते होते. व्यापार वाढविण्याची कांहीं नियमबद्ध व्यवस्था ठरली म्हणून, किंवा १८७१ सालापासून देशत्याग करून बाहेर जाणाऱ्या लोकांनां जर्मन सरकारच्या रक्षणाखालीं राहतां यावें म्हणून, हा सर्व खटाटोप झाला असें नसून, त्या वेळेला वसाहती स्थापन करण्याची देशावर एक प्रकारची लाट आली व त्या उसळीसरशी या गोष्टीला सुरुवात झाली. वसाहती स्थापन करणें अवश्य आहे असें म्हणणाऱ्या लोकांच्या आवाजानें जर्मनींतील वातावरण अगदीं दणाणून गेलें, व नवीन चळवळीचा संसर्ग सर्वांनां बाधूं लागला. एखादी राष्ट्रीय चळवळ सुरू झाली म्हणजे तिचा संसर्ग जर्मनांसारख्या मनोविकाराधीन आणि उत्साही लोकांनां फार लवकर बाधतो, तसा तो या बाबतींतहि बाधला यांत नवल नाहीं. वसाहतींचा प्रश्न किती व्यापक आहे, त्यांत किती निरनिराळ्या बाजू विचारांत घ्याव्या लागतात, याचा खरा अदमास कोणा एकाला तरी झाला होता किंवा नाहीं, याची शंका आहे. या बाबतींत लोकांच्या मनोवृत्ती एकदम उचंबळल्या; त्यांनां त्या गोष्टीचें वेड लागलें. अशा स्थितींत नीट विचार करून एखादें राजकारण ठरवावें आणि नंतर तें साध्य करण्याच्या मार्गाला लागावें हा पोक्त विचार कोठून राहणार ?

प्रिन्स बिस्मार्कच्या मदतीनें वसाहतींची चळवळ शक्य झाली, आणि

तिला राष्ट्रीय स्वरूप प्राप्त झालें हें उघड आहे. परंतु यासंबंधानें विशेष ही गोष्ट लक्ष्यांत येण्याजोगी आहे कीं, स्वतः त्या मुसद्द्याच्या मनांत या राजकारणासंबंधानें विशेष श्रद्धा नव्हती. *१८९९ सालांत म्हणजे वसाहतींचा आरंभ झाल्यानंतर सतरा वर्षांनीं, त्यानें असें बोलून दाखविलें कीं, "वसाहती नकोत असें माझें अजूनपावेतों म्हणणें आहे." आणि आपल्या तंत्रानेंच जर तो वागला असता तर या प्रश्नाच्या वाटेलाच तो गेला नसता, हें पुष्कळ संभवनीय दिसतें. देशांतल्या देशांत स्थिरस्थावर करणें हें त्याच्या राजनीतीचें धोरण, व तदनुरोधानें जर्मनीनें आहे त्यांत समाधान मानून जास्ती मुलुख मिळविण्याच्या भानगडींत पडूं नये हें १८७१ सालापासून त्याच्या वागणुकीचें तत्त्व होतें. जर्मनीची सत्ता दूरदेशीं स्थापन करण्याच्या अनिश्चित योजनांच्या मागें लागण्याची तूर्त वेळ नाहीं, तसें केलें तर त्यांत बराच धोका आहे, असें त्याला वाटत होतें. शेवटीं जो त्यानें या कामाला हात घातला तो तरी लोकांच्या मताला मान देण्याच्या हेतूनेंच घातला; परंतु त्यांत आपल्याला यश येईल अशी त्याची खात्री नव्हती. आरंभीं तरी ल्युडेरिटसारख्या जर्मन प्रजाजनांनीं परदेशीय मुलखांवर स्थापन केलेल्या हक्कांचें साम्राज्य-

---

* खुद्द बादशहा पहिला बुइलियम हा प्रिन्स बिस्मार्कच्या मताचा होता व व जर्मनींतील वजनदार पत्रें त्याच्याच बाजूचीं होतीं. केवळ लोकमताला मान देऊन बिस्मार्क या उद्योगाला लागला. ही गोष्ट ब्रिटिशांचा वकील लॉर्ड आम्प्टहिल यानें फॉरिन सेक्रेटरीला पुढील शब्दांनीं कळविली होती:—

"It is a remarkable fact that Prince Bismarck, contrary to his convictions and his will, has been driven by public opinion into the inauguration of the colonial policy he had hither-to denouneed as detrimental to the concentration of German strength and power."

G. H. Perris P. 331.

सरकारनें रक्षण करणें लोकांनीं त्याच्यावर लादलें. "प्रारब्धमुत्तमजना न परित्यजंति" हा त्याच्या स्वभावाचा धर्म होता. त्याला अनुसरून वसाहती स्थापन करण्याच्या उद्योगाला एकदा जो त्यानें आरंभ केला तो मात्र मग पुढें नेटानें चालविला. परंतु तसें करतांनां देखील आपल्याला लोकमत अनुकूल आहे किंवा नाहीं हें पाहण्याची तो विशेष खबरदारी घेत होता. लोकमत जर कां अनुकूल नसतें तर तो या कामांत फारसा पुढें गेलाच नसता.

प्रिन्स बिस्मार्कच्या मनांत स्वतःच्या मताविषयीं अविश्वास जर कोणच्या कामांत असेल तर तो वसाहतींच्या कामांत होता. वसाहतींचा बोजा साम्राज्यावर लादावयाचा झाला, तर एकंदर राष्ट्राच्या अनुकूलतेनेंच तो लादला पाहिजे, या तत्त्वावर तो पहिल्यापासून वागत होता; स्वतःवर कोणच्याहि तऱ्हेची जबाबदारी तो घेऊं इच्छित नव्हता. लोकांनीं आपलें मत स्पष्टपणानें, एकदा नव्हे तर अनेक वेळां, जर प्रकट केलें तरच आपण त्यांची आज्ञा प्रमाण मानूं, एरवीं मानणार नाहीं, असें त्यानें १८८४ सालांत अनेक प्रसंगीं उघडपणें बोलून दाखविलें होतें.

इतकेंच नव्हे, तर इंग्लिशांच्या तत्त्वावर वसाहती स्थापन करण्याचा जर आपण यत्न केला तर त्यांत बऱ्याच अडचणी उत्पन्न होतील, हें प्रिन्स बिस्मार्कनें अगोदरच ताडलें होतें. परमुलखांतील हवापाणी आणि राष्ट्राचा सदरील कामांत अननुभव या दोन अडचणी क्षुल्लक आहेत, असें त्याला कधीं वाटलें नाहीं. आस्ट्रेलिया आणि कॅनडा हे दोन मुलुख ज्या मार्गानें ब्रिटिश लोकांच्या राजसत्तेखालीं आले त्या मार्गानें जर्मन लोकांनीं वसाहतींत जाऊन तेथें आपलें कायमचें ठाणें द्यावें, हा विचार वरील अडचणींमुळें त्याला केव्हांहि पसंत पडला नाहीं. दुसऱ्या बाजूनें पाहिलें तर, प्रशियांत असलेल्या अधिकारिनिविष्ट शासनपद्धतीचा ( Sys-

tem of bureaucracy चा ) प्रसार करण्याच्या कामांत जर्मन वसाहतींचा उपयोग करून घ्यावा असाहि त्याचा मानस नव्हता. त्याच्या मतानें वसाहती म्हणजे व्यापाराचीं ठिकाणें ( Trading stations ) व त्या ठिकाणांवर गेलेल्या व्यापाऱ्यांनीं तेथील कारभार आपआपल्या जबाबदारीवर करावा आणि आपल्या उद्योगधंद्यांची वाढ करावी, हें आपलें मत त्यानें १८८५ सालीं पुढील शब्दांनीं व्यक्त केलें होतें:—

"वसाहतींतील सत्ता व्यापाऱ्यांच्या हातांत असावी; सरकारनें आपला अधिकारी तेथें नेमण्याचें कारण नाहीं. आमचे प्रीव्हिकौन्सिलर आणि छोटे लष्करी अधिकारी देशांतल्या देशांत उत्तम आहेत; परंतु वसाहतींचें काम व्यापारी मंडळाकडूनच अधिक चांगलें होईल अशी माझी अटकळ आहे."

हें तत्त्व सयुक्तिक आणि मुत्सद्दीपणाला शोभण्यासारखें होतें; आणि या तत्त्वानुसार वसाहतींचा राज्यकारभार जर चालला असता तर जर्मन राष्ट्राचें कल्याण झालें असतें; आणि या कामांत पुढें जें अपयश आलें, जी निराशा झाली, जो तोटा सोसावा लागला व जी अपकीर्ति झाली, ती टाळतां आली असती.

जर्मन स्वभावाचें आणि राजकीय विचारांचें, केवळ बाह्य स्वरूपावर भुलून न जातां, खोल बुद्धीनें जो निरीक्षण करील त्याला ही महत्त्वाची गोष्ट दिसून येईल कीं, वसाहतींच्या चळवळीला सुरुवात झाली तेव्हां राष्ट्रांतील लोकांच्या आनंदाला अतिशय भरतें आलें होतें, ते केवळ या कामांत वेडे बनले होते; परंतु या सुरुवातीनंतर पांचपंचवीस वर्षे लोटलीं नाहींत तोंच त्यांच्यांत इतकी उदासीनता उत्पन्न झाली कीं, १९०७ सालच्या निवडणुकीच्या वेळीं "या कामांत असे उदासीन होऊं नका" असें कोलोनियन सेक्रेटरी हर डर्नबर्ग ( Herr Dernburg ) याला कंठरवानें लोकांनां सांगावें लागलें !

लोकांचा पहिला उत्साह पुढें कायम कां राहिला नाहीं याचीं कारणें लक्ष्यांत घेणें आमच्या मतें अगत्याचें आहे. हीं कारणें अनेक आहेत व त्यांपैकीं कांहींवर जर्मन लोकांच्या वसाहतीच्या राज्याचा भविष्यत्काल बऱ्याच अंशानें अवलंबून आहे; आणि त्यावरूनच, पूर्वीपेक्षां कदाचित् अधिक अनुकूल परिस्थिति उत्पन्न झाली तरी देखील, वसाहतींच्या जर्मनीच्या उद्योगाला पूर्णपणें यश येईल किंवा नाहीं असा संशय घेणें यद्यपि रास्त नसलें तरी तो उत्पन्न झाल्याशिवाय राहणार नाहीं.

आता प्रथम, वसाहतीला प्रतिकूल असणारे लोक असें दाखवूं शकतात कीं, वसाहतींपासून मुख्य देशाला कांहीं द्रव्य फायदा होण्याचें तर दूरच राहिलें, पण उलट त्यांच्या पायीं कराव्या लागणाऱ्या लढाया व लष्करी स्वाऱ्या यांतच त्याचा अतोनात पैसा खर्च झाला आणि हजारों लोक प्राणास मुकले. बरें इतकेंहि करून एखाद्या प्रांतांत जर्मनीचा अम्मल सुरू झाला कीं तेथें सुधारणाहि हटकून व्हावयाची, असा तेथील व्यवस्थेवरून जर्मनीचा सार्वत्रिक लौकिक झाला असेल असें म्हणावें, तर तेंहि नाहीं; उलट त्यांपासून परराष्ट्रांबरोबर असलेल्या संबंधांत नवीन नवीन कुलंगडीं मात्र बरींच उपस्थित झालीं.

वसाहतींकरतां जर्मन राष्ट्राला किती खर्च करावा लागला याचें पुढील दोन सालच्या आंकड्यावरून दिग्दर्शन होईल. १८८५ सालीं फक्त १७,४०० पौंड खर्च झाले, आणि १९०५ सालीं नव्वद लाख पौंड खर्च झाले. या दोन सालांच्या दरम्यान नैर्ऋत्य आफ्रिकेंत एक लष्करी मोहीम करावी लागली, म्हणून हा आंकडा बराच फुगला आहे, हें आम्हांला कबूल आहे; व ती गोष्ट जमेस धरली तरी दरसाल हा खर्च वाढत आहे एवढें म्हणावयाला कांहींच हरकत दिसत नाहीं. सध्यां वसाहतींत सर्वत्र शांतता आहे, लढायांवर जास्त पैसे खर्च होण्याची प्रस्तुत भीति नाहीं, तरी देखील दरसाल वीस लक्ष पौंडांपेक्षां जर्म-

नीला कमी खर्च येत असेल असें वाटत नाहीं, व याला सरकारी रिपोर्टांतच प्रत्यंतर मिळतें.*

निरनिराळ्या लढायांत प्राणहानि किती झाली याची नक्की माहिती छापून प्रसिद्ध झाली नसल्यानें ती देतां येणें शक्य नाहीं. परंतु खुद्द वसाहतींतील लोकांशीं किंवा त्यांच्याकरतां इतरांशीं कराव्या लागलेल्या लढायांची संख्या लक्ष्यांत आणली म्हणजे प्राणहानि भयंकर झाली असली पाहिजे असें गृहीत धरून चालण्यास प्रत्यवाय नाहीं.

याशिवाय आणखी असें होतें कीं, वसाहतींचा राज्यकारभार चालविण्याच्या रीती व तो कारभार करणाऱ्या अम्मलदारांच्या नेमणुका लोकांच्या सुखाकडे लक्ष्य पुरवून केलेल्या नव्हत्या. या कामांत प्रिन्स बिस्मार्कनें घालून दिलेलीं मतें धाब्यावर बसविण्यांत आलीं होतीं. वसाहतींची व्यवस्था, त्याच्या सांगण्याप्रमाणें, व्यापारी मंडळीवर सोंपवावयाची सोडून सरकारनें नेमलेले अधिकारी तिकडे गेले. बर्लिनच्या राजकीय वातावरणांत पसरलेल्या अधिकाराच्या मदांत हे अम्मलदार वाढलेले असल्यानें त्यांनीं आपला करडा अम्मल तेथें सुरू केला, आणि मोठ्या बर्लिनच्या धर्तीचीं लहान लहान बर्लिनें त्यांनीं आफ्रिका व पॅसिफिक महासागराच्या बऱ्याच भागांत निर्माण केलीं!

अगोदर विद्या आणि मग तिचा व्यवहारांत उपयोग, हा क्रम जर्मन राष्ट्रानें आपल्या सर्व आधिभौतिक सुधारणेंत पाळला आहे; परंतु या कामांत मात्र त्यानें हा नेहमींचा क्रम सोडून दिला. वसाहतींच्या बाबतींत त्यानें पूर्वीं कोठेंहि अनुभवाच्या शाळेंत शिक्षण मिळविलें

* हल्लींच्या महायुद्धांत जर्मन वसाहतींत लढाया चालू होत्या हें वाचकांस माहित असेलच. या लढायांचा निकाल संयुक्तराष्ट्रांस अनुकूल असा होऊन जगाच्या कोणच्याहि भागांत जर्मन वसाहत म्हणून कोठें राहिली नाहीं. अशी स्थिति जरी प्राप्त झाली आहे तरी या विषयाचें महत्त्व कमी झालेलें नाहीं.

नव्हतें. जर्मन राज्याचा एवढा मोठा राज्यकारभार, पण तो विशिष्ट पद्धति स्वीकारल्यानें कसा बिनबोभाट चालला आहे! तीच रेखीव पद्धति वसाहतींत सुरू केली म्हणजे सर्व कारभार बिनबोभाट चालेल, या कल्पनेनें त्यांनीं राज्यशकट हांकण्यास सुरुवात केली. ही कल्पना जर बरोबर असती तर वसाहतींचें राज्य यापूर्वीच सुस्थित झालें असतें, तेथें शांतता नांदूं लागली असती, आणि लोकांची सुधारणा होऊन ते संपत्तिमान झाले असते. परंतु यांपैकीं एकहि गोष्ट अनुभवास आली नाहीं. मागें सांगितलेल्या नवीन कोलोनियल सेक्रेटरीनें या कामांत पूर्वींच्या कामगारांच्या हातून झालेल्या चुका प्रांजलपणें कबूल केल्या आहेत. आपल्या एका भाषणांत तो म्हणतो:—"वसाहती स्थापन करण्याच्या कामांत जर्मन लोक निरुपयोगी आणि गचाळ आहेत असें लोक म्हणतात. परंतु आमच्या हातून असा गचाळपणा कां व्हावा? आम्ही व्यापारांत गचाळ आहों काय? खलाशांचा धंदा आम्हांला येत नाहीं काय? समुद्रावर आम्हीं आपला व्यापार थोडाथोडका वाढविला आहे काय? रणभूमीवर आम्हीं कधीं कच खाल्ली आहे काय? इतकें असून वसाहतींच्या कामांत आमचें घोडें कोठें पेंड खातें? याचें उत्तर असें आहे कीं, या कामांत यश संपादन करण्यापूर्वीं कांहीं राष्ट्रांनीं जशी कित्येक दिवस प्रथम उमेदवारी केली, तशी आम्हीं मुळींच केली नाहीं. इतर बाबतींत आम्हीं प्रावीण्य संपादन केलें; पण त्याकरतां अगोदर आम्हांला किती तरी खस्ता खाव्या लागल्या आहेत. वसाहतींची स्थापना हा पोरखेळ नाहीं, ती एक विद्या आहे; आणि ती विद्या साध्य झाल्यावर व्यवहारांत तिचा उपयोग कसा करावयाचा, हा एक निराळाच विषय आहे. तो विषय एखाद्या खोलींत बसून प्रोफेसरांचीं व्याख्यानें ऐकून किंवा अशाच तऱ्हेच्या इतर उपायांनीं मनांत भरावयाचा नाहीं. त्याकरतां परदेशीं मुलखांत ठिकाणावर गेलें पाहिजे; तेथील लोकांची

स्थिति कशी आहे, त्यांच्या गरजा काय आहेत, याचा खरोखर अभ्यासच केला पाहिजे; आणि मग इतर लोकांचा या कामांत अनुभव कसा आहे हेंहि ध्यानांत घेऊन त्या धोरणानें कामाला सुरुवात केली पाहिजे."

आणखी एक गोष्ट अशी आहे कीं, तद्देशीय लोकांच्या चालीरीती कशा आहेत, त्यांचा परंपरागत आयुष्यक्रम कोणच्या प्रकारचा आहे, यांकडे जर्मन अधिकाऱ्यांनीं मुळींच लक्ष्य दिलें नव्हतें. त्यांचे कायदे, त्यांच्या व्यवहारांतील रूढी, यांचा पद्धतशीर अभ्यास करून त्या त्या मानानें प्रत्येक वसाहतीला सोइस्कर असे कायदे करावयाचे तें दिलें सोडून, आणि उचल प्रशियांतील कायदा कीं कर तो त्या मुलखांत सुरू, असा क्रम चालू केला! त्यामुळें प्रजेला फार पीडा झाली. आणि सरकारी अधिकाऱ्यांनांहि पुष्कळ त्रास झाला. "नेटिवांच्या जुन्या चालीरीती व समजुती पायाखालीं तुडवून चुटकीसरसे त्यांनां सुधारून जर्मन लोकांच्या बरोबरीला आणून बसविण्याची मूर्खपणाची हाव धरल्यानें जर्मन अमलाखालीं वसाहतींतील जुन्या कायद्यांचा व रूढींचा लोप होऊन गेला व लोकांत असंतुष्टता उत्पन्न झाली. काळ्या वर्णाच्या नीग्रो लोकांसंबंधाचा कायदा अत्यंत असमाधानकारक आहे. उठल्या बसल्या त्यांच्याशीं दंडुकेगिरी केल्यानें जर्मनीच्या नांवाला कलंक लागला आहे. नीग्रो लोकांनां आमच्याबद्दल काडीचीहि सहानुभूति वाटत नाहीं." हे उद्गार १९०६ सालीं राइशटॅगमध्यें एका सभासदानें काढले असून त्यांत त्यानें वर्णिलेली शोचनीय स्थिति अक्षरशः खरी आहे. त्यांतल्या त्यांत सुदैवाची गोष्ट ही कीं, १९०७ सालीं कोलोनियल आफिसनें वरील सभासदाच्या म्हणण्याची दाद घेऊन एक कमिशन नेमलें व निरनिराळ्या वसाहतींतील जुने कायदे कोणचे आहेत, त्यांनां व्यवस्थित स्वरूप कसें देतां येईल, याची चौकशी करण्याचें काम त्याकडे सोंपविलें. वीस वर्षांपूर्वींच हा शहाणपणाचा व सरळ मार्ग अवलंबिला असता तर

राज्यकारभारांत झालेल्या पुष्कळशा चुका व प्रमाद टाळतां आले असते, आणि लहानमोठ्या ज्या अनेक लढाया कराव्या लागल्या त्या देखील कराव्या लागल्या नसत्या, यांत मुळींच शंका नाहीं.

याहून वाईट गोष्ट म्हणजे ही कीं, वसाहतींचा राज्यकारभार ज्या अधिकाऱ्यांवर सोंपविला होता त्यांच्यांत माणुसकीचा अत्यंत अभाव होता. त्यांच्यांत अपवादादाखल कांहीं चांगलीं माणसें होतीं; परंतु तीं भांगेच्या शेतांत तुळशीच्या रोपाप्रमाणें होतीं. स्वदेशांत ज्यांनीं कोणचाहि कायमचा धंदा कधीं केला नाहीं, ज्यांच्या स्वभावांत स्थिरपणा नाहीं, ज्यांचें आयुष्य वाईट व्यसनांत आणि अतिशय बदफैलीपणाच्या वर्तनांत खर्च झालें, अशा लोकांची दरबारांतील ब्याद टाळावयाची झाली म्हणजे त्यांस वसाहतीच्या गव्हरनराच्या जागेवर पाठवून द्यावयाचें, हा क्रम अनेक वर्षेंपावेतों अव्याहतपणें चालू होता. १८८८ सालीं राइशटॅगच्या सुरुवातीला बादशहानें जें भाषण केलें त्यांत त्यानें असे उद्गार काढले होते कीं, "काळ्या आफ्रिका खंडांत जर्मनीचा अम्मल बसवून तेथें 'ख्रिश्चियन' सुधारणा करणें हें राष्ट्राचें पवित्र कर्तव्य आहे." ही ख्रिश्चियन सुधारणा तर बाजूलाच राहिली; परंतु तिच्याऐवजीं कोणच्याच प्रकारची सुधारणा तेथें घडून आली नाहीं. सरकारी कामगार व गोरे मळेवाले ( Planters ) यांनीं नीग्रो लोकांनां गुलामाप्रमाणें वागविलें, त्यांच्यावर नाना प्रकारचे जुलूम करून त्यांचे हालहाल केले, त्यांच्याशीं वागतांनां त्यांनीं कायद्याला पायाखालीं तुडविलें, व इतर घाणेरडे अत्याचारहि केले. या गोष्टी सांगोवांगीच्या नसून कमिशनपुढें पुराव्यानिशीं शाबीत झाल्या आहेत. त्या ऐकल्या म्हणजे ऐकणाराच्या मनांत किळस उत्पन्न होते; व "हे अनन्वित प्रकार चालू असतां, ख्रिश्चियन सुधारणे! तूं कोठें दडून बसली होतीस?" असे उद्गार आपोआप तोंडांतून बाहेर पडतात!

सरकारी अम्मलदारच जेथें बेकायदेशीरपणानें वागत होते, तेथें गोरे व्यापारी सुद्धां मन मानेल तसे वागत असत यांत आश्चर्य कसचें? या व्यापाऱ्यांची अशी समजूत झालेली होती कीं, नेटिव लोकांपाशीं असेल नसेल तें मनगटाच्या जोरावर बुचाडून घेण्याचा आपला हक्कच आहे. कित्येकांनीं या मार्गानें लोकांच्या जमिनी सुद्धां हिरावून घेतल्या होत्या. मळेवाल्यांचा हाच नमुना होता. मळ्यांतील कामाला लागणारे मजूर आम्ही तुम्हांला मिळवून देतों, असें कांहीं मिशनरी लोकांनीं आरंभीं त्यांनां सांगितलें व त्याप्रमाणें त्यांनीं मजूर मिळवूनहि दिले. परंतु आपण मिळवून दिलेल्या मजुरांपैकीं एकचतुर्थांश मजूर मालकांच्या अनन्वित जुलमामुळें एका वर्षाच्या अखेरीस यमसदनास गेले, बरेच आजारी पडले, व कित्येक तर मालकांनीं ब्रँडी पिण्याचें व्यसन लावल्यानें धुळीस मिळाले, असें जेव्हां मिशनरींनीं पाहिलें तेव्हां त्यांनीं या फंदांत पडण्याचें सोडून दिलें, व हा प्रकार जगाच्या निदर्शनास आणण्याला त्यांनीं सुरुवात केली. त्याबरोबर मळेवाले व इतर व्यापारी त्यांच्यावर रागानें लाल झाले, व 'तुमच्या कामांत भट पडो' या म्हणीच्या आश्रयानें त्यांच्यावर यथेच्छ तोंडसुख घेऊं लागले. हा झाला पूर्वीचा प्रकार. पण वसाहतींतील लोकांशीं मऊ वागून चालावयाचें नाहीं, असें म्हणणारे हरीचे लाल विसाव्या शतकांत देखील जर्मनींत पहावयास सांपडतात, हें आश्चर्य आहे! १९०४ सालीं यांपैकीं एका गृहस्थानें या विषयावर एक चोपडें प्रसिद्ध केलें. त्यांत म्हटलें आहे, "नीग्रोंनां सक्तीनेंच काम करावयास लाविलें पाहिजे व त्याच्या मोबदला त्यांनां जेवावयास घातलें म्हणजे पुरें आहे. कांहीं वर्षेपावतों सक्तीनें मजुरी घ्यावयाची, हा एक न्यायाला संमत असलेला शिक्षेचा मार्ग आहे; शिवाय असें केल्यानें चांगलें काम कसें करावें याचें मजुरांनां आयतें शिक्षण मिळतें. ख्रिस्तीधर्मांत सांगितलेला दयाधर्म आणि परोपकार मिशनऱ्यांनां लखलाभ होवो,

आमच्या कामांत त्याचा कांहीं उपयोग नाहीं."

हा सर्व प्रकार पाहून जर्मनींतील लोकमत अगदीं खवळून गेलें आणि राइशटॅगमध्यें सरकारावर टीकेचा भडीमार सुरू झाला. १९०४।०५ सालांत वसाहतींतील अधिकाऱ्यांचीं व इतर लोकांचीं कृष्णकारस्थानें जेव्हां पुराव्यानिशीं शाबीत झालेलीं पाहिलीं तेव्हां तर लोकांचा राग अनिवार झाला. १९०५ सालीं रॅडिकल पक्षाच्या लोकांची एक सभा भरली होती; व त्या सभेनें असा ठराव पास केला कीं, हल्लींचा वसाहतींचा कारभार यापुढें बंद ठेवला तर फार चांगलें होईल; व एक सभासद टाळ्यांच्या गजरांत असें बोलला कीं, "लिलावांत सवाल बोलावयाला जर कोणी पुढें येईल तर त्याला जाहीर लिलावांत वसाहती विकून टाकल्या तर देशाचें कल्याण होईल." परंतु असा माथेफिरूपणा काय कामाचा? सरकारच्या कृत्यावर लोकांनीं टीका करावी; पण त्या टीकेपासून सरकारला मदत होईल अशी खबरदारी घेणें जरूर आहे. १९०७ सालापासून रॅडिकल पक्षाचेच लोक सरकारला या कामांत योग्य ती मदत करावयास पुढें सरले आहेत. हल्लींचा नवीन कोलोनियल सेक्रेटरी चांगला मुत्सद्दी आहे व त्यानें वसाहतींतील कारभारांत चांगलें लक्ष्य घातलें आहे. त्याच्या प्रयत्नांनां यश येऊन जर्मनीवरचा कलंक लवकरच धुऊन जाईल अशी आशा आहे.

प्रकरण १९ वें

# वसाहतींचें नवें मन्वंतर

१९०७ च्या मे महिन्यांत "कोलोनियल आफिस" नांवाचें, पुष्कळ स्वतंत्र अधिकार असलेलें, एक नवीन खातें उत्पन्न करण्यांत आलें; आणि तेव्हांपासून वसाहतींची सुधारणा होण्याला आरंभ झाला. त्यापूर्वी "कोलोनियल डिपार्टमेंट" म्हणून एक खातें होतें व त्याच्यावर "कोलोनियल डायरेक्टर" हा मुख्य अधिकारी होता. परंतु तें खातें "फॉरिन आफिस"चा एक भाग असें मानण्यांत येत होतें. यामुळें वसाहतींची सर्व सत्ता फॉरिन मिनिस्टरच्या हातांत होती. निरनिराळे फॉरिन मिनिस्टर जे झाले, त्यांनीं कोलोनियल डायरेक्टरच्या कामांत विनाकारण ढवळाढवळ करावयाची नाहीं हें धोरण ठेवलें होतें; परंतु राज्यव्यवस्थेचे नियमच असे होते कीं, त्या नियमांअन्वयें आपल्यावरची जबाबदारी डायरेक्टरवर टाकतां येणें त्यांनां शक्य नव्हतें. या व्यवस्थेनें दोघांच्याहि कामांत फार घोटाळा उत्पन्न होत असे. फॉरिन आफिसच्या हातांत सर्व सत्ता होती खरी, परंतु अम्मलबजावणीचा अधिकार दुसऱ्यांच्या हातांत होता; शिवाय परराष्ट्रांचा ज्यांत संबंध नाहीं अशा बऱ्याच भानगडींत फॉरिन सेक्रेटरीला मन घालावें लागे. ही झाली फॉरिन ऑफिसची अडचण; उलट कोलोनियल डिपार्टमेंटकडे अम्मलबजावणीचा अधिकार होता. परंतु एखाद्या प्रकरणाचा अखेर निकाल करण्याचा अधिकार दुसऱ्याकडे होता. ही झाली त्या ऑफिसची अडचण!

हा घोटाळा मोडण्याकरतां एक स्वतंत्र "कोलोनियल आफिस" निर्माण करण्याची मंजुरी राइशटॅगकडे निरनिराळ्या चॅन्सेलरनीं मागितली होती; परंतु ती पुष्कळ दिवस मिळाली नाहीं. शेवटीं प्रिन्स-

ब्यूलोच्या कारकीर्दींत नवीन खातें काढण्याला राइश्‌टॅगनें संमति दिली. त्यानंतर वर सांगितल्याप्रमाणें १९०७ सालीं वसाहतींचें निराळें व स्वतंत्र खातें स्थापन झालें; आणि हर डर्नहार्ड डेर्नबर्ग या ज्यू गृहस्थाची सेक्रेटरीच्या जागेवर नेमणूक झाली. त्यापूर्वी हा गृहस्थ "कोलोनियल डायरेक्टर-"च्या अधिकारावर होता. वसाहतींची सुधारणा करण्याकरतां त्यानें योजिलेले उपाय शेवटीं कितपत फलप्रद होतील हा कालावधीचा प्रश्न आहे; परंतु हा गृहस्थ नंबर एकचा आशावादी आहे; आणि आपल्या योजना सिद्धीस नेण्यापुरता उत्साह आणि दृढनिश्चय त्याच्या अंगांत आहे, याविषयीं शंका नाहीं. तो जेव्हां या नवीन हुद्द्यावर आला तेव्हांची वेळ फार कठिण होती. सांपत्तिक आणि नैतिक दृष्ट्या वसाहतींची चळवळ अगदीं निरुपयोगी ठरली होती, आणि तेथील व्यवस्थेसंबंधानें कोणाच्या तोंडून एखादा चांगलासा शब्द चुकूनहि येत नव्हता; परंतु याच्या हातांत अधिकार आल्यापासून परमुलखांतील जर्मनीच्या राज्यांसंबंधानें लोकांत पुनः नवीन विश्वास उत्पन्न झाला आहे, आणि म्हणून या गोष्टीचें श्रेय याच्या कर्तबगारीलाच देणें जरूर आहे.

वसाहतींची इंग्लिशांची पद्धति जर्मन पद्धतीपेक्षां चांगली आहे असें त्याचें मत आहे, आणि त्या धोरणानें त्यानें आपला उद्योग आरंभिला आहे. प्रथमतः त्यानें देशांतील विद्वान् लोक, कारागीर, मोठमोठे कारखानदार आणि व्यापारी यांनां पुष्कळशीं व्याख्यानें दिलीं. या व्याख्यानांत त्यानें विशेषेंकरून (१) राष्ट्राचा अभिमान आणि (२) राष्ट्राचें हित ह्या दोन गोष्टी श्रोत्यांच्या मनावर ठसविल्या. ज्या कामाला जर्मनीनें एकदा हात घातला, तें काम मध्येंच सोडलें तर राष्ट्राची अब्रू राहणार नाहीं, असें पहिल्या मुद्द्यासंबंधानें त्याचें म्हणणें आहे; आणि तें अगदीं खरें आहे. दुसऱ्या मुद्द्यासंबंधानें तो म्हणतोः—"जर्मन

राष्ट्रांतील मजुरांची व्यवस्था पुढें काय लावावयाची, उद्योगधंद्यांत गुंतलेल्या मजुरांनां खावयाला पोटभर अन्न कसें मिळवावयाचें, आणि व्यापार, उद्योगधंदे व नवीन जहाजें बांधणें, या कामांत देशांतील भांडवल कसें व किती गुंतवावयाचें, हे महत्त्वाचे प्रश्न वसाहतींच्या व्यवस्थित राज्यकारभारावर अवलंबून आहेत.''

कोलोनियल सेक्रेटरीच्या मतानें पुढेंमागें असा काळ लवकरच प्राप्त होणार आहे कीं, जर्मनींतील उद्योगधंद्यांनां व कारखान्यांनां जेवढा कच्चा माल लागेल किंवा उष्ण हवेंत उत्पन्न होणारीं जीं धान्यें लोकांनां लागतील तीं वसाहतींकडून जर्मनीला मिळूं लागतील. परंतु, इंग्लंडची वसाहतींची व्यवस्था इतकी चोख असून व तेथील लोकसंख्याहि कमी असून त्या देशाला अशा प्रकारचा जो फायदा अजूनपावेतों मिळत नाहीं, तो आणखी थोड्या वर्षांनीं जर्मनीला मिळूं लागेल, हें संभवनीय वाटत नाहीं. कापूस, लोकर, तांबें, रबर, पेट्रोलियम, कॉफी, तांदूळ, तेल काढतां येण्याजोगीं फळें आणि ताग इतके जिन्नस जर्मनीला बहुतेक परदेशांतून आणावे लागतात; १९०५ सालीं पांच कोटी पौंड किंमतीचा वर सांगितलेला हरतऱ्हेचा माल परदेशांतून जर्मनींत आला. इतक्या किंमतीचा निरनिराळा माल वसाहतींत आपण पैदा करूं असें या गृहस्थाला वाटत आहे; यावरून तो किती आशावादी आहे हें स्पष्ट दिसतें. परंतु त्याची आशा सफल होण्याचें चिन्ह पूर्वीच्या परिस्थितीवरून दिसत नाहीं असें आम्हांस वाटतें.

वरील जिनसांपैकीं कापूस हा जिन्नस सर्वांहून जास्त महत्त्वाचा आहे. कापूस पिकविण्याचा प्रयत्न आफ्रिका खंडांतील निरनिराळ्या वसाहतींत हल्लीं मोठ्या प्रमाणावर सुरू झाला आहे. तरी पण जर्मनीला एका वर्षाला जेवढा कापूस लागतो, तेवढ्याचा एक हजारांश देखील वसाहतींत तयार होत नाहीं. कापसाचें पीक अजून नवीन आहे, पुढें कांहीं

वर्षांनीं जास्त माल तयार होऊं लागेल; परंतु करांगुलि फुगली तरी ती कांहीं डोंगराएवढी होऊं शकत नाहीं!

वसाहतींतील जमिनींच्या सुपीकपणाबद्दल कांहीं लोकांच्या फारच विलक्षण कल्पना आहेत. ते असें म्हणतात कीं, "आणखी थोड्या वर्षांतच वसाहतींत कच्चा माल वाटेल तितका उत्पन्न होऊं शकेल. हा माल वसाहतवाले मातृदेशाला खूप कमी किंमतीला विकत देतील आणि त्यायोगानें कारखान्यांत तयार झालेला पक्का जर्मन माल साऱ्या जगावर इतका पसरेल कीं, परराष्ट्रांनां जर्मनीबरोबर टिकाव धरणें फारच अवघड जाईल." वसाहतींत शेतीचा खर्च कितीहि कमी असला तरी तेथील धान्य पिकविणारे लोक बाजाराच्या चढाओढींत सर्वांत जास्त जी किंमत ठरेल तिच्यापेक्षां कमी किंमतीला आपलें धान्य जर्मन व्यापाऱ्यांनां काय म्हणून विकतील, हा विचार मनांतल्या मनांत मांडे खाणाऱ्या या लोकांच्या डोक्यांत कसा येत नाहीं कोणास ठाऊक! खुद्द हरडनेबर्ग देखील असें म्हणावयाला मागेंपुढें पहात नाहीं कीं, पांच वर्षांच्या अवधींत वसाहतींचा मातृदेशाशीं व्यापार तीस लाख पौंडावरून एक कोट पौंडांपर्यंत वाढेल! ही वाढ म्हणजे अतिशय आहे असा आमच्या म्हणण्याचा भावार्थ नाहीं; परंतु वसाहतींचा आतांपर्यंतचा जो अनुभव आहे त्यावरून हा श्वेताचा अदमास देखील खरा ठरेल किंवा नाहीं ही शंका आहे. १८८८ पासून १९०८ पर्यंतच्या वीस वर्षांत जर्मनीचा वसाहतींशीं आयात व निर्गत मालाचा व्यापार एक कोट एकुणसाठ लक्ष पौंडाचा काय तो झाला, म्हणजे एका वर्षांत जर्मनींतून स्वित्झरलंडसारख्या लहान देशांत जितका माल जातो, त्याच्यापेक्षां हा आयात व निर्गत दोनहि प्रकारचा माल बराच कमी आहे. शिवाय जर्मनींतून वसाहतींत जो माल त्या मुदतींत रवाना झाला, त्यांत सरकारी इमारतकारखान्याला व फौज आणि फौजेवरील

अम्मलदार यांनांच लागणारा माल किती तरी होता.

जर्मन वसाहतींनां पुढें कोणची स्थिति प्राप्त होणार किंवा होणार नाहीं यासंबंधानें झालें इतकें विवेचन पुरें आहे. आतां आपण प्रस्तुत त्यांची स्थिति कशी आहे याचा विचार करूं. ही स्थिति एका चुटक्यांत पण अगदीं यथार्थपणें एका माणसानें अशी वर्णिली आहे कीं, ज्या वसाहती सुपीक आहेत त्यांचें हवापाणी चांगलें नाहीं; आणि ज्यांचें हवापाणी चांगलें आहे त्या अगदीं नापीक आहेत! असो. प्रस्तुत स्थितीचा विचार करावयाचा झाला तर एकंदर वसाहतींचे आपल्याला दोन वर्ग करतां येतील. (१) सेटलमेंट (वस्तीच्या) स्वरूपाच्या आणि (२) प्लँटेशन (बागाईत) स्वरूपाच्या. पहिल्या वर्गात नैर्ऋत्य आफ्रिकेचा कांहीं भाग, पूर्व आफ्रिकेचा वरचा मुलुख आणि कांहीं बेटें इतक्यांचा समावेश होतो; व त्या सर्वांचा विस्तार जर्मन राष्ट्राच्या दुप्पट आहे. दुसऱ्या वर्गात पूर्व आफ्रिकेचा पुष्कळसा भाग, कॅमेरून, टोगो, आणि न्यू (नवीन) ग्वायना इतक्यांचा समावेश होतो. याचा विस्तार जर्मन राष्ट्रापेक्षां अडीच पटीनें मोठा आहे. परंतु युरोपियन लोकांनां वसाहत करण्याला हवापाण्याच्या दृष्टीनें हे प्रांत नालायख आहेत. जर्मन वसाहतींचा एकंदर विस्तार (१९०६) २,६५८,४४९ चौरस किलोमीटर (१ किलोमीटर = ५/८ मैल) आहे, आणि तेथलि लोकसंख्या १२,११९,००० आहे. कियाचौ येथील वसाहत धरून सर्व वसाहतींत १९०६ सालीं ५६६८ व नैर्ऋत्य आफ्रिकेंत ६३७२ गोरे लोक होते. जर्मन ईस्ट आफ्रिकेंत जे युरोपियन राहिवासी आहेत, त्यांत इंग्लिश, फ्रेंच, इटालियन, आस्ट्रियन वगैरे लोक देखील आहेत; व इतर भागांतहि ते थोड्याअधिक प्रमाणानें पसरले आहेत.

टोगो येथील वसाहतीचा खर्च मात्र तेथील उत्पन्नांतून भागतो; बाकीच्या सर्वांनां पैशाची मदत साम्राज्याला करावी लागते. १९०६।०७

सालीं ४,३६२,२५० पौंड रकम मदतीदाखल वसाहतींनां द्यावी लागली; त्यापैकीं ३,२५३,५५० पौंड नैर्ऋत्य आफ्रिकेच्या वाट्याला गेले. कारण, तेथें लष्करी खर्च बराच आहे. हा खर्च यापुढें वर्षानुवर्षे कमी होत चालला आहे आणि म्हणून साम्राज्याला द्यावी लागणारी रकम तितकी कमी होईल.

वसाहतींची स्वतःची उत्पन्नाची बाब म्हणजे "कस्टम ड्यूटीज्" (बाहेरून येणाऱ्या मालावरील जकात) होय. १९०६ सालीं जकातीचें एकंदर उत्पन्न ४११,०५० पौंड होतें. परदेशांतून येणाऱ्या पक्क्या मालावर इतकी जकात उत्पन्न झाली असती तर ती गोष्ट निराळी होती; व तीवरून लोकांनां अशा मालाची अभिरुचि लागत चालली आहे असें म्हणतां आलें असतें. परंतु या उत्पन्नापैकीं बराच मोठा भाग दारूच्या जकातीपासून मिळाला आहे, ही खेदाची गोष्ट आहे. दारूचें व्यसन लोकांत फार वाढत चाललें आहे, आणि या व्यसनापायीं कांहीं जातींचे लोक तर नामशेष झाले आहेत. याशिवाय निरनिराळ्या स्वरूपाचे स्थानिक कर आहेत व वरील सालांत त्यांचें उत्पन्न ९६३,५०० पौंड झालें. वसाहतींचा खर्च वसाहतींकडूनच भागवावा असा कोलोनियल सेक्रेटरीचा इरादा आहे, आणि हा इरादा साध्य व्हावा म्हणून साम्राज्याकडून प्रत्येक वसाहतीला किती मदत द्यावयाची तें एकदां ठरवून टाकावें असें त्याच्या मनांत आहे. या ठरीव रकमेच्या मदतीनें खर्चाचीं तोंडें मिळवितां आलीं नाहींत तर कमी पडणारी रकम ज्या त्या वसाहतीनें आपल्या जबाबदारीवर उभारली पाहिजे, असेंहि त्याचें म्हणणें आहे.

१९०५ सालीं वसाहतींचा परदेशांशीं एकंदर व्यापार ९,६५५,००० पौंडांचा होता. त्यापैकीं आयात माल ७,०२७,४०० पौंडांचा व निर्गत माल २,६२७,६०० पौंडांचा होता. आयात मालांत सरकारी सामान

(Stores), रेल्वेला लागणारा माल, व अशाच प्रकारच्या जिनसांचा भरणा फार होता. अशा स्वरूपाचा माल हुंड्यांच्या अदलाबदलींत म्हणजे एक्स्चेंजमध्यें जमेस धरतां येत नाहीं, आणि म्हणून आयात मालाचा व्यापार भरभराटीस येत चालला आहे, असें हा आंकडा पाहून ठरविणें चुकीचें आहे.

बऱ्याचशा वसाहतींत बागाइतीचें उत्पन्न वाढवावयाचें म्हटलें तर तें शक्य आहे, पण यापेक्षां जास्ती हातपाय हालविण्यास तेथें तूर्त सवड नाहीं; आणि प्रस्तुतचे तेथील उद्योग या दिशेनेंच सुरू आहेत. गोऱ्या मळेवाल्यांनां या कामांत देखील जी अडचण आहे ती ही कीं, स्थानिक मजूर नियमितपणानें कामावर रहात नाहींत. कांहीं ठिकाणचे लोक संवयीनें चांगले सुधारतात; परंतु कित्येक ठिकाणचे लोक इतके आळशी आहेत कीं, त्यांचा तो आळस नाहींसा करण्याचा वाटेल तो उपाय केला तरी तो सिद्धीस जात नाहीं.

पश्चिम आफ्रिकेंतील टोगो व कामेरून येथील लोक अजूनपावेतों कामाला आळशी आणि वागणुकीनें गैरशिस्त आहेत. तेथील मजूर अंग मोडून मेहनत करीत नाहींत. हवा वाईट व प्रांत दलदलीचा आहे; परंतु जमीन पिकाला चांगली आहे. पूर्व आफ्रिकेंत चांगले मजूर मिळतात. परंतु नैर्ऋत्य आफ्रिकेंत मजुरांची जी अडचण आहे ती दूर होण्याचा सध्यांला तरी संभव दिसत नाहीं. कारण, हेरेरॉस जातीचे तेथील लोक मजूरीच्या कामाला फार चांगले असत; परंतु जर्मन लोकांनीं त्यांचा अगदीं नायनाट केल्यानें जमीन कसण्याला त्यांच्याइतके चांगले लोक कोणी मिळत नाहींत. या लोकांवर जर्मनांचा इतका मारा कां झाला हा इतिहास वाचण्याजोगा आहे. परंतु आपण तो पहा कशाला ? आपल्याला लक्ष्यांत घ्यावयाचें तें इतकेंच कीं, या लोकांच्या अभावीं नैर्ऋत्य आफ्रिकेंतील शेती आणखी कांहीं वर्षें अशीच निकृष्ट स्थितींत

रहावयाची ! या भागांतील हवा सौम्य आहे; जमीन मुबलक असून सुपीक आहे; चराऊ रानें पुष्कळ आहेत; या सर्व गोष्टी अनुकूल असल्यानें, मजुरांची अडचण दूर झाली म्हणजे, नैर्ऋत्य आफ्रिकेंत फार चांगलें उत्पन्न होईल, असा सरकारचा अदमास आहे. हरडर्नबर्गच्या मतानें हा प्रांत लवकरच ब्रिटिश कॅनडाच्या बरोबरीला येण्याजोगा आहे. हें अतिशयोक्तीचें मत बाजूला ठेवलें तरी खरी स्थिति अशी दिसते कीं, हा प्रांत युरोपियन लोकांनीं मोठी वस्ती करून राहण्याजोगा आहे. तेथील हवा त्यांनां मानवण्याजोगी आहे, व कामधंद्यांत प्राप्तिहि साधारण बरी होईल. त्या भागांत चांगलेंसें बंदर नाहीं, ही एक गौण गोष्ट आहे. वालफिशचें आखात ( Walfisch Bay ) व्यापाराच्या सोईचें आहे; पण तें इंग्रजसरकारच्या ताब्यांत आहे. बंदर या दृष्टीनें स्वाकोपमंड हें ठिकाण बरें आहे; पण त्याच्याभोंवतीं वाळूचा गराडा आहे. ही गैरसोय दूर करण्याकरतां एक खाजगी कंपनी निघाल्याचें ऐकण्यांत आहे. परंतु तिचें काम कोठपर्यंत आलें आहे तें कांहीं अद्याप समजलें नाहीं.

सर्व वसाहतींत उत्पन्नाची मुख्य बाब म्हणजे शेती. शेतींतच सुधारणा करून हरतऱ्हेचा माल उत्पन्न करण्याशिवाय संपत्त्युत्पादनाचीं अन्य साधनें उपलब्ध नाहींत. शेती करावयाची झाली तरी ती मोठ्या प्रमाणावरच केली तर कांहीं तरी नफा होईल; लहान प्रमाणावरील शेती करण्यांत फायदा होण्याचा संभव नाहीं. मोठ्या प्रमाणावर शेती म्हटली म्हणजे ज्याच्यापाशीं भांडवल रगडून असेल तोच या कमांत पडेल; इतरांचा त्यांत निभाव लागणार नाहीं. उदाहरणार्थ, नैर्ऋत्य आफ्रिकेंतील शेतांत योग्य फायदा मिळवावयाचा झाला तर एका मालकाकडे निदान २५,००० एकर जमीन तरी पाहिजे ! अशी जेथें स्थिति आहे तेथें अल्प प्रमाणावर शेती करणाऱ्या लोकांची काय दाद लागणार ? पांचशेंपासून

अडीच हजार पौंडांपर्यंत ज्यांच्यापाशीं भांडवल असेल, अशा शेतकऱ्यांनां मात्र वसाहतींत जाऊन राहण्याची परवानगी देण्यांत येते. यावरून लहान शेतकऱ्यांनां वसाहतींचा कितपत फायदा मिळणार हें दिसतेंच आहे. मग हा प्रांत ब्रिटिश कॅनडाच्या तोडीचा लवकरच होणार असें कोलोनियल सेक्रेटरीला कशावरून वाटतें कोणास ठाऊक!

वसाहतींच्या भरभराटीला आणखी एक मोठी अडचण आहे ती गाडीरस्त्यांची व आगगाड्यांची. परदेशांत रवाना करण्याजोगा माल पांचपासून पन्नास दिवसपावेतों वाहतुकीचीं चांगलीं साधनें नसल्यानें नीग्रोंच्या डोक्यांवरून न्यावा लागतो. हस्तीदंत, रबर आणि भेण हा माल वाहून नेणें सोपें आहे, व त्यांत बराच फायदा उरतो; परंतु तो माल असावा तितका भरपूर नाहीं. पूर्व आफ्रिकेंत तर वाहतुकीची ही अडचण फारच मोठी आहे. १९०८ सालीं राइश्टॅगनें ९०० मैल लांबीची रेल्वे बांधण्याची मंजुरी दिली आहे. ही रेल्वे सहासात वर्षांत बांधून तयार व्हावयाची आहे. ब्रिटिश आफ्रिकन वसाहतींत ज्या मानानें रेल्वे बांधल्या आहेत त्या मानानें हें प्रमाण बरेंच कमी आहे, तरी "अकरणान्मंदकरणं श्रेयः" या तत्त्वानुसार झाली इतकी योजना ठीक आहे असें म्हटलें पाहिजे.

या व मागील प्रकरणांत जी हकीकत सांगितली तिचा जरा शांत मनानें विचार केला म्हणजे हें निश्चित दिसतें कीं, देशांत वाढत जाणारी प्रजा आणि उद्योगधंदे यांची तरतूद लावण्यासाठीं वसाहतींची नीट व्यवस्था लावून त्यांची सुधारणा करण्याचा जर्मन लोकांचा हा सर्व खटाटोप चालला आहे. "वेल्ट पॉलिटिक-"ची लाट सध्यां उसळली आहे, ती या खटाटोपाच्या मूळाशीं अगदींच नाहीं असें म्हणतां येत नाहीं; परंतु आमच्या मतानें मुख्य हेतु जो आहे तो हा कीं, जर्मनीला नवीन बाजारपेठा मिळाव्या; आणि हा हेतु सर्व प्रकारें योग्य आणि दूरदृष्टी-

चा आहे असें कोणीहि म्हणेल. देशांतल्या देशांत ज्या लोकांचा चरितार्थ चालावयाचा नाहीं त्यांनीं देशत्याग करून वसाहतींत कायमची वस्ती करावी; हा विचार राज्यकर्त्यांच्या मनांत सध्यां फारसा येत असेल असें वाटत नाहीं; कारण, वसाहतींत अजून तशा प्रकारची सोय झालेली नाहीं. आफ्रिकेंत आणि पॅसिफिक महासागरांत जर्मनीच्या ताब्यांत जे मुलूख आहेत त्यांनां "वसाहती" ही संज्ञा देण्याचा प्रघात आहे; परंतु हा केवळ शब्दच्छल आहे. या मुलखांनां "संरक्षणाखालचा मुलुख" (Protectorates) किंवा "व्यापाराकरतां वस्ती करण्याचा मुलुख" (Trading Settlements) ही संज्ञा दिली तर ती अधिक शोभेल. कारण, वसाहत ही संज्ञा देण्याजोगी त्या मुलखांत अजून पात्रता नाहीं, व म्हणण्याजोगे गोरे लोक कोणच्याहि एका प्रांतांत कायमचीं घरेंदारें करून आतांपर्यंत राहिलेले नाहींत.

कारखान्यांत तयार झालेला पक्का माल खपविण्याकरतां नवे बाजार हस्तगत करणें अथवा सर्व जगभर जर्मनीची सत्ता स्थापन करून इंग्लंडसारख्या देशाच्या बरोबरीला येणें, या दोन हेतूंपैकीं पहिला मुख्य असो किंवा दुसरा मुख्य असो, अथवा दोन्हीहि मुख्य असोत, वादाकरतां कसेंहि गृहीत धरून चाललें तरी तेवढ्यावरून वसाहतींच्या चळवळीला हल्लीं लोकांकडून जो आश्रय मिळतो तो पुढें तसाच चालू राहील असें म्हणतां येत नाहीं. तथापि वरील कारणांशिवाय आणखी एक बलवत्तर कारण आहे व तें लक्ष्यांत घेतलें असतां लोकांचा हा उत्साह शेवटपर्यंत कायम राहील असें वाटतें. वसाहतींच्या भरभराटीवर जर्मन राष्ट्राचें वैभव अवलंबून आहे असें कंठरवानें सांगितलें तरी ज्यांच्या मनावर यत्किंचितहि अनुकूल ग्रह झाला नाहीं असे हजारों—नव्हे लाखों—लोक आरंभाला जर्मनींत होते. परंतु वसाहतींपायीं अनेक जर्मन लोक गेल्या १०।१५ वर्षांच्या अवधींत मृत्युमुखीं पडले, ही गोष्ट त्यांच्य

मनांत भरवून दिल्याबरोबर ते लोक खडबडून जागे झाले. त्यांनीं आपलें या कामांतील औदासीन्य पार झुगारून दिलें, आणि आतां ते असें म्हणूं लागले आहेत कीं, " ज्या जमिनीवर जर्मनीचे अनेक पुत्र मृत्यु-मुखीं पडले आणि ज्या जमिनीच्या उदरांत हल्लीं ते अखंड निद्रेच्या सुखाचा अनुभव घेत आहेत, ती जमीन आतां लोकांची नाहीं, खुद्द आमची आहे. आणि तिची चांगली सुधारणा करणें व तिच्याविषयीं नेहमीं काळजी वाहणें हें आमचें श्रेष्ठ कर्तव्य आहे." हे उद्गार आफ्रिकेंतील सर्व प्रांतांसंबंधानें खरे आहेतच, परंतु नैर्ऋत्य आफ्रिके-संबंधानें विशेषच खरे आहेत; आणि त्यावरून स्वदेशाचा अभिमान बाळगणाऱ्या जर्मन लोकांच्या मनांत वसाहतींसंबंधानें कोणची मनो-भावना जागृत झाली आहे, हें आपल्या चांगलें लक्ष्यांत येतें. जर्मनींत जीं निरनिराळीं संस्थानें होतीं, त्यांचें एकीकरण होण्याला मनुष्याचें रक्त आणि पोलादी शस्त्रास्त्रें जशीं कारणीभूत झालीं, तशींच तीं वसाहतींच्या निरनिराळ्या प्रांतांचें एकीकरण करण्यास कारणीभूत झालीं आहेत; आणि जे प्रांत इतकी प्राणहानि सोसून एकदां मिळविले ते हातांतून दवडणें म्हणजे राष्ट्राची अब्रू गमावणें आहे, असें प्रस्तुत लोकांनां वाटत आहे. याचा परिणाम असा झाला कीं, राष्ट्रांतील निरनिराळे राजकीय पक्षाचे लोक, आपसांतील भेदभाव विसरून, एकदिलानें या चळवळीला साहाय्य करीत असून " जर्मन कोलोनियल सोसाइटी-"सारखी संस्था स्थापन करीत आहेत. त्यांपैकीं कांहीं लोक असें देखील म्हणणारे आहेत कीं, वसाहतींपासून राष्ट्राचा सांपत्तिक फायदा झाला नाहीं तरी हरकत नाहीं; पण तेथील लोकांची सुधारणा करणें हेंच ब्रीद आपण बाळगलें पाहिजे. सोशियालिस्ट पूर्वी असें म्हणत असत कीं, " वसाहती वाढवा " असा ओरडा करणारे मुख्यत्वेंकरून धनिक लोक आहेत, आणि त्यांची अनावर धनतृष्णाच या चळवळीच्या मूळाशीं आहे. परंतु त्यांच्यांतहि

'मवाळ' ( Moderate ) लोक जे होते त्यांना हें म्हणणें मान्य नव्हतें. मनुष्यजातीची सुधारणा हें सोशियालिझमचें अंतिम साध्य आहे; नीग्रो-सारख्या अडाणी आणि हीन स्थितींत असलेल्या लोकांची आपल्या हातून सुधारणा होण्याजोगी असेल तर ती आपण कां करूं नये, अशा तऱ्हेचा युक्तिवाद या लोकांनीं आपल्या पक्षांतील 'जहाल' लोकांबरोबर केला, व तो त्यांना चांगला पटला. वसाहतींसंबंधानें त्यांच्यांत आतां वाद राहिला नाहीं. आपल्या प्रतिपक्षाबरोबर खांद्याला खांदा लावून ही राष्ट्रीय चळ-वळ यशस्वी करण्याच्या कामांत ते मनापासून मदत करूं लागले आहेत. त्यांचा मुख्य कटाक्ष एवढाच कीं, वसाहतींतील मूळ रहिवाशांबरोबर गोरे लोकांनीं ममतेनें वागलें पाहिजे, आणि त्यांची मानसिक व सांपत्तिक सुधारणा करण्याचे प्रयत्न त्यांनीं प्रामाणिकपणानें केले पाहिजेत. आम्हीं वर बलवत्तर म्हणून जें कारण सांगितलें त्याचा प्रभाव कसा आहे हें सोशियालिस्टांच्या उदाहरणावरून वाचकांच्या ध्यानांत आलें असेलच.

आपल्या शेजारच्या दोस्त राष्ट्रानें वसाहतींसंबंधांत जो उद्योग चाल-विला आहे, त्याबद्दल इंग्लंडनें कोणतें धोरण स्वीकारावें हें ठरविणें कठिण नाहीं. १८८५ सालीं इंग्लंडचा या कामांत जर्मनीशीं जेव्हां पहिला खटका उडाला, तेव्हांच हें धोरण काय असावें याचा मि. ग्लॅडस्टन यांनीं खुलासा केला आहे. असो. "माझी ढाल लटकावून ठेवण्याकरितां एखादा खिळा ठोकण्याची जगांत जेथें मला सोईची जागा सांपडेल तेथें खिळा ठोकण्याला मी यत्किंचितहि कमी करणार नाहीं." अशा प्रकारचे उद्गार एकदां जर्मनीच्या बादशहानें काढले होते ही गोष्ट जरी खरी असली तरी हें ध्यानांत घेतलें पाहिजे कीं, जो उद्योग इतर राष्ट्रांनीं शंभर-अधिक वर्षांपूर्वीं सुरू करून त्यांत यश संपादिलें, तो उद्योग जर्मनी अलीकडे पंचवीसतीस वर्षांत करूं लागला आहे. अर्थात् ढाल लटका-वण्याकरतां खिळे ठोकण्याच्या जेवढ्या सोईच्या जागा जगांत होत्या,

त्या इतर राष्ट्रें अगोदरच पटकावून बसलीं आहेत ! सर्व जग जर्मनमय झालें पाहिजे अशा वल्गना करणाऱ्या लोकांच्या बोलण्यांत जर कांहीं अर्थ असेल तर इतर राष्ट्रांनां त्यांतून भीतिप्रद अर्थ निघेल हें खरें; परंतु अशा वावदूकांचा जोंपर्यंत सर्व जर्मन राष्ट्रावर पगडा बसला नाहीं, तोंपर्यंत त्यांनीं भीति बाळगण्याचें विशेषसें कारण नाहीं. मित्रत्वाच्या नात्यानें जर्मनीला मदत करणें ज्यांनां आवडत नसेल त्यांनीं ती करूं नये; पण "तुमचें चाललें आहे तें ठीक आहे; आम्हांला त्यांत पडण्याचें कारण नाहीं," असें म्हणून तटस्थवृत्ति स्वीकारणें कांहीं गैर नाहीं. तटस्थ राष्ट्रांनीं हें ध्यानांत आणावें कीं, १८८१ सालीं फ्रान्सनें जेव्हां मोरोक्कोप्रकरण उपस्थित केलें, तेव्हां प्रिन्स बिस्मार्कनें अगदीं शांत वृत्ति स्वीकारली होती. अशी वृत्ति कां स्वीकारली आहे, असें जेव्हां त्याच्याजवळच्या लोकांनीं त्याला विचारलें, तेव्हां त्यानें उत्तर दिलें कीं, "वसाहतींच्या बाबतींत फ्रान्स जितकें लक्ष्य घालील, तितकें जर्मनीला पथ्यकरच आहे !" म्हणजे अशा कामांत इतर राष्ट्रांनीं तटस्थवृत्ति स्वीकारावी हें धोरण बिस्मार्कला देखील मान्य होतें असें स्पष्ट दिसतें.

---

* एका जर्मन ग्रंथकाराचें असें मत आहे कीं, व्होसजीसनजीकचा प्रांत; म्हणजे ऑल्सेस व लोरेन, पुनः मिळविण्याची फ्रान्सनें खटपट करूं नये, दुसरीकडे त्याचें लक्ष्य लागावें व गेलेल्या प्रांतापेक्षां अधिक प्रांत तिकडे मिळवावा, या हेतूनें आफ्रिकेंत वसाहती स्थापन करण्याचा प्रिन्स बिस्मार्कनें फ्रेंच मुत्सद्यांनां आपण होऊन सल्ला दिला. त्याप्रमाणें आफ्रिकेंत फ्रान्सनें नवीन प्रांत मिळविला परंतु ऑल्सेस, लोरेन प्रांतांवरील त्याची दृष्टि ढळली नाहीं. यामुळें बिस्माार्कचा बेत शेवटीं फसला; तथापि वरील उत्तर देण्यांत त्याचा मुख्य हेतु काय होता हें यावरून स्पष्ट होतें. मि. डॉसन यांनीं त्याचा अगदीं सरळ अर्थ केलेला दिसतो.

प्रकरण २० वें

# साम्राज्याचा खर्च

जहाल लोकसत्तावादी खेरीजकरून जर्मनींतील इतर सर्व राजकीय पक्षांतील लोकांची हल्लीं मोठी कठिण स्थिति झाली आहे; त्यांचें बोलणें आणि त्यांच्या हातून होणारी कृति यांत बराच गैरमेळ दिसूं लागला आहे. साम्राज्याचें जेणेंकरून हित होईल अशा तऱ्हेची राजनीति अंगीकारली पाहिजे याबद्दल त्यांचें एकमत आहे; तथापि या राजनीती-मुळें जो कांहीं खर्च होईल त्या खर्चाबद्दल मात्र ते कुरकूर करीत अस-तात. जास्ती कर बसविले पाहिजेत, त्याशिवाय तरणोपाय नाहीं, असें सर्व एकवाक्यतेनें म्हणतात; परंतु हे कर कशावर बसवावे याबद्दलच वाद घालतात. लष्करी खर्च वाढत गेल्यानें जे जास्ती कर बसले आहेत त्यांचा बोजा आजपर्यंत ते निमुटपणें सहन करीत आले आहेत. परदेशां-बरोबर जर्मनीची वागणूक बाणेदारपणाची असावी, असें त्यांनां मना-पासून वाटतें; पण या बाणेदारपणामुळें साम्राज्याला जास्ती पैसा खर्च करावा लागला, तर तो मात्र त्यांनां खपत नाहीं. कर देणारा प्रत्येक नागरिकच तेवढा अशी जिकीर घालतो असें नाहीं; तर साम्राज्यांत सामील झालेलीं व साम्राज्याला खर्चाची तूट आली तर ती आम्ही भरून काढूं असें वचन देणारीं कांहीं संस्थानें देखील साम्राज्याचा खर्च फार वाढत चालला आहे असा ओरडा करतात.

साम्राज्याची स्थापना झाल्यानंतर कांहीं वर्षे देशांत सर्वत्र शांतता होती, यामुळें त्या वेळेस लोकांची खर्चाबद्दल जी कल्पना होती तिच्या-पेक्षा हल्लीं तो किती तरी वाढला आहे; आणि आरंभीं जें थोड्या लाखांचें राष्ट्रीय कर्ज होतें तें आतां अनेक कोटींच्या पुढें गेलें आहे. साम्राज्य-स्थापनेनंतर कांहीं वर्षेपावेतों एक कोट पाऊणशें लक्ष पौंडांत त्याचा

सर्व खर्च भागत होता असें जर कोणी आतां सांगितलें, तर त्याच्या-वर सहसा कोणाचा विश्वास बसत नाहीं. या रकमेपैकीं $\frac{1}{4}$ ते $\frac{1}{3}$ पर्यं-तची रक्कम परदेशांतून येणाऱ्या मालावरील ( Custom ) व तंबाखूवरील जकातीपासून उत्पन्न होत होती; $\frac{1}{2}$ साखर, मीठ, बीर आणि स्पिरिट यांजवर देशांतल्या देशांत बसविलेल्या एक्साईज ( Excise ) जकाती-पासून, स्टांपापासून व सार्वभौम टपालखातें आणि रेल्वे यांत मिळणाऱ्या नफ्यापासून उत्पन्न होत होती; व पंचवीसपासून पस्तीस लाखांपर्यंतची रक्कम साम्राज्यान्तर्गत संस्थानांतून सार्वभौम सरकाराकडे येत होती. कांहीं वर्षांनीं पुढें खर्चाचें मान वाढूं लागलें, व १९०८ सालीं तें इतकें वाढलें कीं, त्या सालच्या बजेटांत खर्चाचा अंदाजी आंकडा बारा कोटी सोळा लक्ष पौंडांचा धरला होता. या सालाच्या पूर्वींच्या वीस वर्षांत लोकसंख्या शेंकडा तीस वाढली तर खर्च शेंकडा दोनशेंतीस वाढला !

लष्करी खात्याहून इतर म्हणजे सिव्हिलसर्व्हिसच्या निरनिराळ्या शाखांवर दिवसानुदिवस जास्ती खर्च होणें ही गोष्ट कोणच्याहि राज्यांत अपरिहार्य असते, आणि त्याप्रमाणें जर्मनींतहि हें खर्चाचें प्रमाण वाढलें असेल तर त्यांत नवल नाहीं. पण तेवढ्यानें खर्चाची रक्कम इतकी फुगणार नाहीं, त्याला अन्य कारणें असलीं पाहिजेत; व तीं कारणें म्हणजे सैन्य आणि लढाऊ आरमार हीं होत. वसाहतीचें राज्य स्थापन करण्या-च्या उद्योगाला आरंभ झाल्या दिवसापासून जर्मनींत या दोहोंवर वाजवी-पेक्षां जास्त पैसा खर्च होऊं लागला, व त्याचा परिणाम वर सांगितल्या-प्रमाणें झाला. १८८० सालीं, म्हणजे हा उद्योग सुरू होण्यापूर्वीं, सैन्य आणि आरमार दोन्हीहि मिळून फक्त २,३०,००,००० पौंड खर्च होत होते; १८०० सालीं ३,५०,००,००० पौंडांच्या आंतच खर्च झाला; परंतु १९०८ च्या बजेटांत हा खर्चाचा आंकडा ५,१०,००,०००

पौंडांपर्यंत येऊन ठेपलां*! सैन्य व आरमार या दोहोंतून आरमारावर त्यांतल्यात्यांत जास्त खर्च होत असतो. १९०० सालीं असें ठरलें होतें कीं, आरमार आहे तितकें आतां पुरें झालें, एक कोटी पौंडांपेक्षां जास्ती पैसे त्या सालाला या कामांत खर्च करावयाचे नाहींत, व त्याच्या पुढील सालांत तर अगदींच बेताचा खर्च करावयाचा. हा ठराव झाल्यानंतर पुढें आठच वर्षांनीं म्हणजे १९०८सालीं एक कोट पाउणशें लक्ष पौंड आरमाराकरितां खर्च करावे असें ठरलें. १९१७ सालापर्यंत होणाऱ्या खर्चाचा आठ सालीं जो अंदाज केला आहे, त्यावरून ही रक्कम त्या सालाच्या अखेरीस दोन कोटी पौंडांपर्यंत वाढेल असा रंग आहे. साम्राज्याच्या अवाढव्य खर्चाला प्रत्यक्ष व अप्रत्यक्षपणें वसाहती कारण आहेत. तीस वर्षांपूर्वींच्या बजेटांत वसाहतखातें मुळींच नव्हतें. परंतु तें जसें एकदां सुरू झालें, तशीं खर्चाचीं अनेक तोंडें नवीन उत्पन्न होऊं लागलीं. १९०८ सालीं वसाहतींचा खर्च बत्तीस लक्ष पन्नास हजार पौंड होईल असा अंदाज केला होता. यावरून हा खर्च किती जबर आहे याची वाचकांना कल्पना होईल.

साम्राज्याचा खर्च यापुढें आणखी असाच वाढत जाणार अशीं प्रस्तुत चिन्हें दिसत आहेत. १९०४ सालींच खाजिन्यावरील सेक्रेटरी बॅरन व्हॉन स्टेंजेल ( Baran Von Stengel ) यानें राइश्टॅगमध्यें बोलून दाखविलें कीं, " पुढचें लक्षण मला नीट दिसत नाहीं, हें मी सभासदांना उघडपणें सांगतों; आणि आतां ज्या मानानें आपण खर्च करीत आहों त्याच मानानें पुढें जर खर्च करीत चाललों तर मुळींच निभाव लागणार नाहीं, हें मी आपणांस अगदीं मोकळ्या मनानें सांगतों. " तीसपस्तीस वर्षांपूर्वीं राष्ट्राला मुळींच कर्ज नव्हतें. १८७६।७७ सालीं

* १९१३-१४ सालीं हा आंकडा ६,८७,५०,००० पौंडांपर्यंत गेला.
—डेली मेल, इयर बुक, १९१५.

कर्ज काढण्याला प्रथम सुरुवात झाली, तेव्हांपासून १९०८ सालापर्यंत राष्ट्रीय कर्ज वीस कोट पौंडांवर येऊन बसलें. या रकमेवर व्याजच किती जबर द्यावें लागत असेल याची वाचकांनीं कल्पना करावी. जर्मनीच्या फडणिसांनीं ( Fiuauce minister ) थोड्या वर्षांखालीं पुढें लिहिल्याप्रमाणें उद्गार काढले होते:—" कर्ज काढण्याच्या कामांत आपण सर्व राष्ट्रांच्या पुढें आहों ही मोठी दुर्दैवाची गोष्ट आहे; फ्रान्स आणि इंग्लंड हे दोन देश देखील आपल्यामागें आहेत. ज्या काळांत फ्रान्सनें जास्ती राष्ट्रीय कर्ज काढलें नाहीं, त्या काळांत आमचें कर्ज दसपट अधिक वाढलें. या कर्जबाजारीपणामुळें राजकीय व सांपत्तिक दृष्ट्या जर्मनीची जगांत नाचक्की झाल्याशिवाय राहणार नाहीं." जर्मनींत राष्ट्राचें कर्ज दरमाणसीं तीन पौंड चार शिलिंग आहे.

याशिवाय संस्थानांना ज्यांचें त्यांचें निराळें कर्ज आहेच. परंतु या कर्जासंबंधानें विशेष लक्ष्यांत ठेवण्याजोगी गोष्ट ही आहे कीं, हें कर्ज ज्या संस्थानांना आहे तें त्यांनीं कांहीं उपयुक्त कामाकरितां काढलेलें आहे. या कामापासून इतका फायदा होतो कीं, त्यापुढें कर्जाचें ओझें त्यांना अगदीं हलकें वाटतें. उदाहरणार्थ, संस्थानांतील आगगाड्या, व खाणी यांची आजला जर किंमत केली, तर ती त्याकरतां काढलेल्या कर्जाच्या रकमेपेक्षां किती तरी जास्त आहे. साम्राज्याचें आणि संस्थानांचें मिळून जें कर्ज आहे त्यापैकीं निम्में रेल्वेकरितां काढलेलें आहे, आणि रेल्वेचा जो फायदा उरेल त्यांतून कर्जाची फेड करण्याची व्यवस्था केली आहे.

वीसपंचवीस वर्षांपूर्वी जें राष्ट्रीय कर्ज होतें तें हल्लीं फार वाढलें आहे.

---

1. In 1895 the total debt of GERMANY and PRUSSIA was $605\frac{3}{4}$ Millions Sterling. In 1913, it had incrleased to, 1080 Millions Sterling—Daily mail, Year Book 1915.

यावरून साम्राज्याचें दिवाळें वाजण्याची वेळ नजीक आली आहे, असें जर कोणी म्हणेल तर तें चूक आहे. खरी गोष्ट एवढीच आहे कीं, आपल्याला खर्च किती येईल याचा पुरता अंदाज अगोदर न करतां साम्राज्य-सरकारनें परदेशांत मोठीं व जबाबदारीचीं कामें आपल्या अंगावर घेतलीं; व त्या कामाकरतां कल्पनेपेक्षां जेव्हां जास्ती खर्च येऊं लागला तेव्हां सरकार बरेंच गोंधळून गेलें. सरकारची जेव्हां अशी स्थिति झाली तेव्हां लोकांनींहि गिल्ला करण्यास सुरुवात केली; व राष्ट्राचें आतां दिवाळें निघणार असें कांहीं विचारशून्य लोक बरळूं लागले. आतां हें खरें कीं, अगोदर जितकी काळजी घ्यावयाला पाहिजे होती तितकी घेतली असती तर दर वर्षीच्या बजेटांत जी तूट येती ती येतीना. पण तेवढ्यावरून जर्मनीची स्थिति पैशाच्या बाजूनें अगदीं डबघाईस आली आहे, असें म्हणणें मुळींच शोभत नाहीं. याचें मुख्य कारण असें आहे कीं, साम्राज्यान्तर्गत जीं अनेक संस्थानें आहेत तीं गबर आहेत, आणि त्यांच्या जीवावर साम्राज्याच्या पतीला किंवा स्थैर्याला काडीइतका देखील बाध येणार नाहीं. कांहीं संस्थानें तर कर्जबाजारी आहेत, असा कोणी यावर आक्षेप घेईल, तर त्याला एवढेंच उत्तर आहे कीं, तुम्ही कर्जाची रक्कमच तेवढी पाहूं नका; तर या कर्जाच्या साहाय्यानें संस्थानांनीं आपल्याजवळ किती ऐवज (अवाढव्य व प्रचंड कारखान्यांच्या रूपानें) सांठवून ठेवला आहे तो पहा. पैशाच्या टंचाईमुळें साम्राज्याला जी नेहमीं अडचण पडते तिचें मुख्य कारण हें आहे कीं, जरूरीपेक्षां जास्त पैसा त्यांच्या वांट्याला कधींहि येत नाहीं. त्याच्या उत्पन्नाच्या बाबी वेळोवेळ वाढविण्यांत आल्या आहेत हें जरी खरें आहे, तरी त्या वाढवितांना जेवढी गरज उत्पन्न झाली असेल तेवढी भागली म्हणजे झालें, अशा प्रकारचा कंजूषपणा संस्थानांकडून दाखविण्यांत येतो; व आपण ठरवून दिलेल्या पैशापेक्षां जास्ती पैसा साम्राज्याकडे खर्च होतो किंवा

काय, इकडे डोळ्यांत तेल घालून तीं पहात बसलेलीं असतात.

साम्राज्याचीं उत्पन्नाचीं स्वतंत्र खातीं पुढें लिहिल्याप्रमाणें आहेत. सार्वभौम रेल्वे, पोष्ट, तारखातें, कस्टम्स आणि एक्साईज जकाती, स्टांप आणि इतर किरकोळ बाबी. जकातींचें उत्पन्न ठरीव रकमेच्या वर झालें तर तें निरनिराळ्या संस्थानांनां त्यांच्या लोकसंख्येच्या प्रमाणानें वांटून द्यावें लागतें. आणि खर्चाची तूट आली म्हणजे जरूर ती रक्कम मिळविण्याकरतां साम्राज्यसरकाराला आपल्या संस्थानांतून झोळी फिरवावी लागते.

साम्राज्याच्या उत्पन्नाचा मुख्य भर पहिल्यापासून परदेशच्या मालावरील जकातीवर होता; यामुळें व शिवाय देशी धंद्यांचें संरक्षण करण्याच्या हेतूनें या जकाती वरचेवर वाढविल्या जात आहेत. छत्तीस वर्षांपूर्वीच्या उत्पन्नापेक्षां हल्लीचें हें उत्पन्न सहापटीनें वाढलें आहे. १९०६ सालीं जकातींचें एकंदर उत्पन्न ६६७,७६०,००० मार्क्स (२०.४ मार्क्स = १ पौंड) होतें. या जकाती आरंभीं जेव्हां सुरू केल्या तेव्हां त्यांत संरक्षणाचा हेतु नव्हता; साम्राज्याच्या खर्चाकरतां सर्वस्वीं संस्थानांच्या तोंडाकडे पहावें लागूं नये, व शिवाय लोकांनांहि प्रत्यक्ष (Direct) कर द्यावा लागूं नये, हा दुहेरी हेतु लक्ष्यांत धरून प्रिन्स बिस्मार्कनें ही युक्ति योजिली होती.

दुसरी उत्पन्नाची मुख्य बाब म्हणजे देशांतल्या देशांत ठेवलेल्या जकाती. या जकाती सुद्धां वेळोवेळ बऱ्याच वाढविण्यांत आल्या आहेत. १८७२ सालीं हें उत्पन्न बत्तीस लक्ष पन्नास हजार पौंड होतें. पुढें लोकसंख्या जशी वाढत गेली आणि खाण्याच्या पदार्थांचा जास्त खप होत चालला तसें हें उत्पन्नहि वाढूं लागलें. आजला हें उत्पन्न दोन कोट पौंडांचें आहे.

साम्राज्याच्या जमाबंदीला व्यवस्थित स्वरूप देण्याचा प्रयत्न १९००

सार्ची झाला होता, व त्या वेळेस वसुलाच्या अनेक नवीन बाबी निर्माण झाल्या; परंतु आरमारावर जास्त खर्च होऊं लागल्यानें हें नवीन उत्पन्न देखील कमी पडूं लागलें. यावरून असें स्पष्ट दिसतें कीं, साम्राज्याचा खर्च हल्लीं वाढत आहे तसाच जर वाढत राहिला तर जमाबंदीची कांहीं तरी कायमची व्यवस्था केली पाहिजे; तात्पुरते उपाय कितीहि योजले तरी निभाव लागावयाचा नाहीं.

प्रजेवर बसविण्याचे कर प्रत्यक्ष ( Direct ) असावे किंवा अप्रत्यक्ष ( Indirect ) असावे हा वाद साम्राज्य स्थापन झालें तेव्हांपासून सुरू आहे; परंतु दरवर्षीं साम्राज्याला पैशाचा तुटवडा पडूं लागल्यानें प्रस्तुत या विषयाला बरेंच तीव्र स्वरूप आलें आहे. कन्सरवेटिव पक्षाचे लोक म्हणतात कीं, खर्चाची अडचण दूर करण्याकरतां तुम्ही जकाती पाहिजे तर जास्त ठेवा, परंतु लोकांवर प्रत्यक्ष कर बसवूं नका; रॅडिकल्स आणि सोशल डेमोक्रॅट्स वगैरे जे लोक आहेत ते म्हणतात, संरक्षक जकाती बसविण्यापेक्षां जेणेंकरून सर्वांवर खर्चाचें ओझें सारखें पडेल असा एखादा प्रत्यक्ष कर बसविणें अधिक सोईचें होईल. त्यांच्या मतानें सार्वभौम प्राप्तीचा कर ( Imperial Income-tax ) बसविला असतां इष्ट कार्य घडून येईल. या वादांत खुद्द सरकारचें मन कन्सरवेटिव पक्षाच्या बाजूनें आहे. अमेरिकेंतील संयुक्त संस्थानांत व स्वित्झर्लंड देशांत अप्रत्यक्ष कर बसविण्याची पद्धत अनेक वर्षे चालू आहे; व ज्या अर्थीं ती हितकारक आहे असें अनुभवान्तीं ठरलें आहे, त्या अर्थीं जर्मन साम्राज्यानेंहि तोच मार्ग स्वीकारला पाहिजे व प्रत्यक्ष कर बसविण्याच्या भानगडींत पडूं नये, असें सरकार म्हणतें. ट्रेझरीच्या सेक्रेटरीनें एका प्रसंगीं असें बोलून दाखविलें कीं, " साम्राज्यांतील सर्व संस्थानांचें मतहि असेंच आहे. प्रत्यक्ष कर बसविण्याचा जर आम्हीं विचार केला, तर तो हाणून पाडल्यावांचून तीं रहाणार नाहींत. राज्य-

व्यवस्थेच्या नियमाप्रमाणें अप्रत्यक्ष कर बसविण्याचा साम्राज्याला जो अधिकार दिला आहे, त्या अधिकाराच्या मर्यादेंतच साम्राज्याची जमाबंदी सुधारण्याचे यत्न झाले पाहिजेत." आणखी एका मुत्सद्द्यानें याच मताचा अनुवाद पुढील शब्दांनीं केला आहे:—"प्रत्यक्ष सार्वभौम कर बसविण्याला फेडरल कौन्सिल, कसाहि प्रसंग पडला तरी, संमति देणार नाहीं. अशा तऱ्हेचे प्रत्यक्ष कर बसविण्यास सुरुवात झाली म्हणजे साम्राज्याची घटना ज्या नियमांनीं झाली आहे ते नियम अमलांत आणणें अशक्य होईल."

साम्राज्याच्या घटनेसंबंधाचे जे नियम आहेत त्यांपैकीं सत्तरावें आर्टिकल आपण पाहिलें असतां प्रत्यक्ष कर बसविण्याला नियमांचा बाध येतो असें आम्हांला वाटत नाहीं. खुद्द प्रिन्स बिस्मार्कचेंहि असेंच मत होतें, असें राइशटॅगमधील त्याच्या एका भाषणावरून सिद्ध होतें. असें असून त्यानें प्रत्यक्ष कराऐवजीं अप्रत्यक्ष करच कां बसविले, याचें कारण असें आहे कीं, अप्रत्यक्ष कराचा बोजा लोकांवर एकदम पडत नाहीं, हप्त्याहप्त्यांनीं ते कर द्यावे लागत असल्यानें लोक ते सहज देऊं शकतात, असें त्याचें मत होतें, आणि तें अक्षरशः खरेंहि आहे. प्रत्यक्ष कर बसविण्याला नियमांचा बाध येतो किंवा नाहीं, या वादांत आपल्याला पडण्याचें कारण नाहीं; जर्मनींत वास्तविक प्रकार काय आहे तो आपण पाहिला म्हणजे झालें. आणि तो प्रकार अनेक वर्षें अबाधितपणें असा चालला आहे कीं, साम्राज्याच्या खर्चाकरतां अप्रत्यक्ष कर सार्वभौम सरकारनें बसवावे आणि निरनिराळ्या संस्थानांनीं प्रत्यक्ष कर बसवून त्या कराच्या उत्पन्नांतून साम्राज्याच्या जमाबंदीला मदत करावी.

रॅडिकल पक्षाचे लोक म्हणतात कीं, सार्वभौम इन्कम-टॅक्स बसविणें सध्यांच्या स्थितींत अनुचित आहे. संस्थानांतील प्रजेला संस्थानाच्या उपयोगाकरतां एक व ते ज्या गांवांत किंवा शहरांत राहत असतील त्या

ठिकाणाच्या उपयोगाकरतां दुसरा, असे दोन इन्कम-टॅक्स अगोदरच द्यावे लागतात. त्यांत आणखी तिसऱ्या त्याच स्वरूपाच्या कराचा बोजा त्यांच्यावर लादला तर तो त्यांना असह्य झाल्यावांचून राहणार नाहीं. निरनिराळ्या संस्थानांत प्राप्तीवरचा कर हीच उत्पन्नाची मुख्य बाब आहे, आणि त्या कराच्या उत्पन्नावर त्यांचा बराच खर्च भागतो. अशा स्थितींत सार्वभौम इन्कम-टॅक्सचा बोजा आणखी जर त्यांच्यावर टाकला, तर त्यांच्या स्वतःच्या उत्पन्नांत फार घोटाळा होईल आणि तसा घोटाळा झाला म्हणजे साम्राज्यसरकारचें गाडें तरी कसें सुरळीत चालेल? एतावता, दुसऱ्या वाटेल त्या स्वरूपाचा कर बसविण्याला राइश्टॅग आपली संमति देईल; परंतु प्राप्तीवरील कर बसविण्याला, निदान आणखी कांहीं वर्षें तरी, ती सभा संमति देणार नाहीं, हें उघड दिसत आहे. परंतु एवढ्यावरून हा कर लोकांच्या बोकांडीं केव्हांच बसणार नाहीं अशी मात्र कोणीं खात्री बाळगूं नये. संरक्षित व्यापाराचे जागीं अप्रतिबद्ध व्यापाराचें तत्त्व सुरू होऊन हल्लींच्या जकातपट्ट्या हलक्या झाल्या व कस्टमखात्याचा वसूल कमी होत चालला म्हणजे हा कर बसलाच म्हणून समजावें. या जकातपट्ट्या हलक्या होऊं शकतील किंवा नाहीं याचा विचार आपण करूं लागलों म्हणजे असें दिसतें कीं, शेतीचें आणि उद्योगधंद्यांचें संरक्षण करण्याचा हेतु आपण जरी घटकाभर बाजूला ठेवला, तरी आज बरींच वर्षें जकातीच्या रूपानें अप्रत्यक्ष कर घेण्याची जी वहिवाट चालू आहे, ती एकदम मोडणें कठिण जाईल. आणि साम्राज्याचा खर्च भागण्यापुरतें जकातीचें उत्पन्न भरपूर पदरांत पडेल अशी व्यवस्था तर ठेवली पाहिजे. व ही व्यवस्था ठेवावयाची म्हणजे हल्लींचा जकातपट हलका करून कसें चालेल? सारांश, प्राप्तीवरील कर बसण्याचे दिवस अजून बरेच दूर आहेत. आतां ते किती दूर आहेत हें मात्र अनिश्चित आहे.

प्रकरण २१ वें

# साम्राज्याला अनुकूल व प्रतिकूल परिस्थिति

(Centripetal and centrifugul Influences).

१८७१ सालीं स्थापन केलेलें साम्राज्य चिरस्थायी होईल किंवा नाहीं, यासंबंधानें जर्मनींतील राजकीय पक्षांत आणि विशेषेंकरून उत्तर जर्मनींत आणि बर्लिन राजधानींत नेहमीं वादविवाद चालू असतो. सार्वभौम सरकार (म्हणजे बादशहा, चॅन्सेलर आणि त्याचे स्टेट सेक्रेटरीज्) आणि राइश्टॅगमधील उलटपक्षाचे लोक यांच्यामध्यें विशेष बांकाबांकी सुरू झाली असतां या जुन्यापुराण्या वादाला विशेष जोर येतो, हें सांगितलें म्हणजे, अशा प्रसंगीं वक्त्यांच्या भाषणांत साम्राज्यासंबंधानें जे निरानिराळे तर्कवितर्क लढविलेले दिसतात त्यांनां किती किंमत द्यावयाची हें चांगलें लक्ष्यांत येईल. वस्तुतः जर्मनींतील एकाहि मनुष्याला साम्राज्य नाहींसें होईल किंवा त्यांत आपल्याला कांहीं बिघाड करतां येईल, असें मनापासून खरें वाटत नाहीं. १८७१ सालापूर्वीं जी स्थिति होती त्या स्थितींत पुनः जाणें जर शक्य असतें, तर हजारों जर्मन त्या गोष्टीला कबूल होतील हें कदाचित् खरें असेल; परंतु या गोष्टीला जीं कारणें देण्यांत येतात, तीं राजकारणचतुर पुरुषांनां मान्य होण्याजोगीं नाहींत. विशेषेंकरून राष्ट्रांतील एका विशिष्ट वर्गाच्या लोकांच्या मनांत साम्राज्याविषयीं आतांपर्यंत केव्हांहि प्रेम उत्पन्न झालें नाहीं. १८४८ त फ्रान्समध्यें जेव्हां राज्यक्रांति झाली, तेव्हां संयुक्त जर्मनी निर्माण करून लोकसत्ताक राज्य स्थापन करण्याचा कांहीं 'बेजबाबदार' लोकांनीं यत्न केला असतां, प्रशियांतील जमीनदार सरदारांनीं हा यत्न सिद्धीस जाऊं दिला नाहीं. पुढें १८७१ सालीं साम्राज्य स्थापन झालें, तेव्हां आतां तें कबूल करणें भागच आहे असें म्हणून प्रशियांतील कन्सर-

वेटिव जमीनदारांनीं तें कबूल केलें; परंतु त्यांच्या मनांत त्याविषयीं केव्हां-हि प्रेम उत्पन्न झालें नाहीं, किंवा त्यासंबंधानें त्यांनीं केव्हांहि काळजी वाहिली नाहीं; आणि हें साम्राज्य देशाच्या सुरक्षितपणाला धक्का न लावतां जर आज मोडतां आलें, तर त्या कामाला हातभार लावण्याला ही मंडळी कमी करणार नाहींत. खुद्द बादशहा पहिला वुइल्यम याला "जर्मनीचा बादशहा" म्हणवून घेण्याऐवजीं होहेन् झोलर्न राजघराण्याचा मुख्य म्हणवून घेण्यांत विशेष अभिमान व आपलेपणा वाटत असे. कारण, बादशहा या पदवीबरोबर साम्राज्यांतील सर्व मुलखांचें स्वामित्व त्याचेकडे आलें नाहीं. प्रिन्स बिस्मार्क आपल्या 'रिकलेक्शन्स' (Recollections) मध्यें म्हणतो: "जर्मनींतील अन्य संस्थानें आणि राजघराणीं यांच्या एकमेकांपासून विभक्त राहण्याच्या भावनेशीं (Particularisim)मला जितकें झगडावें लागलें त्याच्यापेक्षां जास्त प्रशियाच्या या भावनेशीं झगडावें लागलें; आणि बादशहा पहिला वुइल्यम याच्याशीं माझें प्रजेचें नातें पडल्यानें या कामांत मला प्रसंगविशेषीं अतिशय त्रास पडत असे." स्वतः-च्या राजघराण्याविषयीं बादशहाच्या मनांत ओतप्रोत अभिमान भरला होता, व सर्व जर्मन राष्ट्राच्या सुधारणेचा प्रश्न निघाला म्हणजे हा अभिमान एखादे वेळीं चांगला आड येत असे. परंतु जर्मन राष्ट्राचें हित तेंच आपल्या राज्याचें, म्हणजे प्रशियाचेंहि हित होय, हें त्याच्या चटकन् ध्यानांत येई, आणि त्यामुळें स्वतःचा अभिमान गुंडाळून ठेवून तो महत्त्वाचीं राष्ट्रकार्यें साधण्यास आपल्याला हरएक प्रकारें उत्तेजन देत असे, असेंहि बिस्मार्कनें सदर लेखांत ग्रथित केलें आहे.

तथापि एल्ब नदीच्या पूर्व भागांतील बड्या जमीनदारांच्या मनांत साम्राज्याविषयींची निष्ठा जरा डळमळीत आहे याचें कारण, राजघराण्याचा अभिमान एवढेंच नाहीं, तर साम्राज्याची घटना उदार तत्त्वांवर झाली असल्यानें आपलें महत्त्व कमी झालें आहे असें त्यांना वाटतें.

यामुळें या घटनेअन्वयें आपल्या तर्फे राइश्टॅगमध्यें सभासद निवडून देण्याचा लोकांनां जो अधिकार दिला आहे तो संकुचित करावा, त्याचप्रमाणें निरनिराळ्या पक्षांतील लोकांच्या हातांत जी सत्ता आहे ती कमी करावी, असें हे लोक उघड प्रतिपादन करीत असतात. निरनिराळे पक्ष एकत्र होऊन संयुक्त सरकाराबरोबर भांडूं लागले म्हणजे त्यांचें म्हणणें सरकारला ऐकावें लागतें. ही स्थिति चांगली नाहीं व ती सुधारण्याला ते वरील दोन मार्ग सुचवितात.

जर्मन राष्ट्रांतील सर्व लोकांनां, मग ते कोणच्याहि राजपक्षाचे असोत, केव्हां केव्हां स्वत:विषयीं अविश्वास वाटतो व एक प्रकारचा घाबरटपणा त्यांच्यांत दिसतो हें खरें; पण या गोष्टीला विशेष महत्त्व देणें चुकीचें आहे. साम्राज्य आतां दृढमूल झालें आहे व त्याला कशाचीहि भीति नाहीं. देशांतल्या देशांत त्याच्यावर कोणतेंहि संकट येऊं शकणार नाहीं. परचक्राचा त्याच्यावर घाला आला तर तो परतविण्याचें सामर्थ्य लोकांच्या अंगांत आहे. जर्मनी या गोष्टी मनांत जाणून आहे; परंतु केव्हां केव्हां त्याला त्यांचें विस्मरण होतें, आणि वास्तविक कोणचाहि रोग नसतां आपल्याला कांहीं तरी रोग जडला आहे असें मानणारा माणूस जसा व्यर्थ घाबरून जातो, तसा जर्मनी विनाकारण घाबरतो, आणि त्यामुळें जर्मन लोकांचें राष्ट्रीय तेज आणि करारीपणा हे दोन गुण जितके उठावदार दिसावे तितके दिसत नाहींत. तथापि हा निराशावाद गेलीं कांहीं वर्षे जरी चालू आहे, तरी हल्लींची व्यवस्था मोडून टाका आणि फ्रेंचाबरोबर युद्ध होण्यापूर्वी राज्यांत जो घोटाळा होता तो सुरू करून एकीच्या ऐवजीं बेकी होऊं द्या, असें धडधडीत प्रतिपादन करणारा एकहि मनुष्य जर्मनींत आढळून येत नाहीं.

जर्मन राष्ट्रांत उत्तम प्रकारचें स्थैर्य आणि एकोपा आहे, हें वाचकांचे मनावर ठसविणें फार इष्ट आहे. कारण, तसें केलें म्ह-

णजे यांशीं सकृद्दर्शनीं विसंगत वाटणारी एक विशेष गोष्ट सांगण्याचा आमचा मार्ग आम्हांला खुला होईल. कारण, जर्मनींतील प्रत्येक मनुष्याला मी सम्राटाचा अभिमानी (Imperialist) आहे असें जरी वाटतें व त्याप्रमाणें राजकीय व्यवहारांत जरी तो वागतो, तरी तीसचाळीस वर्षांपूर्वीं व्हरसेलिस येथें साम्राज्यस्थापनेचा जाहिरनामा ज्या वेळीं प्रसिद्ध केला, त्या वेळीं त्याच्या मनांत जो उत्साह दिसत होता, तो हल्लीं दिसत नाहीं, असें म्हटलें तर तें चूक होणार नाहीं. फ्रेंचांबरोबर केलेल्या युद्धांत सर्व संस्थानें एकदिलानें खांद्याला खांदा भिडवून शत्रूंशीं लढलीं आणि विजय पावलीं; व त्यामुळें राजकीय व्यवहारांत देखील त्यांच्यामध्यें अशा प्रकारचें ऐक्य स्थापन करावें असा विचार प्रिन्स बिस्मार्कच्या मनांत यावयाला आणि त्याप्रमाणें साम्राज्याची स्थापना करण्याला अनुकूल परिस्थिति उत्पन्न होण्याला एकच गांठ पडली. त्या परिस्थितीचा आपल्या नेहमींच्या धूर्तांव्यानें बिस्मार्कनें चांगला उपयोग करून घेतला आणि रणांगणावरील यशाचा विजयध्वज त्यानें साम्राज्यस्थापनेच्या रूपानें उभारला. युद्धकालीं जसे आम्ही एक तसेच शांततेच्या काळांतहि एक, हें जगाच्या निदर्शनास आणून देण्याचा अभिमानाचा दिवस जर्मनांना उगवला, व जर्मन जातीच्या आकांक्षा पूर्वीं ज्या कधीं एकवटल्या नव्हत्या त्या या प्रसंगानें एकरूप झाल्या. देशाभिमानाचा पारा त्या वेळेस बराच वर चढला. परंतु पुढें तो खालीं उतरत चालला. साम्राज्यासंबंधींची उच्च कल्पना नाहींशी होऊन तिच्या जागीं त्याचा खरा उपयोग तेवढा करून घेण्याची कल्पना सध्यां येऊन बसली आहे. साम्राज्य हवें असें जसें पूर्वीं वाटत होतें तसें अजूनहि वाटतें; परंतु तें कशाकरतां, तर त्याचा व्यवहारांत उपयोग करून घेतां यावा म्हणूनच; आणि त्याचा व्यवहारांत उपयोग म्हणजे हा कीं, राष्ट्राराष्ट्रांतील राजकीय प्रकरणांत जर्मनीला आपलें एकवटलेलें तेज दाखवितां यावें आणि लहान संयुक्त

संस्थानें जीं आहेत त्यांचा कारभार मोठ्या संस्थानांच्या बरोबरीनें सुरळीतपणानें चालावा.

यांपैकीं पहिला हेतु स्पष्ट आणि न्याय्य आहे; परंतु दुसरा हेतु तितका स्पष्ट नाहीं. जर्मन म्हटले कीं येथून तेथून एका रक्ताचे. कांहीं जर्मनांचा जो शत्रु तो सर्व जातीचा शत्रु, ही भावना विशेष जागृत होऊन सर्व संस्थानांचें मिळून एक साम्राज्य उत्पन्न होण्यापूर्वीं निरनिराळ्या राज्यांची व संस्थानांची स्थिति कशी होती याचें ज्यांना स्मरण आहे, त्यांच्याच ध्यानांत विशेषेंकरून हा दुसरा हेतु स्पष्टपणानें येईल, इतरांच्या येणार नाहीं. साम्राज्यघटनेच्या नियमाअन्वयें साम्राज्याकरतां कायदे करणाऱ्या व त्या कायद्यांचा अम्मल करणाऱ्या नवीन संस्था निर्माण झाल्या व त्यायोगानें या संस्थानांना आपल्या हातचा बराच अधिकार गमवावा लागला. परंतु त्यामुळेंच तीं पहिल्यापेक्षां अधिक सामर्थ्यवान् झालीं आहेत. हें आमचें म्हणणें विपरीतपणाचें वाटेल; परंतु त्यांत विपरीतपणा नाहीं, असें विचारान्तीं कोणालाहि समजून येईल, आणि तें कसें येईल तें पहा: या व्यवस्थेनें प्रत्येक संस्थानाला पूर्ण स्वातंत्र्य प्राप्त झालें आहे व तें पुढें असेंच अबाधित राहील; संस्थानांतील राजांचे विशिष्ट हक्क कायम झाले आहेत; आणि स्वतःच्या सामर्थ्यावर अवलंबून इतरांपासून विलग राहणाऱ्या राजांच्या राज्यांतून अल्पसत्ताक राज्यपद्धति प्रसंगविशेषीं जी नामशेष झाली असती ती आतां कमीअधिक प्रमाणानें तशीच वास्तव्य करीत राहील. एकसत्ताक राज्यपद्धति—या शब्दाचा विस्तृत अर्थ असा कीं, वंशपरंपरागत प्राप्त झालेल्या राज्याचा अधिकार एका व्यक्तीच्या हातांत देण्याची पद्धति—पूर्वीच्या इतिहासांत जितक्या बळकट पायावर रचलेली होती तितक्या बळकट पायावर तरी निदान आजला ती जर्मनींत रचलेली आहे, याविषयीं कोणाला शंका येणार नाहीं; सोशल डेमोक्रॅटिक पक्षाचे म्हणजे

लोकसत्तावादी लोक प्रजासत्ताक राज्यपद्धतीचीं तत्त्वें या राज्यांतील लोकांनां वाटेल तितकी समजावून देवोत, त्यापासून त्यांची राज्यनिष्ठा केसभर देखील ढळण्याची भीति नाहीं. प्रिन्स बिस्मार्कनें आपल्या "रिकलेक्शन्स-"मध्यें वरील मताला पुष्टी देणारे उद्गार काढले आहेत. त्याच्या मताप्रमाणें देखील नवीन राज्यव्यवस्थेनें एकट्या प्रशियांतच नव्हे, तर इतर लहानलहान राज्यांतील व संस्थानांतील राजांच्या हातांत अधिक सत्ता आली आहे. कांहीं संस्थानांतील राजांच्या लोकप्रियतेमुळें या सत्तेचें अधिक दृढीकरण झालें आहे. दुसऱ्या कित्येक संस्थानांत राजकीय बाबतींतील प्रगमनशील कल्पनांच्या अनुरोधानें प्रजेला विचारान्तीं कांहीं सवलती देण्यांत आल्या आहेत व त्यायोगें राजसत्ता विशेष दृढ झाली आहे. सारांश, एकसत्ताक राज्यपद्धतीचीं मूळें लोकांच्या आपआपल्या राजाविषयींच्या श्रद्धारूपी सुपीक भूमींत खोल जाऊन शिरलीं आहेत.

१८२८ सालीं गीटनें (Goethe) असें लिहिलें होतें कीं, "राज्यांत एक राजधानी केली म्हणजे जर्मनींत ऐक्य उत्पन्न होईल, असें जो माणूस म्हणतो तो चुकतो." १८७१ सालीं ज्या माणसाचें हें चुकीचें मत कायम होतें, त्याला विचारान्तीं असें दिसून येईल कीं, साम्राज्याची स्थापना होऊन एक राजधानी झाली, म्हणूनच संस्थानांसंस्थानांतील एकीच्या ऐवजीं भिन्नभाव जास्त बळकट झाला आहे. साम्राज्यस्थापनेला आपण संमति दिली तर हा भिन्नभाव नाहींसा होईल, अशी जी त्या वेळेस कांहीं संस्थानिकांनां भीति होती ती आतां निराधार ठरली आहे. साम्राज्याचें स्वास्थ्य आणि त्यामुळें त्याचे वाढत जाणारे बहुविध व्यवसाय यांमुळें स्वतःच्या कारभारांत जें कांहीं स्वातंत्र्य आपल्याला राहिलें, तें होतां होईल तितकें कायम राखण्याविषयीं संयुक्त संस्थानें फार काळजी घेत असतात; व त्याचा परिणाम असा झाला आहे कीं, हीं जीं

निरनिराळीं छोटीं संस्थानें आहेत, ज्यांना 'पितृभूमि' (Father-land) अशी जर्मनींत संज्ञा आहे, त्यांतील प्रजाजनांच्या मनांत आपल्या राजघराण्याविषयीं व पितृभूमीविषयीं विलक्षण प्रेम उत्पन्न झालें आहे.

जर्मन गृहस्थाच्या अंतःकरणांत वसत असलेलें राजघराण्याचें प्रेम जर नाहींसें केलें तर देशाभिमान हा गुण त्याच्यांत उत्पन्न होणारच नाहीं, असा प्रिन्स बिस्मार्कचा सिद्धान्त होता. तो म्हणतो:—"जर्मनाच्या पितृभूमीवरील प्रेमाला राजा आणि त्याच्यावर सांठविलेलें प्रेम यांचें अधिष्ठान अगदीं जरूर आहे. जर्मनीच्या राजघराण्यांतील मुख्य पुरुषांनां आज एकदम पदच्युत केलें अशी जर आपण कल्पना केली, तर युरोपच्या राज्यकारभारांत परस्पर राष्ट्रांत जे भानगडीचे प्रश्न नेहमीं उपस्थित होतात त्यांपासून जर्मन लोक अलिप्त राहतील; आपण जर्मन आहों एवढीच गोष्ट लक्ष्यांत घेऊन ते एकजुटीनें कोणचाहि राष्ट्रीय व्यवहार करणार नाहींत. राजा हा समाजांत श्रेष्ठ आहे, तो समाजाचा नियंता आहे, हें मनाचें बंधन एकदां नाहींसें झालें म्हणजे एकजुटीनें चालणाऱ्या इतर राष्ट्रांपुढें जर्मन लोकांचा मुळींच टिकाव लागणार नाहीं. इतर लोकांपेक्षां प्रशियांतील लोकांत राष्ट्रीय गुण अधिक आहेत, असें त्या देशाच्या इतिहासावरून स्पष्ट दिसतें; परंतु तेथील होहेनझोलर्न राजघराणें जर लुप्त झालें तर हे गुण असून नसून सारखेच होतील; व पूर्व-प्रशियांत व पश्चिम-प्रशियांत हल्लीं जो ऐक्यभाव आहे तो नाहींसा होईल! विशिष्ट राजघराण्यांचा उत्कट अभिमान व त्या घराण्यांच्या नांवाखालीं मोडणाऱ्या राष्ट्रांतील यच्चयावत लोकांच्या मनांत ऐक्य उत्पन्न करण्याच्या कामांत होणारा त्याचा उपयोग, या दोन गोष्टी जर्मन साम्राज्यासंबंधानें विशेष लक्ष्यांत घेतल्या पाहिजेत."

जर्मन लोकांनां त्यांच्या त्यांच्या प्रांतांवरून, म्हणजे उदाहरणार्थ, प्रशियन्स, साक्सन्स, बव्हेरियन्स, वुर्टेंबुर्गर्स, असें संबोधिलें म्हणजे

साम्राज्यस्थापनेच्या पूर्वी जसें बरें वाटत होतें तसें हल्लीं देखील वाटतें यांत शंका नाहीं, आणि साम्राज्याविषयीं जरी त्यांनां मनापासून अभिमान वाटतो, आणि वाटेल तसा प्रसंग आला तरी त्याला धक्का लागू द्यावयाचा नाहीं असा जरी त्यांचा दृढनिश्चय आहे, तरी आपल्या छोट्याशा पितृभूमीचें स्वातंत्र्य नष्ट करण्यापेक्षां साम्राज्य नष्ट झालें तरी चिंता नाहीं, असे म्हणणारे लोक मोठमोठ्या संस्थानांत तर आहेतच; पण लहान संस्थानांत देखील आहेत. संस्थानच्या हातांत जे अधिकार ठेवले आहेत त्यांपैकीं कांहीं कमी करावे असें म्हटलें म्हणजे यांचें पित्त खवळतें व इतरांपासून तुटक राहण्याची यांची मनोवृत्ति जास्तच उचंबळते. प्रशियन्स, बव्हेरियन्स, साक्सन्स, वुर्टेम्बुर्गर्स असा त्या त्या लोकांच्या मनांत जो पृथग्भाव आहे तो नाहींसा करून आपण जर्मन्स आहोंत, ही भावना त्यांच्या मनांत उत्पन्न करणें हेंच साम्राज्यांतलि मुत्सद्द्यापुढें सध्यां महत्त्वाचें काम आहे असें विचारान्तीं दिसतें, आणि तें काम सिद्धीस गेलें म्हणजे जर्मनी हें एक सबंध राष्ट्र आहे अशी जाणीव त्यांच्या मनांत उत्पन्न होईल; व त्यामुळें मनांतील प्रस्तुतचा डळमळीतपणा नाहींसा होऊन साम्राज्याविषयीं त्यांनां जास्त विश्वास वाटूं लागेल यांत संशय नाहीं.

जर्मनींत सार्वभौम सत्ता जी स्थापन झाली आहे, ती सर्वस्वीं अनियंत्रित नाहीं, लोकांनां तिच्यावर कांहीं अंशानें आपला ताबा चालवितां येतो, यामुळें तिचें स्वरूप बरेंच सौम्य झालें आहे. परंतु लोकमतानुरोधानें याहिपेक्षां अधिक सौम्य स्वरूप तिला देण्यांत आलें नाहीं, याबद्दल पुष्कळ लोकांची निराशा झालेली दिसते. राइश्टॅग ( पार्लमेंट—लोकनियुक्तांची सभा ) सभेवर कोणच्याच पक्षाचे लोक संतुष्ट नाहींत. याचा पुष्कळसा दोष कांहीं लोकांच्या मतानें खुद्द सभासदांकडेच येतो. हे सभासद शुष्क वादविवादांत व वायफळ टीका करण्यांत आपला वेळ

चालवितात, राष्ट्राच्या कल्याणाकडे त्यांचें फारसें लक्ष्य असत नाहीं, असा त्यांच्यासंबंधानें आक्षेप आहे, आणि तो बऱ्याच प्रमाणानें खरा आहे असें तिऱ्हाइत मनुष्याला देखील वाटण्याचा संभव आहे. परंतु यांत सर्वस्वीं त्यांचा दोष नाहीं. त्यांनां हातानें कांहीं कृति करून दाखवितां येत नाहीं, म्हणूनच ते शुष्क वाद घालीत बसतात. राइश्टॅगच्या व्यवस्थेचे जे नियम आहेत ते आपण पाहिले असतां असें दिसून येतें कीं, त्या सभेंत दोन तऱ्हेच्या राज्यपद्धतींचें मिश्रण करण्याचा प्रयत्न केला आहे. या दोन पद्धती म्हणजे जर्मन संस्थानांत चालू असलेली एकसत्ताक राज्यपद्धति आणि पश्चिमेकडील प्रतिनिधिनिक्षिप्त शासन-पद्धति. याप्रमाणें एकमेकांनां अगदीं विरुद्ध असणाऱ्या शासनपद्धतींचें मिश्रण केल्यानें राइश्टॅगला धड हें किंवा धड तें स्वरूप प्राप्त झालेलें नाहीं. वयांत आलेल्या प्रत्येक पुरुषाला (२१ वर्षें वयाच्या) त्या सभेंत सभासद निवडून देण्याचा अधिकार आहे, "फेडेरल कौन्सिल-"च्या (संयुक्त संस्थानांच्या प्रतिनिधींची परिषद, जिला 'बुण्डेसराट्' असें नांव आहे) तिच्या बरोबरीचा कायदेकानू करण्याचा या सभेला हक्क आहे, हें खरें; परंतु अम्मलबजावणी करणाऱ्या अधिकाऱ्यांवर, म्हणजे राजाच्या मंत्रिमंडळावर, तिचा ताबा मुळींच चालत नाहीं. आपले मंत्री कामावर नेमणें किंवा कामावरून दूर करणें हा अधिकार बादशहाच्या हातांत आहे, आणि आपल्या मर्जीप्रमाणें त्याचा तो उपयोग करतो. व्यक्तिश: किंवा संघशक्तीच्या जोरावर राजकीय पक्षांतील लोकांनां बादशहाच्या या अधिकाराविरुद्ध कांहीं सुद्धां हातपाय हालवितां येत नाहींत. याचा परिणाम असा होतो कीं, कायदेकानू करण्याचा अधिकार असणारे राइश्टॅगमधील सभासद निवडून देण्याची जबाबदारी जरी सर्व राष्ट्रावर आहे, तरी राज्यकारभार चालविण्याच्या कामांत राष्ट्राचा हात शिरकत नाहीं. सभेंतील वादविवाद मोकळेपणानें चालतो,

सरकारच्या कृत्यांवर भीडभीड न धरतां खरपूस टीका होते, आपल्या मर्जीप्रमाणें बिनहरकत मतें देतां येतात, या गोष्टी जशा व्हावयास पाहिजेत तशा होतात; पण त्या होऊनहि सभासदांनां राज्यकारभारांत जो परकेपणा वाटतो तो केव्हांहि दूर होत नाहीं.

कायदेकानू करण्याच्या अधिकाराची देखील समसमान वांटणी केलेली नाहीं. एखादा नवीन कायदा सभेपुढें आणण्याचा सभासदांनां हक्क दिलेला आहे. तसेंच सरकारतर्फे पुढें येणाऱ्या योजना हाणून पाडण्याचा किंवा त्यांत दुरुस्ती करण्याचाहि अधिकार त्यांनां आहे. त्याचप्रमाणें एखाद्या सभासदानें खाजगी बिल पुढें आणलें म्हणजे तें मान्य करण्याचा, फेटाळून लावण्याचा, किंवा ऐनजिनसीं नवें बिल सादर करण्याचा अधिकार सरकारलाहि* आहे. दोघांचा सारखेपणा दाखविणारा हा थाट उत्तम साधला आहे; परंतु व्यवहारांत मात्र तो उपयोगीं पडत नाहीं. सरकारनें पुढें आणलेलीं बिलें भराभर पास होतात; परंतु एखादें खाजगी बिल आलें म्हणजे तें मंजूर होईपर्यंत बिल आणणाऱ्या सभासदाच्या नाकीं नव येतात. शेवटीं फाजील चिकित्सेखोर राजमंत्र्यांपुढें तो इतका टेकीला येतो कीं, तें बिल हटकून नामंजूर करून घेण्यापेक्षां त्यांत करवेल तितकी छाटाछाटी करून पास करून घेण्यास तो बिचारा तयार होतो! सरकारतर्फे पुढें येणाऱ्या योजना हाणून पाडून सरकारचीं कायदे करण्याचीं यंत्रें बंद पाडण्याचा अधिकार राइश्टॅगला आहे. परंतु हा अधिकार बजावणें म्हणजे सरकारच्या कृत्याला उठल्या सुटल्या हरकत करीत बसलें पाहिजे. बरें, अशी हरकत करण्या-

* ब्रिटिश पार्लमेंटांत 'गव्हर्नमेंट' (Government) या शब्दाचा अर्थ अधिकारारूढ असणाऱ्या पक्षाचें प्रधानमंडळ (कॅबिनेट) असा आहे. जर्मनींत या शब्दाचा अर्थ संकुचित आहे व तो या प्रकरणाच्या आरंभीं दिला आहे. हा फरक वाचकांनीं लक्ष्यांत ठेवावा अशी त्यांस विनंति आहे.

पासून तादृश फायदा कांहींएक न होतां उलट मूर्खपणा मात्र पदरीं यावयाचा ! तेव्हां असा मूर्खपणा पदरांत घेऊन कांहीं कामच होऊं द्यावयाचें नाहीं, यापेक्षां सरकारच्या योजनेंत, करतां आले तर योग्य फेरफार करून, ती मान्य करण्याचा पडता मार्ग सभासद स्वीकारतात.

एखादा पक्ष अधिकारारूढ असावयाचा व त्याच्या हातांत सर्व राज्यकारभाराचीं सूत्रें द्यावयाचीं, हा प्रघात इंग्लंडप्रमाणें जर्मनींत चालू नाहीं हें एक प्रकारें इष्ट आहे, असें तेथील कांहीं लोकांचें मत आहे. त्यांची विचाराची दिशा अशी आहे कीं, जर्मनींतील मंत्रिमंडळांत पक्षाभिनिवेश नसतो आणि यामुळें ते जे कायदे पास करतात ते विशिष्ट वर्गाचें हित साधण्याकरतां केलेले नसतात, सर्व प्रजेचें जेणेंकरून हित होईल अशी राज्यव्यवस्था ठेवण्याकडे नेहमीं त्यांच्या मनाचा कल असतो. इंग्लंडसारख्या देशांतील मंत्रिमंडळाला इतका निःपक्षपाती-पणा राखतां येत नाहीं. परंतु हें म्हणणें चुकीचें आहे असें थोडासा विचार केला असतां कळण्याजोगें आहे. जर्मनींतील अधिकारीमंडळ पक्षाभिनिवेशापासून अलिप्त राहण्याची गोष्ट तर दूरच राहो; उलट प्रतिनिधींच्या सभेंत आपल्या बाजूचें मताधिक्य करून घेण्याकरतां, ज्या पक्षाचे लोक आपल्याला अनुकूल आहेत असें त्यांनां वाटतें, त्यांच्याशीं गट्टी करणें त्यांनां भागच पडतें. कारण, त्यांच्या बाजूचें जर मताधिक्य झालें नाहीं तर राज्यकारभाराचा गाडा कसा चालावा ? हा प्रकार संस्थानांतील लहानसहान सभांत (डाएटमध्यें) तेवढा चालतो असें नसून, प्रशियाच्या व साम्राज्याच्या बड्या सभेंत देखील चालतो. गेल्या तीसपस्तीस वर्षांच्या अवधींत, एकदोन प्रसंग खेरीज करून, प्रशियन लोअर हाउसमधील कन्सरवेटिव पक्षांतील लोकांच्या गळ्यांत गळा घालून सरकारी अधिकारी आपल्या बाजूचें मताधिक्य करून घेत होते. प्रिन्स बिस्मार्कनें देखील साम्राज्याच्या आरंभाला राइश्टॅग-

मधील एका पक्षाला हाताशीं धरलें होतें. कांहीं दिवसांनीं तो आपल्याला बधत नाहीं असें पाहिल्यावर त्याला सोडून देऊन दुसरा पक्ष त्यानें हातीं धरला. त्याच्या पश्चात् चॅन्सेलरच्या जागेवर येणाऱ्या मुत्सद्द्यांनींहि हाच मार्ग अनुसरला. या धरसोडीच्या प्रकाराचा निष्कर्ष असा निघतो कीं, जेथें राजकीय पक्षांतील लोकांवर जबाबदारी नांवाची असते, पण ज्या पक्षाचें सभेंत मताधिक्य असेल त्या पक्षाची पायधरणी मात्र मंत्रिमंडळाला करावी लागते, तेथें त्यांच्याबरोबर अधिकारीवर्गानें केलेलें सख्य जनतेच्या हिताकडे दृष्टि देऊन केलेलें नसतें, 'कामापुरता मामा' या म्हणीकडे दोघांचेंहि लक्ष्य असतें आणि त्यामुळें लोककल्याणाची बाजू दोघांच्याहि नजरेस नीटपणें येत नाहीं.

ज्या राज्यांत धड एकसत्ताक राज्यपद्धतिहि नाहीं, किंवा ब्रिटिश पार्लमेंटच्या धर्तीवर बहुसत्ताक राज्यपद्धतिहि नाहीं, त्या राज्यांत लोकांच्या मनांत सार्वजनिक हितबुद्धीची वाढ व्हावी तशी होत नाहीं, व राजकीय विचारांनां इष्ट असें वळण लागत नाहीं. आपल्या हातांत सत्ता नाहीं, हें निरनिराळ्या पक्षांतील लोक ओळखून असतात. शिवाय त्यांच्या शिरावरची जबाबदारीहि बेताबेताचीच असते. यामुळें निरर्थक वाद करण्यांत व एकमेकांशीं भांडत बसण्यांतच ते आपलें सारें सामर्थ्य खर्चतात. बरें, या वादविवादांत कांहीं तथ्य असतें असें म्हणावें तर तेंहि नाहीं. राइश्टॅगमधील सभासद राष्ट्रांतील वयांत आलेल्या सर्व माणसांकडून निवडलेले असतात; म्हणजे त्यांच्या पाठीशीं बहुजनसमाज असतो. ते वादविवादाच्या कामांत पटाईत असतात, व त्यांच्या वक्तृत्वाचा ओघ एकसारखा चालू असतो. परंतु त्यांचें निःसत्त्व वक्तृत्व जितकें निष्फळ होतें तितकें जगांतील इतर सुधारलेल्या देशांच्या कोणत्याहि प्रतिनिधिसभेंत होत नसेल असें म्हटलें, तर त्यांत अतिशयोक्तीचा दोष आमचेवर येईल असें वाटत नाहीं. टीका करण्यांत आपल्याला

कोणीहि हरकत करूं शकणार नाहीं, हें सभासदांना माहीत असल्यानं ते यथेच्छ टीका करीत असतात, व तसें करतांनां जगांतील नानाविध विषयांवर ते व्याख्यानें झोडतात. एका वर्षांतील यांचीं व्याख्यानें जुळवून जर पाहिलीं तर त्यांतून जगांतील अमुक एक विषय सुटला आहे असें कोणालाहि वाटणार नाहीं! परंतु ही पद्धति राज्यकारभाराच्या दृष्टीनें हितावह नाहीं व कायदे करण्याचें कामहि तिच्या योगानें पायाशुद्ध होत नाहीं. कारण, राज्यकारभारांत लोकमताचा फायदेशीर दाब जो असावा लागतो तो येथें असत नाहीं. लोकांच्या मागणीला दबून पसंत केलेल्या कायद्यांपेक्षां अशा सभेंत पास झालेले कायदे निरपेक्षबुद्धीनें व पूर्णविचारान्तीं पास होत असतील; तरी पण सत्तेला लोभावलेल्या अधिकाऱ्यांच्या डोक्यांतून त्यांचा उगम होत असल्यानें त्यांच्या कोत्या विचारांची त्यांत छटा उमटल्याशिवाय रहात नाहीं. हे अधिकारी आपलें काम प्रामाणिकपणानें व कर्तव्यनिष्ठेनें करतात, याविषयीं कोणाला शंका नाहीं. परंतु साधारण लोकांबरोबर यांचा व्यवहार बेताचाच असल्यानें त्यांच्यासमोर येणाऱ्या प्रश्नांचा उदार मनानें व समाजाच्या हिताकडे दूरवर दृष्टि देऊन विचार करण्याची पात्रता यांच्या अंगांत कमी असते. आणि सर्वांत वाईट गोष्ट जी आहे ती ही कीं, पार्लमेंटांसारख्या सभांवर कायदेकानू करण्याची जबाबदारी असण्याऐवजीं ती अधिकारीमंडळावर पडल्यानें असंतुष्ट झालेले प्रजाजन अधिकाऱ्यांवर व ज्या राज्यपद्धतीनें त्यांच्या हातांत फाजील सत्ता येते त्या राज्यपद्धतीवर दोषांचा आरोप करतात. एखाद्या राजकीय प्रकरणाचा झालेला निकाल इंग्लडांतील कांहीं माणसांनां आणि कांहीं पक्षांनां जर पसंत पडला नाहीं, तर तेथील राज्यपद्धतीला सहसा कोणी नांवें ठेवीत नाहीं. कारण, झालेली चूक दुरुस्त करण्याचें कमीअधिक सामर्थ्य आपल्या स्वतःच्याच अंगांत आहे हें ते जाणून असतात. असंतुष्ट झालेल्या जर्मन

नागरिकाला स्वतःच्या हिंमतीवर कोणचीहि गोष्ट करतां येत नाहीं, म्हणून तो प्रचलित राज्यपद्धतीच्या नांवानें सारखा खडे फोडीत राहतो.

राज्यव्यवस्थेच्या घटनेची सुधारणा करूं पाहणाऱ्या लोकांत प्रस्तुत जर्मनींत जो वाद चालला आहे तो कोणच्या स्वरूपाचा आहे, याचें येथें थोडक्यांत दिग्दर्शन करणें सोईचें होईल. ज्या तीन गोष्टींसंबंधानें वाद चालू आहे त्या ( १ ) निवडणुकींचा हक्क, ( २ ) सभासदांच्या जागांची फेरवांटणी, आणि (३) राजमंत्र्यांची जबाबदारी ह्या तीन होत. यांपैकीं पहिल्या गोष्टीचा संबंध ज्या संस्थानांतील सभांच्या निवडणुकींत अजून सुधारणा झाली नाहीं अशा सभांपुरता आहे आणि बाकीच्या दोन गोष्टींचा सार्वभौम सभेशीं देखील आहे.

प्रशियांतील लोकप्रतिनिधि निवडून देण्याच्या हक्काबद्दलचा जो प्रश्न आहे, त्याचा संबंध केवळ प्रशियाशींच रहावा, राइशूटॅगमध्यें त्याची वाटाघाट होऊं नये, असे यत्न अजूनपर्यंत होत असून देखील त्या प्रश्नाला आज अनेक वर्षांपासून सार्वभौम स्वरूप प्राप्त झालेलें आहे. प्रशियाच्या लोअर हौसमधील एका रॅडिकल पक्षाच्या सभासदानें १९०८ सालीं पुढें लिहिलेले उद्गार काढले:—“सर्व संयुक्त संस्थानांत प्रशियाचें संस्थान फार मोठें आहे, व सर्व साम्राज्यावर त्याचें वजन आहे. आणि म्हणून प्रशियांतील निवडणुकीचे नियमांचा विचार केवळ प्रशियाच्या दृष्टीनें न करतां सर्व जर्मन राष्ट्राच्या दृष्टीनें करावयास पाहिजे.” प्रशियाची राज्यव्यवस्था नवीन पद्धतीवर आणण्याच्या कामांत इतर संस्थानें फार लक्ष्य घालतात, त्याचें मूळ कारण हें आहे कीं, बुद्धिव्यासंगांत आणि राष्ट्राची सांपत्तिक स्थिति सुधारण्यांत प्रशिया जसा पुढाकार घेतो, त्याचप्रमाणें राजकीय विचारांनां नवें वळण लावण्याच्या कामांतहि त्यांनेंच पुढाकार घेतला पाहिजे, असें त्यांनां साहजिकपणेंच वाटतें. “इम्पीरियल चॅन्सेलर-”च्या आणि “प्रशियन मिनिस्टर प्रेसि-

डेंट-''च्या जागेवर एकच इसम असतो व त्याचा हेतु हा कीं, साम्राज्य आणि संस्थानें यांची राज्यपद्धति एका नमुन्याची असावी. ही गोष्ट संस्थानांतर्फे वरील गोष्टीच्या पुष्ट्यर्थ पुढें आणली जाते. या विषयावर उभय पक्षांत नेहमीं परस्परांत वाद चालू असतो. एकपक्षीं, दक्षिण-जर्मनींतील लोकांनां असें वाटतें कीं, प्रशियाच्या मठ्ठपणामुळें आम्ही मागें पडत चाललों आहों; दुसऱ्या पक्षीं, प्रशियांतील राजकीय विचारांत मागें असलेल्या लोकांनां या उदारवृत्ति माणसांनीं आपल्या बरोबरीला इतरांनां खेंचण्याचा प्रयत्न केला म्हणजे अतिशय राग येतो.

प्रशियांतील जमीनदारवर्गाचें मुख्य वर्तमानपत्र जें "बर्लिन क्रॉस गॅझेट" त्यांत १९०७ सालीं पुढें लिहिलेला एक लेख आला होता:— "प्रशिया आणि इतर संस्थानें यांत जो मतभेद आहे तो अलीकडे विशेष रंगारूपाला आला आहे. याचीं मुख्य कारणें अशीं आहेत कीं, कांहीं संस्थानांत आणि विशेषेंकरून दक्षिण-जर्मनींतील संस्थानांत पार्लमेंटांच्या( डाएट्सच्या ) निवडणुकीचे जे नियम आहेत त्यांत लोकमताला अनुसरून कांहीं फेरबदल केले आहेत. अशा तऱ्हेचे फेरबदल प्रशियानें देखील आपल्या नियमांत करावे असें त्यांचें म्हणणें आहे. पण प्रशियाच्या सरकारला व पार्लमेंटला ही गोष्ट मान्य नाहीं. दक्षिण-जर्मनींतील संस्थानांनीं सार्वभौम डाएटच्या धर्तीवर वयांत आलेल्या प्रत्येक पुरुषाला मत देण्याचा अधिकार दिला आहे, यामुळें राजकीय प्रगति करण्याच्या कामांत पुढारीपणाचा थोडासा मान त्यांनां देणें वाजवी आहे. परंतु तेवढ्यावरून या प्रगतीला प्रशिया उलट आहे असें जें त्यांचें म्हणणें आहे, तें खरें ठरत नाहीं. या लोकांनीं हें लक्ष्यांत घेतलें पाहिजे कीं, जर्मन साम्राज्यस्थापनेकरतां बड्या व घरंदाज लोकांनीं जे परिश्रम घेतले आहेत, त्यांचा फायदा त्यांनां मिळालाच पाहिजे. तो फायदा त्यांनां न मिळूं देण्याचा कोणीं यत्न केला म्हणजे, आपण जें

साम्राज्य स्थापिलें तें आपल्या बऱ्याकरतां कां वाइटाकरतां अशी त्यांनां साहजिकच शंका येते."

निवडणुकीचा हक्क विशेष विस्तृत असावा असें प्रतिपादन करणारे लोक म्हणतात कीं, साम्राज्याला जी गोष्ट चांगली ती तदंतर्गत संस्थानां-नांहि चांगली असलीच पाहिजे; आणि शिवाय ते असेंहि दर्शवितात कीं, प्रशियांतील निवडणुकीची जी पद्धति आहे ती साम्राज्यांतील मुख्य संस्थानांनां नापसंत आहे, व त्यांनीं आपल्यापुरती सुधारणा केली आहे. प्रशियांतील या पद्धतीचा उगम केव्हां झाला, तिचें संकुचित स्वरूप कसें आहे व तें कां आहे, या गोष्टींचा आतां येथें विचार करणें अगदीं अवश्य झालें आहे.

१९ व्या शतकाच्या मध्याला राज्यकारभारांत आपला हात असावा असें प्रशियांतील पुढाऱ्यांनां वाटूं लागलें. त्याअन्वयें १८४९।५० सालीं प्रशियाचा राजा फ्रेडरिक वुइल्यम यानें लोकांनां राज्यकारभारा-संबंधीं हक्कांची सनद दिली. ही सनद १८७१ सालीं, म्हणजे साम्रा-ज्याची स्थापना झाल्यानंतरहि कायम राहिली, व आजतागायत ती तशीच चालू आहे. प्रशियाचें वजन फार मोठें म्हणून साम्राज्यस्थापने-नंतरच्या राज्यव्यवस्थेंत व राजकीय घडामोडींत प्रशियाचाच नमुना सर्व संयुक्त संस्थानांनीं आपल्यापुढें ठेवला आहे. प्रशियाच्या लोकांनां हक्कांची सनद मिळाली, व सर्व लोकांनां मतें देण्याचा अधिकार प्राप्त झाला हें खरें; परंतु तेथील पार्लमेंटांत लोकांचे खरे खरे प्रतिनिधि निवडून न येतां सरकारला अनुकूल अशींच बडीं बडीं व वजनदार घराण्यां-तील माणसें निवडून येतात. हें असें कां व्हावें याचें कारण पुढील मज-कुरावरून वाचकांचे ध्यानांत येईल.

"लोकप्रतिनिधि निवडून देण्याचा ज्यांनां हक्क आहे, अशा सर्व लोकांचे सरकारी कराच्या उत्पन्नाच्या मानानें तीन वर्ग करण्यांत येतात.

म्हणजे कराच्या सर्व रकमेचे तीन हिस्से करून, ते ज्यांकडून वसूल होतात त्यांचे तीन वर्ग करतात, व त्यांनां सारखे प्रतिनिधि निवडून देतां येतात. म्हणजे सर्वांत जास्त कर देणाऱ्या अगदीं थोड्या लोकांनां अर्थात् जास्त प्रतिनिधि निवडतां येतात, व गरीब लोकांची संख्या जास्त असूनहि त्यांना अगदीं थोडे प्रतिनिधि निवडतां येतात. हे प्रतिनिधि म्हणजे लोकांच्या वतीनें लोकसभेंत बसणारे नव्हत; तर लोकांच्या वतीनें लोकसभेंत बसणारे प्रतिनिधि निवडून देणारे प्रतिप्रतिनिधि होत. कराच्या विभागणीनें केलेले हे तीन वर्ग आपणांपैकीं कांहींनां निवडतात, व अशांचें मंडळ ( College ) लोकसभेला सभासद निवडून देतें. उदाहरणार्थ, प्रशियांत सरासरी २,६०,००० कर देणारे श्रीमंत लोक एकतृतीयांश प्रतिनिधि निवडून देतात; ८,७०,००० कर देणारे आणखी एकतृतीयांश निवडून देतात, आणि राहिलेले ६५,००,००० कर देणारे एकतृतीयांशाची निवड करतात. याचा परिणाम बहुतेक नेहमीं असा होतो कीं, या ६५ लक्षांचे प्रतिनिधि अगदीं थोडे असल्यामुळें त्यांचे प्रतिनिधि प्रशियन लोकसभेंत बिलकुल नसतात. अर्थात् प्रशियन लोकनियुक्त सभेंतील 'लोक' हें पद निरर्थक आहे, यांत शंका नाहीं. खुद्द बर्लिन शहरच्या म्युनिसिपालिटीच्या निवडणुकींतहि हेंच प्रत्ययाला येतें. करांच्या प्रमाणानें केलेल्या वर्गीकरणाचा परिणाम असा होतो कीं, बर्लिन शहराला लोकसत्तावाद्यांचा म्हणजे सोशल डेमोक्रॅटसचा भरणा अतिशय मोठा असूनहि तेथें निवडून आलेल्या १४४ म्युनिसिपल सभासदांपैकीं सारे ३८ 'लोकसत्तावादी' असतात! याचा अर्थ असा होतो कीं, २०,००,००० लोकसंख्येच्या या शहराची व्यवस्था दोनतृतीयांश सभासद निवडून देणाऱ्या ३३,००० धनिक मतदारांवरच अवलंबून असते!

हें झालें लोकनियुक्तांच्या सभेविषयीं. या सभेला 'लोअर हौस' म्हण-

तात. दुसऱ्या अथवा वरील सभेची गोष्टच बोलावयास नको! हिच्या 'अपर हौस' या नांवाला अनुसरून या सभेंत राजघराण्यांतील वयांत आलेले राजपुत्र, सरदार, दरकदार, बडे जमीनदार आणि राजानें तहाह्यात नेमून दिलेले बडे लोक सभासद असतात. क्वचित् लोकसत्तावादीहि एखादा हींत असतो. प्रशियाचें उदाहरण घेतल्यास गेल्या निवडणुकीनंतर या सभेंत ३२७ सभासद होते, त्यांपैकीं फक्त १२ मात्र लोकांचे वाली होते. ३ बँकांचे डिरेक्टर, ८ व्यापाऱ्यांचे प्रतिनिधि व १ खरोखरीच कामकरी वर्गांतला. मिळून हे १२ म्हणजे हल्लींच्या व्यापारी, धंदेवाले व कामकरी या वर्गांचे प्रतिनिधि होण्याच्या लायकीचे जे लोक आहेत त्यांशीं शेंकडा चार या प्रमाणांत सुद्धां पडत नाहींत; यावरून प्रशियांतील खऱ्या लोकमताला राज्यकर्त्यांकडून किती मान व किती उत्तेजन मिळतें, हें दिसून येईल."

आतां राइश्टॅग सभेची निवडणूक कशी होते ती पाहूं. ही सभा लोकांनीं निवडून दिलेल्या प्रतिनिधींची असते. ही निवडणूक प्रत्यक्ष असते, प्रशियन पार्लमेंटसारखी परंपरेनें असत नाहीं. वयांत आलेल्या म्हणजे एकवीस वर्षांच्या प्रत्येक पुरुषाला मत देण्याचा हक्क असतो. त्यांनीं निवडून दिलेले ३९७ सभासद या सभेंत बसून कायदेकानू करतात; व राज्यकारभार सुयंत्रित चालण्यासाठीं योग्य तेवढ्या रकमा खर्च करण्याची परवानगी देतात.

यावरून राइश्टॅगमधील निवडणुकींत बराच सढळपणा आहे असें स्पष्ट दिसतें, आणि हा सढळपणा दक्षिण-जर्मनींतील कांहीं संस्थानांनीं आपआपल्या पार्लमेंटांच्या निवडणुकींत सुरू केला आहे. परंतु इतर संस्थानांत प्रशियांतील निवडणुकीची पद्धति चालू असल्यानें लोकमत प्रकट व्हावयास जितका वाव मिळावयास पाहिजे तितका मिळत नाहीं, आणि याकरतां प्रशियानें आपली वागणूक या कामांत याहून जास्त

उदारपणाची ठेवावी असें संस्थानांचें म्हणणें आहे.

राइश्टॅगची निवडणुकीची रीति सुद्धां समाधानकारक आहे असें नाहीं. कारण, तेथें देखील लोकमताला अनुकूल असे प्रतिनिधि येत नाहींत; व याचें कारण, निरनिराळ्या प्रांतांत सभासदांची वांटणी योग्य रीतीनें झालेली नाहीं. कोणत्या शहरांतून किती प्रतिनिधि यावे हें १८७२ सालीं एकदां प्रिन्स बिस्मार्कनें व त्याच्या बरोबरच्या मुत्सद्द्यांनीं ठरवून ठेवलें आहे. तेव्हांच मुळीं ही विभागणी एकतर्फी होती. या सभेंत देखील होतां होईल तों बडे जमीनदार निवडून येऊन राजसत्ता व राजघराणीं यांचे हितसंबंध योग्य रीतीनें राखले जावे, या इच्छेनें प्रेरित होऊन त्यानें ही विभागणी केली होती. मग आतां तर ती जास्त एकतर्फीच नव्हे, अन्यायाचीहि झाली आहे यांत आश्चर्य नाहीं. कारण, १८७२ नंतरच्या काळांतच जर्मनीची व्यापारधंद्यांत वाढ झाली असून शहरांची लोकसंख्या वाढली आहे. पण त्यांनां आतां वाढलेल्या लोकसंख्येच्या प्रमाणानें प्रतिनिधि निवडून देतां येत नाहींत. बर्लिन आतां एवढें मोठें शहर झालें आहे, पण त्याला अवघे सहा प्रतिनिधि निवडून देतां येतात. शिवाय १८७२ त जीं खेडीं होतीं त्यांपैकीं कांहींचीं आतां गजबजलेलीं शहरें झालीं असूनहि त्यांनां मुळींच प्रतिनिधि नाहींत. ही स्थिति सुधारण्यासाठीं प्रागतिक ( नॅशनल लिबरल्स ) व लोकसत्तावादी ( सोशल डेमोक्रॅट्स ) लोकांची खटपट चालू आहे. पण आजवर तिला कांहीं यश आलें नाहीं.

राइश्टॅगच्या डोक्यावर ' बुण्डेसराट् ' म्हणून जी सभा आहे व तिच्या हातांत जी सत्ता आहे ती पाहिली म्हणजे राइश्टॅगचें स्वातंत्र्य किती नियंत्रित झालें आहे हें ध्यानांत येईल. ही सभा सर्व संयुक्त संस्थानांच्या प्रतिनिधींची असते. हींत राजघराण्यांतील माणसें व बडेबडे सरदार वगैरे असतात, व ते संस्थानिकांनीं नेमलेले असतात. कोणचाहि बिकट

प्रश्न निघाला असतां आपल्या संस्थानाला संमत असेंच एकमत त्यांनां द्यावें लागतें. या परिषदेचे एकंदर ५८ सभासद असतात, व त्यांपैकीं १७ एकट्या प्रशियाचे असतात. तिच्या सभासदांनां अर्थात् स्वतःचें मत असें कांहींच नसतें. ज्या संस्थानचे ते प्रतिनिधि असतील, तेथील सरकार ठरवील तें मत त्यांनां द्यावें लागतें. "ही सभा गुप्तपणें विचार करते व ती कोणच्याहि संस्थानच्या क्षेत्राच्या बाहेर असल्यामुळें, सर्व संस्थानिकांनां आपल्या खुद्द राजधानींत जें करतां येत नसे, तें हिच्या द्वारा करतां येतें. लोकमताच्या दडपणाची भीति या परिषदेला मुळींच असत नाहीं. म्हणून जुन्या घराण्यांचें आतां चांगलेंच जमूं लागलें आहे. कोणत्याहि सुधारलेल्या राष्ट्रांत इतकी सर्व शक्ति एकवटलेली सभा नाहीं. या सभेंत प्रशियाचें (१७ सभासद एकट्याचे) व अर्थातच्च प्रशियाचा राजा—जर्मनीचा बादशहा—याचें वर्चस्व आहे. सैन्य व आरमार यांविषयीं कायदेकानू करणें, साम्राज्याला लागणाऱ्या खर्चा-साठीं कर वगैरे बसविणें, इत्यादि बाबतींत प्रशियाच्या प्रतिनिधींच्या मतानें तंटे तुटतात. कारण, अशा प्रसंगीं सद्यःस्थितिच बरी, असें सतरा-जणांचें मत पडलें म्हणजे अर्थात् इतरांनांहि तें अमान्य असत नाहीं.

युद्ध व तह करतांनां या परिषदेची संमति मिळावी लागते. शिवाय प्रत्यक्ष लोकनियुक्त सभेनें (राइश्टॅगनें) पास केलेल्या गोष्टींवरहि या 'बुण्डेसराट-'ची हुकमत खालील कलमांअन्वयें आहे. तीं कलमें अशीं:— (१) राइश्टॅगमध्यें ज्या सूचना येतील आणि जे कायदे पास होतील, त्यांवर ही सभा विचार करील; (२) साम्राज्याचे कायदेकानू अमलांत आणण्यासाठीं ही सभा योग्य ती व्यवस्था करील व योग्य ते उपाय योजील; (३) साम्राज्याचे कायदेकानू अमलांत आणण्याच्या कामीं ज्या उणीवा दिसून येतील, त्यांविषयीं ही सभा विचार करील, वगैरे. बाद-शहानें आपल्या मर्जीप्रमाणें पसंत केलेला 'कान्त्सलर' (चॅन्सेलर, मुख्य

प्रधान ) या सभेचा अध्यक्ष असतो, व तो या सभेच्या विद्यमानें लोकनियुक्त सभेंत भाषण करतो; पण या 'बुण्डेसराट्' सभेला एखादी गोष्ट कदाचित् पसंत पडूं शकेल, या भरंवशावर त्या सभेच्या वतीनें त्याला वचनें वगैरे कांहीं देतां येत नाहींत.

आतांपर्यंत मागें सांगितलेल्या तीन गोष्टींपैकीं दोहोंचा एकमेकांच्या अनुषंगानें विचार झाला. बाकी राहिलेली तिसरी गोष्ट जी मंत्रिमंडळाची जबाबदारी तिच्याबद्दल थोडेसें लिहून हें लांबलेलें प्रकरण संपवूं.

ही तिसरी गोष्ट बरीच नाजूक आहे, आणि लोकसत्तावाद्यांच्या म्हणण्याप्रमाणें जर तिच्यांत सुधारणा झाली तर साम्राज्याच्या आणि प्रशियाच्या राज्यव्यवस्थेच्या नियमांत फारच घोटाळा उडून जाईल; किंबहुना त्यांना अगदीं निराळेंच स्वरूप द्यावें लागेल. केवळ तत्त्वतः पाहिलें तर बादशहाच्या मंत्र्यांवर जबाबदारी ठेवण्यांत आली आहे; परंतु व्यवहारांत मात्र तिचें अस्तित्व अनुभवास येत नाहीं. इंग्लंडांतील मंत्रिमंडळ जसें कोणच्या तरी एका पक्षाच्या तर्फे अधिकारारूढ असून त्या पक्षाची सरशी तीच मंडळाची सरशी होते, अथवा त्या मंडळाचा पराजय झाला असतां प्रधानमंडळ पदच्युत होतें, तसा प्रकार जर्मनींत नाहीं. लष्करी खातें खेरीज करून इतर खात्यांत बादशहा जे हुकूम सोडतो किंवा जाहीरनामे प्रसिद्ध करतो, त्या हुकुमांवर किंवा जाहीरनाम्यांवर इम्पीरियल चॅन्सेलरनें एका बाजूला सही करावी लागते. यावरून नियमाप्रमाणें त्याच्यावर जबाबदारी आलीशी दिसते; परंतु वस्तुतः त्याच्यावर तशी जबाबदारी असत नाहीं. सभासदांना त्या मंत्र्याला वाटेल ते प्रश्न विचारतां येतात, त्याच्या कृत्याचा त्यांना निषेध करतां येतो; पण त्याला किंवा इतर मंत्र्यांला कामावरून दूर करूं म्हटलें तर तें मात्र त्यांना करतां येत नाहीं; तो अधिकार सर्वस्वीं बादशहाचा आहे. बादशहा अथवा कायसर हाच प्रत्यक्ष राज्यसूत्रें चालविणाऱ्या मंत्रिमंड-

ळाचा मुख्य असतो, व तो आतां पूर्वीप्रमाणें संस्थानिकांनीं निवडाव-याचा नसून वंशपरंपरागत असा आहे. प्रशियाच्या बाहेर त्याला दिवाणी बाबतींत अगर कायदेकानूंत हात घालतां येत नाहीं; पण तो जर्मन सैन्याचा व आरमाराचा मुख्य अधिपति असून परराष्ट्रांशीं सर्व व्यवहार तोच करतो. शिवाय संस्थानिक-प्रतिनिधींच्या सभेंत त्याचें वजन फार आहे. प्रशियाचें अलोट बळ व एकदम सतरा मतें यामुळें ही परिषद् त्याच्याच आकांक्षा व इच्छा पाहून नेहमीं वाकते. त्याचा कान्सलर नांवाचा प्रधान असतो, व त्याला मदतनीस म्हणून प्रत्येक खात्याचे निरानिराळे चिटणीस असतात. मदतनीसापेक्षां त्यांचा अधिकार आणि योग्यता अधिक नसल्यामुळें त्यांची इंग्लंडांतील मंत्र्यांशीं तुलना करणें केव्हांहि शक्य नाहीं.

"याप्रमाणें जर्मनींतील राज्यव्यवस्थेचें साधारणतः स्वरूप आहे. राजकीय बाबतींत जर्मनीचें पुढें काय होईल हें सांगणें कठिण आहे. पण हल्लींचें युद्ध जर झालें नसतें, व शांततेचा काळ युरोपला लाभला असता, तर जर्मन राज्यव्यवस्थेचा कल कोणीकडे वळला असता, याची थोडीशी तरी कल्पना करतां येणें शक्य आहे. एकीकडे राजसत्तेला —एकतंत्री अधिकाराला—अनुकूल आणि लोकसत्तेला प्रतिकूल अशी प्रशियाची राज्यव्यवस्था व साम्राज्यांतील अति महत्त्वाची परिषद् 'बुंडेसराट्' व दुसरीकडे एकतंत्री सत्तेला दिवसेंदिवस जास्त प्रतिकूळ व लोकसत्तेला पूर्ण अनुकूळ असें 'राइशटॅग' यांच्या ओढाताणींत जर्मन राजकारणाचें तारूं कोणीकडे झुकेल, ही सकृद्दर्शनीं भीति वाटते. पण थोडा विचार केला तर असें दिसेल कीं, दिवसेंदिवस लोकांमध्यें प्रगति होत असतां व सर्व युरोपभर विचारक्रांतीचा ओघ वाहत असतां, बुंडेसराट्, कान्सलर व कायसर मात्र प्रतिगामी राहून चालावयाचें नाहीं. ते तसे राहिलेच तर काय होईल? लोकमत दिवसेंदिवस जास्त

जागृत होऊन लोकसत्तेकडे कल खात आहे. बिस्मार्कसारख्या दंडाईत मंत्र्याला सुद्धां 'लिबरल' अथवा प्रागतिक लोकांच्या मताला मान देऊन मताचा सार्वभौम हक्क व राइश्‌टॅग हीं द्यावीं लागलीं. हल्लींची सोशल डेमोक्रॅट पार्टी घ्याना ? दहा वर्षांपूर्वी त्यांची संख्या तिरस्कार वाटण्याजोगी थोडी होती; पण आज जर कोणच्या पक्षाची संख्या जर्मनींत अपरिमित असेल, तर ती त्यांचीच आहे. शिवाय शहरांनिहाय प्रतिनिधींची विभागणी जरी पूर्वींचीच—एकपक्षी अन्यायाची—अशी आहे, तरीहि त्यांनां १९१२ सालीं १०० वर प्रतिनिधि निवडून देतां येतात. वाढत्या उद्योगधंद्यांच्या काळांत सोशल डेमोक्रॅट लोकांची संख्या व तिजबरोबरच त्यांच्या प्रतिनिधींची संख्या वाढणार; व मग कायसर व बुंडेसराट् यांनां दोनच पक्ष उरतील. लोकमतापुढें मान वांकवून कॉन्स्टिटयूशन् अगर सनदेंत लोकांनां संमत असे फेरफार करणें, अथवा लोकमताकडे दुर्लक्ष्य करून आपल्या डोळ्यांदेखत राज्यक्रान्ति घडवून आणणें. मरणें अगर सत्ता कमी करून घेऊन जगणें अशीच पाळी आल्यावर जर्मन सरकार मरण्याला तयार होईल कीं नाहीं, याची शंकाच आहे. पण हे विचार शांततेच्या वेळचे झाले. हल्लीं महायुद्ध धुमसत आहे; त्याचा काय परिणाम होईल, व त्यांतून कोणच्या स्थितींत जर्मनी उरेल, हें तटस्थपणें पाहण्यापलीकडे आपणांला दुसरें काय करतां येणार आहे ?"

प्रकरण २२ वें

# सोशियालिझमचीं भावी चिन्हें

जर्मनींतील सामाजिक आणि सांपत्तिक चळवळींचा अभ्यास करणाऱ्या गृहस्थास सोशल डेमोक्रॅटसच्या संबंधांत निरनिराळे विषय विचार करण्याजोगे आढळतील; त्यांतून सोशियालिझमवर हल्लीं गंडांतर आल्यासारखें दिसत असल्यानें या विषयांचा विचार करणें त्याला विशेषच कौतुकास्पद वाटेल. १९०७ च्या जानेवारी महिन्यांतील सार्वभौम निवडणुकींत सोशियालिस्टांच्या झालेल्या पराभवाचें यथादर्शन चित्र रेंखाटतांनां पुष्कळ लोकांच्या हातून चुका होतात. दर निवडणुकींत सोशियालिस्टांची सरशी झालेली पाहण्याची जर्मनींतील लोकांनां इतकी संवय झाली होती कीं, १९०७ सालीं राइशटॅगमधील कांहीं जागा प्रसंगोपात्त त्यांच्या हातांतून गेल्याबरोबर या समाजविध्वंसकांचा पुरा पराभव झाला, आतां त्यांचें डोकें वर निघणार नाहीं, असा लोकांनीं एकदम सिद्धान्त बांधला. आणि वास्तविक पाहिलें तर या पराभवापासून जर कोणतें खरें अनुमान निघत असेल तर तें हेंच कीं, या लोकांची संख्या जितकी वाढावयाला पाहिजे होती तितकी १९०६ साल अखेर वाढली नाहीं. याचा अर्थ असा कीं, लोकसंख्येच्या वाढीबरोबर त्यांची संख्या वाढली व इतर लोकांशीं त्यांचें प्रमाण वाढलें हें खरें; परंतु १९०३ सालीं या दोनहि बाबतींत जी सुधारणा दिसून आली, ती पुढील सालांत कायम राहिली नाहीं इतकेंच. १९०७ सालीं सोशियालिस्ट उमेदवारांनीं एकंदर ३,२५८,००० मतें काबीज केलीं. १९०३ सालीं ही संख्या ३,०१०,७७० होती. १९०३ सालीं वाढीचें प्रमाण शेंकडा ४३ होतें, तें १९०७ सालीं शेंकडा ८.२ झालें. सर्व मतांत १९०३ सालीं एकंदरींत सोशियालिस्टांचीं मतें शेंकडा ३१.७

होतीं; १९०७ सालीं तीं फक्त शेंकडा २९.० झालीं. छोट्या छोट्या पांच संस्थांनां मिळून दोन हजार मतें त्यांच्या हातचीं गेलीं. त्यांनां मुख्य धक्का जो बसला तो साक्सेन संस्थानांत. तेथें त्यांचीं एकदम २३,२०० मतें नाहींशीं झालीं, आणि मॅक्लेनबर्ग–श्वेरिन येथें ५,५०० नाहींशीं झालीं. बाकीच्या, म्हणजे उदाहरणार्थ, प्रशिया, बव्हेरिया, बेडन, वुर्टेम्बुर्ग, वगैरे संस्थानांत पूर्वींपेक्षां अधिक मतें त्यांनां मिळालीं; परंतु त्यामुळें त्यांनां आपली घसरती बाजू मुळींच सांवरून धरतां आली नाहीं.

मुख्यत्वेंकरून औद्योगिक प्रांतांनीं त्यांची बाजू सोडली नाहीं किंवा त्यांच्यासंबंधानें औदासीन्यहि दाखविलें नाहीं. परंतु शेतीच्या प्रांतांत त्यांचीं बरींच मतें कमी झालीं. १९०३ सालीं राइशटॅगमधील ७९ जागा त्यांच्या हातांत होत्या, त्यांपैकीं १९०७ सालीं फक्त ४३ राहिल्या. त्यांचा पुढारी हर बेबेल ( Herr Bebel ) यानें १९०३ सालीं असें भविष्य केलें होतें कीं, सात सालच्या निवडणुकींत हा आंकडा आम्ही शंभरापर्यंत खात्रीनें नेऊन भिडवूं. ही या माणसाची 'गर्वोक्ति' लक्ष्यांत घेतली म्हणजे सात सालीं सोशियालिस्टांनां चांगला पाठभर मार बसला असें उघड होतें. १९०३ सालाला या पक्षाचा जो कार्यक्रम होता, त्या कार्यक्रमांतील अगदीं ठराविक विषय म्हणजे, देशांतील संपत्ति आणि संपत्त्युत्पादनाचीं साधनें कांहीं व्यक्तींच्या मालकीचीं राहूं न देतां सर्व राष्ट्राच्या मालकीचीं करणें, प्रजासत्ताक राज्य, मजूरवर्ग खेरीज करून बाकी लोकांच्या मिळकतींवर क्रमाक्रमानें वाढत जाणारा कर, बिन-पगारी नागरिकांचें सैन्य म्हणजे 'मिलिशिआ', सुधारलेले औद्योगिक कायदेकानू, आणि सार्वभौम सरकारनें चालविलेल्या वसाहतींच्या राज्य-पद्धतीचा जोरानें निषेध, हे होत. वसाहतींच्या राज्यपद्धतीचा निषेध सात सालींहि होता व मतें मिळविण्याच्या उद्योगांतहि कांहीं ढिलाई झाली

नव्हती. मग सात सालांत जो एवढा पराभव झाला त्याचीं कारणें काय असावीं? त्याचीं कारणें दोनः—(१) सोशियालिस्टांविरुद्ध खटपट करणाऱ्या लोकांत एकोपा, आणि (२) सोशियालिस्टांत दिसून येणारा एकोप्याचा झालेला अभाव. याशिवाय छोटे शेतकरी व कारखानदार, आणि किरकोळ माल विकणारे व्यापारी यांनींहि त्यांची बाजू सोडून दिली होती, परंतु हें कारण विशेष महत्त्वाचें आहे असें दिसत नाहीं.

सोशियालिस्टांविरुद्ध खटपट करणारे म्हटले म्हणजे मुख्यत्त्वेंकरून मध्यम वर्गांतील (Middle classes) लोक होत. त्यांच्यांत १९०३ ते १९०६ साल अखेर नवीन जागृति उत्पन्न झाली व सोशियालिस्टांचें प्रस्थ कमी करण्याचा ते एकादिलानें उद्योग करूं लागले; आणि त्याचाच परिणाम सोशियालिस्टांना सात सालीं भोंवला, हें निःसंशय आहे. पहिल्यापहिल्यानें मध्यमवर्गांतील लोक निवडणुकीचे वेळीं मतेंच देत नसत. यामुळें त्यांच्या पुष्कळशा जागा सोशियलिस्टांनीं पटकावल्या होत्या. या निष्काळजीपणामुळें सोशियालिस्टांनीं आपल्यावर बराच हात चढविला असें जेव्हां त्यांनीं पाहिलें तेव्हां यापुढें या लोकांची उपेक्षा करतां कामा नये असें त्यांच्या मनानें घेतलें; आणि त्याप्रमाणें त्यांच्या पक्षाचे पुष्कळ लोक मतें देण्याकरतां सात सालीं पुढें आले. या सालीं सोशियालिस्टांना मध्यम स्थितीच्या लोकांनीं जशी हरकत केली, तशी पूर्वीं बरेच वर्षांत कोणच्याहि पक्षांतील लोकांनीं केली नव्हती. नाहीं म्हणावयाला १८८७ सालीं मात्र कन्सरवेटिव आणि नॅशनल लिबरल्स (प्रागतिक) यांनीं मिळून त्यांच्याविरुद्ध खटपट केली होती व तींतहि यश संपादन केलें होतें. परंतु त्या सालापासून पुढें १९०३ सालापर्यंत सोशियालिस्टांचा सारखा उत्कर्षच होत गेला व १९०३ सालांत तर त्यांनीं मोठाच विजय संपादन केला. सात सालीं मध्यम प्रतीच्या लोकांनीं त्यांचा जो पराभव केला तो जर केला नसता, तर हर बेबेलनें

केलेलें भविष्य खरें झाल्याशिवाय राहतें ना ! परंतु हें भविष्य खरें तर ठरलें नाहींच, उलट त्या सालच्या निवडणुकीवरून पुष्कळांच्या ध्यानांत असें येऊन चुकलें कीं, मोठमोठ्या शहरांत राहणाऱ्या ( Burgher ) लोकांनीं आपआपसांतील भेदभाव बाजूला ठेवून एकदिलानें जर मोहीम सुरू केली तर सोशियालिस्टांची प्रगति कुंठित झाल्याशिवाय खाचित राहणार नाहीं.

सोशल डिमॉक्रसीच्या बाजूचे सर्व लेखक ही गोष्ट प्रांजलपणें कबूल करतात कीं, मध्यम स्थितीच्या लोकांच्या पुरताच जर विचार केला तर असें दिसतें कीं, सोशियालिस्टांनीं स्वतःच्याच जोरावर ठोकून दिलेल्या सिद्धान्तांचा सात सालच्या निवडणुकींत पुरा फजिता झाला. यांपैकीं एक महत्त्वाचा सिद्धान्त असा होता कीं, सर्व समाजाचे दोन भाग पडण्याकडे हळूहळू प्रवृत्ति होत चालली आहे. विशेष हक्क असलेल्या व अलोट संपत्तीच्या जोरावर चैन करणाऱ्या थोड्या लोकांचा एक वर्ग, आणि ज्यांनीं आपलें सर्व आयुष्य दारिद्रावस्थेंत घालविलें पाहिजे असें विधिघटितच आहे अशा पुष्कळ लोकांचा दुसरा वर्ग, मजूरवर्गांतूनच एक मध्यम प्रतीचा तिसरा वर्ग—यालाच ‘ लोअर मिडल क्लास ’ असेंहि म्हणतात—हळूहळू अस्तित्वांत येत होता याकडे त्यांच्यापैकीं कोणाचेंच लक्ष्य गेलें नव्हतें. शेवटीं सात सालीं हा वर्ग इतका प्रबळ झाला व त्यानें एकदम इतका जोराचा हल्ला केला कीं, त्यापुढें सोशियालिस्ट अगदीं गांगरून गेले, व राजकीय बाबतींत आपल्या हातांत सत्ता पाहिजे असें ज्या पक्षाला वाटत असेल त्या पक्षानें मध्यम प्रतीच्या लोकांचीच सहानुभूति संपादन केली पाहिजे, असें जेव्हां त्यांच्या अनुभवास आलें तेव्हां तर त्यांनां विशेषच आश्चर्य वाटलें.

१९०७ सालापर्यंत मध्यम प्रतीच्या लोकांची सोशियालिस्टांनां दादहि नव्हती. त्या कामांत त्यांचे सर्व सिद्धान्त चुकीचे ठरले, ही गोष्ट

या पक्षांतील मुख्य पुढाऱ्यांनीं व लेखकांनीं तत्काळ कबूल केली. यांत त्यांच्या मनाचा सरळपणा जगाच्या चांगला अनुभवास आला. हर एड-मंड फिशर म्हणतो:—" एकंदर लोकसंख्येपैकीं मजुरीवर निर्वाह करणाऱ्या लोकांचीच संख्या दिवसानुदिवस वाढत जाणार; मनुष्यजातीला, निदान तीपैकीं बऱ्याच मोठ्या समुदायाला, सुखापेक्षां दुःख जास्त अनुभवावें लागणार; मध्यम स्थितीचे लोक हळूहळू नामशेष होणार; आणि थोड्याच काळांत अशी स्थिति प्राप्त होईल कीं, संपत्त्युत्पादनाच्या साधनांची रेलचेल असणाऱ्या मूठभर धानिक व बड्या लोकांचा एक वर्ग, आणि मजुरीवर निर्वाह करणाऱ्या असंख्य लोकांचा दुसरा वर्ग, असे एकंदर समाजाचे फक्त दोन वर्ग कायम राहतील. आणि म्हणून लोकांनां सोशि-यालिझमचीं तत्त्वें मान्य व्हावीं एतदर्थ जर कांहीं खटपट करावयाची असेल तर ती मजुरीवर निर्वाह करणाऱ्या लोकांनां आपल्या पक्षाकडे ओढून घेण्याच्या कामांतच केली पाहिजे. हीं व अशा प्रकारचीं मतें आम्ही आजपर्यंत मोठ्या प्रेमानें उराशीं बाळगून लोकांनां तीं सांगत आलों. परंतु प्रत्यक्ष अनुभवान्तीं हीं मतें खोटीं आहेत, अगदीं अव्यवहार्य आहेत, असें ठरत नाहीं काय? समाजांत भांडवलवाले आणि मजूर हेच दोन वर्ग राहणार असें आम्ही कंठरवानें सांगतों; परंतु अनुभव तर असा येतो कीं, मजूरवर्गांतूनच तिसरा एक वर्ग आपलें डोकें हळूहळू वर काढीत आहे. या वर्गांतील लोक श्रीमंतांप्रमाणें ऐषआरामांत जरी नसतात तरी मजुराप्रमाणें हलाखींतहि नसतात."

हर फिशरच्या अदमासाप्रमाणें या नवीन मध्यम स्थितींतील लोकांची एकंदर संख्या सुमारें पंचावन लाखांपर्यंत असावी. या संख्येंत शेतकरी, व्यापारी, शिल्पकार, मुकादम, मुलकी खात्यांतील व म्युनिसिपालिट्यां-तील नोकर, शिक्षक आणि इतर धंदेवाले, यांचा समावेश होतो. त्यांच्या मतानें हे सर्व लोक मजुरीवर निर्वाह करणाऱ्या लोकांतूनच उत्क्रांति

होत होत बाहेर पडले आहेत, आणि उत्क्रांतीचें हें रहाटगाडगें नेहमीं असेंच चालू राहणार असें तो म्हणतो. हें मत बरोबर असो वा चूक असो, यावरून एक गोष्ट मात्र पूर्णपणें शाबीत होते, ती ही कीं, सोशियालिस्टांनीं स्वमतप्रसारार्थ आजपर्यंत जे उद्योग केले ते चुकीच्या तत्त्वावर केले. मध्यम स्थिति अनुभवणारा वर्ग आपल्या समाजांत मुळीं नाहींच, यदाकदाचित् असला तर तो फार लहान असेल; आणि एकदां का तो नाहींसा केला म्हणजे आपल्या मतांचा विजय झाला म्हणून समजावेंच, ही त्यांची विचाराची मुख्य दिशा, आणि ती तर सर्व प्रकारानें चुकलेली. अर्थात् त्यांच्या मतांची छाप लोकांवर बसली नाहीं हें अगदीं साहजिकच आहे, असें कोणाच्याहि लक्ष्यांत येईल.

सोशियालिझमच्या कार्यक्रमाप्रमाणें उद्योगधंदे, व्यापार, अथवा शेती यांवर निर्वाह करून चारितार्थ चालविणारा ' जर्मन मिडल क्लास ' असणें शक्यच नाहीं ! ते असें गृहीत धरून चालतात कीं, समाजांतील सर्व लोक एका दर्जाचे झाले पाहिजेत, सांपत्तिक स्थितीच्या मानानें किंवा इतर परिस्थित्यनुरूप त्यांत मुळींच फेरबदल होतां कामा नये; किंवा एखाद्या मनुष्यानें स्वतःच्या हिंमतीवर इतरांपेक्षां आपला दर्जाहि वाढवितां कामा नये. त्यांच्या विचारसरणींत मुख्य गोम जी आहे ती ही कीं, मनुष्यस्वभावांतील संचय करण्याच्या उपजतबुद्धीचें अस्तित्व हे विक्षिप्त लोक कबूल करीत नाहींत. ही बुद्धि मोठ्या शेतकऱ्यांत ज्या प्रमाणानें असते, त्याच प्रमाणानें लहान शेतकऱ्यांतहि असते, मोठ्या कारखानदारांत जशी असते तशी छोट्या शिल्पकारांतहि असते, राजेरजवाड्यांनां कर्ज देण्याजोगी ऐपत असणाऱ्या लक्षाधीशांत जशी असते तशीच ती खोरीं कुदळी घेऊन काबाडकष्ट करणाऱ्या व आपली दर आठवड्याची शिल्लक म्युनिसिपल बँकेंत टाकणाऱ्या मजुरांतहि असते आणि ती निसर्गसिद्ध आहे.

पूर्वींप्रमाणें अजूनपावतों देखील सोशियालिझमच्या कांहीं पुरस्कर्त्यांचा मुख्य भर दारिद्र्य आणि असंतोष या दोहोंवर आहे आणि या दोन गोष्टी लोकांच्या नेहमीं डोळ्यांसमोर ठेवल्यानें आपल्या मतांचा प्रसार होण्याला उशीर लागणार नाहीं, असा त्यांना भरंवसा वाटत आहे. एकंदर सुधारणेबरोबर जगांतील दारिद्र्य, निदान दारिद्र्यामुळें अनुभवाव्या लागणाऱ्या यातना, अंशत: हळूहळू कमी करण्याचीं साधनें अस्तित्वांत येऊं लागलीं आहेत, ही गोष्ट ते ध्यानांत घेत नाहींत, आणि त्यामुळें सोशियालिस्टांची ही बाजू व्यवहारदृष्ट्या बरीच लंगडी पडते. इतकें असूनहि वादविवादाच्या प्रसंगीं लोकांच्या वाढत्या दारिद्र्याचें तुणतुणें वाजविण्यास ते कमी करीत नाहींत. " तुम्ही दारिद्र्यानें कसे पीडलां आहां, व कांहीं लोक द्रव्याच्या राशींवर कसे लोळत पडले आहेत तें पहा " असें मजुरांना ते वरचेवर सांगतात, आणि त्यायोगें त्यांच्या मनांत असंतोष उत्पन्न करतात. आपल्या अनुयायी वर्गाला त्यांनीं जे वागणुकीचे नियम घालून दिले आहेत, त्यांत काटकसरीनें वागण्याचा नियम मुद्दाम वगळलेला असतो असें दिसतें. याच्या मूळाशीं त्यांची ही समजूत असावी कीं, काटकसरीनें वागून मजुरांनीं पैसे सांठविले म्हणजे संकटसमयीं ते त्यांच्या उपयोगीं पडतील, आणि तसें झालें असतां दारिद्र्यजन्य असंतोष त्यांना भासेनासा होईल. यामुळें प्रत्येक जर्मन शहरांत म्युनिसिपल सेव्हिंग्स बँकांत पुष्कळ मजूर लोक आपली शिल्लक ठेवीत असतात ही गोष्ट त्यांना पसंत नाहीं! त्यांतल्या त्यांत काटकसर करून शिल्लक टाकलेला पैसा मजुरांनीं घर बांधण्याच्या कामांत जर खर्च केला तर तो त्यांना मुळींच खपत नाहीं. मनुष्यस्वभाव म्हटला म्हणजे येथून तेथून सारखाच असावयाचा, आणि त्याप्रमाणें एखादा मजूर, मग तो सोशियालिस्ट पंथाचा कां असेना, त्याला साहजिकच असें वाटतें कीं, आपल्या मालकीचें घर आपल्याला रहावयास असावें

आणि दुसऱ्याला घरभाडें देण्याचा व तदनुषंगिक इतर त्रास आपल्यामागचा कायमचा चुकावा! अशा तऱ्हेनें आपआपल्या मालकीचीं लहान लहान घरें बांधण्याची मजुरांनां पुष्कळ शहरांत हल्लीं सोय झालेली आहे, व तिचा फायदा ते घेऊं लागले आहेत. संग्रह करणें, मग तो घराच्या रूपानें असो, अगर बँकेंतील ठेवीच्या रूपानें असो, सोशियालिझमच्या तत्त्वांविरुद्ध आहे; आणि असा संग्रह करणारे मजूर देखील सोशियालिस्टपक्षाचे आहेत असें मानण्यांत येतें! याशिवाय आणखी विशेष आश्चर्याची गोष्ट ही आहे कीं, खाजगी मिळकतीविरुद्ध सोशियालिस्टांची जी मोहिम चाललेली असते, तिच्या खर्चाकरतां घरवाले, म्हणजे स्वतःची मिळकत करणारे, मजूरदार वर्गणी देतच असतात. ते असें म्हणतात कीं, 'भावी राज्य' (Future state) केव्हां होईल तेव्हां होईल; तोंपर्यंत घरेंदारें करून रहावयाला आम्हांला कोणची हरकत आहे? आम्हीं नियमाप्रमाणें वर्गणी दिली म्हणजे झालें. मजूरवर्गाची ही वागणूक आपण लक्ष्यांत घेतली म्हणजे सोशियालिझमचें तारूं सुकाणूवाल्याला दाद न देतां कसें भलतीकडे झुकत चाललें आहे, हें तेव्हांच दिसून येईल!

सोशियालिझमला सध्यां जें ग्रहण लागलें आहे त्याचें आणखी एक बलवत्तर कारण असें आहे कीं, पार्लमेंटमध्यें सोशियालिस्टांच्या ज्या चळवळी चालू होत्या त्यांनां यावें तसें मुळींच यश आलें नाहीं. आपली स्थिति सुधारून धनिकवर्गाच्या कचाटींतून मजुरांनां जर मुक्त व्हावयाचें असेल तर त्यांनीं आपलें राजकीय सामर्थ्य वाढविलें पाहिजे, असें साठ वर्षांपूर्वीं त्यांचा मुख्य पुढारी कार्लमार्क्स यानें सांगितलें होतें. सोशलडेमोक्रॅट्सचा पक्ष संख्येच्या मानानें आज जितका बळकट आहे तितका इतर कोणचाहि जर्मनींतील राजकीय पक्ष बळकट नाहीं. परंतु आपआपसांत एकजूट नसल्यानें ही बळकटी केवळ वरपांगी आहे, व्यव-

ह्यारांत तिचा तादृश फायदा मुळींच होत नाहीं. याचें कारण हें आहे कीं, यांची काम करण्याची पद्धति पायाशुद्ध नाहीं. पार्लमेंटांत एखादा विषय निघाला म्हणजे त्याला नस्ते फरगडे फोडीत बसावयाचें, किंवा त्यांत कांहीं तरी विघ्न उपस्थित करावयाचें, हा त्यांचा नेहमींचा क्रम. अशानें त्यांचें राजकीय महत्त्व थोडेंच वाढणार आहे ? महत्त्व वाढावयाला हातून कांहीं तरी लोकोपयोगी काम झालें पाहिजे. केवळ कुत्सित टीका करण्यानें किंवा चालत्या गाड्याला खीळ घातल्यानें तें कधींहि वाढावयाचें नाहीं. सोशियालिझमचें राजकीय बाबतींत घोडें जें नडतें तें येथें कीं, आपल्याला पाहिजे आहे काय, हें त्या लोकांनां पूर्वींहि केव्हां कळलें नाहीं किंवा अझूनहि नीटपणें कळत नाहीं. "देशाचा कारभार तुमच्या मतानें कसा चालवावा तें सांगा" असा या लोकांनां प्रश्न केला म्हणजे त्याचें उत्तर देण्याची ते टाळाटाळ करतात. "राइशटॅगमध्यें तुमचें मताधिक्य झालेंच तर तुम्ही करणार काय ?" असा एका सभासदानें नुक्ताच प्रश्न केला होता. तेव्हां हर बेबेलनें पुढें लिहिल्याप्रमाणें उत्तर दिलें:—"आमचें मताधिक्य झालें तर आम्ही आपल्या कल्पनांप्रमाणें देशाचा राज्यकारभार चालवूं; आणि परराष्ट्रांशीं आम्ही अशी वागणूक ठेवूं कीं, जगांत जिकडे तिकडे शांतता नांदूं लागेल. आम्ही स्वतः शांतता राखूं आणि आपल्या उदाहरणानें लोकांनां ती राखावयास लावून मनुष्यजातीच्या संस्कृतींत भर घालूं." हे विचार उदात्त आहेत; पण त्या विचारान्वयें आचार कसा करावयाचा याचें उत्तर यांत कोठें आहे ? सोशियालिस्ट पक्षाचा हर पार्व्हस ( Herr Parvas ) या नांवाचा एक प्रसिद्ध लेखक आहे त्यानें एका वाक्यांत सोशियालिस्टांच्या प्रस्तुतच्या स्थितीचें मोठ्या मार्मिकपणानें वर्णन केलें आहे. तो म्हणतो, "स्वतःच्या कार्यक्रमाशीं विसंगत असणाऱ्या निरनिराळ्या मतांचा संचय आमच्या पक्षानें फारच चांगल्या तऱ्हेनें केला आहे!" सोशिया-

लिस्टपक्ष म्हणजे येथून तेथून एक, त्यांत फाटाफूट किंवा निराळे पंथ नाहींत असें म्हणावयाचें मात्र; पण वास्तविक पाहिलें तर त्यांच्यांत नाना मतें आणि नाना पंथ आहेत व त्यांपैकीं बरेच एकमेकांला मारक आहेत. ज्या व्यक्तींच्या हातांत मुबलक भांडवल आहे त्यांचा द्वेष करण्यांत मात्र कोणाचा मतभेद नाहीं, आणि माळेचे मणि जसे एका सूत्रानें एकमेकांशीं संलग्न असतात तसे या पक्षांतील लोक या एका गोष्टीनें मात्र एकमेकांशीं संलग्न झालेले आहेत. बाकीच्या गोष्टींत एकाचें तोंड पूर्वेकडे तर दुसऱ्याचें पश्चिमेकडे अशी स्थिति आहे. उदाहरणार्थ, अनियंत्रित व्यापारपद्धति असावी असें यांचें मुख्य तत्त्व; परंतु व्यापार संरक्षित असावा असें जोरानें प्रतिपादन करणारे लोक यांच्यांत आहेत. शेतीला मागें सारून उद्योगधंद्यांनां उत्तेजन द्यावें हें यांचें मूळचें तत्त्व; परंतु शेतीची जोपासना अगोदर केली पाहिजे, उद्योगधंदे बुडाले तरी हरकत नाहीं, हें मत प्रतिपादन करणारे ग्रंथकारहि यांच्यांत आहेत. वसाहतींचें राज्य नको असें या पक्षाचें लेखी मत प्रसिद्ध झालेलें आहे; परंतु आम्हांला वसाहती नकोत, असें म्हणणारा ठराव मात्र यांच्या कांग्रेसमधून कधींहि पास केला जात नाहीं. सरकारानें पदरचे पैसे खर्चून सैन्य ठेवूं नये असें यांचें म्हणणें आहे; पण तें देखील कागदांतल्या कागदांतच राहतें, उघडपणें पुढें येऊन केव्हांहि त्याचें कोणी प्रतिपादन करीत नाहीं.

ज्या पक्षांत अशा प्रकारची फाटाफूट आहे, त्या पक्षाच्या हातून राज्याला किंवा समाजाच्या सुस्थितीला केव्हांहि धक्का पोंचण्याची विशेषशी भीति नसते. गुणदोषविवेचनाच्या कामांत जर्मन लोकांची पहिल्यापासून ख्याति आहे. हा त्यांच्या अंगचा गुण शेवटपर्यंत जर असाच कायम राहिला, तर सोशियालिझमची डाळ जर्मनींत फार दिवस शिजणार नाहीं. विध्वंस हें जर्मन सोशियालिझमचें प्रधान लक्षण आहे.

जर्मन समाजाचा विध्वंस करण्याचें काम या पक्षानें तूर्त आपल्या हातांत घेतलें आहे. परंतु सुदैवाची गोष्ट ही आहे कीं, जर्मन समाजाचा विध्वंस होण्याऐवजीं या पक्षाचाच विध्वंस होण्याचा, निदान त्याच्या मूळच्या स्वरूपांत पालट पडण्याचा तरी, काळ समीप येत चालला आहे. आपल्या डोळयांपुढें एक ध्येय ठेवून तें साध्य करण्याच्या कामांत एकदिलानें साहाय्य करणारे लोक ज्या पक्षांत आहेत अशा पक्षाच्या हातून, राजकीय परिस्थिति प्रतिकूल असूनहि, जर्मनींत फार मोठें कार्य झालें असतें. परंतु सोशल डेमोक्रॅट्सची बाजू लंगडी पडली ती येथेंच! मजुरांपुरतेंच यांचें कार्यक्षेत्र नसून सर्व जगाला कवटाळण्याचा यांचा यत्न चालू असतो. ज्या सांपत्तिक पायावर समाजाची रचना झाली आहे, तो पाया सुधारण्याची तेवढी खटपट करावयाची सोडून देऊन त्याबरोबरच शास्त्रें, कला, तत्त्वज्ञान आणि धर्म यांची सुधारणा करण्याचा ते डौल घालतात. यामुळें 'एक घड ना भाराभर चिंध्या' असा त्यांचा नेहमीं प्रकार होतो, व आपआपसांत फाटाफूट होते. एका पक्षांतील तीस-बत्तीस लाख धडधाकट माणसें आज अनेक वर्षेंपावेतों हवेला काठ्या मारण्याचा व्यर्थ उद्योग करीत आहेत. हा विलक्षण आणि शोकप्रद देखावा जर्मनीच्या राजकीय वातावरणांत जसा पहावयास सांपडतो तसा अन्यत्र कोठेंहि सांपडावयाचा नाहीं!

सोशियालिस्ट पक्षांतील जुन्या पुढाऱ्यांच्या दुराग्रहीपणामुळें समाजाचें हित आजवर त्या पक्षाला साधतां आलें नाहीं. परंतु हा दुराग्रहीपणा हल्लींच्या पिढींतील तरुण पुढारी तसाच चालू ठेवतील असें वाटत नाहीं. हर व्हॉन व्हॉलमर (Hear Von Vollmar) सारखे अनेक* लोक हल्लीं

---

*. या लोकांपैकीं बर्नस्टीन (Bernstein) या गृहस्थाच्या नांवाचा उल्लेख मि. डॉसन यांनीं कसा केला नाहीं याचें आश्चर्य वाटतें. या मनुष्याला प्रिन्स बिस्मार्कनें हद्दपार केला होता. आपल्या हद्दपारीचीं बहुतेक वर्षें त्यानें इंग्लंडांत

असें प्रतिपादन करीत आहेत कीं, यापुढें आपल्या हातून कांहीं विशिष्ट कार्य घडेल असा नवीन कार्यक्रम आपण ठरविला पाहिजे. सोशियालिस्ट वर्तमानपत्रांतून देखील याच मताचा अनुवाद होत आहे. राष्ट्रांत जो प्रागतिक पक्ष आहे, त्याला रुचेल अशी काम करण्याची पद्धति सोशियालिस्टांनीं हुडकून काढली, तर ज्या विषयांत दोघांची एकवाक्यता आहे त्या विषयांपुरतें तरी यश मिळण्याला हरकत पडणार नाहीं, अशा झोकाचे लेख वर्तमानपत्रांत येऊं लागले आहेत. राइशूटॅगमधील हर ह्यु ( Here Hue ) नांवाच्या सोशियालिस्ट पुढाऱ्यानें नुक्तेच पुढें लिहिल्याप्रमाणें उद्गार काढले आहेत:—"जर्मन नागरिकांत जे खरे खरे प्रागतिक आहेत त्यांच्या साहाय्यानें जर आपण उद्योग करूं लागलों तर लोककल्याणाचीं कांहीं तरीं कृत्यें आपल्या हातून झाल्याशिवाय राहणार नाहींत. प्रगतीला विरोध करणारे लोक आपआपसांत जसे एकदिलानें वागतात, तसे ज्ञान आणि स्वातंत्र्य मिळविण्याकरतां जे जे लोक आजपर्यंत वेगवेगळ्या मार्गांनीं खटपट करीत आले आहेत, त्या सर्वांनीं एकदिलानें वागण्याचा निश्चय केला पाहिजे." सोशियालिस्टांच्या वृत्तींत अशा प्रकारचा पालट पडल्यानें राइशूटॅगमधील कोणच्याच पक्षाशीं आतांपर्यंत त्यांचें जें जुळत नव्हतें तें यापुढें रॅडिकल किंवा नॅशनल लिबरल

---

राहून काढलीं. इंग्लंडांत त्याला जो अनुभव आला त्यावरून त्याचीं पूर्वींचीं एककल्लीपणाचीं बरींच मतें बदललीं. त्याच्यावर सुटलेलें पकडवारंट पुढें कांहीं वर्षांनीं रद्द झालें, तेव्हां तो परत स्वदेशीं आला, व आपलीं नेमस्त मतें प्रतिपादन करूं लागला. जहाल सोशियालिस्टांनीं याबद्दल त्याचा जोरानें निषेध केला. तरी त्यानें आपला उद्योग सोडला नाहीं. पुढें हळूहळू पुष्कळ लोक त्याच्या पक्षाला येऊन मिळाले. शेवटीं तो एका सोशियालिस्टांच्या मतदारांच्या संघातर्फे राइशूटगॅमध्यें निवडून आला. तेव्हांपासून नेमस्त सोशियालिस्टांचा तो पुढारी आहे असें मानण्यांत येतें.

यांसारख्या पक्षांबरोबर जुळूं लागेल, आणि समाजसुधारणेचें थोडेंसें काम तरी त्यांच्या हातून होईल असें वाटूं लागलें आहे. दक्षिण जर्मनींतील लोक उदारमतवादी आहेत, हें मागें सांगितलेंच आहे. त्याचप्रमाणें त्या भागांतील सोशियालिस्ट लोक देखील कमी हटवादी आहेत व इतर राजकीय पक्षांशीं सलोख्यानें वागण्याची प्रवृत्ति त्यांच्यांत विशेष आहे. बजेटावर पार्लमेंटांत वादविवाद सुरू झाला असतां त्यावर सोशियालिस्टानें मत देतां उपयोगी नाहीं, असा त्यांचा नियम आहे. कारण, बजेटावर मत देणें म्हणजे चालू असलेली राज्यपद्धति कबूल करण्यासारखें आहे. असें जरी आहे, तरी बव्हेरिया, वुर्टेम्बुर्ग आणि बेडन या दक्षिणेंतील संस्थानांच्या पार्लमेंटमधील सोशियालिस्ट सभासद या विषयावर धडकून मतें देतात, व असें करण्यांत आपण आपल्या पक्षाचे नियम उल्लंघीत आहोंत, हा विचार देखील त्यांच्या मनांत येत नाहीं. उत्तरेकडील सोशियालिस्टांचा क्रम याच्या उलट आहे. त्यांच्या मतें बजेट ही एक अपवित्र वस्तु आहे आणि तिचा ते आपल्याला मुळींच स्पर्श होऊं देणार नाहींत; म्हणजे ते करतात काय, तर मतें देण्याची वेळ आली असतां सभेंतून चालते होतात. बजेटावर मत दिल्यानें प्रचलित राज्यपद्धति कबूल केल्यासारखें होतें असें जर आहे, तर त्याच राज्यपद्धतीनें घालून दिलेले निवडणुकीचे नियम ते कां पाळतात ? आणि त्या नियमांअन्वयें निवडून येऊन पार्लमेंटमध्यें तरी हे कसे बसतात ? एकूण साराच पोरकटपणा. आम्हीं देखील या गोष्टीचा येथें जो उल्लेख केला तो एवढ्याकरतांच कीं, एकदां जो वर्तनक्रम ठरला त्यांत परिस्थित्यनुरूप मुळींच फेरबदल करावयाचा नाहीं, अंधपरंपरेनें तोच सदासर्वकाळ चालू ठेवावयाचा, हा सोशियालिस्टांचा दुर्गुण आहे; आणि या दुर्गुणापायींच व्यवहारदृष्ट्या हे लोक अगदीं नादान ठरले आहेत.

लोकसत्ताक राज्य हा एक सोशियालिस्ट कार्यक्रमांतील विशेष

महत्त्वाचा भाग आहे. उत्तर जर्मनींतील सोशियालिस्ट राजाची सत्ता मानणारे नाहींत (असें तोंडानें म्हणावयाचें); परंतु दक्षिणेंतील सोशियालिस्ट राजाला फार मान देतात व राजघराण्याविषयीं मनांत विशेष आदर बाळगतात. राजांनां पुत्रप्राप्ति झाली असतां राजवाड्यांत जाऊन सोशियालिस्ट पुढाऱ्यांनीं आनंद प्रदर्शित केल्याचीं उदाहरणें बेडन, वुर्टेम्बुर्ग व बव्हेरिया या संस्थानांत घडलीं आहेत. तेथील मजुरांच्या घरांत सोशियालिस्ट पुढाऱ्यांच्या बरोबरीनें राजाराणीच्या तसबिरी लटकत भिंतीवर असलेल्या आपणांस पहावयास सांपडतात. असो. या गोष्टीवरून तात्पर्य निघतें तें हें कीं, दक्षिण जर्मनींतील सोशियालिस्ट इतर लोकांशीं मिळूनमिसळून वागतात व सारासार विचाराला अजीबात फांटा न देतां आपलीं मतें इतर राजकीय पक्षांनां मान्य होतील अशा बेतानें प्रतिपादन करतात. तरी पण सोशियालिस्टांच्या पटांतून त्यांचीं नावें कोणीं काढून टाकलीं नाहींत किंवा त्याबद्दल त्यांनां कोणीं वाळींत टाकलें नाहीं. दक्षिण जर्मनींतील आपल्या बंधूंचा कित्ता इतर ठिकाणच्या सोशियालिस्टांनीं जर गिरविला तर त्यांच्यावरचा एककल्लीपणाचा व व्यवहारशून्यतेचा आरोप नाहींसा होऊन समाजसुधारणेचें काम त्यांच्या हातून कांहीं तरी होईल. हें काम त्यांच्या हातून घडून येण्याला हल्लींचा बादशहा कायसर यानेंहि मदत केली पाहिजे. कायसरच्या मनांत या लोकांविषयीं इतका कांहीं द्वेष खिळून गेला आहे कीं, तो त्यांनां आपल्या वाऱ्याला देखील उभे राहूं देत नाहीं. सोशियालिस्टांचा नायनाट करण्याच्या बुद्धीनें त्यानें त्यांच्या पुढाऱ्यांचा नाहीं नाहीं तो छळ केला; परंतु इतका छळ करून देखील त्यांचें डोकें वर आहे तें आहेच. सोशियालिस्टांचीं मतें बरींच चुकीचीं आहेत, राजसत्ता त्यांनां नको आहे; परंतु नागरिकांचे इतर गुण त्यांच्या अंगांत पुष्कळ आहेत. त्यांचा जितका होईल तितका उपयोग करून घेण्याचें कायसरनें जर

मनांत आणलें तर दुधांत साखर पडल्यासारखें होईल.

सोशियालिस्टांच्या मतांत आतां नेमस्तपणा दिसूं लागला आहे, यामुळें त्यांच्या हातून यापुढें देशकल्याणाचीं कामें होण्याचा विशेष संभव दिसतो; असें आम्ही म्हणतों, यावरून सोशियालिस्टांच्या हातून लोकसेवेचीं कामें आतांपर्यंत मुळींच झालीं नाहींत, असें वाचकांनीं समजूं नये. प्रिन्स बिस्मार्कनंतर चॅन्सेलरच्या जागीं आलेला कौंट कॅप्रिव्हि ( Count Caprive ) यानें जे व्यापारसंबंधीं तह केले व ज्यांच्या-योगानें जगाला थक्क करून सोडणारी जर्मनीची व्यापारांत व उद्योग-धंद्यांत प्रगति झाली, त्या तहांना राइश्टॅगमधील सोशियालिस्ट सभा-सदांनीं आपलें पूर्ण अनुमोदन दिलें होतें. हें अनुमोदन मिळालें नसतें तर ते तह पसंत झाले नसते. ही गोष्ट खुद्द कायसरलादेखील कबूल आहे, हें लक्ष्यांत घेण्याजोगें आहे. निरनिराळ्या संस्थानांतील पार्लमेंटांत व खुद्द राइश्टॅगमध्यें मजूरवर्गाच्या म्हणजे आपल्या अनुयायांच्या कल्याणार्थ या लोकांनीं जी खटपट केली ती तर केवळ अवर्णनीय आहे. आपल्या अनुयायी वर्गाकरतां त्यांनीं खटपट केली यांत विशेष तें काय केलें, असें म्हणून त्यांना नांवें ठेवणाऱ्या लोकांनीं हें विसरतां कामा नये कीं, मजुरांचें ज्यांत कल्याण आहे त्यांतच सर्व राष्ट्राचेंहि आहे. राइश्टॅगच्या निरनिराळ्या कमेट्यांत इतर लोकांपेक्षां या लोकांनीं मनापासून व फार श्रम घेऊन अनेक कामें केलीं आहेत. राइश्टॅगमधील इतर सर्व बहु-तेक सभासद अधिकाऱ्यांच्या मताला मान डोलविणारे व राजसत्तेनें दिपून गेलेले आहेत. सोशियालिस्ट त्या सभेंत आहेत म्हणून स्वतंत्रतेचीं उदात्त तत्त्वें निर्भयपणानें तेथें प्रतिपादिलेलीं आपल्याला ऐकूं तरी येतात. त्या सभेंतून त्यांना जर का हुसकून लाविलें, तर तिची फारच निकृ-ष्टावस्था होईल व अधिकाऱ्यांच्या इच्छेविरुद्ध लोकोपयोगी एकहि कायदा तेथें पास होणार नाहीं. या दृष्टीनें विचार केला म्हणजे सोशिया-

लिस्टांनां 'समाजविध्वंसक' म्हणणें चुकीचें आहे. त्यांचीं कांहीं मतें विक्षिप्तपणाचीं व अव्यवहार्य आहेत, परंतु त्यांचाहि हळूहळू ते त्याग करूं लागले आहेत, व हें त्यांच्या भावी उत्कर्षाचें चिन्ह आहे. यासंबंधानें पुढें दिलेला इंग्रजी उतारा वाचकांनीं मनन करण्याजोगा आहे, इतकें सांगून हा भाग आम्ही पुरा करतों.

"Thus looking over the vast field of German socialism, the unbiassed observer finds much that he cannot help admiring. The cohorts and legions that obey the socialist trumpet-call are by no means the dullards and fools which persons not acquainted with the real facts are prone to fancy them. What the final issue of the struggle will be which the socialist party, single-handed, is making against all the powers of government and society there, it is too early to predict. Certain it is, however, that the party is making head way and that it is gaining over to its ranks an increasing percentage of the cultured middle classes as well. It is also certain that just at present at least there is no prospect of a more liberal form and spirit of government save and alone through this very socialist party. Shorn of its revolutionary character, freed from its former visionary features, and reduced to a radical and democratic reform programme, there seams no valid reason why this party should not have a great future in store. It alone, of the score of political parties and factions in the Empire, has great ideals and aims, and it alone is a living and growing force, throbbing with power, with hope, and with faith in its own destiny." —Wolf Von Schierbrand. (1903)

प्रकरण २३ वें

# पोलंडांतील पोलिश लोकांचा प्रश्न

प्रशियाच्या ताब्यांतील पोलिश प्रांतांत हल्लीं जी राज्यव्यवस्था चालू आहे, ती तेथील लोकांनां पसंत नसल्यानें तिच्यांत फेरबदल करणें सरकारला भाग पाडावें या हेतूनें तेथें चळवळ सुरू असल्याचीं स्पष्ट चिन्हें अनेक दिसूं लागलीं आहेत व त्यामुळें पोलिश प्रश्नाला, निदान प्रशियापुरतें तरी, विशेष महत्त्व आलें आहे.

जुन्या पोलंडचा जो भाग प्रशियन सत्तेखालीं आहे, तेथील सांपत्तिक स्थिति उत्तम प्रकारची आहे, लोक बुद्धिमान् आहेत, आणि म्हणूनच तेथील लोकांत पोलिश राष्ट्रीय भावना विशेष प्रज्वलित आहे. पोलंडचा आस्ट्रियाच्या ताब्यांत जो प्रांत आहे त्याला गॅलीशिया असें म्हणतात. त्या प्रांतांतील लोकांनां स्वराज्याचा अनुभव बरेच दिवस मिळाला असल्यानें तेथील पोलिशची राजकीय व सामाजिक स्थिति समाधानकारक आहे. परंतु सांपत्तिक बाबतींत व लोकांच्या हुशारीच्या मानानें प्रशियन पोलिश प्रांताचा आस्ट्रियन पोलिश प्रांताच्या वर नंबर लागतो. रशियन पोलंड तर या दोन बाबतींत आस्ट्रियन पोलंडच्या देखील फार मागें आहे. प्रशियाची सत्ता पोलंडमधील लोकांनां नकोशी कां वाटते, याला अनेक कारणें आहेत, परंतु जातिभेद आणि धर्मभेद हीं कारणें त्यांत प्रमुख आहेत.

पोसेन आणि वेस्ट प्रशिया या दोन प्रांतांत पोल्सची संख्या अधिक असल्यानें प्रशियाच्या त्या दोन प्रांतांनांच ‘ पोलिश ’ ही संज्ञा देणें अन्वर्थक आहे. तथापि, ईस्ट प्रशिया आणि सायलीशिया या प्रांतांतील कांहीं भागांत निव्वळ पोल्सचीच वस्ती आहे. या भागांत पोलिशचळवळ अलीकडे सुरू झाली आहे. परंतु ती इतकी जोराची आहे

कीं, राइश्टॅग आणि डाएटमधील नुक्त्याच झालेल्या निवडणुकींत पोलिश पक्षाचेच प्रतिनिधि त्या भागांतर्फे निवडून आले आहेत. या चार प्रांतांमिळून पोलिश जातीचे व पोलिश भाषा बोलणारे पंचवीस लाख लोक आहेत. याशिवाय सर्व जर्मन राष्ट्रभर, विशेषतः वेस्ट फालिया, ऱ्हाईन, साक्सेन व खुद्द बर्लिन शहर व त्याच्या आसपासचा भाग येथें हे लोक पसरले आहेत व त्यांची संख्या जवळजवळ पांच लाख आहे. या लोकांपासून देखील प्रशियन राज्याला भीति उत्पन्न होऊं लागली आहे; परंतु खरी भीति जी आहे ती या लोकांची नसून वर सांगितलेल्या दोन पोलिश प्रांतांतील लोकांची आहे.

१८४६ त राशिया व आस्ट्रिया येथें व १८६३ त एकट्या रशियांत जेव्हां पोलिशबंडें उपस्थित झालीं तेव्हां त्यांची छाया प्रशियन मुलखांवरहि पडली होती. प्रशियन लष्कराच्या कांहीं तुकड्या व पोलिश बंडखोर यांच्यांत थोड्याशा चकमकी झाल्या; परंतु बंडखोरांची लढण्याची तयारी चांगलीशी नव्हती, म्हणून या दोनहि प्रसंगीं प्रशियांत पोलिश बंड असें झालें नाहीं. १८६३ सालापासून प्रशिया आणि राशिया येथें पोलिश प्रजेंत त्या त्या राजसत्तेविषयीं असंतुष्टता उत्पन्न झाली आहे व ती आंतल्याआंत धुमसत आहे.

पोलिश प्रांतांत जी आधिभौतिक सुधारणा झालेली दिसते, तिचें सर्व श्रेय प्रशियालाच दिलें पाहिजे, व त्याचीं कारणेंहि तशींच सयुक्तिक आहेत. हे प्रांत ज्या वेळेस (म्हणजे १७७२ सालीं) प्रशियन राज्यांत सामील झाले त्या वेळेस ते फार निकृष्टावस्थेंत होते; व ही गोष्ट पोलिश ग्रंथकार देखील कबूल करतात. हे प्रांत आपल्या ताब्यांत घेतल्याबरोबर त्यांची सुधारणा करण्यास फेडरिक दी ग्रेटनें (१७४० ते १७८६) आरंभ केला. फ्रेडरिक दी ग्रेटच्या १७७२ पासून बाकी राहिलेल्या चवदा वर्षांच्या कारकीर्दींत पोलिश प्रांतांतील लोकसंख्या शेंकडा पन्नास

वाढली व सांपत्तिक स्थितिहि चांगली सुधारली. त्याच्या पश्चात् प्रशियन तक्तावर बसलेल्या राजांनींहि हेंच सुधारणेचें धोरण कमीअधिक प्रमाणानें कायम ठेवलें होतें. १८०६ ते १३ या सात सालांत नेपोलियननें प्रशियांत धुमाकूळ मांडला होता व पोलिश प्रांत त्याच्यापासून हिरावून घेतले. त्या मुदतींत मात्र त्या प्रांतांची बरीच धूळधाण झाली होती. परंतु नेपोलियनचा पराभव झाल्यावर युरोपांत सर्वत्र शांतता झाली, प्रशियाचे गेलेले प्रांत पुनः त्याला मिळाले, व सुधारणेचें काम पुनः पहिल्याप्रमाणें सुरू झालें.

तथापि, पहिला जर्मन बादशहा पहिला वुइल्यम याच्या कारकीर्दीत (१८६१ ते १८८८) १८६३ सालापासून पोलिश प्रांतांची सांपत्तिक सुधारणा फार झपाट्यानें होऊं लागली, त्यापूर्वी ती बेताचीच होती. गेल्या चाळीस पन्नास वर्षांच्या अवधींत प्रशियांतील पोलिश प्रांताची संपत्ति चौपट वाढली आहे. पोलिश सरदार पूर्वीच्या काळांत आपली सर्व संपत्ति चैनींत व व्यसनांत उधळून टाकीत असत. हा प्रकार आतां अगदीं पालटला आहे व त्यांच्याजवळचा पैसा पोलिश बँकांत येऊन सांठूं लागला आहे. शेतीची जुनी पद्धति नाहींशी होऊन तिच्याऐवजीं शास्त्रीय पद्धति सुरू झाली आहे व पूर्वींचे जुने नांगर, आउतें वगैरे जाऊन त्यांच्या जागीं शेतीचीं यंत्रें आलीं आहेत. लहान शेतकरी चांगले सांवरले आहेत, आणि मोठ्या शेतांत बीटची साखर करण्याचे व दारू गाळण्याचे कारखाने सुरू झाल्यानें त्यांच्या मालकांनां जास्त फायदा पडूं लागला आहे. खाणींतील अपार संपत्तीकडे पहिल्यानें कोणाचेंच लक्ष्य नव्हतें; परंतु अलीकडे शास्त्रीय पद्धतीनें खाणींतील संपत्ति भराभर बाहेर निघूं लागली आहे. सायलीशियाच्या वरच्या भागांत लोखंड व कोळसा यांचा व्यापार फार वाढला आहे, व पश्चिम प्रशियांतील मीठ व लोखंडाच्या खाणी यांत चांगला नफा

होऊं लागला आहे. शेतांत वरिष्ठ प्रतीचें प्रत्येक धान्य हल्लीं उत्पन्न होत आहे, आणि घोडे व इतर जनावरें यांची जोपासना चांगली होऊं लागली आहे. शेतीचीं प्रदर्शनें आतां प्रत्येक ठिकाणीं नियमानें भरूं लागलीं आहेत.

तथापि, पोलिश प्रांतांचें खरें कल्याण जर कोणचें झालें असेल तर तें हें कीं, तेथील मध्यम स्थितींतील लोकांची स्थिति अलीकडे विलक्षण तऱ्हेनें सुधारली आहे. पोलंड हें राष्ट्र या नात्यानें जें अधोगतीला पोंचलें, त्याचें मुख्य कारण हेंच असावें कीं, मध्यम स्थितींतील हुशार व बुद्धिमान् लोकांचा भरणा तेथें कमी होता. सुमारें पंचवीस-तीस वर्षांपूर्वी पोलिश शहरांत मध्यम स्थितीचे लोक पहावयाचे झाले तर ते जर्मन आणि ज्यू या लोकांतच आढळत होते. आज त्या लोकांना मागें सारून त्यांच्या जागा तरुण आणि सुशिक्षित पोल्सनीं पटकावल्या आहेत. पोलिश व्यापारी, पेढीवाले, दुकानदार, यंत्रकार, शिल्पकार, वैद्य, वकील आणि एंजिनियर यांचा भरणा आतां किती तरी मोठा झाला आहे !

अगदीं अलीकडे या प्रांतांच्या कल्याणाची आणखी महत्त्वाची योजना झाली आहे ती अशी कीं, सरकारनें दरवर्षी एक कोटी मार्क्स (१ पौंड म्हणजे २०·४ मार्क्स) खर्च करून चांगलीं मजबूत शाळागृहें, सार्वजनिक पुस्तकालयें, अजबखाने, आणि उच्च प्रतीच्या शिक्षणाकरतां इमारती—पोसेन व डँटाझिक यांसारख्या मोठ्या शहरांपुरत्या मात्र—बांधाव्या असें ठरविलें आहे. आणि हा क्रम अमुक वर्षें चालावा हें निश्चित केलेलें नाहीं, हें त्यांत विशेष आहे. वरील सर्व संस्थांनां द्रव्याची उणीव कधींहि न भासेल अशीहि आणखी सरकारनें तजवीज करून ठेवली आहे.

इतकें झालें तेव्हां शिक्षणाची वाढहि त्या प्रांतांत झपाट्यानें होत

आहे हें निराळें सांगावयास नकोच. रशियन पोलिश प्रांतांत शिक्ष-णाचें पाऊल अजून फार मागें आहे. नुकत्याच प्रसिद्ध झालेल्या माहिती-वरून असें दिसतें कीं, रशियांतील पोलिश प्रांतांत शेंकडा वीस लोक लिहिणारे वाचणारे आहेत व प्रशियांतील शेंकडा तीन लोक निरक्षर आहेत; हा केवढा विलक्षण फरक! सक्तीचें शिक्षण आतां तेथें सुरू करण्यांत आलें आहे. १८८० सालापासून जर्मन युनिव्हर्सिटयांत शिक्षण संपादन करणाऱ्या पोलिश विद्यार्थ्यांची संख्या पूर्वीपेक्षां दसपट जास्त झाली आहे. पोलिश जातीच्या जर्मन विद्वानांनीं आपल्या विद्वत्तेचा प्रभाव विशेष प्रसंगीं अनेक वेळां दाखविला आहे. डँटझिक येथें धंदे-शिक्षणाचें हायस्कूल काढण्याचा सरकारनें विचार केला आहे व त्याला पैशाची भरपूर मदत करण्याचें ठरविलें आहे. हें हायस्कूल स्थापन झालें म्हणजे धंदेशिक्षणाचीहि उत्तम सोय लागेल.

सारांश, पोलिश प्रांतांतलि संपत्ति आणि लोकांचें बुद्धिसामर्थ्य वाढ-विण्याकडे प्रशियन सरकारनें किती लक्ष्य पोंचविलें आहे आणि उदार अंतःकरणानें किती पैसा खर्च केला आहे, याबद्दल कोणाच्याहि मनांत शंका येणार नाहीं. आतां ही गोष्ट खरी आहे कीं, प्रशियाच्या पश्चिम भागांतील संपत्ति व तेथील लोकांची बुद्धिमत्ता या मानानें पाहूं गेलें असतां पोलिश प्रांतांचा नंबर या दोनहि बाबतींत बराच खालीं लागेल. तथापि त्या प्रांतांची पूर्वीची आणि हल्लींची स्थिति यांची जर तुलना करून पाहिली, तर या दोहोंत जमीनअस्मानाचें अंतर दिसेल यांत शंका नाहीं.

राजकीय बाबतींत मात्र प्रशियानें पोलिश प्रजेशीं जें वागणुकीचें धोरण ठेविलें आहे तें इतकें यशस्वी झालेलें नाहीं. पोलिश राष्ट्रीय आकांक्षा जागच्या जागीं दाबून टाकण्याचा रशियानें जसा अव्याहत-पणें उद्योग केला, त्याप्रमाणें प्रशियानें केला नाहीं व त्याकरतां जालिम

व दुष्ट उपाय अमलांत आणले नाहींत हें खरें; परंतु एक गोष्ट कबूल केली पाहिजे ती ही कीं, उत्तरेकडील प्रशियन्स व पोल्स या दोघांचें एकीकरण होण्याच्या बाबतींत धर्म व जाति यांसंबंधीं इतक्या कांहीं अडचणी प्रस्तुत व्यवस्थेनें उत्पन्न केल्या आहेत कीं, त्यांचा अनिष्ट परिणाम होऊन उलट दोघांचा बेबनाव झाल्याशिवाय रहात नाहीं. शिवाय दुसरी गोष्ट अशी आहे कीं, पोल्सनां जर्मन करून सोडण्याचे प्रशियानें आजपर्यंत जे अनेक यत्न केले, ते सुसंगत किंवा शहाण-पणाचे नव्हते. धड दडपशाहीचे उपायहि एकसारखे योजिले नाहींत, किंवा त्यांचें मन वळविण्याचे नैतिक उपायहि योजिले नाहींत. १७७२ सालापासून प्रत्येक प्राशियन राजाच्या कारकीर्दींचें धोरण या कामांत अगदीं निराळें होतें. या विषयांत आम्हीं फार मागें न जातां चाळीस वर्षांपूर्वीपासून म्हणजे पहिल्या वुइल्यमच्या कारकीर्दीपासून आतांपर्यंत कसे कसे प्रकार होत गेले याचेंच निरीक्षण करूं.

पोलिश घराण्यांतील एका सरदाराच्या रूपसंपन्न तरुण मुलीवर या राजाचें मन बसलें होतें, आणि तिच्याबरोबर लग्न करण्याचा त्याचा विचार होता. परंतु ही तरुणी जर्मन जातीची नाहीं, या एका गोष्टीमुळें त्याचा बाप तिसरा फ्रेडरिक वुइल्यम यानें या लग्नाला संमति दिली नाहीं; व त्यामुळें तें अर्थात् मोडलें. पहिल्या वुइल्यमच्या आयुष्यांत ही अद्भुत गोष्ट जेव्हां घडून आली, तेव्हांपासून पोल्सविषयीं त्याच्या मनांत एक प्रकारचें प्रेम उत्पन्न झालें होतें, व आमरण तें तसेंच टिकलें. त्यांतहि विशेषत: पोलिश सरदारांविषयीं त्याच्या मनांत जास्त प्रेम वागत होतें. यामुळें त्या दयाळू वृद्ध राजाच्या कारकीर्दींत पोलिश राजनीतीचें धोरण अनेक वर्षेंपावेतों स्नेहभावाचें आणि प्रसंगविशेषीं लाडिवाळपणाचें होतें, आणि त्याच्या दरबारांत पोलिश सरदारांच्या घराण्यांतील पुष्कळ लोक नेहमीं त्याच्या संन्निध असत. पोलिश राज्यकारभारांत त्याला सल्लामसलत

देणारा वर सांगितलेल्या तरुणीच्या घराण्यापैकींच एक सरदार होता.

परंतु १८७५ च्या सुमारास प्रिन्स बिस्मार्कच्या एका कृत्यानें रोमन-चर्च (धर्मसंस्था), अथवा धर्माधिकारी मंडळी (Hierarchy) असें म्हणणें जास्त सयुक्तिक होईल,—यांच्यांत व प्राशियन सरकारांत वितुष्ट उत्पन्न झालें. आज अनेक शतकें पोल्स हे रोमन कॅथलिक पंथाचे कट्टे अभिमानी आहेत. त्यांच्या धर्मसंस्थेच्या व्यवस्थेचे कांहीं नियम प्रशियन सकारानें घालून दिले होते. त्या नियमांन्वयें व्यवस्था करण्याचें सर्वस्वीं नाकबूल केल्यामुळें प्रिन्स बिस्मार्कनें पोलिश प्रायमेट (धर्मगुरु) याला पोसेन येथें तुरुंगांत टाकलें, व त्याच्याबरोबर दुसरे अनेक लहान धर्मोपदेशकहि (Clergy) तुरुंगांत कोंबले. या कृत्याचा (याला जर्मन भाषेंत Cultur kampf म्हणतात) दुहेरी परिणाम झाला. याच्या योगानें पोलिश उपाध्ये-मंडळ प्रशियाचें कट्टे शत्रु बनलें व त्यांनीं आपल्या शिष्यवर्गांत जर्मन लोकांविषयीं जेणेंकरून द्वेष उत्पन्न होईल असे उद्योग चालविले. या वेळेपासून या द्वेषाचें बीज जें एकदां लोकांच्या मनांत रुजलें तें पुढें तेथून केव्हांहि ढळलें नाहीं. आतां तर त्या बीजापासून मोठाच वृक्ष उत्पन्न झाला आहे. १८७५ सालापावेतों जातिद्वेष हेंच एक परस्परांतील वांकुडपणाचें कारण होतें; पण त्यांत आतां धर्मविषयक वादाचीहि भर पडली. तेव्हांपासून प्रशियांतील यच्चयावत् पोल्स आपले जर्मन शेजारीपाजारी व नागरिक यांनां आपल्या धर्माचे शत्रु लेखूं लागले. हा द्वेष जेणेंकरून जास्त विकोपाला जाईल अशा तऱ्हेचें धर्मगुरूंनीं आपलें वर्तन सुरू केल्याचा आजला असा परिणाम झाला आहे कीं, खालच्या दर्जाच्या पोल्सच्या मनांत देखील जर्मन लोकांविषयीं पहिल्या प्रतीचा द्वेष उत्पन्न झाला असून तो इतका दृढ होऊन बसला आहे कीं, पोल्सप्रमाणें जे कांहीं जर्मन कॅथलिक पंथाचे आहेत त्यांचा सुद्धां हे लोक तिरस्कार करूं लागले आहेत. याचें प्रत्यं-

तर राइश्टॅग आणि प्रशियन डाएटकरतां पोलिश प्रांतांतर्फे जेव्हां प्रतिनिधींची निवडणूक झाली तेव्हां मिळालें. कारण, त्या निवडणुकींत कोणीहि जर्मन कॅथलिक निवडून आला नाहीं, व वरील दोनहि सभांतील 'सेंटर' नांवाचा जो कॅथलिक पक्ष आहे त्याची तितकी बाजू लंगडी पडली.

तथापि इतकेंहि होऊन प्रिन्स बिस्मार्कनें धर्मसंस्थेची जी व्यवस्था सुचविली होती, ती शेवटीं अमलांत आली नाहीं ती नाहींच. आपल्या हातून ही मोठी चूक झाली असें खुद्द बिस्मार्कनें पुढें कबूल केलें, आणि शेवटीं त्याला पोपच्या सामर्थ्यापुढें मान वांकवावी लागली. पुढचा हा प्रकार ठीक झाला; पण त्यामुळें आरंभाला जी चुकी झाली व जो तिचा अनिष्ट परिणाम झाला तो कायमचाच होऊन बसला; व तो हा कीं, प्रॉटेस्टंट प्रशिया आणि जर्मनी व रोमन कॅथलिक पोलिश प्रांत या दोहोंत धर्मांच्या बाबतींत उत्पन्न झालेलें वितुष्ट दिवसानुदिवस वाढत चाललें. प्रशियाचा राजा आणि जर्मन बादशहा पहिला वुइल्यम याच्याविषयीं पोल्सच्या मनांत पूर्वीचें प्रेम शेवटपर्यंत थोडेंसें तरी कायम राहिलें होतें. परंतु हल्लींच्या दुसऱ्या वुइल्यमविषयीं (कायसरविषयीं) त्यांची मनोवृत्ति अगदीं निराळ्या प्रकारची आहे. पोलिश सरदार बर्लिनच्या दरबारांत आतां दिसत नाहींत. १८९७।९८ च्या सुमारास जर्मनींतील वर्तमानपत्रकार आणि आपले राजकीय सल्लागार यांच्या सांगीप्रमाणें दुसरा वुइल्यम आणि प्रशियन कॅबिनेट या उभयतांनीं पोलिश प्रांतावर जरा करडा अंमल चालविण्याचें ठरविलें. प्रशियन राजसत्ता उलथून पाडण्याचा पोल्सचा विचार आहे, ही गोष्ट विरुद्ध पक्षाच्या लोकांनीं बादशहाच्या मनांत पुरती भरवून दिली व ती त्याला पटल्यामुळें वरीलप्रमाणें त्यानें निश्चय केला. पोलिश प्रांतांत पोल्सच्या मानानें जर्मन लोकांची संख्या कमी आहे. या अल्पसंख्याक जर्मन्सनां पोल्स

बनवून सोडावयाचें (Polonization) असा त्या लोकांचा कृतसंकल्प आहे, असेंहि बादशहाच्या मनांत कोणीसें भरवून दिलें व त्यामुळें तो जास्तच खवळला. आतां 'पोलोनायझेशन्' हें प्रकरण काय आहे याचा येथें थोडासा खुलासा करणें ओघानें अवश्य आहे.

पोलंडचें पूर्वीप्रमाणें स्वतंत्र राज्य स्थापन करावयाचें हें पोलिश चळवळीचें अंतिम साध्य आहे, यांत शंका नाहीं. आपलें हेंच साध्य असल्याचें पोलिश वक्त्यांनीं व मुत्सद्द्यांनीं अनेक सार्वजनिक प्रसंगीं उघडपणें बोलून दाखविलें आहे. विशेष जहाल न जाणारे व बर्लिन येथील दरबारांत कांहीं दिवस काम केलेले पोलिश पुढारी देखील आपला हा संकल्प असल्याचें कबूल करतात. १९०० सालीं क्रॅको येथें एक मोठी पोलिश सभा भरली होती, त्या सभेंत अशा अर्थाचीं या लोकांनीं उघडपणें भाषणें केलीं. कायसरनें त्यामुळें त्या लोकांचीं नांवें आपल्या दरबारांतून कमी केलीं. प्रशिया व आस्ट्रिया येथील पोलिश वर्तमानपत्रांत या विषयाचा नेहमीं खल चालत असतो. पोलंडचें पूर्वीचें राज्य बाल्टिक समुद्रापासून काळ्या समुद्रापर्यंत पसरलेलें होतें. त्याचा विस्तार चार लक्ष चौरस मैल होता, व तेथील लोकसंख्या तीन कोट पन्नास लक्ष होती. एवढें मोठें राज्य शेजारच्या राजांनीं अपमतलबानें धुळीस मिळविलें. त्या धुळींतूनच नवीन राज्याची इमारत उठविण्याचा प्रत्येक पोलिश देशभक्ताचा इरादा आहे, असें या वर्तमानपत्रांत स्पष्ट म्हटलेलें असतें. हल्लींची तयारी जी आहे ती ही इमारत उठविण्याचीच आहे याविषयीं शंका रहात नाहीं. तथापि यावरून आपलें स्वप्न खरें करण्याकरतां पोल्स एखादी राज्यक्रांति घडवून आणतील असें मात्र निश्चयानें मानतां येत नाहीं. १८६३ सालीं ह्यांनीं अशा तऱ्हेचा यत्न करून पाहिला होता; पण त्यांत त्यांनां यश आलें नाहीं; उलट त्यांचे हजारों लोक मृत्युमुखीं पडले. या झालेल्या

हानीमुळें त्यांच्यांत बराच शहाणपणा आला आहे व प्रस्तुत ते आपले उद्योग फार सावधगिरीनें करीत आहेत. आपलें सामर्थ्य कशांत आहे, आपली कोणची बाजू कमी आहे, हें त्यांनां पूर्वीपेक्षां चांगलें कळूं लागल्यानें योग्य संधीची ते सध्यां वाट पहात बसले आहेत. उतावीळपणानें, किंवा चांगली तयारी केल्याशिवाय, ते कोणचेंहि धाडसाचें कृत्य करण्यास तयार होणार नाहींत, किंवा जगाच्या कोरड्या सहानुभूतीवरहि ते अवलंबून राहणार नाहींत. युरोपांतील बलाढ्य राष्ट्रांत पुढेंमागें लवकरच गुंतागुंतीचे प्रश्न उद्भवतील, किंवा रशियांत एकादी मोठी राज्यक्रांति घडून येईल (आणि यामुळेंच निहिलिस्ट लोकांत पोल्सचा विशेष भरणा आहे), किंवा हल्लींचा बादशहा मरण पावला म्हणजे आस्ट्रिया व हंगेरी या जोडराष्ट्रांचीं शकलें होतील, किंवा निरनिराळ्या राष्ट्रांत घनघोर युद्ध होऊन त्या युद्धांत सर्वच बलाढ्य राष्ट्रें कमजोर होतील, अशा प्रकारच्या भविष्यत्काळावर ते नजर ठेवून बसले आहेत. असा प्रसंग आलाच तर पोलंडचें स्वतंत्र राज्य स्थापन करण्याचा विचार कसा करावयाचा, त्या विचारानुरूप कोणची कृति करावयाची, हें त्या वेळच्या परिस्थितीला अनुसरून ठरवूं, असा मनाशीं संकेत करून तूर्त ते स्वस्थ बसले आहेत. दरम्यानच्या मुदतींत पोलिश क्षात्रतेज कायम ठेवावयाचें; राष्ट्रीय स्वातंत्र्य मिळविण्याची आकांक्षा प्रत्येक व्यक्तीच्या अंतःकरणांत जागृत ठेवावयाची; व हल्लीं चालू असलेल्या राजकीय चळवळी तशाच जोरांत चालू ठेवावयाच्या असा त्यांचा संकल्प आहे. आणि पोल्समध्यें, व विशेषतः प्रशियांतील पोल्समध्यें, शिक्षणाचा जों जों जास्त प्रसार होईल तों तों, वेळ येऊन ठेपली म्हणजे, जास्त चिकाटीनें ते शत्रूंशीं सामना देण्यास तयार होतील यांत शंका नाहीं.

याप्रमाणें रशिया, आस्ट्रिया आणि प्रशिया येथील पोल्सचा गेलेलें स्वातंत्र्य मिळविण्याचा जो कार्यक्रम आहे, त्याचें आम्हीं स्थूलमानानें

वर्णन केलें. आपल्या कार्यक्रमाचें स्वरूप काय आहे, हें क्रॅको, लेम्बुर्ग, वॉरसा, पोसेन आणि नेसेन यांसारख्या मोठमोठ्या शहरीं, राष्ट्रीय उत्सवाकरतां त्यांच्या वेळोवेळीं ज्या मोठ्या सभा भरल्या त्या सभांत त्यांच्या पुढाऱ्यांनीं स्पष्टपणें बोलून दाखविलें आहे. त्याच्या आधारानेंच आम्हीं वरील विवेचन केलें असल्यामुळें त्यांत चूक होण्याचा संभव नाहीं; असो.

पोलंडमध्यें 'सोकोल्स' (sokols) नांवाचे तालमीचे आखाडे पुष्कळ आहेत आणि त्या आखाड्यांत तयार होणारीं माणसें पुढें सैन्याला फार उपयोगीं पडण्याजोगीं असतात. किंबहुना, तशा प्रकारचें शिक्षणच त्यांनां तेथें मिळतें. १८१३ सालीं नेपोलियनची सत्ता झुगारून देण्याचा जेव्हां प्रशियांत उद्योग सुरू झाला, तेव्हां तेथेंहि अशा प्रकारचे आखाडे होते व त्यांतील माणसांचा लढाऊ सैन्य उभारण्याच्या कामांत फार उपयोग झाला. पोल्सनीं हल्लीं कशा प्रकारची चळवळ सुरू केली आहे याचें प्रशियन डाएटपुढें वर्णन करतांना हे आखाडे म्हणजे राजद्रोहाच्या भट्ट्या आहेत, असें एका राजमंत्र्यानें सांगितलें; व या आखाड्यांत कशा प्रकारचीं भाषणें होतात याचा मासला म्हणून त्यानें अनेक वक्त्यांचीं भाषणें सभेंत वाचून दाखविलीं. या भाषणांत राजद्रोह ओतप्रोत भरला आहे असें कोणीहि कबूल करील. प्रशियांतील पोलंडांत आखाड्यांची संख्या दोनशेंपासून तीनशेंपर्यंत आहे व त्यांतील मेंबरांची संख्या पन्नास हजारांपर्यंत आहे. या सर्व लोकांपाशीं हत्यारें असतात व त्यांनां लष्करी कवाईत शिकविण्यांत येते. गॅलिशियामध्यें आखाड्यांत जाणाऱ्यांची संख्या किती आहे हें निश्चयानें सांगतां येण्याजोगें नाहीं, परंतु ती बरीच मोठी असावी असा तर्क आहे. या विषयावर राशियन सरकारनेंहि आकड्यांची माहिती प्रसिद्ध केलेली नाहीं. तथापि एवढी गोष्ट निश्चित आहे कीं, यापुढें जर एखादें पोलिश बंड उपस्थित झालें, तर त्या बंडाला सोकोल्समध्यें लष्करी शिक्षण मिळविलेल्या

लोकांचें फार मोठें साहाय्य मिळाल्यावांचून रहाणार नाहीं.

पोलिश वाङ्मय, व त्यांतूनहि विशेषेंकरून रसात्मक काव्यें ( Lyrical poetry ) यांचा राष्ट्रीय आकांक्षा जागृत ठेवण्याच्या कामांत उपयोग होतो. ऐतिहासिक विषयांवर तालसुरांत बसविलेले पोवाडे असून त्या पोवाड्यांत पूर्वीच्या काळीं जर्मन्स व राशियन्सबरोबर लढतांनां पोल्स योद्धयांनीं दाखविलेल्या पराक्रमाचें रसभरित वर्णन केलेलें असतें; व त्यांचा श्रोत्यांच्या मनांवर फार मोठा परिणाम होतो. खाजगी किंवा सार्वजनिक सम्मेलनाच्या प्रसंगीं हे पोवाडे गाण्याचा तेथें प्रघात आहे. अशा प्रकारचे पोवाडे हमेशा नवे नवे तयार होत आहेत. पोवाड्यांचीं लहान लहान पुस्तकें छापलीं आहेत व त्यांची किंमतहि अगदीं स्वल्प ठेवण्यांत आली आहे. यामुळें गोरगरिबांच्या घरांत देखील या पुस्तकांचा प्रसार झाला आहे. लोकांनां रुचेल अशा रीतीनें गाण्याची रचना केलेली असते. एखाद्या गोष्टीचा पोल्सच्या मनावर त्वरित परिणाम होतो, अशा प्रकारचा त्यांचा स्वभाव आहे. यामुळें हीं गाणीं गाइलेलीं ऐकलीं म्हणजे त्यांच्या अंगांत विलक्षण स्फूर्ति उत्पन्न होते. पोलिश गद्य ग्रंथांत देखील हाच प्रकार आढळून येतो. ऐतिहासिक विषयांवरील कांहीं कादंबऱ्यांत तर हा प्रकार ओतप्रोत भरलेला आहे.

प्रशियांतील पोल्सपुरताच विचार करावयाचा झाला तर ही गोष्ट आपण विसरतां कामा नये कीं, प्रतिनिधिनियंत्रित राजसत्तेमुळें ब्रिटिश पार्लमेंटचा आयरिश लोकांनां आपल्या कार्याकरतां जसा उपयोग करून घेतां येतो, तसा पोल्सनांहि जर्मन सभांचा उपयोग करून घेतां येतो. प्रशियन डाएटमध्यें व जर्मन राइशटॅगमध्यें, प्रत्येकीं तेरा पोलिश सभासद आहेत. हे सर्व प्रतिनिधि विद्वान, सभाधीट आणि वक्तृत्व-कुशल आहेत. पार्लमेंटांतील पाचपेंच त्यांनां पुरते माहीत आहेत. यामुळें त्यांच्या संख्येच्या मानानें त्यांचें दोनहि सभांत चांगलें वजन

आहे. सरकारनें सुचविलेली पोलिश राज्यव्यवस्था हाणून पाडावयाची आणि पोलिश पुढाऱ्यांचीं कारस्थानें बाहेर काढणाऱ्या सभासदांचा उपहास करावयाचा, हा या प्रतिनिधींचा नेहमींचा क्रम आहे.

प्रशियांतील राजकीय बाबतींत पोलिश धर्मगुरूंचें ( Clergy ) किती महत्त्व आहे याचा आतां आपल्याला विचार केला पाहिजे. या लोकांच्या मनांत प्रशियन सरकाराविषयीं किती द्वेष भरला आहे व त्याला मूळ कारण काय झालें, याचें वर्णन मागें केलेंच आहे. सरकारचा उद्योग एकसारखा असा चालू आहे कीं, पोल्सनां जर्मन बनवून सोडावयाचे. हा उद्देश मनांत धरून पोलिश प्रांतांतून पोलिश भाषा हुसकून लावण्याचे सक्तीचे उपाय त्यांनीं योजिले आहेत. प्रशियांत राजसत्तेचें तेज प्रखर असल्यामुळें इंग्लंडासारख्या राष्ट्राला जे उपाय कधींहि योजतां येणार नाहींत अशा प्रकारचे जालिम उपाय प्रशियन सरकारला तेव्हांच योजतां येतात. आपल्या मायभाषेविरुद्ध प्रशियन सरकारनें जी जुलमाची मोहीम सुरू केली आहे तिच्यायोगानें पोल्स फार खवळून गेले आहेत व हें अगदीं साहजिक आहे. जर्मन भाषेचा आपल्या प्रांतांत शिरकाव न होऊं देण्याची पोल्सची खटपट अव्याहत चालू आहे व तिला धर्मगुरूंनीं दुजोरा दिला आहे. या लोकांचें सामान्य लोकांवर फार मोठें वजन आहे, आणि त्याच्या जोरावर जर्मन भाषा परत पिटाळून लावण्याचे त्यांचे दीर्घ उद्योग चालू आहेत. ते असें म्हणतात कीं, पोलिश घरादारांत किंवा प्रार्थनालयांतील व्यासपीठांवर किंवा न्यायसभांत जर्मन भाषा एकदां अधिष्ठित झाली म्हणजे पोल्सनां जर्मन बनवून सोडण्याच्या सरकारच्या उद्योगांनां यश आलेंच म्हणून समजावें. हें त्यांचें म्हणणें अगदीं यथार्थ आहे असें कोण म्हणणार नाहीं ? आणि त्यामुळें जर्मन भाषेविरुद्ध ते चळवळ करतात याबद्दल त्यांनां नावें तरी कोणाला ठेवतां येतील ?

आणि या खटपटींत त्यांनां खरोखर चांगलें यश येत आहे यांत शंका नाहीं. जर्मन व पोलिश या दोनहि भाषा अवगत असणाऱ्या लोकांनां साहजिकपणें जो द्रव्याचा फायदा झाला असता तो सोडून देण्यास हे सर्व लोक एका पायावर तयार झाले आहेत. ही गोष्ट आपण लक्ष्यांत घेतली म्हणजे पोल्सच्या स्वार्थत्यागाची व तो करावयास लावणाऱ्या धर्मगुरूंची तारीफच केली पाहिजे. पोलिश भाषा झुगारून देणारा पोल देशाचा शत्रु आहे, स्वजातीचा शत्रु आहे, किंवा परकीयांच्या घरांत राबणारा गुलाम आहे, असें कंठरवानें लोकांनां ते सांगत हिंडतात, व लोकांनांहि हें त्यांचें म्हणणें पटल्यावांचून राहत नाहीं; कारण तें तितकें सयुक्तिकच आहे. ही कल्पना लोकांच्या मनांत खोल शिरली असल्यामुळें जर्मन भाषेचा अंगीकार केल्यानें ज्या सरकारी जागा पोल्सनां मिळाल्या असत्या व जे इतर उद्योगधंदे करतां आले असते त्यांनां ते सर्वस्वीं मुकले आहेत.

परंतु आपली व आपल्या मुलाबाळांची पोलिश भाषा कायम राहिली पाहिजे एवढ्यावरच हे लोक संतुष्ट न होतां मागें सांगितलेल्या चार पोलिश प्रांतांतील ( म्हणजे इस्ट प्रशिया, वेस्ट प्रशिया, पोसेन् आणि सायलीशियांतील ) ज्या ज्या भागांत पोल्सची लोकसंख्या अधिक आहे त्या भागांत 'पोलोनायझेशन'चा उद्योग त्यांनीं आरंभिला आहे आणि ह्यांत त्यांनां बरेंच यश येत चाललें आहे. प्रशियन अधिकारी सरकारी आरोग्यखात्याचे नियम चांगल्या तऱ्हेनें अमलांत आणतात व त्यामुळें जर्मन लोकांपेक्षां पोल्सची जन्मसंख्या झपाट्यानें वाढत आहे, व या गोष्टीचा वरील उद्योगाला फार चांगला फायदा मिळूं लागला आहे. खेड्यापाड्यांतच नव्हे तर मोठमोठ्या शहरांत देखील जर्मन्सच्या मानानें पोल्सची संख्या वाढली आहे. पोसेन, नेसेन, ब्राम्बर्ग, थॉर्न वगैरे शहरांत थोड्या वर्षांपूर्वी जर्मन लोकांचा जो वरचष्मा होता तो

वराच कमी होऊन उलट पोल्सच त्यांच्यावर आतां कुरघोडी करूं लागले आहेत, हें ध्यानांत ठेवण्याजोगें आहे.

जर्मनांच्या दृष्टीनें विशेष भयावह जी गोष्ट आहे ती ही कीं, पोलिश प्रांतांतील जर्मन रहिवाशांवर 'पोलोनायझेशन'चा, हळूहळू चांगलाच परिणाम होऊं लागला आहे. हा परिणाम केव्हां केव्हां सरळ तर केव्हां केव्हां विषम मार्गानें साधण्यांत येतो. पोल्स आणि जर्मन्स यांच्यांत घडून येणारे विवाह पूर्वोक्त सरळ मार्गांपैकीं होत व ते सर्वांत विशेष परिणामकारी आहेत. कारण त्यांच्यायोगानें जर्मनांच्या राष्ट्राभिमानाला बहुतेक ग्रहण लागल्यासारखें होतें. सामोपचारानें बधण्याजोगे जे जर्मन नसतात त्यांच्यावर जालिम उपायांचा प्रयोग केला जातो.

पोलिश भाषेवर बहिष्कार घालून पोल्सचा हा उद्योग हाणून पाडण्याचा प्रशियन सरकारनें योजिलेला उपाय कसा निष्फळ झाला, हें मागें सांगितलेंच आहे. याच कारणाकरितां प्रिन्स बिस्मार्कनें "जर्मन कोलोनायझेशन फंडा-"ची आणखी एक युक्ति काढली होती व ती सिद्धीस जाईल असा आरंभाला अजमास होता; परंतु अनुभवान्तीं तीहि सपशेल फसली असल्याचें दिसून येतें. हा फंड वेळोवेळ वाढविण्यांत आला असून, आजला तर जवळजवळ वीस कोटी मार्क्सपर्यंत त्याची मजल गेली आहे. या फंडाचा मुख्य हेतु हा होता कीं, पोलिश प्रांतांत जर्मन लोकांच्या वसाहती स्थापन कराव्या आणि मधमाशांच्या पोळ्याप्रमाणें सर्व मुलुखभर जर्मन लोकांच्या वसाहती पसराव्या. ही युक्ति दिवसानुदिवस जास्तच फसत चालली आहे. "पोलिश प्रांतांत जाऊन तुम्ही वसाहती करा, असें करण्यापासून तुमचा फार फायदा होईल; आम्ही तुम्हांला वाटेल त्या सवलती देऊं," असें प्रशियन सरकारनें लोकांनां आळवून कितीहि सांगितलें तरी ते तिकडे मुळींच लक्ष्य देत नाहींत. कारण, आपण तिकडे गेलों असतां पोल्सच्या जाळ्यांत सांपडल्याशिवाय

राहणार नाहीं अशी त्यांनां भीति वाटते, व ती आतांपर्यंत दिलेल्या माहितीवरून बरीच साधार आहे असें म्हणावें लागतें. याशिवाय त्या फंडाचा दुसरा आणखी एक हेतु होता तो हा कीं, खाजगी रीतीनें किंवा जाहीर लिलावांत आपलीं शेतें किंवा मळे विकण्याचा पोल्सवर प्रसंग आला असतां तीं शेतें आणि ते मळे जर्मन लोकांकरतां विकत घ्यावे; परंतु हा हेतु देखील पोल्स साध्य होऊं देत नाहींत. जर्मन लोकांबरोबर किंमतींत चढाओढ करून आपल्या जातभाईंच्या जमिनी परकी लोकांच्या हातांत ते जाऊं देत नाहींत. यदाकदाचित् त्या जर्मनांच्या हातांत गेल्याच तर त्या माणसांनां आसपासचे लोक अगदीं भंडावून सोडतात. त्यांच्यावर सर्व तऱ्हेनें बहिष्कार घालण्यांत येतो. त्यांनां जमिनींत काम करावयाला मजूर मिळूं द्यावयाचे नाहींत; बाजारांत त्यांनां कोणचाहि जिन्नस मिळूं द्यावयाचा नाहीं; पिकांची व जनावरांची नासधूस करावयाची; एतावता, त्यांनां इतकें भंडावून सोडावयाचें कीं, त्यांनीं आपली जमीन सोडून परत आपल्या मुलखांत चालतें व्हावें. अशा या जाचामुळें लिलावांत कोणीहि जर्मन पोलिश प्रांतांतील जमिनी विकत घ्यावयास सहसा धजत नाहीं, हें अगदीं साहजिक आहे.

पुष्कळ लोकांचा असा समज आहे कीं, पोलिश मुलखांत प्रशियन सरकारनें जुलूम चालविला आहे. कांहीं कांहीं बाबतींत सरकारनें कठोरपणा दाखविला आहे हें खरें, पण त्यावरून लोकांवर तें जुलूम करतें असें मानणें चुकीचें होईल. आतांपर्यंत पूर्ण निःपक्षपातीपणानें आम्हीं वर जी हकीगत दिली आहे तीवरून उलट वाचकांच्या ध्यानांत हें येईल कीं, प्रशियन सरकार हल्लीं जे उपाय योजीत आहे ते केवळ आपल्या बचावाकरतांच योजीत आहे. जर्मन लोकांनीं पोलिश प्रांत जेव्हां आपल्या ताब्यांत घेतले, तेव्हां त्यांचा असा हेतु होता कीं, जर्मन भाषा, जर्मन सुधारणा, जर्मन ध्येयें यांचा पोल्सनां

अंगीकार करावयाला लावावयाचें, आणि जर्मन लोकांच्या नव्या वसाहती स्थापन करून तेथील पूर्वीच्या अल्पसंख्याक जर्मनांचें सामर्थ्य वाढवावयाचें. हल्लीं 'पोलोनायझेशन'चा पोल्सनीं जो उपक्रम चालविला आहे तो तसाच बिनहरकत चालूं दिला, तर वर सांगितलेले जर्मनांचे हेतु सिद्धीस जाण्याची आशा कायमची सोडली पाहिजे. आणि हल्लींची परिस्थिति जर पाहिली तर पोल्सच्या या मार्गांत कोणच्याहि प्रकारची हरकत उपस्थित झाली आहे असें वाटत नाहीं; त्यांचा क्रम कसा सुरळीतपणानें चालला आहे. त्याचा प्रतिबंध कसा करावा हें प्राशियाला सुचेनासें झालें आहे. आपल्या अंगांत विशेष सामर्थ्य आणण्यापुरता पोल्सनीं अवश्य त्या जर्मन सुधारणेचा आश्रय केला. पांचपन्नास वर्षांपूर्वीं पोलिश प्रांतांत जी संपत्ति होती तिच्या चौपट संपत्ति हल्लीं तेथें झाली आहे आणि त्यामुळें तेथील लोकांनां जर्मन बनविणें अधिक कठिण, जवळजवळ अशक्यच, झालें आहे. जर्मन युनिव्हर्सिट्यांत शिक्षण संपादन केलेले व जात्या हुशार अशा पोल्सनीं प्रस्तुतची चळवळ आपल्या हातीं धरली आहे; पोलिश जात, पोलिश भाषा व पोलिश विचारसरणी दृढ करण्याची त्यांची जोराची खटपट चालू आहे, व आपल्या राजकर्त्यांबरोबर दोन हात करण्याचा प्रसंग मागेंपुढें लवकरच प्राप्त होणार आहे, या भावनेनें आपल्या अनुयायांस लष्करी तयारी ठेवण्याविषयीं ते उत्तेजन देत आहेत. प्रशियन सरकारापुढें हा जो महत्त्वाचा प्रश्न उभा राहिला आहे, तो सोडविण्याचा यत्न करणें स्वतःच्या बचावाच्या दृष्टीनें त्यांनां भाग आहे. परंतु तो प्रश्न सोडवितांनां पोल्सनां 'जर्मन्स' न बनवितां 'चांगले पोल्स' बनविण्याकडे विशेष लक्ष्य पुरविलें पाहिजे, असें आम्हांला वाटतें. एका पोलिश सरदारानें या कामांत काढलेले उद्गार फार महत्त्वाचे आहेत. तो म्हणतो:—"प्रशियन सरकार राज्यकारभारांत अतिशय दक्ष, अतिशय व्यवस्थित, व अति-

शय कार्यकुशल आहे; परंतु ज्या लोकांवर तें आपला अम्मल चालवितें त्यांचें आपणावर प्रेम बसेल किंवा त्यांच्या मनांत आपल्याविषयीं विश्वास उत्पन्न होईल, असें वर्तन त्याला करतां येत नाहीं. पोल्सचा समूळ नाश करावयाचा आणि त्यांच्या जागीं जर्मन आणून बसवावयाचें, असा त्यांचा घातुक क्रम चालू आहे." या म्हणण्यांत बरेंच तथ्य आहे, आणि पोल्सनां संतुष्ट राखावयाचें झालें तर त्यांच्याशीं दांडगाई किंवा त्यांचा उपमर्द न करतां सामोपचारानें त्यांच्यांशीं वागलें तरच प्रशियाला यश मिळण्याचा संभव आहे.






Printed by A. C. Bhat in "Yeshavant" Press (Poona) for The Printing Agency (Poona) and Published by N. K. Agashe at Satara.

# शुद्धिपत्र

☞ क्वचित् कानामात्रा उडाली असल्यास तशा स्थळांचा समावेश येथें केलेला नाहीं.

| पृष्ठ–पंक्ति | शुद्ध | पृष्ठ–पंक्ति | शुद्ध |
|---|---|---|---|
| ११–१७ | for ever | १२९–२४ | वाढल्या |
| २८–८ | यांची | २३४–२४ | clothes |
| ६३–१६ | संस्थांत | २८०–३ | बर्नहार्ड |
| ९१–१६ | जास्त | २९४–१८ | Baron |
| ९६–२५ | इंटीरीअर | ३३५–७ | हरत्यू |
| १०३–१७ | काव्याचा | ३३९–१८ | Seems |



